# उद्यांचें शिक्षण

न्यू इंग्लिश स्कूलच्या हीरकमहोत्सवानिमित्त प्रसिद्ध झालेला
शिक्षणविषयक ग्रंथ

संपादक :

परशुराम महादेव लिमये,
फर्ग्युसन कॉलेज, पुणें

विनायक विष्णु देशपांडे,
हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस

१ जानेवारी १९४०

किंमत ३ रुपये

# आरंभींचे चार शब्द

बरोबर साठ वर्षांपूर्वी ह्या दिवशीं कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लो. टिळक, आगरकर आणि नामजोशी यांच्या साहाय्यानें न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना मोरोबादादा फडणिसांच्या वाड्यांत केली. आपल्या प्राचीन परंपरे-प्रमाणें राष्ट्राचें शिक्षण स्वार्थत्यागपूर्वक चालवलेल्या खाजगी संस्थांच्या हातांत असावें या तत्त्वाच्या पुरस्काराकरितां कै. शास्त्रीबुवांनीं आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें हा एक मोठाच प्रयत्न केला; व तो इतका यशस्वी ठरला कीं, केवळ महाराष्ट्रभरच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानांत न्यू इंग्लिश स्कूल आणि डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या धर्तीवर शेंकडों शिक्षणसंस्था निर्माण झाल्या आणि प्रायशः त्यांतूनच येथील गेल्या दोनतीन पिढ्यांचें शिक्षण झालें आहे. सर-कारी शाळा आतां प्रत्येक जिल्ह्याचे ठिकाणीं सुद्धां हमखास शिल्लक राहिलेली नाहीं. अशा रीतीनें न्यू इंग्लिश स्कूल ही देशांतील खाजगी शिक्षणसंस्थांची जननी असून तिचे ऋण सर्व महाराष्ट्रावर आहे.

सध्यां वर्धाशिक्षण-योजना प्रसिद्ध झाल्यापासून शिक्षणाच्या क्षेत्रांत मोठी क्रांति घडून येऊं पाहत आहे व शिक्षणविषयक निरनिराळ्या प्रश्नांचा ऊहा-पोह फार मोठ्या प्रमाणावर सभा-संमेलनादिकांच्या द्वारा सर्वत्र सुरू आहे. याच वेळीं शाळेचा हीरकमहोत्सव पडत असल्यामुळें जाणिक विद्वानांच्याकडून निरनिराळ्या शिक्षणासंबंधींच्या विषयांवर निबंध लिहवून घेऊन त्यांचा एक ग्रंथ शाळेस व तिच्या आद्य संस्थापकांना त्यांच्या महाराष्ट्रावरील ऋणाचें स्मरण म्हणून अर्पण करावा ह्या प्रश्नास महोत्सवमंडळाच्या माजी विद्यार्थ्यांच्या कार्यकारी समितीकडून चालना मिळाली. आज जे प्रश्न विशेष जोरानें चर्चिले जातात त्यांची प्रथम एक स्थूल यादी करण्यांत आली व त्या त्या प्रश्नांवर ज्यांनीं ज्यांनीं विशेष लक्ष घालून विचार केला आहे अशा विद्वान् मंडळींना लेख लिहिण्याबद्दल विनंति करण्यांत आली. लेखकांना लेख तयार करण्यास अवधि अत्यंत थोडा दिला. परंतु त्याबद्दलच्या दोषाची सर्व जबाबदारी

समितीचीच आहे, लेखकांची नाहीं. बलिप्रतिपदेच्या दिवशीं म्हणजे सुमारें पावणेदोन महिन्यांपूर्वी प्रथमच लेखकांच्याकडे विनंतिपत्रकें धाडलीं गेलीं व त्यामुळें वेळेवर लेख येतील कीं नाहीं याबद्दल समितीस फार शंका वाटत होती. परंतु शाळेचें पुण्य इतकें आहे कीं, बहुतेकांनी विनंति मान्य करून इतर कामांची निकड असतांहि वेळेवर लेख पाठविले. अर्थात् कित्येकांच्या बाबतींत ही मुदत अपुरी पडली व त्यामुळें पुणें विद्यापीठाचा प्रश्न, मातृभाषेचें स्थान, शिक्षणाची आर्थिक किंमत, महाराष्ट्रास योग्य औद्योगिक शिक्षण, अशांसारख्या महत्त्वाच्या प्रश्नांवरील लेखांस हा ग्रंथ आंचवला आहे.

या पुस्तकांत शिक्षणाविषयक सर्व प्रश्नांचा सांगोपांग विचार होणें शक्यच नव्हतें. शाळेवरील प्रेमानें निरनिराळीं विद्वान् मंडळी फुटकळ विषयांवर लेख लिहिणार त्यांत कांहीं ठिकाणीं द्विरुक्ति तर कांहीं ठिकाणीं अभाव हा राहावयाचाच; परंतु समितीनें पुस्तक शक्यतोंवर पूर्णव्याप्त करण्याचा प्रयत्न केला आहे. आणि जर वेळेची अडचण नसती तर समितीस बहुतेक संपूर्ण यशहि आलें असतें, हें आज प्रत्यक्ष प्रसिद्ध झालेल्या निबंधांच्या विविधतेकडे आणि वैचित्र्याकडे पाहिल्यास कोणाच्याहि लक्षांत येईल.

पुस्तकाच्या पहिल्या भागांत एकंदर २९ निबंध आले आहेत. त्यांचे स्थूल मानानें दोन पोटविभाग पडतात. सर्व समाजास साक्षर करून देशामधील सर्व मुलांना मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण मिळावें अशासाठीं हल्लीं जे सार्वत्रिक प्रयत्न सुरू आहेत त्यांचे प्रातिनिधिक म्हणून सुमारें ९।१० लेख आले आहेत. सासवडचे आचार्य भागवत यांच्या म० गांधीप्रणीत वर्धा-शिक्षण-योजनेवरचा लेख वाचकांस मूलग्राही वाटेल. ग्रामीण शिक्षणावर प्रो. सबनीस व नागपूरकर यांचे लेख सूचक आहेत. सेवक सेवानंदांनीं आपल्या लेखांत आपले स्वानुभवाचे बोल ओतले आहेत. नागरिक शिक्षण हा पुस्तकांतील पहिला श्री. तात्यासाहेब केळकर यांचा लेख उद्बोधक वाटेल. राष्ट्रभाषेचें स्थान या विषयावरील प्रि. कानेटकर यांचा लेख विद्वत्तापूर्ण असून हिंदी हीच एकमेव राष्ट्रभाषा होण्यास लायक आहे हा त्यांचा सिद्धान्त मान्य होण्याजोगा आहे. दुसरा विभाग शिक्षणासंबंधीं. ह्यामध्यें अनेक विषयावर १०।१२ च्यावर लेख आलेले आहेत. शाळांतून धार्मिक शिक्षण द्यावें का न द्यावें ह्या सध्यां वाद-

ग्रस्त झालेल्या विषयावर प्रि. गोखले व प्रो. वा. म. जोशी ह्या दोघां विद्वानांचे मुद्दाम दोन लेख घेतले आहेत. हल्लींच्या शिक्षणासंबंधीं पालकांची दृष्टि व समाजाची अपेक्षा यावरहि दोन स्वतंत्र लेख आले आहेत. विद्यार्थी-जीवना-वरील डॉ. घारपुरे यांच्या लेखामध्यें आलेले विचार विद्यार्थ्यांस आपली राष्ट्रीय कर्तव्यें करण्यास उद्युक्त करतील असा भरंवसा वाटतो. श्री. किंकर यांचा लेख ज्याप्रमाणें खाजगी शिक्षण-संस्थांच्या मार्गांतील अडचणींचें दिग्दर्शन करतो त्याचप्रमाणें त्यांच्यामार्फत शिक्षणाची झालेली प्रगतीहि दर्शवितो. शारीरिक व सैनिक शिक्षणावरील लेख परस्परांना पूरक असे वाटतील. प्रो. माधवराव परांजपे यांनीं आतां यापुढें मराठी हायस्कूलें काढण्याची आवश्यकता प्रति-पादिली आहे. तर भारत महिला विद्यापीठानें आंखलेलाच शिक्षणक्रम स्त्रियांच्या शिक्षणास कसा अत्यंत उपयोगी आहे हें त्या विषयावरील लेखाच्या वाचनानें वाचकांच्या लक्षांत घेईल. श्री. गो. म. जोशी यांचा लेख व्यासंगपूर्ण व माहितीनें भरलेला असा उतरला आहे. त्यांनीं आपल्या दृष्टीनें सहशिक्षणाच्या दोन्ही बाजू मांडण्याचा प्रयत्न केला आहे. प्रो. चापेकरांचाहि लेख वाचकांस उद्बोधक वाटेल. सरकारी शाळांचा इतिहास, सरकार आणि शिक्षण इत्यादि कांहीं लेख जरी वरील दोन्ही पोट-विभागांत समाविष्ट होऊं शकले नाहींत तरी त्यांचें महत्त्व उघड आहे. श्री. बोकील यांचा लेख महत्त्वाच्या माहितीनें संपूर्ण भरलेला आहे. तर प्रो. दातार यांनीं शिक्षणक्षेत्रामधील सरकारच्या अधिकारमर्यादेची केलेली तात्त्विक छाननी आजच्या कालांत पुष्कळांना मार्गदर्शक होईल. श्री. नारळकर यांनीं सवड नसतांहि अतिशय अडचण सोसून दुय्यम शिक्षणास जरूर असणारी सर्व अंगोपांगें 'उद्यांच्या शिक्षणांत' कशा रीतीनें सजविली पाहिजेत याचें विवेचन करणारा हा उत्कृष्ट लेख लिहून दिला आहे.

येथें लेखांचा व लेखकांचा उल्लेख फक्त दिग्दर्शनापुरता केला आहे. पुस्तकांतील सर्वच लेख महत्त्वाचे आणि उत्कृष्ट असे वठले आहेत.

गेल्या साठ वर्षांत न्यू इंग्लिश स्कूलनें निरनिराळे शिक्षणविषयक प्रश्न हातीं घेऊन त्यासंबंधीं शाळेमध्यें प्रत्यक्ष प्रयोग करून काय अनुभव मिळविले यांचा त्रोटक अहवाल याच पुस्तकांत दुसऱ्या भागामध्यें दिला आहे.

त्यांमध्यें निरनिराळ्या ८।१० प्रयोगांबद्दल माहिती आली आहे; ती माहिती व त्यापेक्षांहि शेवटीं जी कोष्टकें व आंकडे दिले आहेत ते अत्यंत महत्त्वाचे आहेत. पुस्तकांत लेखकांचे फोटो समाविष्ट करण्याची इच्छा होती; परंतु सर्वांचे ब्लॉक वेळेवर येऊं न शकल्यामुळें ती योजना रद्द करावी लागली. असो.

शेवटीं आभारप्रदर्शनाचें कर्तव्य राहिलें. सर्व लेखकांचे आम्ही फार ऋणी आहोंत. स्थलाभावामुळें व कालाभावामुळें ज्यांचे लेख समाविष्ट करतां आले नाहींत अशांची आम्ही मनःपूर्वक क्षमा मागतों. राजगुरु छापखान्याचे मालक श्रीयुत बापूराव राजगुरु यांनी ग्रंथप्रकाशनाची आर्थिक जबाबदारी सर्वस्वीं आपल्या शिरावर घेऊन समितीला अत्यंत उपकृत केलें आहे. त्यांच्या औदार्ययुक्त धाडसामुळें या ग्रंथाची कल्पना मूर्तस्वरूपांत येऊं शकली. पंधरा दिवसांचे आंत हें पुस्तक इतक्या सुबक स्वरूपांत छापून राजगुरु छापखान्यानें आपली कार्यक्षमता पटवून दिली आहे. लेख तपासण्याचे बाबतींत व कच्चीं मुद्रितें पाहण्याचे बाबतींत पर्सनल प्रेस सर्व्हिसचे चालक श्रीयुत ना. तु. ठाकूर यांची बहुमोल मदत झाली आहे. न्यू इंग्लिश स्कूलसंबंधीं दुसऱ्या भागांत आलेली माहिती संकलित करण्याची जबाबदारी सुपरिंटेंडेंट प्रो. कुंभार व असिस्टंट सुपरिंटेंडंट श्रीयुत चितळे यांनीं पार पाडली. शाळेच्या शिक्षकवर्गापैकीं श्री. गोंधळेकर, भागवत, सहस्रबुद्धे आंबर्डेकर प्रभृतींचे परिश्रमहि उल्लेखिले पाहिजेत. या सर्व मंडळींचे समितीतर्फे आम्ही उभयतां मनःपूर्वक आभार मानतों.

अशा प्रकारें हीरकमहोत्सवाचा एक अंगभूत भाग म्हणून हातीं घेतलेलें काम थोड्या वेळांत शक्य तितक्या चांगल्या प्रकारें पार पाडण्याचा प्रयत्न केला आहे. तो शिक्षणप्रेमी जनतेनें गोड करून घ्यावा अशी विनंति करून निरोप घेतों.

न्यू इंग्लिश स्कूल, पुणें.
१ जानेवारी १९४०
मार्गशीर्ष व. ७, श. १८६१

प. म. लिमये
त्रि. वि. देशपांडे

# समर्पण

ज्या शिक्षणसंस्थेनें

महाराष्ट्रभरच काय किंबहुना अखिल हिंदुस्थानांत

खाजगी संस्थांच्या द्वारें

जनतेस शिक्षण देण्याच्या पवित्र कार्याचें रोप लावलें

व गेल्या साठ वर्षांत त्याचा विशाल वृक्ष बनविला

त्या

**न्यू इंग्लिश स्कूल, पुणें**

ह्या शाळेस तिच्या

**हीरकमहोत्सव-प्रसंगीं**

हा शिक्षणविषयक ग्रंथ माजी विद्यार्थ्यांनीं

आदरपूर्वक अर्पण केला आहे.

# अनुक्रमणिका

## भाग १ ला

# उद्यांचें शिक्षण

## नागरिक-शिक्षण

लेखकः—न. चिं. केळकर

पुणें न्यू इंग्लिश स्कूलच्या हीरकमहोत्सवानिमित्त एक ग्रंथ निघणार त्यांत 'नागरिक-शिक्षण' या विषयावर एक लेख लिहिण्याविषयीं मला सांगण्यांत आलें. त्याप्रमाणें या विषयावर सुचणारे चार शब्द लिहितों.

चिपळोणकर, टिळक, आगरकर, नामजोशी यांनीं न्यू इंग्लिश स्कूल काढलें तें 'शिक्षण' देण्याकरितां काढलें. यांत शालेपयोगी शिक्षण हें अर्थातच प्रथम जमेस धरलें होतें. परंतु तें शिक्षण देणें एवढाच या नवीन उपक्रमाचा हेतु नव्हता. मुलांना शिक्षण द्यावयाचें तें त्यांना पुढें आपला संसार, चरितार्थ स्वावलंबनानें चालवितां यावा याकरितां तर द्यावयाचेंच, पण त्या शिक्षणाचा उपयोग भावी पिढ्यांना, देशाला, राष्ट्राला, समाजाला व्हावा हा हेतु गर्भित असला तरी होताच होता.

मुलांना शिक्षण मिळतें तें तीन ठिकाणीं मिळतें. एक स्वतःच्या घरांत आईबापांकडून, दुसरें शाळेंत शिक्षकांकडून, व तिसरें घराबाहेर, शाळेबाहेर म्हणजे समाजांत पुढाऱ्यांकडून. या तीन ठिकाणच्या शिक्षणाला 'नागरिक-शिक्षण' हें नांव सामुदायिकपणें देणें योग्य होईल. तथापि 'नागरिक' या शब्दाची व्याप्ती थोडी स्पष्ट करून सांगणें इष्ट आहे.

नागरिक म्हणजे 'नगर'चा रहिवासी आणि 'नगर' म्हणजे सामान्यतः राहण्याचें ठिकाण. हें ठिकाण खेड्यापासून राजधानीपर्यंत लहानमोठें असूं शकतें. तथापि 'नगर' हा एक शब्द घेतला तर तो या सर्व ठिकाणांचा प्रतिनिधि होऊं शकेल. वास्तविक 'नगर' हा शब्द उच्चारला म्हणजे बऱ्याच

मोठ्या अशा शहराची कल्पना येते. परंतु अशा शहरांत राहणारे तेवढेच जर नागरिक तर मग इतर कोण? याचा खुलासा असा कीं खेड्यांत राहणारा हाहि राजधानींत राहणाराप्रमाणें आपआपल्या परीनें नागरिकच असतो. या दृष्टीनें नगराची व्याप्ती राष्ट्रापर्यंत होऊं शकतें.

आज कोणतेंहि नगर किंवा गांव अगदीं स्वयंपूर्ण स्वतंत्र व स्वावलंबी असूं शकत नाहीं. उत्पादनाच्या दृष्टीनें त्याचा संबंध खालीं खेड्यांतील शेतीपर्यंत पोंहोचतो, तर संकीर्ण राज्यकारभाराच्या दृष्टीनें त्याचा संबंध प्रांताचें किंवा देशाचें वरिष्ठ सरकार राहणाऱ्या राजधानीपर्यंत पोंहोचतो.

मग 'नागरिक-शिक्षण' द्यावयाचें त्याची व्याप्ती कोणती? याचें उत्तर असें कीं 'नागरिक-शिक्षण' हें स्थलव्याप्तीवर अवलंबून नाहीं; कारण नागरिक-शिक्षण म्हणजे सामान्यतः समाजांतील सर्व मनुष्यांचें परस्पर हक्क, त्यांचीं कर्तव्यें, व त्या दोहोंवर आधारलेले संबंध याचें शिक्षण असाच करावा लागतो. या हक्कांच्या दृष्टीनें खेडें, नगर व राष्ट्र यांत फरक होऊंच शकत नाहीं. म्हणून नागरिक-शिक्षणाची योजना करावयाची तर ती हे हक्क, हीं कर्तव्यें व हे संबंध, यांचें शिक्षण देण्याविषयीं करावयास पाहिजे.

प्रथम सांगितल्याप्रमाणें हें शिक्षणहि थोडें फार कांहीं घरच्या घरीं, कांहीं थोडें शाळेंत, व कांहीं समाजांत मिळणारें आहे. पैकीं घरचें शिक्षण असें अलीकडे फार थोडें उरलें आहे. कारण मुलांना शिक्षण देण्याची, वळण लावण्याची, जबाबदारी पालकांनीं शिक्षकांवर टाकल्यासारखी आहे, व ते स्वतः-च्या जबाबदारींतून सुटूं पाहत आहेत. त्यांचे इतर व्याप व चिंता लक्षांत घेतां त्यांनीं या सवलतीची अपेक्षा करावी हें स्वाभाविकच आहे.

घरांतील शिक्षणापेक्षां शाळेंतील शिक्षणाचें क्षेत्र मोठें. तेथें ज्ञान-विज्ञानाचे सर्व विषय थोडे थोडे शिकविले जातात. तथापि तिथल्या शिक्षणांत एक उणीव ही कीं, गुरु व शिष्य यापुरताच मनुष्यामनुष्यांचा संबंध येतो. पण मनुष्याचें खरें जीवन घराबाहेर, शाळेबाहेर, एकंदर समाजांतील मनुष्यांबरोबर वागण्यांतच अनुभवास येतें. अलीकडे शाळेंत धर्म-शिक्षण असें कांहीं दिलें जात नाहीं; आणि सामाजिक शिक्षण द्यावयाचें तर शाळेंत मुलांचा एकजिनसी जमाव नसतो यामुळें भानगडीचे सर्व प्रश्न टाळून उरेल तेवढेंच शिक्षण शाळेंत देतां येतें. पण खऱ्या भानगडी बाहेरच्या मोठ्या समाजांत वागतांना उत्पन्न होतात.

याचा अनुभव हल्लीं चाललेल्या राष्ट्रीय राजकारणाच्या चर्चेंत येतच आहे. तो असा कीं, राष्ट्रीय समाजांत अनेक जातींचे, धंद्यांचे, संस्कृतींचे, धर्मांचें, संप्रदायांचें व भाषांचे असे निरनिराळे लोक आहेत. त्यांच्या हिताची तोंडमिळवणी कशी करावयाची? ही मिळवणी करण्याचें खरें साधन मनुष्याचें <u>सामाजिक मन.</u> तें जितकें मोठें व सहिष्णु असेल तितक्या ह्या भानगडी कमी येतील. उलट तें जितकें कृपण व संकुचित असेल तितक्या या भानगडी वाढतील. पण व्यक्तिशः मनुष्याचें मन कृपण व संकुचित असलें तरी, समाजाच्या सामुदायिक हिताकरितां, त्यानें सक्तीनें व कायद्याच्या जुलमानें का होईना, पण स्वतःच्या अंगीं वागणुकीच्या कोणत्या संवयी व वळणें लावून घेतलीं पाहिजेत याचा विचार मुख्यतः नागरिक-शिक्षणांत येतो.

माझ्या मतें हें व्यापक शिक्षण शाळेंतील शिक्षणांत फारसें देतां येणार नाहीं. क्रमिक पुस्तकांच्या धड्यांत कांहीं धडे अशा विषयांवर घालतां येतील. परंतु नागरिक-शिक्षण हा विषय एवढा मोठा आहे कीं त्याचा स्वतंत्र सांगोपांग शिक्षणक्रमच बनूं शकेल. म्हणून तें शिक्षण देण्याची कांहीं तरी वेगळी व समांतर व्यवस्था झाली पाहिजे.

पुण्यांतील लॉ कॉलेजचे प्रिन्सिपल श्री. घारपुरे यांनीं लॉ कॉलेज स्थापन करतांना फार मोठी जमीन सोसायटीच्या मालकीची केली. त्या वेळीं त्यांनीं असें जाहीर केलेलें आठवतें कीं या जागेंत पुढें-मागें 'नागरिक-शिक्षणाची शाळा' काढली जाईल. आतां ती कल्पना अद्यापि अनुभवांत उतरली नाहीं. परंतु ती पुढें-मागें केव्हां तरी कोणी तरी अमलांत आणावी असें निश्चित वाटतें.

अशा शाळेचा विद्यापीठाशीं संबंध येणें शक्य नाहीं. या शिक्षणाचा शेवट एखाद्या पदवीदानानें होईल असेंहि नाहीं. पदवी प्रशस्तिपत्रें यांचा संबंध नसलेलें असें पुष्कळ शिक्षण समाजांत नित्य दिलें जात असतें. तेंच संघटित अभ्यासक्रमाच्या रूपानें द्यावें ही पुढची पायरी ठरते.

हें संकीर्ण शिक्षण, उदाहरणार्थ, वर्षभर चालू असलेल्या व्याख्यान-सत्रांतून मिळत असतें. पुण्यास १०।२० संस्था अशा आहेत कीं त्यांच्या

विद्यमानें व्याख्यानें होत असतात. हीं एका अर्थानें नागरिक-शिक्षणाचींच व्याख्यानें होत. परंतु या प्रत्येक संस्थेच्या कार्यक्रमाचें एक एक अंग असें निवडून काढतां येईल कीं त्याचें शिक्षण देणारा असा अभ्यासक्रम होईल व तो पुरा करणारी शाळा होऊं शकेल. अशा शाळेंत शिक्षण देण्याची पात्रता असलेले आईबाप, शाळेंतील शिक्षक, व स्वतंत्र नागरिक हेहि भाग घेऊं शकतील.

या शिक्षणांत खाजगी घरांतील आरोग्यापासून समाजांतील सर्वांगीण आरोग्यापर्यंत शिक्षणाचा समावेश होईल. विशेषतः प्रत्येकाला आपले सामाजिक व राजकीय अधिकार काय आहेत हें नीट समजावें व त्याबरोबरच दुसऱ्याचे हक्क काय आहेत हेंहि समजावें याचें शिक्षण देणें फार महत्त्वाचें आहे. येथें कृपण मनें उदार करणें, त्यांना व्यापक विचार करण्यास शिकविणें, हेंच मुख्य शिक्षण होईल. कारण अशा व्यापक दृष्टीशिवाय राष्ट्राची कल्पना येऊं शकत नाहीं. आणि राष्ट्राची नाहीं म्हणजेच नागरिकाची नाहीं.

व्यक्तिशः मनुष्य व त्याचा देश किंवा राष्ट्र यांचा संबंध इतका जिव्हाळ्याचा आहे कीं त्यांचें वेगळें अस्तित्व मानतां येत नाहीं. आणि ही राष्ट्रजीवनाची कल्पना लहान किंवा प्रौढ मुलांच्या मनांत जितक्या आधींपासून भरवितां येईल तितकी चांगली. यासंबंधानें माझ्या "तरुण हिंदु नागरिक" या पुस्तकांत ग्रीक तत्त्ववेत्ता सॉक्रेटीस याचा एक उतारा मीं घेतला आहे तो येथें घेऊन हा लेख संपवितों.

"आपल्यापेक्षां व आपल्या पूर्वजांच्यापेक्षां आपल्या देशाचें महत्त्व अधिक आहे असें मनुष्याला वाटलें पाहिजे. सुज्ञ माणसें ही गोष्ट मानतीलच, पण ईश्वराघरींहि ही रुजू होईल यांत शंका नाहीं. आपण देशावर प्रेम केलें तर देशहि आपणावर प्रेम करील. देश आपणावर जर रागावला तर आपण त्याचें सान्त्वन समाधान केलें पाहिजे. विनयभावानें आदरानें त्याची प्रार्थना केली पाहिजे. आणि जर आपणाला त्याचें मन वळवितां आलें नाहीं तर त्याची आज्ञा बिनतक्रार पाळली पाहिजे. त्यानें आपणाला शिक्षा केली तर निमुटपणें ती सोसली पाहिजे. त्याच्याकरितां रणांगणावर जाऊन जखमी झालें पाहिजे व मृत्यूचाहि स्वीकार केला पाहिजे. तसेंच न्यायकोर्टें किंवा राज्यकारभाराचें इतर कोणतेंहि स्थान

या ठिकाणीं देशाची आज्ञा मानली पाहिजे. आईबापांना अपकार करणें हें जर वाईट तर आपल्या देशाला राष्ट्राला अपकार करणें त्याहून वाईट."

असो. नागरिक किंवा राष्ट्रीय मनुष्य म्हटला म्हणजे त्याचीं मुख्य कर्तव्यें काय याचें उत्तम दिग्दर्शन वरील उताऱ्यांत आढळेल. राष्ट्र व त्यांतील प्रजा यांचें नातें व्यक्त करणारा सर्वांत उत्तम शब्द म्हटला म्हणजे 'नागरिक' हा होय. 'नागरिक' या सुट्या शब्दामध्यें एकेरी व्यक्तीची कल्पना येतेच, पण नगराचीहि कल्पना राष्ट्राचीहि कल्पना तो शब्द उच्चारल्याबरोबर येते ही गोष्ट महत्त्वाची आहे. 'नगर' हा एकेरी व्यक्ति व सामुदायिक राष्ट्र यांच्या दरम्यान असून व्यवहाराला अतिशय सोयीचा असा घटक आहे. पिंड-ब्रह्मांड भाषेनें बोलवयाचें तर, या नव्या युगांत, राष्ट्ररूपी ब्रह्माचा अंतिम पिंड हा सुटा—एकेरी प्रजाजन नसून 'नगर' हाच ठरतो. 'नागर' म्हणजे सुशिक्षित, सुसंस्कृत असा अर्थ आहे याचें कारण हेंच कीं राष्ट्रांतील सर्वोत्तम शिक्षण किंवा संस्कृति नगरांतच पहावयास सांपडते.

शेवटीं एकच सांगावयाचें कीं हें 'नागरिक-शिक्षण' देण्याची स्वतंत्र व समांतर योजना झाली पाहिजे असें म्हटलें याचें कारण सांगतों. हल्लीं शाळेला जाणारीं मुलें पुस्तकें व वह्या यांच्या भारानें इतकीं आधींच भारावलेलीं दिसतात कीं, 'नागरिक-शिक्षणा'सारख्या अत्यंत उपयुक्त अशा शिक्षणाप्रीत्यर्थहि एखादें आणखी पुस्तक व वही यांचें ओझें त्यांवर टाकणें हा शुद्ध निर्दयपणा वाटतो. म्हणून शिक्षणाचा पर्याय जो खेळ त्याचें स्वरूप देऊन 'नागरिक-शिक्षण' पदरांत कसें पाडावें हें शिकविणारा एखादा प्रतिभासंपन्न पुढारी मिळाला तर हवा आहे!

---

# राष्ट्रभाषेचा प्रश्न



लेखकः—गंगाधर गोविंद कानेटकर

प्रस्तुत लेखकास न्यू इंग्लिश स्कूलचा विद्यार्थी होण्याचें भाग्य कधीं लाभलें नव्हतें. तथापि या संस्थेनें ज्याला जन्म दिला त्या फर्ग्युसन कॉलेजचा एक माजी विद्यार्थी व डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा एक ऋणानुबंधी या नात्यानें न्यू इंग्लिश स्कूलच्या हीरकमहोत्सव-प्रसंगीं संस्थेस अर्पण केल्या-जाणाऱ्या ग्रंथांत एका प्रचलित महत्त्वाच्या विषयावर दोन शब्द लिहिण्याचें धाडस मी करीत आहे.

(२) हिंदुस्थान हें एक राष्ट्र आहे का राष्ट्रसंघ आहे हा प्रश्न, मला वाटतें, अद्यापहि सुटलेला नाहीं. तथापि गेल्या अर्धपाऊण शतकांत राष्ट्रीयत्वाच्या भावनेची बरीच वाढ आपल्या देशांत झाली आहे व राष्ट्रीयत्वाला आड येणाऱ्या गोष्टींना शक्य तितकें बाजूस सारून आपण राष्ट्रीय ऐक्यभावनेची जोपासना केली पाहिजे अशी तीव्र इच्छा सर्व विचारी लोकांच्या मनांत जागृत झाली आहे. एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेला एकछत्री राजसत्ता, एकधर्म व संस्कृति, व एकभाषा हीं अगदीं अनिवार्य नसलीं तरी अत्यंत उपयुक्त अंगें आहेत यांत शंका नाहीं. दैवयोगानें सध्यां एकछत्री अंमल आपल्या देशावर आहे. परंतु धर्म, संस्कृति व भाषा यांचें ऐक्य मात्र नाहीं. येवढ्या मोठ्या खंडप्राय देशांत एकधर्म व एकभाषा असावी अशी अपेक्षाहि करणें धाडसाचें होईल. तथापि हे धर्मभेद व भाषाभेद शक्य तितके कमी करून देशांतील भिन्नभिन्न लोकसमूहांमध्यें परस्परांविषयीं अधिकाधिक स्नेहभाव व आत्मीयता उत्पन्न व्हावी अशाविषयीं सांप्रत जे यत्न सुरू आहेत त्यांतच राष्ट्रभाषेचा प्रयत्नहि मोडतो.

राष्ट्रीय चळवळीचीं सूत्रें महात्मा गांधींच्या हातीं गेल्यापासून या प्रयत्नाला जोर चढला. "मेरे लिये राष्ट्रभाषा का सवाल, राष्ट्रीय स्वातंत्र्य का सवाल है" असें म्हणून महात्माजींनीं राष्ट्रभाषाप्रचाराचें निशाण इंदूर येथील हिंदी साहित्य-संमेलनाच्या प्रसंगीं उभारलें व त्यानंतर त्यांच्या प्रेरणेनें व उत्तेजनानें दक्षिण-

भारतासारख्या अनार्य—असंस्कृतोद्भव—भाषाभावी प्रांतामध्येंदेखील हिंदी प्रचाराचें केवढें अवाढव्य कार्य झालें हें सर्वांना माहीत आहे. सार्वजनिक सभांतून शक्य तोंवर हिंदुस्तानीच बोलावयाचें असा निश्चय महात्माजींनीं केला; राष्ट्रसभेचे सर्व व्यवहारहि हिंदींतूनच चालावे असें ठरलें.

या सर्व प्रयत्नांनीं राष्ट्रभाषा-प्रचारास बराच जोर चढला हें खरें असलें तरी, या प्रयत्नास सरकारी पाठिंबा नव्हता तोंपर्यंत हिंदी किंवा हिंदुस्थानी भाषेच्या प्रचाराचें काम धीरेधीरेच चाललें होतें. पण इ. स. १९३७ च्या जुलईत सात व पुढें आठ प्रांतांत कॉंग्रेस सरकारचा अंमल जारी झाल्यावर मात्र या प्रचारास राजाश्रय मिळाला व गेल्या दोन सव्वादोन वर्षांत या सर्व प्रांतांत हिंदुस्थानी भाषा शाळांतून सक्तीनें शिकविली जाण्याची तजवीज झाली; व हिंदुस्थानी तालीमी संघाच्यामार्फत या सर्व कार्यास व्यवस्थित व एकसूत्री करण्याचें कार्य सुरू झालें. चालू युद्धाच्या परिस्थितीमुळें कॉंग्रेसनियुक्त सरकारें जरी तूर्त लुप्त झालीं आहेत तरी त्यांनीं आंखलेलें धोरण व घालून दिलेली शिस्त यांत आपण होतांहोईतों फरक करणार नाहीं असें इंग्रज सरकारनें आश्वासन दिलें असल्यानें चालू व्यवस्था बहुधा चालू राहील असा तर्क होतो. व याच अंदाजानें राष्ट्रभाषा प्रचार व त्याच्या प्रस्तुतच्या पद्धति याविषयीं पुढील दोन विचार वाचकांपुढें मांडले आहेत.

( ३ ) हिंदुस्थानची राष्ट्रभाषा इंग्रजी असावी कीं हिंदीसारखी एखादी देशी भाषा असावी या मुद्द्यावर आतां फारसा मतभेद राहिला असेल असें वाटत नाहीं. राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा लाभ पूर्णपणें पदरांत पडेपर्यंत इंग्रजीला एक तऱ्हेचें राजनैतिक महत्त्व राहणारच व साहजिकच तिच्या अध्ययनाला इतर स्वतंत्र सुधारलेल्या राष्ट्रांत जें महत्त्व दिलें जातें त्यापेक्षां हिंदुस्थानांत अधिक मानाचें स्थान मिळत राहणार. परंतु स्वातंत्र्यलाभानंतरहि एक अत्यंत संपन्न व प्रगत भाषा व आंतरराष्ट्रीय व्यवहाराचें एक उत्कृष्ट साधन या दृष्टीनें इंग्रजीचें अध्ययन बऱ्याच दूरच्या भविष्यकालीं देखील— थोड्या लोकांना तरी— आवश्यक समजलें जाईल यांत शंका नाहीं. म्हणून प्रस्तुत तरी इंग्रजी भाषेच्या अध्ययन-अध्यापनाकडे आपण दुर्लक्ष करणें इष्ट नाहीं. येवढी कबुली दिल्यानंतरहि असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं कीं, इंग्रजी ही हिंदुस्थानची राष्ट्रभाषा होऊं शकत नाहीं. एक तर ती हिंदुस्थानांतील कोणत्याहि भाषेशीं

मिळती-जुळती नसून अत्यंत भिन्न, परकी आहे. तिची बनावट व तिचा ढंग हीं अगदीं वेगळीं आहेत. यामुळें आपल्यांतील अत्यंत बुद्धिमान् व दीर्घकाल व्यासंग केलेल्या अशा अल्पसंख्य विद्वानांखेरीज इतरांस त्या भाषेच्या द्वारें आपलें मनोगत सहज व स्पष्ट रीतीनें व्यक्त करतां येत नाहीं. मग तींत सुंदर व भावपूर्ण वाङ्मय निर्माण करण्याची गोष्ट तर दूरच ! पण हिंदुस्थानांतील अत्यंत कठीण भाषा देखील आपणास दोन-तीन वर्षांत पूर्णपणें हस्तगत करणें—इतकेंच नव्हे तर श्री. काका कालेलकर व कै. माधवराव सप्रे व श्री. सखारामपंत देऊसकर, यांजप्रमाणें गुजराती, हिंदी व बंगाली या भाषांत उत्कृष्ट ग्रंथनिर्मिति करणें हें देखील शक्य होईल. कारण या सर्व भाषा—तेलगू-तामील यांसारख्या द्राविडी भाषासुद्धां—परस्परांपासून भिन्न असल्या तरी त्यांना आधारभूत असलेली भारतीय संस्कृति व अधिकांश शब्दसंग्रह, वाक्प्रचार, म्हणी इत्यादि या सर्व भाषांत एकच आढळून येतात.

अर्थात् हिंदुस्थानची राष्ट्रभाषा ही देशी भाषांपैकींच एक असली पाहिजे हें उघड आहे. आतां सर्व देशी भाषांत हा मान हिंदीलाच मिळाला पाहिजे हेंहि ओघानेंच येतें. कारण एक तर हिंदुस्थानच्या पस्तीस-छत्तीस कोट लोकसंख्येपैकीं जवळ जवळ पंधरा कोट लोकांची ( थोड्याबहुत फरकानें ) ती मुळीं मातृभाषाच आहे; व दुसरें असें कीं हिंदुस्थानच्या इतर भागांतहि, मद्रास इलाख्यांतील कांहीं भाग सोडून, ती बऱ्याच अंशीं समजूं शकते व फार थोड्या श्रमानें शिकून आत्मसात् करतां येते, हें आतां अनुभवानें सिद्ध झालें आहे. गेल्या निवडणुकीचे धामधुमींत पं. जवाहरलालजींनीं सर्व हिंदुस्थानभर वावटळीसारखी दौड करून हिंदी व्याख्यानांनींच आपली बाजू किती परिणामकारक रीतीनें लोकांपुढें मांडली याची आठवण पुष्कळांस असेल. मद्रास इलाख्यांतहि गेल्या वीस वर्षांत हिंदीचा प्रचार पुष्कळ झाला असून आपल्या द्राविड बंधूंनाहि तिजविषयीं प्रेम वाटूं लागलें आहे. या भाषेच्या मदतीनें हिंदुस्थानच्या कोणत्याहि भागांत अत्यंत सुखानें प्रवास करतां येतो हेंहि पुष्कळांच्या अनुभवास आलें असेल. तेव्हां **राष्ट्रभाषा** म्हणून हिंदीचीच निवड करण्यांत आली हें सरळच झालें.

तथापि हा प्रश्न वाटतो तितका सोपा नाहीं. यांत मतभेदास कांहीं शंका-स्थानें व वाव देणारे कांहीं प्रश्न आहेत. कॉंग्रेसमार्फत स्थापन करण्यांत आलेला 'हिंदुस्तानी तालीमी संघ' व कॉंग्रेसचीं प्रांतीय सरकारें यांनीं या

प्रश्नांची सोडवणूक कशी केली आहे, व ती कितपत यशस्वी होण्याचा संभव आहे हें आतां पाहूं.

( १ ) कांहीं लोकांना शंका अशी येते कीं, आधींच जड असलेल्या आपल्या अभ्यासक्रमांत **हिंदी** ( किंवा हिंदुस्थानी ) हा एक नवीन अभ्यास आवश्यक केल्यानें विद्यार्थ्यांवरील बोजा फार वाढेल व कदाचित् मातृभाषेच्या अध्ययनासहि पुरेसा वेळ मिळणार नाहीं.

मला या भीतींत फारसें तथ्य वाटत नाहीं. एक तर हिंदीच्या अध्ययनामुळें मातृभाषेच्या अध्ययनास कमीपणा येणार नाहीं; व मातृभाषेकडे भरपूर लक्ष दिलें जाईल असें निश्चित आश्वासन शिक्षणाधिकाऱ्यांकडून मिळालेलें आहे. दुसरें, प्राथमिक शिक्षणाच्या शेवटल्या तीन वर्गांपुरतीच ही सक्तीची योजना आहे व हिंदीचा अभ्यासहि इतका सुलभ व अल्प असा ठेवण्यांत आला आहे कीं, आठवड्यांतून दोन तास नियमितपणें या विषयास दिल्यास हा अभ्यास तीन वर्षांत अगदीं हसत-खेळत होईल व एक राष्ट्रभाषा पदरांत पडेल. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हा तीन वर्षांचा अभ्यासक्रम म्हणजे हिंदी भाषेच्या अध्ययनाचा केवळ पायाच समजला पाहिजे. राष्ट्रीय व्यवहारास कामीं येईल इतकें भाषाप्रभुत्व येण्यास विशेषेंकरून संभाषण, सभेंतील वक्तृत्व व पत्रव्यवहार सफाईनें व निदान ढोबळ चुका न करतां येण्यास ही तुटपुंजी तयारी पुरेशी होणार नाहीं. म्हणून यापुढेंहि हिंदी शिकविण्याची सोय करणें व मॅट्रिकसारख्या परीक्षेंत संस्कृत, पर्शियन अशा भाषांप्रमाणेंच हिंदी भाषाहि एक ऐच्छिक विषय म्हणून ठेवणें हें यापुढें ओघानेंच येईल अशी अपेक्षा करणें गैरवाजवी होणार नाहीं.

( २ ) दुसरा प्रश्न या भाषेच्या स्वरूपाविषयींचा आहे व तोच फार अवघड होऊन बसला आहे. "**हिंदी ऊर्दू** व **हिंदुस्थानी** हीं सर्व नांवें एकाच भाषेचीं आहेत. हीच भाषा सर्व हिंदुस्थानची राष्ट्रभाषा—सामान्य व्यवहारभाषा—म्हणून प्रचलित करण्यास योग्य आहे; कारण उत्तर हिंदुस्थानांतील हिंदु व मुसल्मान हे दोघेहि हीच भाषा बोलतात. फक्त लिपि मात्र हिंदु देवनागरी व मुसल्मान ऊर्दू ( फारसी-आरबी मिश्र लिपि ) वापरतात; म्हणून लिपीपुरतें उभयतांस ( हिंदु व मुसल्मान समाजांस ) स्वातंत्र्य देऊन हीच भाषा सर्वांना सारखी शिकविणें हें सोईचें होईल," असें राष्ट्रभाषा प्रचारकांकडून ( आतां सरकारी

व्यवस्थापकांकडूनहि ) सांगण्यांत येतें. प्रस्तुतची राष्ट्रभाषा-शिक्षणाची योजना याच तत्त्वावर करण्यांत आली आहे. शाळांमधून राष्ट्रभाषा-शिक्षक तयार करण्यासाठीं ज्या अध्यापक-पाठशाला ( Training classes ) काढण्यांत येत आहेत त्यांत देवनागरीबरोबरच शिक्षकांना ऊर्दू लिपीचें ज्ञान असलें पाहिजे असा नियम करण्यांत आला आहे.

ही योजना कितपत ठीक आहे हें आतां पाहूं.

हिंदी, हिंदुस्तानी किंवा ऊर्दू ही वस्तुतः एकच भाषा आहे या म्हणण्यांत थोडें तथ्य आहे, पण हें सर्वांशीं खरें नाहीं व हें दिवसेंदिवस अधिकाधिक खोटें होत जाणार अशीं स्पष्ट चिन्हें आहेत. याचा अधिक स्पष्ट खुलासा होण्यासाठीं थोडी जास्त माहिती देणें जरूर आहे.

मराठी, गुजराथी, बंगाली या भाषांप्रमाणेंच हिंदी ही एक संस्कृतोद्भव भाषा आहे. पैशाची, मागधी, शौरसेनी, महाराष्ट्री वगैरे प्राकृत भाषांपैकीं शौरसेनी ही हिंदीची जननी समजली जाते. पंजाबपासून बंगालपर्यंतच्या भागांत व दक्षिणेस नर्मदेपर्यंत हळूहळू या भाषेचे अनेक पोटभेद अस्तित्वांत आले व विख्यात 'पृथ्वीराजरासो' या चंदवरदाईच्या काव्यापासून अनेक विद्वानांनीं व कवींनीं या भाषेची जोपासना केली. मुसल्मानी अमलांत जेव्हां मुसल्मानी लष्करांतील अधिकारी व शिपाई यांना एतद्देशीय जनतेशीं व्यवहार करण्याचा प्रसंग आला तेव्हां कांहीं फारसी, आरबी व कांहीं देशी अशा शब्दांच्या मिश्रणानें जी एक नवीनच भाषा जन्मास आली तिला ऊर्दू ( लष्करी भाषा ) असें नांव पडलें. मुसल्मानी अमलांत दरबारी भाषा व पत्रव्यवहाराची भाषा **फारसी** असे; अर्थात् या राजभाषेचा अंमल सरकारदरबाराशीं संबंध असलेल्या लोकांवर प्रथम व हळूहळू सामान्य हिंदीभाषेवरहि होऊन बरेचसे फारसी, आरबी व तुर्की शब्द हिंदी भाषेंत मिसळले. ( मराठीवरहि फारसी-आरबीचा असाच परिणाम मुसल्मानी अमदानींत झाला हें आपल्या परिचयाचेंच आहे ) ऊर्दू ही केवळ लष्करी किंवा बाजारी भाषा या नात्यानें प्रचारांत होती व कांहीं गजलांसारख्या लोकगीतांखेरीज ऊर्दू वाङ्मय असें त्या वेळीं निर्माण झालेंहि नाहीं. उलटपक्षीं हिंदींत मात्र तुलसीदास, सूरदास, कबीर यांसारखे अभिजात ग्रंथनिर्माते अनेक झाले व त्यांचें वाङ्मय आबालवृद्धांस प्रिय झालें. हें वाङ्मय अर्थात् पद्यमय होतें. गद्यलेखनाची त्या वेळीं प्रवृत्तीच नव्हती.

ही स्थिति इंग्रजी अंमल सुरू होईपर्यंत चालू राहिली. इंग्रजी अमलांतहि कांहीं कालपर्यंत सरकारदरबारची भाषा फारसीच होती. पण पुढें धोरणी इंग्रज सरकारनें असें पाहिलें कीं, मुसलमानी अमलाखालच्या लोकांना दरबारी लिपि म्हणून फारसी लिपीची संवय झालेलीच आहे व कारकुनी कामांत तेव्हांपासून विख्यात असलेल्या कायस्थांनीं तर फारसी लेखनांत मुसलमानांनाहि मागें टाकलें आहे; तेव्हां देशी दप्तर ऊर्दू (फारसी–आरबी) लिपींत ठेवलें व सरकारी कामकाजही हिंदु-मुसलमानांस समजणाऱ्या ऊर्दू भाषेंत चालविलें तर अधिक सोईचें होईल या उद्देशानें त्यांनीं ऊर्दू भाषा व लिपि यांनाच दरबारी भाषेचा मान दिला. याचा परिणाम असा झाला कीं पंजाब, संयुक्तप्रांत, मध्यप्रांताचा उत्तरभाग, राजपुताना व मध्यहिंदुस्थानांतील राज्यें या सर्वांत ऊर्दूला राजभाषेची पदवी मिळून शाळांमधूनहि याच भाषेला व लिपीला प्राधान्य मिळालें. हिंदी ही लोकांच्या बोलण्यांत असली तरी सरकार-दरबारीं अर्ज करण्याची, कायदेशीर कागदपत्रांची व कोर्टकचेऱ्यांची भाषा ऊर्दू असा प्रकार झाला. त्यामुळें व पुढें शाळांतूनहि याच भाषेचा पुरस्कार होऊं लागल्यामुळें हळूहळू या भाषेंत चांगलें गद्य व पद्य निर्माण होऊं लागलें, व ती एक भरदार, संपन्न भाषा बनूं लागली. ऊर्दू भाषेच्या अभिवृद्धींत हिंदु (बहुधा कायस्थ व काश्मिरी पंडित) व मुसलमान लेखकांनीं सारखाच हातभार लावला आहे. प्रथम प्रथम या भाषेंत प्रचारांतील संस्कृत किंवा तद्भव शब्दांचा उपयोग भरपूर होत असे व त्यामुळें सुशिक्षित हिंदूंनाहि ही नागरभाषा आहे असें वाटून ती बोलणें व तींतच ग्रंथरचना करणें हें योग्य होय असें वाटे. पण (कारणें कांहीं असोत) हळूहळू ही स्थिति पालटत गेली. चांगली ऊर्दू म्हटली कीं तींत हिंदी (म्हणजे संस्कृतोद्भव, देशी) शब्द शक्य तितके कमी वापरून फारसी–आरबी शब्द, वाक्प्रचार, दृष्टान्त यांचा भरणा जास्त केला पाहिजे अशी प्रवृत्ति– विशेषेंकरून मुसलमान लेखकांत—दिसूं लागली. व त्या योगें ऊर्दू भाषेला हळूहळू अहिंदी स्वरूप येऊं लागलें. इकडे बहुसंख्य हिंदूंच्या प्रचलित लिपीला कोर्टकचेऱ्यांत मज्जाव, व मोठमोठ्या नामांकित कवींनीं नटविलेल्या हिंदीविषयीं अनास्था ही स्थिति इंग्रजी शिक्षणानें जागृत झालेल्या हिंदु समाजासहि शल्यासारखी टोंचूं लागली व **नागरी प्रचारणी सभे-**सारख्या संस्थांनीं नागरी लिपि व हिंदी भाषा यांची जोरानें तरफदारी करून

अखेरीस नागरीला ऊर्दूच्या बरोबरीनें दरबारची लिपि होण्याचा मान मिळवून दिला; हिंदींत उत्कृष्ट काव्यें, नाटकें, कादंबऱ्या व इतर प्रौढ गद्य वाङ्मय-निर्मितीस सुरुवात केली; सरस्वती, माधुरीसारखीं सुंदर मासिकें व अनेक वर्तमानपत्रें काढलीं व अल्पकालांतच—म्हणजे सुमारें १८९० पासून आजपर्यंतच्या कालांत—तिची सर्व बाजूनें उन्नति केली. एका काळीं ऊर्दू लेखक म्हणून विख्यात असलेल्या मुन्शी प्रेमचंदसारख्या लेखकानें आपलें पुढलें पुढलें सर्व लिखाण हिंदींत केलें ही एकच गोष्ट या बदललेल्या परिस्थितीचा उत्कृष्ट पुरावा आहे. प्रथम प्रथम हिंदी लेखक ( ऊर्दूमधील फाजील आरबी-फारसी शब्दांना उत्तर म्हणूनच कीं काय ) आपल्या लेखनांत संस्कृत शब्दांचा अमर्याद उपयोग करूं लागले. पण ही प्रवृत्ति फार वेळ टिकली नाहीं व आतां प्रचलित आरबी-फारसी शब्दांचा सर्रास उपयोग करण्याची प्रवृत्ति दिसून येत आहे, व हा फरक इष्ट-असाच आहे !

वरील सर्व प्रपंच करण्याचें कारण असें कीं, हिंदी व ऊर्दू या दोन भाषांचें आजचें स्वरूप वाचकांस कळावें. हिंदी व ऊर्दू या दोन भाषा निराळ्या नाहींत; फक्त त्यांची लिपि भिन्न आहे, हें म्हणणें एका काळीं—ज्या वेळीं ऊर्दू व हिंदी यांची वाढ मुळींच झाली नव्हती व त्यांत ग्रंथसंपत्ति निर्माण झाली नव्हती त्या वेळीं, थोडेंबहुत खरें होतें. पण आतां मात्र त्या दोन स्वतंत्र भाषा बनल्या आहेत, व त्या दोहोंमधील अंतर दिवसेंदिवस वाढत आहे. ऊर्दूचा जन्म हिंदुस्थानांतच झाला; हिंदुस्थानाबाहेर ती कोठें समजत नाहीं; मुसलमानांबरोबरीनें हिंदूंनींही तिच्या अभिवृद्धयर्थ यत्न केले, या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी आजकालची ऊर्दू ही हिंदी नसून अहिंदी— परदेशी भाषाच झाली आहे व होत आहे हें अनेक प्रमाणांनीं दाखवितां येईल. पहिलें प्रमाण परकीय शब्दांच्या—जे शब्द **अशिक्षित हिंदु व मुसलमान** या दोघांसहि समजत नाहींत—परिमाणाचें. भाषा जर हिंदी असेल तर तींतील शब्दसंग्रह मुख्यत्वें हिंदी पाहिजे, अहिंदी नव्हे. पण डॉ. अब्दुल हकक्रत 'फरहंगे आसफिया' नामक ऊर्दू शब्दकोशांत ७००० आरबी शब्द, ६५०० फारसी शब्द व फक्त ५०० संस्कृत व तद्भव शब्द आले आहेत! उलटपक्षीं हिंदी शब्दसागर कोशांत ९४००० शब्दांपैकीं फार तर शेंकडा ७-८ शब्द आरबी-फारसीमधून आलेले आहेत! इतक्या फरकाच्या भाषा एक कशा होतील? दुसरा फरक व्याकरणाचा. हिंदीवाले आर्य-

भाषांच्या व्याकरणाचे नियम पाळूं चाहतात, तर ऊर्दूवाले त्याला फारसी, आरबी व्याकरणाच्या वळणावर नेतात. उदाहरणार्थ; वकील, हाकिम, मौल्वी, अमीर इत्यादि परकीय शब्द जरी हिंदीनें घेतले तरी ती त्यांचीं बहुवचनें हिंदी पद्धतीनें वकीलें, हाकिमों, अमीरों इ. तऱ्हेनें करते; पण तेच ऊर्दू त्यांना वकला, हुक्काम, मौलवियान, उमरा असें रूप देईल. त्याचप्रमाणें 'चमन का गुल' ऐवजीं ऊर्दूत 'गुले चमन' येईल व जबरन्, अंदाजन्, तख्मीनन्, अशीं फारसी ढंगाचीं अव्ययें तिला अधिक पसंत पडतील. तिसरा फरक आहे सांस्कृतिक दृष्टीचा व एका अर्थानें हाच मुख्य आहे. भाषा ही संस्कृतीचें प्रतीक असते. हिंदु व मुसलमान यांना जोंपर्यंत आपली संस्कृति भिन्न आहे, आपली परंपरा, आचार, इतिहास हीं भिन्न आहेत असें वाटत आहे, तोंपर्यंत त्यांच्या भाषेंतसुद्धां फरक राहणारच. राम-कृष्णादि देव, गंगा-यमुनेसारख्या नद्या, काशी, प्रयाग, रामेश्वरांसारखीं तीर्थस्थानें व रामायण-महाभारतासारखे प्राचीन ग्रंथ याविषयीं पूज्यभाव व आत्मीयता वाटणाऱ्या हिंदूंच्या लिखाणांतील भावना, दृष्टांत वगैरे मक्केकडे दृष्टि ठेवून असणाऱ्या इस्लामी लेखकास कशा पटतील व सुचतील? साधी उपमा देतांना सुद्धां हिं हनुमान-भीमाचें स्मरण करील, तर मुसल्मान बहुधा फारसी वीर रुस्तमचें स्मरण करील. कोकिळाच्या बदलीं त्याला बुलबुल स्मरेल व ऋतु वसंतच्या ऐवजीं 'मौसिमे बहार' येईल. ऊर्दू शाळांत पढविलीं जाणारीं प्राथमिक पुस्तकें जरी वरवर चाळून पाहिलीं तरी हा फरक ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. हीं सांस्कृतिक दृष्टि पालटण्याचा व या दोन भाषा परस्परांजवळ येण्याचा काळ आतां उलटून गेला आहे. त्यांना स्वतंत्रपणें आपापल्या मार्गांनें आपली उन्नति करूं देणें हेंच उचित होय. दोन्ही भाषा चांगल्या आहेत. हिंदूंनीं ऊर्दू व मुसल्मानांनीं हिंदी शिकून परस्परसमाजाचें ह्रद्गत समजून घेण्याचा यत्न करावा व असें केल्यानेंच परस्परांविषयींचे गैरसमज दूर होऊन राष्ट्रीय ऐक्य होण्यास साहाय्य होईल!

या दोन भाषा जर भिन्न आहेत असें ठरलें तर राष्ट्रभाषा यांपैकीं कोणती व्हावी? याचें सरळ उत्तर असें आहे कीं ही भाषा **हिंदीच** होऊं शकते ऊर्दू नव्हे. हिंदी म्हणजे देवनागरी लिपींत लिहिली जाणारी संस्कृताश्रित (संस्कृत-प्रचुर नव्हे) आर्य भाषा. याचें कारण असें कीं **संस्कृताश्रित हिंदीच**

हिंदुस्थानच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत थोड्या श्रमानें समजूं शकते. ऊर्दू ही ज्यांची मातृभाषा आहे असे लोक हिंदुस्थानांत फारच थोडे आहेत. थेट काश्मीर व पंजाब प्रांतांत—जेथें बहुसंख्य प्रजा मुस्लिम धर्मानुयायी आहे—देखील लोकांची घरगुती भाषा ऊर्दू नाहीं. सरकारी व शैक्षणिक भाषा मात्र ऊर्दू आहे. बंगाल्यांत मुसलमान बहुसंख्य असले तरी त्यांची भाषा बंगाली (व म्हणूनच संस्कृतप्रचुर) आहे. दिल्ली व संयुक्त प्रांतांतील मुसलमानांची मात्र ती मातृभाषा आहे असें म्हणतां येईल. राजपुताना, मध्यहिंदुस्तान, मध्यप्रांत, मुंबई इत्यादि इलाख्यांतील लोकांचें ऊर्दूचें ज्ञान अगदीं तुटपुंजें असतें व त्यांना त्या त्या प्रांतीय भाषा चांगल्या येत असतात. महाराष्ट्रीय मुसलमान तर ऊर्दू मुळींच जाणत नाहींत व मराठी उत्तम बोलतात! निजामी राज्यांत मात्र सक्तीनें बहुतेकांना ऊर्दू शिकावें लागतें हा भाग वेगळा; पण मुस्लिमेतर लोकांच्या भाषा निराळ्याच आहेत. मद्रास इलाख्यांत विचारावयासच नको; सर्व मुसल्मान तेलगू, तामीळ, मल्याळी इत्यादि भाषाच बोलतात. अर्थात् हिंदुस्थानांतील मुसल्मानांना त्या त्या प्रांतांतील भाषा अवगत असल्यामुळें व या सर्व भाषांत—द्राविडी भाषांतसुद्धां—संस्कृत शब्द बरेच मिसळलेले असल्यामुळें संस्कृताश्रित हिंदी या सर्व लोकांना—हिंदूंना व अहिंदूंना—जितकी सोपी जाईल तितकी आरबी-फारसी मिश्र ऊर्दू सोपी जाणार नाहीं.

पण येथें असा प्रश्न केला जाइल कीं राष्ट्रभाषा ऊर्दू करण्याचा प्रश्नच मुळीं उद्भवतो कोठें? महात्मा गांधी, पं. नेहरू वगैरे राष्ट्रीय नेते जिचा पुरस्कार करीत आहेत ती भाषा हिंदीहि नव्हे व ऊर्दूहि नव्हे, तर या दोन्ही भाषेंतील प्रचलित व सोप्या शब्दांची बनलेली व हिंदु-मुसल्मानांस मान्य होण्याजोगी "हिंदुस्तानी." पण मुसल्मानांचा दावा असा आहे कीं राष्ट्रभाषा फक्त ऊर्दूच होऊं शकते; त्यांच्या म्हणण्याची मजल येथपर्यंत जाते कीं, हिंदी ही मुळीं पूर्वीं अस्तित्वांतच नव्हती; ती अलीकडे कांहीं मुसलमानद्वेष्ट्या हिंदूंनीं ऊर्दूमधून आरबी-फारसी शब्द काढून व त्याऐवजीं संस्कृत शब्द घालून बनविलेली एक कृत्रिम भाषा आहे! वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे. आजकालच्या उच्च प्रतीच्या मानल्या गेलेल्या ऊर्दूत सुद्धां एकूणएक क्रियापद संस्कृतोद्भव आहे. तीच गोष्ट सर्वनामांची! नामें, विशेषणें व कांहीं अव्ययें मात्र मुद्दाम आरबी-फारसींतून आणून भरण्याची कल्पनाहि बरीच

अलीकडची आहे. पूर्वीच्या ऊर्दू कवितेंत संस्कृतोद्भव शब्द बरेच येत. पण वली, नासिख वगैरे लेखकांच्या प्रेरणेनें व अनुकरणानें पुढें या शब्दांवर बहिष्कार पुकारला गेला. लखनौच्या नबाबांच्या राजवटींतच सुरू झालेल्या या भाषा-पद्धतीला पुढें इंग्रजी अमलांत ऊर्दूला राजभाषेचा मान मिळाल्यावर विशेषच जोर चढला. 'जलवये खिज्र' नामक एका ऊर्दू ग्रंथांत हा इतिहास आलेला आहे. "१८५७ सालच्या बंडानंतर लखनौच्या ढंगावर सर्व हिंदुस्थानभर लेखनपद्धति सुरू झाली. दिल्लीनें देखील आपल्या जुन्या गोधडीला नवीं ठिगळें लावलीं व जुनी रचना व जुनी भाषापद्धति सोडून लखनौचा ढंग उचलला. गद्य व पद्याची भाषा सुधारली (!) गेली; वर्तमानपत्रांनींहि या चळवळीस प्रोत्साहन दिलें. शिक्षणखात्यांतील पुस्तकांचा ढंग बदलला. सारांश, सर्वत्र लखनौ पद्धतीचा स्वीकार झाला." नासिखचें सुखस्वप्न असें होतें कीं आपण **लखनौचें इस्पहान करूं.** हें सुखस्वप्न आतां एका अर्थानें खरें झालें आहे व हिंदुस्थानचा इराण करण्याचें श्रेय आधुनिक ऊर्दूनें बहुतांशीं संपादन केलें आहे ! कारण या भाषेंत आतां आपणांस हिंदी संस्कृति कोठेंच न सांपडतां इराणी-आरबी-संस्कृति मात्र भरपूर सांपडेल. असो. पण याच हट्टाग्रहाचा साहजिक परिणाम म्हणजे हिंदी संस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्या लोकांनीं हिंदीचें हिंदीपण कायम राखण्याचा प्रयत्न केला व गेल्या तीसचाळीस वर्षांत तिची उन्नति केली, हें आपण वर पाहिलेंच आहे. तथापि "हिंदुस्तानी" भाषेची कल्पना जर यशस्वी व्हावयाची असेल तर ऊर्दू हीच राष्ट्र-भाषा होय, व तिला हिंदूंनीं मुद्दाम विकृत करून आजकालची हिंदी बनविली हा आग्रह सुटला पाहिजे. "हिंदुस्तानी" भाषेंत मुख्य भरणा हिंदी म्हणजे हिंदुस्थानांतच जन्मलेल्या व वाढ झालेल्या शब्दांचा व वाक्संप्रदायांचा असला पाहिजे. हिंदुस्थानांतील मुसलमानी अमलामुळें व अनेक शतकांच्या सहवासामुळें जेवढे **व्यवहारोपयोगी** शब्द देशी भाषेंत **रूढ** झाले असतील तेवढे अर्थात् या हिंदुस्तानी भाषेंत सामावले पाहिजेत हें मान्य; पण याच्या-पुढें जाऊन रूढ व सर्वांस समजणाऱ्या संस्कृतोद्भव शब्दांची हकालपट्टी झाली पाहिजे, व त्यांची जागा ऊर्दू ( फारसी-आरबी ) शब्दांनीं घेतली पाहिजे असा आग्रह जर ऊर्दूवाले ( अर्थात् मुसलमान बंधु ) धरूं लागले तर मात्र हा " हिंदुस्तानी भाषानिर्मितीचा प्रश्न सुटणें कठीण जाईल. व तसा तो कठीण

होईल कीं काय अशी भीति वाटण्याजोगी परिस्थिति खास उत्पन्न झाली आहे.

राष्ट्रसभाध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या प्रेरणेनें बिहार प्रांतांतील सरकारनें एक कमिटी नियुक्त केली आहे. “ हिंदुस्तानी ” भाषेंत हिंदु व मुसल्मान या उभयतांनाहि मान्य होण्याजोग्या समान शब्दांची एक जंत्री तयार करणें; अशा भाषेचा नमुना म्हणून कांहीं पाठ्य पुस्तकें तयार करणें व ह्या एका अर्थानें नवीन राष्ट्रभाषेचें पद्धतशीर व्याकरण तयार करणें हें काम या कमिटीवर सोपविण्यांत आलें आहे. या कमिटीवर हिंदु व मुसल्मान दोन्ही जातींचे विद्वान सदस्य आहेत. इच्यामार्फत आजकाल “ होनहार ” नांवाचें एक मासिक पुस्तक नागरी व ऊर्दू या दोन्ही लिपींत ( मजकूर तोच ) प्रसिद्ध होत असतें. या कमिटीचें कार्य अद्याप पुरें झालेलें नाहीं. पण तें फारसें समाधानकारक रीतीनें चाललेलें नसावें असें दिसतें. या कमिटीचे एक सदस्य डॉक्टर बाबूराम सकसेना यांनीं नुकताच राजीनामा दिला आहे. व नुकतेंच काशी येथें जें हिंदी साहित्यसंमेलन भरलें होतें त्यांत या कमिटीच्या कार्यपद्धतीवर फार जोराचा हल्ला करण्यांत आला. **हिंदुस्थानीच्या नांवावर ही कमिटी बहुजन समाजावर ऊर्दूच लादीत आहे** असा या टीकेचा स्पष्ट भावार्थ आहे. व ही टीका बहुतांशीं रास्त आहे हें पुढील उताऱ्यांवरून ध्यानीं येईल. ज्यांच्या नियंत्रणाखालीं ही कमिटी काम करीत आहे ते बिहार प्रांताचे ( आतां भूतपूर्व म्हटलें पाहिजे ) शिक्षणमंत्री डॉ. सय्यद महमूद ‘ होनहार ’ मासिकाचें अभिनंदन आपल्या “ **हिंदुस्तानी** ” भाषेंतच करीत आहेतः—

“ **रेसाला** होनहार देखकर मुझे बडी खुशी हुई। मैनें इसे बडी **दिलचस्पीसे** पढा। मैं समझता हूं कि रेसाला बच्चोंके लिये **फायदामंद** साबित होगा.... मेरी यह **ख्वाहिश** बहुत दिनोंसे थी कि देशमें ऐसे **अदब** का प्रचार जो कि दोनोंही हरफोंमें हो मगर ज़बान एकही और आसान हो......जिन लोगोंनें ‘होनहार’ निकालकर इस कमी को पूरा किया उन लोगोंको इस कोशिशपर **मुबारकबाद** देता हूं। ”

दुसरा एक अभिनंदनाचा मासलाः—

“‘हिंदुस्थानी जबानके माहवारी अखबार ‘होनहार’ का पहला परचा मेरे सामने

है. जबानको सहल और **आमफहम** बनानेके लिये काफी **एहातियात** रखी गई है. यह कोशिश **काबिले-तारीफ** है, और एडिटर को इसमे काफी **कामयाबी हासिल** हुई है......उम्मीद है कि यह (अखबार) अपने **मकसद** को हासिल करनेमें कामयाब साबित होगा !

आतां थोडा 'होनहार'चा नमुनाः—

" ओ देशसे आनेवाले बता

क्या अबभी **महकते** मंदिरसे **नाकूस** (शंख) की आवाज आती है? और शाम के रंगीन सायोंपर एक **अजमत** सी छा जाती है ? "

" ओ भारतमाता, ओ भारतमाता !

खुदाकी तुमपर **रहमत** हो."

" नेपाल की तरफ **अजदहा** भी पाया जाता है. अजदहाको लोग अजगरभी कहते हैं."

'शंख' शब्दाबद्दल 'नाकूस' व अजगराबद्दल 'अजदहा' शब्द वापरण्यानें भाषेला काय साधेपणा व सौंदर्य आलें असेल तें या मासिकाचे विद्वान संपादकच जाणोत !

सारांश, या खिचडी-भाषेंत ना सुलभता ना सौंदर्य असा प्रकार दिसत आहे. व ऊर्दूपक्षपाती लोकांचें आराधन करण्यासाठीं या भाषेंत प्रमाणाबाहेर आरबी-फारसी शब्द घुसडण्यांत येत आहेत असें दिसतें. हीच प्रवृत्ति चालू राहील तर हा प्रयत्न अयशस्वी होईल असें भाकित करण्यास ज्योतिषाची गरज नाहीं. परवांच्या हिंदी साहित्यसंमेलनांत पंडित व्यंकटेश नारायण तिवारी यांनीं जेव्हां 'होनहार' मधील व या कमिटीनें बनविलेल्या कांहीं पाठ्यपुस्तकांतील उतारे वाचून दाखवून त्या भाषेचें ऊर्दूत्व सर्व सभेस पटवून दिलें तेव्हां खुद्द राजेंद्र बाबूसुद्धां चकित झाले व हिंदीवर असा अन्याय आपण होऊं देणार नाहीं असें आश्वासन त्यांनीं दिलें. ईश्वर करो व त्यांचें आश्वासन सफल होवो.

सारांश, हिंदी— इला हिंदुस्थानी म्हणण्यास आमची हरकत नाहीं; पण हिंदी म्हणतांच कामा नये असा आग्रह मात्र नसावा. हीच राष्ट्रभाषा होण्यास

पात्र आहे; तिच्या प्रचारार्थ व्यवस्थित, पद्धतशीर यत्न करणें हें सरकारचें काम आहे व तसा प्रयत्न सुरू केल्याबद्दल राष्ट्रसभा व तिनें नियोजित केलेले मंत्रि यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. तथापि हा प्रयत्न करतांना जातीय व अराष्ट्रीय अभिमानानें प्रेरित झालेल्या लोकांचें समाधान करण्याच्या नादीं लागून हिंदुस्थानी भाषेला अराष्ट्रीय स्वरूप देणें हें केव्हांहि वाजवी होणार नाहीं व तसा प्रयत्न सफलहि होणार नाहीं.*

---

*वरील लेख लिहितांना प्रसिद्ध हिंदी मासिक पत्रिका 'सरस्वती'मधील पं. वेंकटेश नारायण तिवारी यांच्या दोन-तीन लेखांचा बराच उपयोग झाला हें कृतज्ञतापूर्वक नमूद करणें अवश्य आहे.

# धार्मिक व नैतिक शिक्षण

लेखकः—गंगाधर निळकंठ गोखले

आपल्या देशांत परधर्मीयांची सत्ता झाल्यापासून आपल्या शिक्षणांतून धर्माची उचलबांगडी झालेली आहे ही गोष्ट सर्वांस माहीतच्च आहे. त्यापूर्वी मुसलमानांचें राज्य असतांना देखील, धार्मिक शिक्षण दोन्ही समाजांमध्यें प्रचलित होतें. इंग्रजी राज्य झाल्यानंतर मेकॉलेनें इंग्रजी शिक्षण देण्याचें नक्की केलें त्या वेळेस, इंग्रजी शिकल्यानें सर्व हिंदुस्थान ख्रिश्चन बनेल अशी पुष्कळांची कल्पना होती; व ख्रिश्चन धर्मप्रसारकांनीं याबाबत उद्योगहि सुरू केला होता. परंतु सत्तावन सालच्या बंडानंतर, काडतुसांना चरबी लावली या क्षुल्लक पराचा हिंदुस्थानांत कसा कावळा होतो, हें शहाण्या इंग्रज लोकांच्या लक्षांत आलें. गोंव्याकडे रोमन कॅथॉलिक पोर्चुगीज लोकांची डाळ कशी शिजली नाहीं, हेंहि पण लक्षांत ठेवून प्रॉटेस्टंट इंग्लिशांनीं व्हिक्टोरिया राणीचे हस्तें जो जाहीरनामा काढला त्यांत 'आम्ही तुमचे धर्मांत हात कधींही घालणार नाहीं' असें आश्वासन दिलें व तें त्यांनीं आजपर्यंत पाळलें आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, ख्रिस्ती धर्मप्रसारकांचा सर्व उद्योग बंद झाला. तो चालूच होता; व थोड्याबहुत प्रमाणांत अजूनहि पण आहे. परंतु प्रत्यक्षपणें ब्रिटिश सरकार या बाबतीमध्यें हात घालीत नाहीं हें खरें आहे. त्यामुळें येथील शिक्षणपद्धतींत धर्मास स्थान नाहीं.

२. येथें थोडी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, जसें आपले देशांत शिक्षणाचें काम पंडित, मौलवींचें हातांत पूर्णपणें होतें, तसेंच युरोपमध्यें सर्व शाळा, विद्यालयें धर्माधिकाऱ्याचे हातांतच होतीं व अजूनहि 'या विसाव्या शतकांत' ती परंपरा मोडलेली नाहीं. आपले डॉक्टर परांजपे ज्या कैंब्रिजमध्यें सीनिअर रँगलर झाले, त्या कैंब्रिजमध्यें देखील सेंट जॉन कॉलेज आहे, व बहुतेक कॉलेजांचीं खाजगी देवालयेंहि आहेत. तेथें विद्यार्थ्यांना जावें लागतें, व दररोज जेवणापूर्वी ख्रिश्चन पद्धतीचें "यंतु न देवो......" म्हणावें लागतें

ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. परधर्मी विद्यार्थ्यांच्यावर याची सक्ती करण्यांत येत नाहीं, व ते तेथील विद्यालयांत धार्मिक बाबतींत पूर्ण स्वतंत्र, म्हणजे "बेतंत्र" राहूं शकतात. युरोपमध्यें अजूनहि पण शेंकडों मोठमोठीं देवालयें आहेत; व त्यांत लाखों लोक खेटे घालीत असतात. निदान रशियांतून तरी हें धर्माचें खूळ गेलेलें आहे असें कित्येक लोक म्हणतात; पण गेल्या २३ जूनच्या "पीसन्यूज" नांवाच्या पाक्षिकामध्यें एक गृहस्थ लिहितो कीं, "मी लेनिनग्राडमध्यें कॅथॉलिक देवळांत पूजा करून आलों, येथें एक ग्रीक चर्चहि आहे व मुसल्मानांची एक मशीदहि आहे. मॉस्को येथें १९१७ सालच्या राज्यक्रांतीपूर्वी चारशें देवालयें होतीं; तेथें आज चाळीस आहेत इतकेंच." ही गोष्ट ज्या देशांत तरवारीच्या धारेवर धर्माची हकालपट्टी करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला गेला तेथील आहे. पण असे प्रयत्न फक्त विसाव्या शतकांतच होतात असें नाहीं. पुराणांतरीं स्वतःच्या मुलानें विष्णूचें नांव घेतल्याबद्दल त्याला तापलेल्या तेलाच्या कढईत टाकणाऱ्या हिरण्यकशिपूची आपण गोष्ट वाचली आहे. हल्लींचे राजे फक्त भूलोकांतून धर्माची उचलबांगडी करण्याचा प्रयत्न करतात, प्रल्हाद-पित्यानें विष्णूची हकालपट्टी त्रिलोकांतून करण्याचा चंग बांधला होता, पण तोहि यशस्वी झाला नाहीं. यापासून या विसाव्या शतकांत देखील थोडा धडा घेण्यासारखा आहे.

३. समजा, एक बर्फाचा मोठा पर्वतप्राय तुकडा पाण्यांत तरंगत आहे. त्याचा पाण्याच्या वरतीं जो एकसप्तमांश भाग असतो त्यावर राहणाऱ्या किड्यांनीं (ही उपमा आहे) वर दिसणाऱ्या सर्व भागाची अगदीं बरोबर मोजणी करून त्याचें पूर्णपणें ज्ञान संपादन केलें आहे. तो हिमपर्वत उत्तरेकडून दक्षिणेकडे हळूहळू वाहत जात आहे, हेंहि पण शास्त्रज्ञ किड्यांनीं ताऱ्यांचे वेध घेऊन सिद्ध केलें आहे. असा खडा, समजा "गल्फ स्ट्रीम"मध्यें वाहत गेला व त्यांतील बर्फाचा समुद्राखालील भाग वितळला तर त्या हिमपर्वताची उलटापालट झाल्याशिवाय [illegible]रीज राहणार नाहीं. हीच गोष्ट या सर्व जगताची आहे. सर्व स्थूल जगत्, सर्व जडसृष्टि पाण्याच्या पृष्ठभागावर दिसणाऱ्या हिमपर्वताच्या एकसप्तमांश भागासारखी आहे हें विसरून चालणार नाहीं. याचा अर्थ ही जडसृष्टि खोटी आहे; अगर हा पूर्ण आभास आहे असा नाहीं. निदान स्वप्नामधील वाघ अगर अंगावर येणारें कुत्रें हा आभास नव्हे. जागे

झाल्यानंतर स्वप्नसृष्टि आभासमय होते. त्याप्रमाणें सर्व ज्ञान झाल्यामुळें जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून सुटलेल्या जीवास हें सर्व जगत् आभासमय असूं शकेल. पण त्या पकडलेल्या बद्ध जीवास जगत् भासमय नाहीं असें म्हणणें जितकें हास्यास्पद आहे तितकेंच जें आपणांस आपल्या डोळे, कान वगैरे इंद्रियांमार्फत अनुभवास येतें, त्याखेरीज सृष्टींत कांहीं नाहीं असें प्रतिपादन करणें तसेंच अशास्त्रीय व वेडेपणाचें आहे. ही गोष्ट प्रत्येक मुलाच्या मनावर नेहमीं बिंबवणें यास मी धर्मशिक्षण म्हणतों.

४. पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं जगांत मोठमोठे शोध लावले- आहेत. त्यांचा मानव जातीस केवढा उपयोग होतो व केवढी हानि होते हें आपण दररोज पाहतच आहोंत. त्यांनीं कितीहि शोध लावले असले तरी एका जिवंत व मेलेल्या उंदरा-मध्यें काय फरक झालेला आहे तो त्यास कोणत्याहि यंत्रानें मापतां येत नाहीं. निर्जीव पदार्थांतून " N रेज " जाऊं शकत नाहींत हें त्यांना माहीत आहे; पण यापलीकडे ते कांहीं सांगूं शकत नाहींत. अलीकडील व्हिटॅमिनशास्त्रांत ते थोडेंबहुत इकडे डोकावूं लागले आहेत; परंतु पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं अशी समजूत करून घेतली आहे कीं, मरणोत्तर स्थितीविषयीं विचार करणें आपणांस अशक्य आहे. त्यांनीं आधिभौतिक व आध्यात्मिक ज्ञानामध्यें भिंत बांधली आहे. धर्म व आजकालचीं शास्त्रें यांमधील मरण सरहद्द आहे. ती ओलांडणें हें धर्मशिक्षणाचें मुख्य कार्य आहे व मरणोत्तर स्थितीविषयीं बोलणारास जोंपर्यंत रॉयल सोसायटी वेडा ठरविते, तोंपर्यंत स्वतंत्र, धर्मशिक्षणाची जरूरी आहे.

५. येथें एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं ही भिंत पूर्वींचे काळांत नव्हती. धर्म व शास्त्र असे ज्ञानाचे दोन भाग नव्हते. सकाळीं केव्हां उठावें, काय खावें येथपासून मरणोत्तर क्रिया काय करणें जरूर आहे येथपर्यंत, सर्व गोष्टींचा विचार आपल्या धर्मशास्त्रांत केलेला आहे. आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक असे आयुष्याचे तीन भाग आमच्या पूर्वजांनीं कधींहि केले नव्हते. युरोपमध्येंहि तीच स्थिति होती. परंतु तेथील धर्माधिकाऱ्यांनीं आपली पोटाची खळगी भरण्याकरितां जिऑरदानोब्रूनो, ग्यालिलिओ या लोकांस जिवंत जाळलें, तेव्हांपासून धर्म व शास्त्र यांमधील अढी उत्पन्न झाली. धार्मिक भटजीं-नीं जो ज्ञानाच्या प्रगतीस विरोध केला, त्याचा वचपा रॉयल सोसायटींतील

भटजींनीं धर्म व शास्त्र यांमध्यें भिंत बांधून काढला, व युरोपांतील लोकांच्या तोंडानें पाणी पिणाऱ्या हिंदुस्थानांतील लोकांनाहि ही भिंत खरी वाटूं लागली. शास्त्रज्ञांना मिळालेल्या भौतिक यशामुळें त्यांचे डोळ्यांवर जी धुंदी चढली, त्यांत त्यांना परमेश्वर या हैपॉथिसिसची देखील जरूरी भासेनाशी झाली. रेडियमचे शोधानें पाश्चात्य शास्त्रज्ञांस कळून चुकलें कीं, त्यांचे आधिभौतिक शास्त्राचा पाया खडकावर नसून वाळूवर आहे. प्रत्येक इलेक्ट्रॉनबरोबर ही पायाखालील वाळू घसरत चाललेली त्यांना दिसून आली; व आइनस्टाइननें दृश्य व अदृश्य जगतांतील भिंतीमध्यें मोठें भगदाड पाडलें. स्पिरिच्युॲलिस्ट लोकांनीं या खिडींतून पलीकडे जाऊन अंधेरांत चांचपडत, बरीच माहिती तिकडून आणिली व गेल्या महायुद्धामध्यें जेव्हां घरोघरीं तरुण मुलें मेलीं, तेव्हां मरण काय आहे या प्रश्नाकडे तिकडील लोकांचें साहजिकच जास्त लक्ष लागलें. एकट्या लंडन शहरांत मृतात्म्याशीं बोलण्याचीं पीठें दीडशें होतीं. हीं सर्व खरीं कीं खोटीं हा प्रश्न नाहीं. मला फक्त एवढेंच दाखवावयाचें आहे, कीं युरोपमध्यें जडवादास कशी ओहोटी लागलेली आहे. हिंदुस्थानांत आपण गरिबीमुळें सेकंडहँड पुस्तकें वाचतों, त्यामुळें आपले सुशिक्षितांपर्यंत ही लाट अजून पोंचलेली नाहीं. पण ती लाट पश्चिमेकडून येईतोंपर्यंत वाट पहावयाची, का आपल्या घरच्या अडगळींतून ती गोष्ट बाहेर काढावयाची एवढाच काय तो प्रश्न आहे.

६. ही भिंत पाडणें ही धर्मशिक्षणाची पहिली पायरी आहे. संध्या करणें, पूजा करणें वगैरे त्या मार्गावरील पावलें आहेत. मनुष्य हा जीव आहे, व तो अमर आहे अशी मनाची खात्री पटल्याखेरीज खऱ्या धार्मिक अगर शास्त्रीय जीवनास सुरुवात होत नाहीं.

"अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे"

येथून श्रीमद्भगवद्गीतेस खरी सुरुवात होते. हा श्लोक ज्यास पटला नाहीं, त्यानें भगवद्गीता पाठ केली, दररोज म्हटली अगर त्यावर शेंकडों प्रवचनें दिलीं तरी त्यास या गोपालनंदनानें काढलेलें दूध पचवितां येत नाहीं. तेथें धर्मशिक्षण नाहीं, धर्म नाहीं व अर्थात् जय नाहीं. युरोपमधील लोकांना आधिभौतिकामध्यें देखील जो जय मिळतो तोहि पण ते जेव्हां आधीं जडजीवनाची पर्वा करीत नाहींत तेव्हांच.

७. परंतु त्यांचा जय टिकाऊ नाहीं; कारण धर्माचें जें दुसरें फार महत्त्वाचें अंग आहे त्याकडे त्यांची नजर जात नाहीं. सर्व सृष्टि एका तत्त्वांतून निघते व फिरून एका तत्त्वांत अंतर्धान पावते, व सर्व कार्य एका " पुरुष विशेषा "चे इच्छामात्रें चालतें. मग त्या पुरुषविशेषास कोणी ईश्वर म्हणोत, कोणी अल्ला म्हणोत अगर कोणी फक्त सृष्टिनियम म्हणोत. सर्व सृष्टिकार्य बिनचूक व एकात्मतेनें, एकतंत्रानें चाललें आहे. दिक्कालानुरूप त्या एकतत्त्वाची वेगळीं वेगळीं रूपें, त्या अनुरूप वेगळे वेगळे धर्मग्रंथ वगैरे कितीहि प्रकार असले, तरी ते एकाच तत्त्वाचे प्रकार आहेत; व सर्व सृष्टीचें अंतिम ध्येय

योमां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ॥

असें " पुरुषविशेष " तयार करणें हें आहे. येथें श्रीभगवद्गीता संपते. या सर्व गोष्टी आमचे पाश्चात्य बंधु जोंपर्यंत लक्षांत ठेवीत नाहींत तोंपर्यंत त्यांचा जय दीर्घ काल टिकणें शक्य नाहीं.

८. या सर्व गोष्टी वेगवेगळया रीतींनीं तरुण पिढीपुढें मांडणें हें धर्म शिक्षणाचेंच काय, पण सर्व शिक्षणाचें कार्य आहे. तें देशकालानुरूप विद्यार्थ्यांच्या वयानुरूप, त्यास रुचेल व सहज पचेल अशा अशा रीतीनें सांगितलें पाहिजे. लहान-पणीं गोष्टीरूपी साखरेंत मिसळून व त्यांत दुसरे नवरस घालून दिलें पाहिजे. पुढें बुद्धि तीव्र झाल्यानंतर तत्त्वज्ञानाच्या खारका-बदामरूपानें दिले पाहिजे व सर्व नीति या दोन मूलभूत तत्त्वांच्या पायावर कशी उभारली आहे हें विचारानें व आचारानें तरुण पिढीस पटवून दिलें पाहिजे.

९. या सर्व शिक्षणांत शिक्षकाच्या स्वतःच्या वर्तणुकीचें उदाहरण अत्यंत परिणामकारक होतें. यास्तव मनुष्य हा निवळ देहमात्र नसून आंतील अमर जीव आहे ही खात्री स्वतः शिक्षकास पटली पाहिजे. निदान ती गोष्ट अगदीं अशक्य व मूर्खपणाची आहे इतका त्याचा दुराग्रह उपयोगाचा नाहीं. एवढी गोष्ट शिक्षकास पटली म्हणजे त्याच्या लक्षांत येईल कीं जसें शरीरास वय असतें, तसें या उत्क्रांत होत जाणाऱ्या अमर जीवासहि एक तऱ्हेचें वय असतें; व म्हणूनच कांहीं मुलें जन्मतः सत्त्वशील असतात, व कांहीं दुर्गुणी असतात. हा **निवळ** आनुवंशिक अगर संगतीचा परिणाम नाहीं. या दोन्ही आधिभौतिक

गोष्टी खोट्या नाहींत. पण या दोन्हीखेरीज धर्म सांगतो कीं, आणखी कांहीं तरी 'क्ष' आहे. ही गोष्ट ज्या शिक्षकाचे लक्षांत आली तो शिक्षक आपणासमोर उभ्या असलेल्या तीस-चाळीस पौंड वजनाच्या मांसाच्या गोळयाकडे पाहून त्यास बडवून, धाकदपटशा दाखवून शिक्षण देण्याचा प्रयत्न करणार नाहीं. तो त्या गोळयामागें असणाऱ्या जीवाशीं बोलेल, व तो जीव आपणापेक्षां जास्त ज्ञानवृद्ध असूं शकेल ही गोष्ट लक्षांत ठेवून त्या अल्पवयी देहास ताब्यांत घेण्यासाठीं आंतील वयोवृद्ध जीवास मदत करील. हें धर्मशिक्षणाच्या मार्गावरील पहिलें पाऊल आहे. सुज्ञ वाचकांचे लक्षांत येईल कीं पाश्चात्य शिक्षणविशारद याच दिशेकडे चांचपडत आहेत.

१०. लहानपणीं हें तत्त्वज्ञान गोष्टीरूपी साखरेंत मिसळून दिलें पाहिजे हें योग्यच आहे. आणि म्हणूनच व्यास महर्षींनीं अठरा पुराणें लिहिलीं आहेत. पण हीं पुराणें वाचतांना वरील तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि कायम राखली पाहिजे. त्याखेरीज पुराणें हास्यास्पद होतात. उदाहरणार्थ, आपण भीष्माचार्यांच्या जन्माची गोष्ट घेऊं. ही गोष्ट आपण अजूनदेखील वाचतों. पण पाश्चात्य जडवादानें आपला बुद्धिभेद झाल्याकारणानें आपण ही गोष्ट ज्ञानाच्या प्रकाशांत न वाचतां, फक्त ज्ञानप्रकाशांतील इतर बातम्यांप्रमाणें वाचतों कीं, "शंतनु नांवाचा एक राजा होता. तो नाताळांत गंगेच्या कांठीं शिकारीस गेला होता. तेथें त्याला एक सुंदर मुलगी आढळली, त्याचें तिच्यावर एकदम प्रेम बसलें, त्यानें तिला राज्ञीपद देऊ केलें, व तिनें तें एका अटीवर कबूल केलें, कीं लग्न झालें तरी मी माहेरचें नांव बदलणार नाहीं; व मी रॅशनलिस्टिक सोसायटीची मेंबर असल्यामुळें, माझ्या बुद्धीस पटेल तशीच मी वागेन. ज्या दिवशीं तुम्ही मला यांत मना कराल त्या दिवशीं मी तुम्हांस सोडून जाईन. तिच्या रूपानें वेडावलेल्या राजानें जास्त विचार न करतां ही गोष्ट कबूल केली. तीं दोघें एकत्र राहूं लागलीं सृष्टिनियमाप्रमाणें त्यांस एक मुलगा झाला. त्याबरोबर या गंगादेवीनें त्या अर्भकास आपल्या हातांनीं गंगेंत फेकून दिलें. राजाला वाईट वाटलें, पण तिला बोलल्यास ती सोडून जाईल या भीतीनें तो गप्प बसला. याप्रमाणें एकामागून एक सात मुलें जेव्हां त्या सुंदर चांडाळणीनें गंगेंत नेऊन बुडविलीं तेव्हां मात्र राजाचा क्रोध अनावर झाला. आठव्या खेपेस तो "कृमि उलटला" व त्यानें तिच्यावर १४४ कलमा-

प्रमाणें नोटीस बजावली. तेव्हां त्या राक्षसिणीनें मुलास राजापाशीं ठेवून स्वतः हंसत हंसत गंगाकिनारीं जाऊन नदींत उडी घेऊन जीव दिला."

११. आपणांस आश्चर्य वाटूं लागतें कीं असल्या गोष्टी आपल्या समाजांत होत होत्या कीं काय व ही सत्यकथा असल्यास ती प्रसिद्ध करण्यापासून व्यास-महर्षींनीं जगाचा काय फायदा केला? असल्या गोष्टी वाचून अलीकडील तरुण-तरुणी आपलीं मुलें नदींत बुडवूं लागतील या भीतीनें महाभारत वाचण्याची आपल्या मुलांस मनाई करणारे एक सुशिक्षित सद्गृहस्थ मला माहीत आहेत. गोष्ट आश्चर्यजनक तर खरीच, व ती आज आपणास विसाव्या शतकांतच नव्हे तर शौनकादिकांसहि तशी वाटली; पण त्यांचा जडवादानें बुद्धिभेद झाला नसल्यानें त्यांनीं ती आदरभावानें ऐकून घेतली व गोष्ट संपल्यावर असली गोष्ट कां सांगितली हा आपलाच प्रश्न त्यांनीं सूतास विचारला. सूतांनीं उत्तर दिलें, "तुमची शंका अगदीं बरोबर आहे; पण ती घटना नीट समजण्यास थोडें मागें गेलें पाहिजे. एक वेळेस इंद्रलोकामध्यें सभा भरली असतां तेथें दुर्वास ऋषि आले. त्यांची ती ओबडधोबड आकृति पाहून तेथें हजर असलेल्या गंगा नदीस व अष्टावसूंस हसें आवरेना! तें पाहून दुर्वास ऋषींना राग आला. ते म्हणाले कीं, माझें हें वेडेंविद्रें मृत्युलोकीचें रूप पाहून तुम्हांस हसूं येतें, पण हा दोष माझा नाहीं. मृत्युलोकची मातीच तशी आहे. ही तुमची आठवण विसरलेली दिसते. याला उपाय म्हणजे तुम्हां सर्वांस फिरून मृत्युलोकीं धाडलें पाहिजे. असें म्हटल्याबरोबर त्या देवता गयावया करूं लागल्या. कारण सर्वांस माहीतच आहे कीं, मृत्युलोकच्या किड्यांना येथें कितीहि आनंद वाटत असला तरी स्वर्गलोकीच्या फुलपाखरांना फिरून अळी व्हावेंसें वाटत नाहीं. दुर्वास ऋषींनीं उत्तर दिलें कीं, तुम्हांला हा धडा शिकलाच पाहिजे. तेव्हां तुम्हांस मी पूर्ण माफी देऊं शकत नाहीं. तुम्हां सर्वांस मृत्युलोकीं गेलेंच पाहिजे. परंतु तेथें किती दिवस राहिलें पाहिजे याविषयीं मी आग्रह धरीत नाहीं. तुम्हीं आपसांत व्यवस्था करून मृत्यूच्याद्वारें तेथून लवकर परत येण्याची कांहीं व्यवस्था केलीत तर त्यास माझी हरकत नाहीं. याप्रमाणें गंगादेवीनें आपली स्मृति कायम ठेवून मृत्युलोकीं जाऊन तेथील सृष्टिनियमाप्रमाणें त्या वसूंचें स्वागत करून त्यांपैकीं सातजणांना परत पाठवून दिलें; व स्वतः आठ वेळां प्रसूति-वेदना सहन करून ती परत गेली. आत्महत्या ही परमेश्वरी नियमसंमत नसल्या-

मुळें आठव्या वसूस मृत्यु लोकांत अडकून पडावें लागलें व तोच पुढें भीष्म-पितामह या नांवानें प्रसिद्धीस आला.

१२. विस्तारभयास्तव या गोष्टींत धर्माचीं मूलतत्त्वें किती सुंदर रीतीनें गोवलीं आहेत हें मी सांगत नाहीं, सुज्ञ वाचकांच्या तें सहज लक्षांत येईल. येथें ही गोष्ट लिहिण्याचा माझा मुख्य उद्देश हाच आहे कीं धर्मशिक्षण देतांना त्या गोष्टींच्या मागें असलेलें तत्त्वज्ञान लक्षांत न ठेवल्यास त्यापासून समाजाची हानि होते. या सर्व गोष्टी सत्यकथा आहेत किंवा नाहींत हा प्रश्न अगदीं गौण आहे. याचा निकाल लागणें शक्य नाहीं. श्रीरामचंद्रांना एक स्त्री होती का अनेक होत्या याचा निकाल रामायणांतील सव्वादोन श्लोकांच्या आधारें लावूं इच्छिणाऱ्या सत्यान्वेषकास असें विचारतां येईल कीं, श्रीरामचंद्र नांवाचा मनुष्य खरोखरीच होऊन गेला याविषयींच तुमचेजवळ काय पुरावा आहे. जुन्या गोष्टी कशा **वाचूं नयेत** याचें उत्कृष्ट उदाहरण–नुकतेंच एका M. A. B. T. गृहस्थांनीं प्रसिद्ध केलेला "अद्यापि कोणत्याहि भाषेंत प्रसिद्ध न झालेला वेद-कथांचा संग्रह" हें आहे. किर्लोस्कर मासिकाचे वाचकांसहि या गोष्टी पूर्ण विदित आहेतच. हे सर्व जडवादाचे परिणाम आहेत व ते पुष्कळदां गंध लावणाऱ्या व तुळशीबागेंत जाणाऱ्या सुशिक्षित विद्वानांतहि आढळतात. ही परिस्थिति बदलणें हें धर्मशिक्षणाचें कार्य आहे. मग तें गोष्टीरूपें किंवा भक्तिरूपें किंवा तत्त्वज्ञानरूपें अगर आत्मसमर्पणरूपें या सर्व तऱ्हांनीं देशकालानुरूप केलें पाहिजे.

१३. श्रीमद्भगवद्गीतेंतील सर्व धर्म खालील पांच श्लोकांत येतो.

**॥ अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**॥ गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ॥ ( २–११ )**

**॥ उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**॥ आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ (६–५ )**

**॥ बहूनि मे व्यतीतानी जन्मानि तव चार्जुन ।**
**॥ तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ( ४–५ )**

**॥ यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**॥ तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ( ६–३० )**

॥ आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
॥ सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ( ६-३२ )

या पांच श्लोकांत सर्व धर्मांचें सार आलें. " जीव अमर आहे. सर्व सुख-दुःखांबद्दल तो स्वतः जबाबदार आहे. तो पृथ्वीवर अनेकदां येतो. सर्वांभूतीं एक तत्त्व आहे हें पटलें म्हणजे मुक्त होतो व जगांत सर्वदा " आत्मौपम्येन " राहतो " हें सर्व शिक्षणांत गोवणें हें धर्मशिक्षणाचें मुख्य कार्य आहे.

१४. या पायाखेरीज निवळ नीतिशिक्षण व्यर्थ आहे. खोटेपणानें वागणारांची जेथें सकृद्दर्शनीं चलती झालेली पदोपदीं दिसते तेथें " सत्य सदा बोलावें " असें सांगण्याचा उपयोग देशांत प्रचलित असलेल्या अहिंसावादाइतपतच होतो. पाठीमागें सैन्याचा जोर असल्याखेरीज शत्रूस पाठवलेल्या सहा महिन्यांच्या निर्वाणीच्या खलित्याइतकीच त्याची किंमत ठरते. निवळ जडवादावर नीति-मत्तेची इमारत उभारतां येत नाहीं, व अध्यात्माखेरीज नीतिबंधनें अगदीं अशास्त्रीय ठरतात.

१५. म्हणून नीतिशिक्षणास धर्मशिक्षणाचा पाया पाहिजे; व हें आजहि पूर्ण शक्य आहे. फक्त वर दिलेलीं धर्मतत्त्व शिकवितांना श्रीमद्भगवद्गीतेंतीलच आणखी दोन श्लोक लक्षांत ठेवले पाहिजेत.

॥ न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
॥ जोषयेत् सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ ( ३-२६ )

॥ यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
॥ स यत् प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ ( ३-२१ )

याचा अर्थ आपले मोठमोठ्या लोकांस व शिक्षकांस ही गोष्ट पटून त्यांनीं जडवाद सोडून दिला पाहिजे. जेथें शिक्षणमंत्री अवतारांची मूर्खपणाची कल्पना समाजांतून गेल्याखेरीज समाजाची उन्नति होणार नाहीं असें म्हणतात; अगर ज्या कॉलेजचा प्रिन्सिपल ईश्वर असेल तर त्यांनीं मला एक थप्पड मारावी असली भाषा बोलतो, तोंपर्यंत त्या प्रांतांत अगर त्या शिक्षणसंस्थेंत त्यांनीं दररोज संध्या केली पाहिजे असा नियम केला तरीदेखील खरें धर्मशिक्षण तेथें अशक्य आहे. हा निव्वळ एकादशीच्या उपवासाचा अगर देवदर्शनाच्या

सक्तीचा प्रश्न नाहीं. ते सर्व निरनिराळे मार्ग आहेत. त्यामध्यें पूर्ण सहिष्णुता दाखवलीच पाहिजे. म्हणूनच " साधनानां अनेकता " हें हिंदु धर्माचें एक लक्षण आहे. परंतु आस्तिक्यभाव पाहिजे तो काय, तें गीतेंतील पांच श्लोकांत मीं वर दाखविलेंच आहे. मुख्य प्रश्न जडवाद हा आहे व तो शिक्षणांत धर्मास स्थान नसल्याकारणानें आपल्या सुशिक्षितांचे रोमरोमांत भरला आहे. तेथून या कार्यास सुरुवात झाली पाहिजे असें माझ्या अल्प मतीस वाटतें. अलीकडे आइनस्टाइननें दाखविलेली विचारसरणी, व फोर्थ डायमेनशन्ची शक्यता वगैरे गोष्टी समजून घेण्याचा प्रयत्न केल्यास अधिदैव कसें शक्य आहे याची थोडी कल्पना येईल. पूर्ण खात्री होणें कठीण आहे; पण पतंजलींनीं तो मार्ग स्पष्ट दाखविलेला आहे. थोडा विश्वास पाहिजे. कार्बनचें ॲटोमिक वेट ३२ आहे हें आपल्या कोणत्या प्रोफसरांनीं स्वतः अजमाविलें आहे. त्या-बद्दल आपण टोपीवाल्यांवर विश्वास ठेवतोंच कीं नाहीं ? तितपतच श्रद्धा पाहिजे. या उषःकालांत चळवळीचें सामर्थ्य तर आहेच; पण श्री समर्थांनीं बजावून सांगितलें आहे कीं,

" परंतु अधिष्ठान पाहिजे भगवंताचें " ।। हेंच धार्मिक शिक्षण. तोच नीतीचा पाया.

---

# मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण

लेखक:—स. ज. भागवत

"My plan to impart Primary Education through the medium of village-handicrafts like Spinning and Carding etc., is thus conceived as the spear-head of a silent social revolution fraught with the most far-reaching consequences. It will provide a healthy and moral basis of relationship between the city and the village and thus go a long way towards eradicating some of the worst evils of the present social insecurity and poisoned relationship between the classes. It will check the progressive decay of our villages and lay the foundation of a juster social order in which there is no unnatural division between the 'haves' and 'have-nots' and everybody is assured of a living wage and the right to freedom."

—महात्मा गांधी

म. गांधींनीं मूलोद्योगाच्या द्वारा मुलांना शिक्षण देण्याची योजना राष्ट्रापुढें मांडिली या गोष्टीला दोन वर्षें होऊन गेलीं. या काळांत अखिल हिंदुस्थानांत या अभिनव योजनेचा प्रयोग मोठ्या प्रमाणावर चालू झाला आहे. सध्यां या पद्धतीच्या दोन हजारांवर शाळा चालल्या असून एकूण चौदा अध्यापनकेंद्रें काम करीत आहेत. हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती शिक्षणसमितीनें या योजनेचा स्वीकार केला आहे. नुकतीच पुण्यास 'हिंदुस्तानी तालीमीसंघा'तर्फे या योजनेची पहिली अखिल भारतीय परिषद झाली. या परिषदेबरोबरच या योजनेंतील शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या हस्तव्यवसायांचें आणि शैक्षणिक कार्यांचें एक मोठें प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें. या योजनेसंबंधीं चांगलें

साहित्य निर्माण होऊं लागलें असून राष्ट्रांतील अनेक बुद्धिमान लोक या योजनेचा प्रयोग सहानुभूतीनें अवलोकीत आहेत. हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत अखिल लोकव्यापी आणि संपूर्णतया राष्ट्रीय अशी ही पहिलीच शिक्षणयोजना असल्यामुळें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाच्या हीरकमहोत्सव-प्रसंगीं तिचा थोडा विचार करणें हें विशेष औचित्यपूर्ण होणार आहे.

शिक्षणाचा विचार करावयाचा म्हणजे व्यक्ति आणि समाज यांचे आदर्श आणि त्यांची विद्यमान परिस्थिति यांचा विचार करून विद्यमान परिस्थितींतून इष्ट आदर्श निर्माण होतील अशी पद्धति शोधून काढणें होय. शिक्षण हें व्यक्तिविकासासाठीं असावें कीं समाजधारणेसाठीं असावें असा एक वाद नेहमीं चाललेला दिसतो. वस्तुतः व्यक्ति आणि समाज यांत विरोध असण्याचें कारण नाहीं. निदान या दोघांच्या आदर्शांत तरी अविरोधच असला पाहिजे. व्यक्ति समाजांतच जन्म घेते आणि तिचा विकासहि समाजाच्या सहकार्या-शिवाय होऊं शकत नाहीं. समाजसंस्थेचें कार्य व्यक्तींचा संपूर्ण विकास घड-वून आणणें हेंच आहे. म्हणून शिक्षणानें व्यक्ति आणि समाज या दोघांचे पर-स्परसंबंध जाणूनच आपली पद्धति आंखली पाहिजे. व्यक्ति सुखाची, स्वातंत्र्या-ची आणि ध्येयविषयक प्रगतीची आकांक्षा बाळगते. समाज त्यागाची, शिस्तीची आणि परंपरेची आकांक्षा बाळगतो. या आकांक्षा परस्परविरोधी आहेत अशा समजुतीनें नेहमी क्रांतिकारक आणि सनातनी यांचे झगडे चालतात. जीवनाच्या आदर्शांत सुख आणि त्याग, स्वतंत्रता आणि नियंत्रितता, प्रगति आणि परंपरा हीं कांहीं विरोधी द्वंद्वें नाहींत. तीं एकमेकांना पोषक आणि आवश्यक आहेत. शिक्षणानें ह्या आकांक्षांमधील भासमान विरोध नाहींसा करून त्यांची परस्परपूरकता सिद्ध करून दिली पाहिजे. जीवनाला आपल्या आदर्शांत अभ्युदय आणि निःश्रेयस या दोघांचीहि सिद्धि कराव-याची असते. या दोघांमध्येंहि विरोध नाहीं. अभ्युदयाचें स्वरूप भौतिक असतें आणि निःश्रेयस ही नैतिक वस्तु आहे हें खरें असलें तरी भौतिक आणि नैतिक या एकाच जीवनाच्या दोन अवस्था आहेत. यामुळें त्यांच्यामध्यें परस्परावलंबित्व आणि परस्परपूरकत्व आहे. विशिष्ट भौतिक अवस्थेंत विशिष्ट नैतिक अवस्था निर्माण करण्याचें सामर्थ्य असतें. त्याच प्रमाणें विशिष्ट नैतिक मूल्यें विशिष्ट भौतिक घटना निर्माण करूं

शकतात. शिक्षणानें जीवनाच्या ह्या दोनहि अवस्थांचें सम्यक् आकलन करून ।आपल्या पद्धतींत त्याना यथार्थ स्थान मिळवून दिलें पाहिजे. शिक्षणाला जीवनाची घडण करावयाची असल्यामुळें जीवनाच्या साऱ्या क्षेत्रांशीं शिक्षणानें आपला संबंध जाणला आणि जोडला पाहिजे. व्यक्ति आणि समाज यांच्या जीवनांत ज्या ज्या आकांक्षा निर्माण होतात, त्या सर्वांचें प्रतिबिंब शिक्षणांत अवश्य पडलें पाहिजे. यासाठीं शिक्षण हें जीवनाच्या अनेक शास्त्रांतील एक शास्त्र असें समजून चालणार नाहीं. शिक्षण हें जीवनाचें एकमेव शास्त्र आहे. शिक्षणाच्या सार्वभौम छत्राखालीं जीवनाच्या अंगोपांगांच्या सर्व शास्त्रांनीं आपला संसार चालविला पाहिजे. आर्थिक, सामाजिक, राजकीय, नैतिक आणि आध्यात्मिक या सर्व जीवनव्यापारांशीं शिक्षणानें आपला अखंड संबंध राखला पाहिजे. जुन्या काळीं जीवनावर अशी सार्वभौम सत्ता चालविणाऱ्या शास्त्राला धर्मशास्त्र असें म्हणत असत. तें वस्तुतः त्या काळचें शिक्षणशास्त्रच होतें. आधुनिक युगांत धर्मकल्पनेला पुष्कळच विकृत स्वरूप आलें असल्यामुळें धर्मशास्त्राचा व्यापक अधिकार कित्येक विचारवंतांच्या बुद्धीला पटत नाहीं. तथापि त्यांना शिक्षणशास्त्राची वरील कल्पना मान्य होत चालली आहे. शिक्षण हा आधुनिक युगाचा धर्म झाला असून शिक्षणशास्त्राला धर्मशास्त्राची थोरवी प्राप्त होत आहे. आणखी एका दृष्टीनें शिक्षणाला विचार करावयाचा असतो. आतांपर्यंत व्यक्तींनीं निरनिराळे संघ बनवून आपल्या विकासाच्या चळवळी चालविल्या. कुल, गोत्र, जाति, वंश, धर्म इत्यादि रूपांनीं हे संघ ओळखले जात होते. आधुनिक कालांत वर्ग आणि राष्ट्र या कल्पना पुढें आल्या असून त्या नांवांनीं संघटना चालू झाल्या आहेत. एकाच राष्ट्रांत वर्गविरोध माजत आहेत; आणि राष्ट्रांराष्ट्रांतहि विरोध आणि वैर यांची वाढ होत आहे. हा विरोध आर्थिक आणि सांस्कृतिक आहे. वर्ग आणि राष्ट्र त्याचप्रमाणें राष्ट्र आणि मानवकुल यांमधील सध्यां अत्यंत तीव्रतेनें भासणारा हा विरोध जीवनाच्या दृष्टीनें असत्य आणि अयथार्थ आहे. राष्ट्रांतील सर्व वर्ग आणि विश्वांतील सर्व राष्ट्रें यांच्यामध्यें जीवनाच्या दृष्टीनें परस्परसहकार आणि सहजीवन नांदलें पाहिजे. जीवनाच्या शिक्षण-शास्त्राला हा वर्गविरोध आणि राष्ट्रविरोध मिटवावयाचा आहे; आणि सर्वोदयाच्या तत्त्वावर मानवी संस्कृति उभारावयाची आहे.

म. गांधींनीं आपल्या राष्ट्रापुढें जी शिक्षणपद्धति मांडली आहे ती आतां-पर्यंत वर्णिलेल्या जीवनाच्या सर्वोदय-दर्शनावर आधारलेली आणि उभारलेली आहे. ती एक फुटकळ कल्पना नाहीं. म. गांधींच्या आतांपर्यंतच्या सर्व चळ-वळींत आश्चर्यकारक असा एकसूत्रीपणा दिसून येतो. त्यांच्या सर्व विचारांत जीवनाचें एकच दर्शन पहावयास मिळतें. या दर्शनाच्या प्रकाशांतच त्यांची शिक्षण-पद्धति स्पष्ट होऊं शकेल. मानवी जीवनाचें परम प्रयोजन आध्यात्मिक मुक्ति हेंच आहे असें आजपर्यंतच्या सर्व साधुसंतांप्रमाणें म. गांधींचेंहि मत आहे. जीवनाचा उपयोग भौतिक विलासाकडे करावयाचा नसून नैतिक विकासाकडे केला पाहिजे असा त्यांचा आग्रह असतो. पशु आणि मनुष्य यांमधील फरक केवळ बौद्धिक ज्ञानाचा नसून नैसर्गिक प्रेरणेचा आहे. पशूचें जीवन भौतिक आणि देहापुरतें मर्यादित असतें म्हणून त्याचा आंधळा 'संसार' चालू राहतो. मनुष्याचा मोठेपणा त्याच्या आत्मशक्तींत आहे. म्हणून त्याला ज्ञानाची 'संस्कृति' निर्माण करतां येते. ही संस्कृति शाश्वत नैतिक मूल्यांवर उभारली जाईल तरच ती चिरंतन होऊं शकेल आणि मनुष्यजीवनाला कृतार्थ करील असें म. गांधींचें म्हणणें आहे. पण नैतिक ध्येयवादित्व इतकेंच त्यांच्या विचाराचें स्वरूप नाहीं. तसें असतें तर संसाराचा त्याग करून त्यांनीं हिमालयाचा रस्ता सुधारला असता. सामाजिक अनेकविध व्यापसंतापांत त्यांना पडावेंसें वाटलें नसतें. पण म. गांधी हे अध्यात्मवादी असले तरी ते व्यक्तिवादी नसून समाजवादी आहेत. समाजांतील सर्वसाधारण मनुष्याला अध्यात्मजीवनाचा लाभ घडवून देतां येईल अशी त्यांची आकांक्षा आहे. यासाठीं समाजांतील सर्व प्रकारचे व्यवहार सत्य, न्याय आणि प्रेम यांवर आधारले गेले पाहिजेत अशी त्यांची शिकवण आहे. सामाजिक जीवनांत आज जी विषमता व हिंसा निर्माण झाली आहे ती सर्वथा नाहींशी करावयाची असल्यास प्रत्येक व्यक्तीचें जीवन शक्य तितकें साधें, स्वावलंबी व संयमी झालें पाहिजे आणि कोठें अन्याय अगर पिळणूक होऊं लागेल तर त्या गोष्टीचा निर्भयतेनें परंतु संपूर्ण शांततेच्या मार्गानें प्रतिकार केला पाहिजे असा त्यांचा आदेश आहे. नैतिक विकास हें मनुष्यजीवनाचें साध्य धरलें तरी भौतिक वस्तूंची साधन म्हणून आवश्यकता असतेच. मनुष्याला अन्नवस्त्र, गृह, आरोग्य, शिक्षण, संरक्षण, यांची गरज असल्यामुळें व्यक्तिमात्राला या सर्वांचा योग्य प्रमाणांत लाभ होईल अशी समाजरचना इष्ट आहे. यासाठीं समाजजीवनाच्या

सर्व क्षेत्रांत म. गांधींनीं विधायक कार्यक्रम चालविले आहेत. सत्तेचें, संपत्तीचें अथवा शक्तीचे केंद्रीकरण हें नेहमीं समाजांत दास्य आणि विषमता निर्माण करीत असल्यामुळें त्यांचा सर्व तऱ्हेचें केंद्रीकरण नाहींसें करण्यावर कटाक्ष असतो. या दृष्टीनें त्यांनीं चरखा-ग्रामोद्योग यांच्या द्वारा अन्नवस्त्राच्या बाबतींत पूर्ण स्वावलंबी बनलेल्या कुटुंबांच्या ग्रामराज्यांची संघटना उपदेशिली आहे. अस्पृश्यतानिवारण, मद्यपानबंदी, सर्व धर्मसमभावाच्या तात्त्विक अधिष्ठानावर आधारलेलें हिंदु-मुसलमान इत्यादि विविध धर्मीयांचें ऐक्य, हिंदुस्थानीचा राष्ट्रभाषा म्हणून स्वीकार यांच्या द्वारें समाजमनाची शुद्धि करण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. समाजकार्यांत पुरुषांबरोबर स्त्रियांनाहि त्यांनीं समान स्थान कल्पिलें आहे. नैतिक साध्यांच्या निर्मितीला नैतिक साधनांचाच अवलंब केला पाहिजे ही त्यांनीं मोठी शिकवण हिंदुस्थानच्या द्वारा अखिल मानवतेला दिली आहे. त्यांनीं आपल्या दीर्घ आयुष्यांत समाजजीवनाच्या महत्त्वाच्या सर्व क्षेत्रांत संशोधनाची आणि सेवेची दीक्षा घेतलेले असंख्य कार्यकर्ते निर्माण केले असून शुद्ध नैतिक मूल्यावर मानवी संस्कृति कशी रचितां येईल याची कल्पना आणून दिली आहे. आपल्या राष्ट्रांतील अखिल जनतेला या संस्कृतिनिर्मितीच्या कामीं उपयुक्त बनविण्यासाठीं त्यांनीं आतां आपली शिक्षणाची राष्ट्रीय योजना सादर केली आहे; आणि माझी ही राष्ट्राला शेवटची, सर्वश्रेष्ठ देणगी आहे असें त्यांनीं म्हटलें आहे.

ही शिक्षणयोजना सामान्यतः 'वर्धा-योजना' या नांवानें ओळखली जाते. या योजनेच्या पुरस्कर्त्यांनीं हिला 'मूलोद्योगी राष्ट्रीय शिक्षण' (Basic National Education) असें नांव दिलें आहे. म. गांधींनीं या योजनेला Rural National Education through Village-handicrafts (ग्रामोद्योगी राष्ट्रीय ग्रामशिक्षण) असें नांव दिलें आहे. या नांवाचें स्पष्टीकरण करतांना ते म्हणतात. " Rural excludes the so called higher or English education. 'National' at present connotes Truth and Non-violence. And 'through Village-handicrafts' means that the framers of the scheme expect the teachers to educate village-children in their villages so as to

draw out all their faculties through some selected village handicrafts in an atmosphere free from super-imposed restrictions and interference." ही योजना म्हणजे खेड्यांतील मुलांच्या शिक्षणांत एक क्रांतिच आहे. यांत पाश्चात्यांची यत्किंचितहि उसनवारी नाहीं असेंहि त्यांनीं या योजनेविषयीं म्हटलें आहे. इंग्रजी राज्यांत लोकशिक्षणाचा प्रश्न कधींच आस्थेनें हाताळण्यांत आला नाहीं. लोकशिक्षण म्हणजे हिंदुस्थानच्या सात लक्ष खेड्यांत मुख्यतः शेतीवर आणि सर्वतः शरीरश्रमावर संसार चालविणाऱ्या गरीब आणि दुबळ्या लोकांचें शिक्षण. इंग्रजांची कारकीर्द सुरू होण्यापूर्वी हिंदुस्थानचीं सर्व खेडीं संपन्न, सुखी आणि संघटित होतीं. पण इंग्रजी राज्याच्या दीडदोनशें वर्षांच्या काळांत हीं खेडीं सर्वथा उत्सन्न झालीं आहेत. खेड्यांतील बुद्धि आणि कर्तृत्व शहरांत जाऊन बेकार झालें आहे. आणि खेड्यांत केवळ लाचार आणि गुंड यांची वस्ती उरली आहे. खेडीं आणि शहरें यांच्यामध्यें निर्माण झालेला संबंध आर्थिक आणि नैतिक अशा दोन्ही दृष्टींनीं घातक झाला आहे. शहरें हीं खेड्यांतील जनतेचें रक्तशोषण करीत असून खेड्यांविषयीं अगदीं बेदरकार झालीं आहेत. यांत सर्व राष्ट्राचा नाश ठेवलेला आहे. हिंदुस्थानचें संजीवन करावयाचें असेल तर हीं लक्षावधि खेडीं पुनः पूर्व वैभवाप्रत नेलीं पाहिजेत. महात्माजींच्या शिक्षणयोजनेंत हेंच उद्दिष्ट राखलें आहे. खेड्यांतील जनतेंत भीषण दारिद्य आणि भयानक अज्ञान यांचें साम्राज्य माजलें आहे. खेड्यांतून निसर्गसंपत्ति पडून राहिली आहे. कोट्यवधि लोक पुरेसें काम नाहीं म्हणून सुस्तपणानें काळ वायां घालवीत आहेत. रिकामा काळ, बेकार हात आणि निसर्गाची विपुल संपत्ति या गोष्टींना एकत्र आणून त्यांतून मानवी जीवनाला आवश्यक आणि अलंकारक अशा उभयविध वस्तूंची निर्मिति शिक्षणानें केली पाहिजे. शिक्षण म्हणजे अक्षरज्ञान नव्हे. केवळ लिहिणें-वाचणें शिकल्यानें मनुष्य जीवनकार्याला समर्थ होत नाहीं. तो आपला सर्वांगीण विकासहि साधूं शकत नाहीं. शिक्षणाचा जीवनाच्या प्रत्यक्ष निरीक्षणाशीं आणि प्रयोगाशीं संबंध जोडला पाहिजे. मानवी शरीरघटनेचा विचार केला असतां एक अत्यंत महत्त्वाचा शोध लागतो. मनुष्याला आपल्या चरितार्थासाठीं अनेक प्रकारच्या वस्तू संपादाव्या लागतात. माणसाचा मोठेपणा त्याच्या बौद्धिक ज्ञानावर आणि नैतिक चारित्र्यावर अवलंबून

असतो. चरितार्थाचीं साधनें, बौद्धिक ज्ञान आणि नैतिक चारित्र्य या जीवनाच्या तीनहि पुरुषार्थांचें मीलन मनुष्याच्या हाताच्या कृतींत सामावलेलें आहे. पाश्चात्यांमध्यें रूसो, पेस्टालात्झी, फ्रोबेल इत्यादि शिक्षणशास्त्रज्ञांनीं हा हस्तमहिमा ओळखला होता. त्यांच्या उपदेशामुळें शरीरशास्त्री आणि मानसशास्त्री यांनीं अनेक प्रकारचे प्रयोग करून शास्त्रीय दृष्टया ही गोष्ट आतां निर्विवाद सिद्ध केली आहे. हात हें ज्ञानाचें–विचाराचें–इंद्रिय आहे (The hand is an organ of thought). तें बुद्धि आणि भावना यांना जागृत करणारें प्रभावी साधन आहे (The hand is a potent instrument in opening the entellect as well as in training sense and will) ही गोष्ट आतां शिक्षणशास्त्रांत सर्वमान्य झाली आहे. हातांनीं जीवनाच्या अन्नवस्त्रादि गरजा भागवितां येतात; ह्यासाठीं पांडित्य करण्याची मुळींच गरज नाहीं, ती अगदीं उघड गोष्ट आहे. म. गांधींच्या शिक्षण-योजनेंत उद्योगावर मुख्य भर दिलेला आहे. तो शास्त्रीय दृष्टीनें संपूर्णतया समर्थनीय आहे हें यावरून सहज दिसून येईल. रूसो, पेस्टालात्झी यांनीं हस्त-महिमा ओळखला खरा; परंतु त्यांच्या विचारांना शिक्षणांत स्थान मिळण्याच्या दृष्टीनें एक मोठी अडचण उत्पन्न झाली. ती म्हणजे यंत्रयुगाचा उदय ही होय. यांत्रिक शोधांनीं पाश्चात्य देशांत औद्योगिक क्रांति झाली आणि इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इटली व अमेरिका इत्यादि देशांनीं आपलीं ग्रामोद्योगाचीं खेडीं मोडून यंत्रोद्योगांची विराट् नगरें वसविलीं. यामुळें हस्तोद्योगाला शिक्षणांत स्थान उरलें नाहीं. तथापि जनता-शिक्षणाचा कार्यक्रम सुरू झाल्यापासून आणि विशेषतः कामकऱ्यांच्या मुलांना कारागिरीच्या कामाचें शिक्षण देण्याची आवश्यकता भासूं लागल्यापासून युरोप-अमेरिकेंत अलीकडे उद्योगप्रधान शिक्षणाला पुनः जोराची चालना मिळाली आहे; आणि Activity School (कृति-शाळा) नांवाची शैक्षणिक चळवळ चालू झाली आहे. युरोप-अमेरिकेचें कांहीं झालें तरी हिंदुस्थानांत लक्षावधि खेडीं, कोट्यवधि माणसांनीं गजबजलेलीं आहेत ही येथील वस्तुस्थिति आपणाला विसरतां येणार नाहीं. कोट्यवधि हातांना आपणाला काम द्यावयाचें आहे आणि तें ताबडतोब द्यावयाचें आहे. त्याच वेळीं त्यांची बुद्धि जागृत करावयाची आहे. त्यांच्यांत शास्त्रीय दृष्टि निर्माण करावयाची आहे. शिस्त आणि उद्योगप्रियता यांचें महत्त्व त्यांना पटवून द्यावयाचें आहे.

या दृष्टीनें पाहतां हिंदुस्थानच्या खेड्यांतील शिक्षण ग्रामोद्योगावर रचल्या-शिवाय आपणाला गति नाहीं. म्हणजे शिक्षण हें केवळ बौद्धिक अथवा अलंकारात्मक न राहतां तें आर्थिक दृष्टया उपयुक्त होईल.

म. गांधींच्या शिक्षणयोजनेंत तीन भाग प्रमुख आहेत. उद्योगाच्या द्वारें शिक्षण द्यावयाचें हा पहिला भाग. यासाठीं एखादा मूलोद्योग शिकवावयाचा. बौद्धिक विषयांचें शिक्षण उद्योगाच्या अनुषंगानें द्यावयाचें हा दुसरा भाग; आणि मूलोद्योगांतून निर्माण झालेल्या वस्तु शाळेला स्वावलंबी बनविण्याच्या दृष्टीनें उपयोगी पडतील असें करावयाचें हा तिसरा भाग. हे तीनहि भाग परस्परावलंबी आहेत. यांचा विच्छेद करून चालणार नाहीं. याचें नांव मूलोद्योगी शिक्षण. हें शिक्षण सर्व राष्ट्राला मोफत आणि सक्तीचें द्यावयाचें आहे. वयाच्या सातव्या वर्षापासून चौदाव्या वर्षापर्यंत या शिक्षणाचा काल ठरविण्यांत आला आहे. या अवधींत सर्व शिक्षण स्वभाषेंतूनच देण्यांत येईल. चौदाव्या वर्षी विद्यार्थ्याला आजच्या मॅट्रिकइतकें बौद्धिक ज्ञान मिळेल. फक्त इंग्रजी भाषा शिकविली जाणार नाहीं. पण मॅट्रिकपेक्षां त्याची स्थिति अधिक स्पृहणीय होईल. कारण त्याला एक चांगला उद्योग शास्त्रीय रीतीनें शिकविण्यांत आलेला असल्यामुळें त्याच्यावर बेकार राहण्याची पाळी येणार नाहीं. त्याचे बौद्धिकज्ञान कृतीच्याद्वारा लाभलें असल्यामुळ तें त्याला जीवनांत नेहमीं उपयोगी पडेल. राष्ट्रभाषेचें त्याला ज्ञान मिळालेलें असल्यामुळें परप्रांतीय लोकांचे आणि पुढाऱ्यांचे विचार-व्यवहार समजण्यास तो समर्थ होईल आणि इंग्रजीची उणीव त्याला भासणार नाहीं. त्याला आत्मविश्वास लाभलेला असेल. यामुळें तो आपल्या जीवनांत स्वाभिमान आणि निर्भयता प्रकट करूं शकेल. खेड्यांतील जीवनाशीं त्याचा जिव्हाळ्याचा संबंध शिक्षणानें जोडून दिला असल्यामुळें तो आपल्या खेड्याचा उद्धार करण्याला उत्साहानें झटेल. धर्मभोळेपणा, अस्वच्छता आणि अनारोग्याची राहणी यांतून त्याची सुटका झाल्यामुळें त्याचें जीवन विवेकी, स्वच्छ आणि आरोग्यमय होईल. ग्रामोद्योगाच्या शिक्षणानें खेड्यांत नवीन संपत्ति निर्माण करण्याचा मार्ग मिळाल्यामुळें खेडीं पुनः ताजीं तवानीं होतील. अस्पृश्यता-निवारण, मद्यपानबंदी व जातीय ऐक्य यांच्या द्वारा खेड्यांतील समाज समान संस्कृतीचा आणि संघटित शक्तीचा तयार होईल. आर्थिक दृष्टीनें स्वयंपूर्ण आणि सांस्कृतिक दृष्टीनें संपन्न झालेल्या

खेड्यांना शहरें पिळूं शकणार नाहींत. खेड्यांचे आणि शहरांचे संबंध न्याय्य व परस्परोपकारक होतील. या शिक्षणानें सिद्ध झालेली जनता शुद्ध लोकशाही निर्माण करूं शकेल. अशा रीतीनें म. गांधी यांनीं म्हटल्याप्रमाणें हें शिक्षण समाजांत शांतपणें सर्वांगीण क्रांति घडवून आणील.

या शिक्षणपद्धतीचा नीट विचार केला असतां असें आढळून येईल कीं, ती शास्त्रतः अत्यंत निर्दोषी आहे; आणि आपल्या देशाच्या सध्यांच्या परिस्थितीला सर्वतोपरी जुळणारी आहे. हिंदुस्थानसारख्या खंडतुल्य राष्ट्रांत आपणांला लोकशाही निर्मावयाची आहे. युरोपची आजची स्थिति नजरेसमोर आणिली म्हणजे हिंदुस्थाननें कोणत्या सावधगिऱ्या बाळगिल्या पाहिजेत तें स्पष्ट होण्यासारखें आहे. येथें प्रांतिक दुरभिमान बळावूं देतां कामा नये. त्यासाठीं सारे प्रांत आर्थिक दृष्टींनीं स्वयंपूर्ण झाले पाहिजेत आणि त्यासाठीं प्रत्येक प्रांतानें आपापलीं ग्रामें स्वायत्त बनविलीं पाहिजेत. आपलीं खेडीं आपण स्वायत्त बनविलीं तर वर्गकलहाचा प्रश्न येथें निर्माण होण्याचें कारण राहणार नाहीं. खेड्यांच्या एकीकरणासाठीं थोडीं शहरें लागतील आणि अशा शहरांतून मोठ्या प्रमाणावरील यांत्रिक कारखानेहि निर्मिले जातील. तथापि स्वायत्त ग्रामराज्यांच्या मध्यभागीं निर्माण झालेलीं शहरें ग्रामीण लोकांच्या आर्थिक जीवनावर आक्रमण करूं शकणार नाहींत. ग्रामोद्योगानें ग्रामसंजीवन घडणार आहे आणि त्याच्या योगेंच स्वतंत्र भारतांत खरीखुरी लोकशाही नांदणार आहे.

उद्योगाच्या द्वारा शिक्षण देण्याच्या पद्धतीला 'समवाय-पद्धति' असें नांव देण्यांत आलेलें आहे. जीवनांतील सर्व विभाग कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें परस्परसंबद्ध असतात. त्यामुळें जीवनाला कोठेंहि स्पर्श केला तरी जीवनाचें सर्व शास्त्र शोधकाच्या हातीं आल्याखेरीज राहत नाहीं. सामाजिक गरजा आणि नैसर्गिक परिस्थिति यांच्या मीलनांत माणसाची कृति जन्म घेत असते. त्या कृतीच्या आश्रयानें निसर्ग आणि समाज यांच्या विविध अंगांशीं विद्यार्थ्यांचा सहज परिचय करून देतां येईल. जाकिर हुसेन कमिटीनें आपल्या अभ्यासक्रमांत शेती, कांतण-विणकाम आणि कार्डबोर्डकाम व लांकूडकाम यांचे अभ्यासक्रम तपशीलवार दिले आहेत. आणखीहि कित्येक उद्योग त्यांत समाविष्ट करतां येतील. कागद बनविणें, चामड्याचें काम, मातीचीं भांडीं बनविणें, दुग्धव्यवसाय, मधमाशा पाळून मध बनविणें इत्यादि ग्रामोद्योग

सर्वत्र चालण्यासारखे आहेत. हे उद्योग केवळ यांत्रिक जड पद्धतीनें शिकवावयाचे नाहींत; तर त्यांचा अभ्यास अत्यंत शास्त्रीय पद्धतीनें करून घ्यावयाचा आहे; आणि शास्त्रीय अभ्यास म्हटला म्हणजे बुद्धीचा विकास हा ठेवलेलाच आहे. भाषा, गणित, समाजपरिचय, सामान्यविज्ञान, रेखन हे सर्व विषय उद्योगाच्या संगतीनें चांगले शिकवितां येण्यासारखे आहेत. पुस्तकपद्धतीपेक्षां प्रयोगपद्धति ही नेहमींच शिक्षणांत श्रेयस्कर मानली जाते. 'समवाय-पद्धति' म्हणजे प्रयोगपद्धतीच होय. समवाय-पद्धतींत असा सिद्धान्त गृहीत आहे कीं, ज्ञान हें कर्माशीं नित्य संबद्ध आहे. त्यामुळें कर्म करूं लागलें कीं, त्याचा कर्त्याला बोध होऊं लागणारच. त्याची मीमांसा करीत गेलें म्हणजे कर्मांत कुशलता आणि ज्ञानांत शास्त्रीयता निर्माण होते. ज्ञानाचे विविध विषयहि परस्परांशीं अनुबद्ध असतात. यामुळें समवाय-पद्धतीनें त्यांचें शिक्षण देणें हें अधिक स्वाभाविक आणि सोयीचें आहे. ही समवाय-पद्धति शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें आजतागायत आणि अत्यंत परिणतीला पोंचलेली पद्धति होय.

शिक्षण स्वावलंबी करीत असतांना एक महत्त्वाची गोष्ट करावी लागेल, आणि ती म्हणजे शाळांतून विद्यार्थ्यांनीं निर्माण केलेले पदार्थ बाजारांत विकण्याची व्यवस्था करण्याचें काम शाळांतील शिक्षकांवर टाकावयाचें नाहीं. तें काम सरकारनें केलें पाहिजे असें म. गांधींनीं प्रथमपासून जाहीर केलें आहे; आणि 'वर्धा योजना' यशस्वी व्हावयाची असेल तर हें काम सरकारकडून करून घेतलेंच पाहिजे. राष्ट्रनिर्मितीच्या या मोठ्या प्रयोगांत सरकारनें आपला वाटा उचललाच पाहिजे. मग तें सरकार कोणत्याहि स्वरूपाचें असो. हें काम सरकारवर टाकण्यांत असा हेतु आहे कीं, ग्रामोद्योगाची वस्तु बाजारांत टिकावयाची असेल तर तिला देशाच्या हितासाठीं कायद्याचें संरक्षण मिळालें पाहिजे. यंत्रानें तिच्याशीं अन्याय्य स्पर्धा करतां कामा नये. ही एक प्रकारची आर्थिक क्रांति आहे; आणि ती पूर्णांशानें यशस्वी करण्यासाठीं शेवटीं राजकीय क्रांतीची आवश्यकता उत्पन्न होणार आहे. अशा रीतीनें 'वर्धा-योजना' ही राष्ट्रीय स्वातंत्र्याला आवश्यक अशा राजकीय क्रांतीकडे अचूक नेणारी आहे. याहि दृष्टीनें ही योजना संपूर्ण राष्ट्रीय आहे असें आपणांस दिसून येईल.

---

# हल्लींच्या शालेय शिक्षणासंबंधानें कांहीं सामान्य विचार

लेखकः—कृष्णाजी गणेश जोशी

हल्लींची शिक्षण-पद्धति कुचकामाची अगर टाकाऊ आहे असे विचार बरेच वक्ते अगर लेखक प्रगट करतांना आढळतात. शिक्षणाची आमूलाग्र सुधारणा झाली पाहिजे असें म्हणण्याची प्रथाच पडली आहे. प्रचलित शिक्षण-पद्धति सर्वस्वी दोषरहित आहे असें प्रतिपादन केलेलें ऐकिवांत नाहीं. हल्लींच्या पद्धतींत सुधारणा करण्यास जरी बराच वाव असला तरी प्रचलित शिक्षणाच्या योगानें बरीच कामगिरी झालेली आहे, हें निर्विवाद आहे. हल्लींच्या शिक्षणानें-च निरनिराळ्या सरकारी खात्यांच्या कामासाठीं लायक नोकरवर्ग निर्माण झाला व त्यामुळें क्रमशः वरच्या वरच्या दर्जाच्या जागांवर काम करण्यास लायक हिंदी लोक मिळूं लागले. या शिक्षणामुळेंच न्यायमूर्ति रानडे, गोखले, टिळक, बोस, टागोर, नेहरू, गांधीजी यांच्यासारखीं विद्वद्रत्नें व राष्ट्रभक्त उदयास आले. एवढेंच नव्हे, तर इंग्रजी वाङ्मय व इतिहास यांच्या अभ्यासानें व दृढ परिचयानें हिंदी समाजांत जागृति उत्पन्न झाली व सामाजिक, आर्थिक, आणि राजकीय प्रश्नांचा विचार नवीनच दृष्टिकोनानें होऊं लागला. सन १९१४–१९१८ च्या महायुद्धापासून नवीन विचारांच्या या खळबळीस विशेष तेज चढून, घोरत पडलेला हिंदी समाज खडबडून जागा झाला, व त्यांत एक प्रकारचें नवचैतन्य भासमान होऊं लागलें. हिंदी लोकांस पूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे असे विचार प्रगट करण्यांत येऊं लागले, व ह्यासंबंधानें स्पष्ट मागणी सुसंघटित व प्रबळ अशा कॉंग्रेसपक्षानें केली. वाघिणीच्या दुधाचें तेज ज्यांत आहे, अशा इंग्रजी शिक्षणाचाच (तें जरी बरेंच सदोष होतें तरी त्याचाच) हा प्रभाव होय ह्याबद्दल फारसा मतभेद होण्यासारखा नाहीं.

२. आपल्या देशास पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे असें कोणत्या सुसंघटित व स्वाभिमानी समाजास वाटणार नाहीं ? आश्चर्य हें कीं, अशा प्रकारची मागणी हिंदी समाजाकडून वर निर्दिष्ट केलेली जागृति झाल्यावरहि अजून एकमुखानें होऊं शकलेली नाहीं, याचें कारण काय असावें ?

याचें उत्तर असें:—इंग्रजी शिक्षणानें नवे नवे विचार सुशिक्षित समाजांत प्रसृत झाले; स्वातंत्र्य (व्यक्तिस्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य, आचार-स्वातंत्र्य), समता, व बंधुत्व यांचा जोरानें पुरस्कार होऊं लागला. जुनीं धार्मिक, कौटुंबिक व सामाजिक बंधनें ढिलीं होत होत अगदीं खिळखिळीं अतएव निर्जीव झालीं. समाजांत वैयक्तिक स्वार्थी वृत्ति जोरावूं लागली व विस्कळितपणा वृद्धिंगत होऊं लागला. जुन्या बंधनांच्या जागीं समाजांत एकोपा उत्पन्न होईल अशीं नवीन बंधनें प्रस्थापित करण्याची परिणामकारक व्यवस्था झाली नाहीं; अगर होऊं शकली नाहीं. तसें झालें असतें तर पत्रांतून स्वतःचा गौरव करून घेण्याची संधि मिळाली नसती. हीं घातुक वैयक्तिक स्वार्थी वृत्तीचीं उदाहरणें सोडलीं तरी सामाजिक कर्तव्याच्या बाबतींत काय दिसून येते ? सार्वजनिक उत्सवाच्या गंभीर प्रसंगीं देशगीत अगर सामुदायिक प्रार्थना म्हटली जात असतांना उच्च स्थळीं अधिष्ठित असलेले विद्वान् अगर धुरीणसुद्धां आपआपसांत बोलतांना किंवा थट्टामस्करी करतांना आढळतात ! सामाजिक जीवनांतील विस्खलितपणाचें हें स्पष्ट द्योतक नाहीं काय ? नाना धर्म, पंथ व जाति यांनीं बनलेल्या विस्खळित हिंदी समाजांत सलोखा, सहिष्णुता व संघटना या गुणांचें योग्य संवर्धन होणें हें, परिस्थिति पूर्ण लक्षांत घेऊन हेतुपुरःसर तयार केलेल्या शिक्षणयोजनेखेरीज जवळ जवळ अशक्यच होय. एवंच, सामुदायिक कामें सहकारी वृत्तीनें, खुल्या दिलानें व एकजुटीनें करण्याची प्रवृत्ति समाजांत रूढ झाली पाहिजे व ह्याचें बाळकडू शिक्षणसंस्थांतून रोजच्या शिक्षणांत मिळालें पाहिजे. सारांश, सांप्रतच्या विस्खलितपणाचें निर्मूलन होईल अशा तऱ्हेचें—निदान त्यास परिणामकारक आळा बसेल असें—शिक्षणाचें ध्येय निश्चित झालें पाहिजे.

३. हल्लींच्या शिक्षणाचें ध्येय उदार शिक्षण ( Liberal Education ) हें होय. हें जरी बरेंच व्यापक असलें तरी तें अत्यंत मोघम असून बहुसंख्य लोकांना फारसें उपयुक्त झालेलें नाहीं. कचेऱ्यांतील व दुकानांतील बैठें काम

करणारा कारकूनवर्ग व वकील अथवा डॉक्टर यासारखे धंदेवाईक निर्माण करण्याचें कार्य हल्लींच्या शिक्षणानें मुख्यतः चांगलें साधलें असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु हीं कामें करणारे लोक समाजांत १०० मागें अवघे ३।४ च असतात. बहुसंख्य समाज खेड्यांत राहणारा आहे.

अशा लोकांची संख्या शेंकडा ७६ हून अधिक आहे. कामधंद्याच्या दृष्टीनें विचार केल्यास असें दिसून येतें कीं, शंभरांपैकीं ६६ हून अधिक लोक शेतीवर उपजीविका करणारे आहेत. ह्या संख्येंत मजूर, सुतार, लोहार व अशा प्रकारचे कारागीर ह्यांची संख्या मिळविल्यास एकंदर संख्या ९५-९६ पर्यंत जाईल.

अठरा विश्वे दारिद्य, गाढ अज्ञान, वर्षांतून जवळ जवळ ५–६ महिने बेकारी ही खेड्यांतील म्हणजे बहुसंख्य लोकांची स्थिति ! समाजांतील विशेष उणीवांसंबंधानें सांगावयाचें म्हणजे समाजांतील वाढत चालणारा वैयक्तिक आपमतलबीपणा, बेबनाव व एकंदर विस्खळितपणा नाहींसा होणें हें अत्यंत जरूरीचें आहे. देशांत प्रातिनिधिक संस्था व लोकशाही पद्धति जारीनें अमलांत यावी अशी प्रबळ आकांक्षा उत्पन्न झालेली आहे. ही आकांक्षा सर्व प्रकारें परिपूर्ण होण्यास चाणाक्ष मतदार संघ, लायक व विश्वासार्ह प्रतिनिधि व अधिकारी वर्ग, आणि विचारी व कर्तबगार नेते निर्माण करणें अत्यंत जरूरीचें आहे. ह्याप्रमाणें समाजाची सर्व परिस्थिति, गरजा व आकांक्षा पूर्णपणें लक्षांत घेऊन शिक्षणाचें ध्येय ठरविण्यांत आलें पाहिजे, तें कोणतें असावें ? शिक्षणानें विद्यार्थ्यांच्या अंगीं जे नैसर्गिक गुण असतील त्यांचा विकास होण्यास अर्थात् पूर्ण वाव मिळाला पाहिजे. त्याबरोबरच प्रत्येक विद्यार्थी सुदृढ, दीर्घोद्योगी, कार्यक्षम व सहकार्य आणि जनसेवा ह्यासारख्या उच्च भावनांनीं प्रेरित असा उपयुक्त व प्रभावी नागरिक बनला पाहिजे. सारांश, हिंदी समाज सुसंघटित, समृद्ध व सर्व प्रकारें प्रगमनशील होईल अशा प्रकारचें शिक्षणाचें स्पष्ट ध्येय असणें हल्लींच्या परिस्थितींत अत्यंत आवश्यक आहे.

४. अशा रीतीनें शिक्षणाचें ध्येय स्पष्टपणें निश्चित झाल्यावर शाळेंतील अभ्यास-क्रम व शिक्षणाची पद्धति ह्या बहुतेक तपशिलाच्या बाबी होत. सामान्यतः शाळेंतील अभ्यासाचे विषय बहुतांशीं ठराविकच असतात. समाजाच्या त्या

त्या वेळच्या विशेष गरजा अगर उणीवा लक्षांत घेऊन कोणत्या विषयावर किंवा कोणत्या बाबीवर विशेष कटाक्ष ठेवला पाहिजे हें वेळोवेळीं ठरविणें जरूर होतें. त्या दृष्टीनें पाहतां सांप्रत शिक्षण-संस्थांतून शरीर-संवर्धन व शारीरिक जोपासना या बाबींकडे प्रामुख्यानें विशेष लक्ष दिलें गेलें पाहिजे. शारीरिक शिक्षणासंबंधानें एका स्वतंत्र समितीनें विचारपूर्वक विधायक सूचना केल्या आहेत. त्या सूचनांचा पूर्ण विचार होऊन त्यांची शक्य ती अम्मलबजावणी सर्व शाळांतून करण्याची तजवीज प्रथम झाली पाहिजे. ह्या बाबीसंबंधानें हल्लींच्या परिस्थितींत अधिक विस्तृत लिहिण्याचें कारण दिसत नाहीं.

५. दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे हस्तव्यवसायाचें शिक्षण ही होय. पुष्कळ सुशिक्षित लोक शिक्षणासंबंधानें आपल्या मुलांच्या किंवा जातीच्या मुलांच्या शिक्षणाकडे नजर ठेवून विचार प्रगट करतांना आढळतात. अशा कोत्या दृष्टीमुळेंच सांप्रत निव्वळ बौद्धिक शिक्षणाला भलतेंच महत्त्व आलें आहे. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, हस्तव्यवसायाचें काम हें हलकें काम होय असा समज रूढ होत जाऊन सुशिक्षितांस अंगमेहनतीचें काम करण्याचा तिटकारा वाटूं लागला आहे. विचाराचें हें लोण शहरांतून खेडेगांवांतहि पोंचलें आहे ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. व्यापक दृष्टीनें विचार केल्यास प्राथमिक शिक्षण हें प्रामुख्यानें बहुसंख्यजनांसाठीं होय, हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. बहुसंख्यलोक खेड्यांत राहतात व ते सामान्यतः शेतकी व मोलमजुरी करून आपली उपजीविका करतात हें वर स्पष्ट केलेंच आहे. निदान खेड्यांतील शाळांतून दिलें जाणारें शिक्षण खेडेगांवांतील जीवनाशीं समरस व्हावें अशी प्राथमिक शिक्षणाची योजना करावयाची असल्यास हस्तव्यवसायाच्या शिक्षणावर अशा योजनेंत विशेष कटाक्ष ठेवण्यांत आला पाहिजे हें उघड आहे. सरकारी अभ्यासपत्रकांत हा विषय दाखल केलेला आहे, तरी पण खेड्यांतील बहुतेक शाळांतून या विषयाकडे दुर्लक्ष होतें.

हस्तव्यवसायाचें शिक्षण हें शिक्षणाचें विशेष महत्त्वाचें अंग होय. खेडेगांवांतील शाळांतून हस्तव्यवसायाच्या शिक्षणावर विशेष कटाक्ष देण्यांत येण्यासाठींच कीं काय, वर्धा-शिक्षणयोजनेनें एक उपाय सुचविला आहे. तो म्हणजे व्यवसायद्वारा शिक्षण देणें हा होय. ही योजना प्रचलित पाठात्मक शिक्षण-पद्धतीहून अगदीं भिन्न असली तरी अत्यंत मननीय आहे. त्यांतील

तत्त्व मानसशास्त्र व शिक्षणशास्त्र ह्यांच्या सिद्धान्तास पूर्णपणें धरून आहे. तें तत्त्व म्हणजे प्रत्यक्ष क्रियेच्या द्वारें शिक्षण देणें हें होय. ह्या योगानें बौद्धिक शिक्षणाला कमीपणा येईल हा निव्वळ भ्रम होय. प्रत्यक्ष कृति करून शिकण्यानें जें शिकावयाचें तें सहज शिकलें जातें; एवढेंच नव्हे, तर तें मनावर चांगलें ठसतें; व हें शिक्षण खरेंखुरें विचार-प्रवर्तक असतें. अशा प्रकारची शिक्षण-पद्धति पाश्चिमात्य देशांतून आतां रूढ झालेली आहे. आपल्या-कडील प्रचलित शिक्षणाची आखणी लॉर्ड वुइल्यम बेंटिंकच्या कारकीर्दीत लंडनच्या शाळांच्या धर्तीवरच करण्यांत आली; परंतु तिकडे परिस्थित्यनुरूप शाळेच्या शिक्षणक्रमांत बदल होऊन सुदृढ, विचारी व कार्यक्षम विद्यार्थी निर्माण होतील अशी दक्षता घेण्यांत येते, तर आपल्याकडे पुस्तकी ज्ञानाच्या जोरावर परीक्षेंत यश मिळवून नोकरीसाठीं येरझारा घालणारा विद्यार्थिवर्ग निर्माण करण्याच्या ठराविक पद्धतींत अद्याप बदल होत नाहीं !

वर्धा-शिक्षण-योजनेंतील व्यवसायद्वारा शिक्षणाच्या योगानें व्यवसायाच्या शिक्षणास जरूर तें महत्त्व प्राप्त होऊन अशा व्यवसायात्मक शिक्षणानें खेडे-गांवांतील लोकांस परिस्थित्यनुरूप शिक्षण मिळून बराच कार्यभाग होणार आहे. खेड्यांतून सामान्यतः सृष्टिनिरीक्षण व बागकाम ह्यांच्याद्वारें शिक्षण देण्याची योजना विशेष खटाटोपाशिवाय होण्यासारखी आहे. तरी पण ही पद्धति नवीन आहे. तिच्याबद्दल बराच गैरसमज व कांहीं दुराग्रहहि आहे. या पद्धतीनें शिकविणारे लायक शिक्षक प्रथम तयार केले पाहिजेत. येणाऱ्या अडचणींचें योग्य प्रकारें निराकरण करून त्या पद्धतीचा अवलंब केल्यास फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं. त्या दृष्टीनें ह्या पद्धतीचा प्रयोग करून पाहण्याची योजना झालेली आहे, ही समाधानाची गोष्ट होय. हा प्रयोग दक्षतेनें, सहानुभूतीनें व व्यवस्थितपणें केला गेल्यास त्यापासून बराच फायदा होण्यासारखा आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या प्रयोगाच्या अनुभवाच्या आधारें शहरांतील प्राथमिक शाळांतूनहि हल्लींच्या पाठात्मक पुस्तकी शिक्षणाऐवजीं प्रत्यक्ष जीवनाशीं निकट संबंध जोडणारें अधिक जोमदार अगर प्रभावी शिक्षण देण्याची व्यवस्था होणेंहि अत्यंत आवश्यक आहे.

तसेंच इंग्रजी शाळांतूनहि शेतकी, व्यापार, अगर सामान्य उद्योगधंद्यांचें शिक्षण देण्याची व्यवस्था करणें जरूर आहे. दुय्यम शिक्षणक्रम संपल्यावर बी. ए., एम्. ए.सारख्या परीक्षांसाठीं अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांमध्येंहि उपयुक्त कामें करण्याची पात्रता येईल अशी दुय्यम शिक्षणाची व्यवस्था असणें जरूर आहे. सामान्यतः दुय्यम शाळांतील सर्व विद्यार्थ्यांना प्रयोगशाळेंत अगर कारखान्यांत प्रत्यक्ष काम करून खालील बाबींबद्दल सांगोपांग माहिती मिळण्याची समाधानकारक व्यवस्था असली पाहिजे: डायनामो, सायकल, स्टोव्ह, मोटारगाडी, कंदील, एंजिन, पेट्रोमॅक्स, रेडिओ, विमान, टेलिफोन, कॅमेरा, इलेक्ट्रिक दिवे, फाउंटन पेन, घड्याळ, कुलूप, पंप वगैरे.

६. शालेय शिक्षणांतील तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे अभ्यासक्रमांत मातृभाषेचें स्थान ही होय. मातृभाषेस शाळेंतील अभ्यासक्रमांत पहिलें स्थान असलें पाहिजे हें प्रतिपादन करण्याची जरूरी पडावी ही खेदाची गोष्ट होय. मातृभाषेच्या योग्य व मार्मिक ज्ञानाच्या पायावरच शिक्षणाची एकंदर इमारत उभारली गेली पाहिजे, हें उघड आहे. इंग्रजी शाळांतील अभ्यासक्रमांत हल्लीं इंग्रजी भाषेला पहिलें स्थान देण्यांत आलेलें आहे.

युक्लिडच्या सिद्धान्ताप्रमाणें दोन वस्तु एकसमयावच्छेदेंकरून एकच स्थान व्यापूं शकत नाहींत. मातृभाषेनें जर एकदां प्रथमस्थान पटकावलें तर इंग्रजी भाषेच्या वाट्यास कोणतें तरी खालचें स्थान येणार, हें उघड आहे. हा एकंदर प्रश्न बराच गुंतागुंतीचा व बिकट आहे हें खरें. तरी पण त्याची टाळाटाळ करून चालणार नाहीं. तरुणांची व्यर्थ कुंचंबणा न होतां ते खरेखुरे ज्ञानसंपन्न, प्रभावी व कर्तबगार व्हावेत अशी उत्कट इच्छा असेल तर वर दर्शविलेल्या दिशेनें बदल घडवून आणण्यासाठीं जारीनें खटपट झाली पाहिजे. ह्या बाबतींत सुधारणा क्रमाक्रमानें का होईना पण ती निश्चितपणें होणें अत्यंत आवश्यक आहे.

७. शिक्षणांतील विचार करण्यासारखी चवथी महत्त्वाची बाब म्हणजे शाळांतून परीक्षांचें माजलेलें खूळ ही होय. साप्ताहिक, मासिक, त्रैमासिक, षण्मासिक, वार्षिक असे परीक्षांचे नाना प्रकार आहेत. परीक्षेविरुद्ध मुख्य आक्षेप परीक्षांच्या संख्येसंबंधानें नसून बाह्य परीक्षांचा शिकणारांवर, शिक्षकांवर व एकंदर शाळेंत चालणाऱ्या शिक्षणावर होणारा वाईट परिणाम हा होय.

शाळेंतील कामाची अंतर्गत माहिती असलेले शिक्षणानुभवी एकमुखानें कबूल करतात कीं, बहुतेक शाळांतून मास्तर व विद्यार्थी वर्षारंभापासून ते अखेरपर्यंत परीक्षेची तयारी करण्यांत गुंतलेले असतात आणि ह्याचा परिणाम बहुतांशीं असा होतो कीं, मुलें घोकंपट्टी करून पुस्तकी ज्ञान संपादन करून बाहेर पडतात व विचारप्रवर्तक अथवा प्रभावी शिक्षणाचा फायदा त्यांस फारच थोडा मिळतो. निव्वळ पुस्तकी ज्ञानापासून परावृत्त होऊन तरुण पिढी खरी ज्ञानसंपन्न व कर्तबगार बनावी अशी स्थिति निर्माण करावयाची असेल तर बाह्यपरीक्षांचें दडपण नाहींसें झालें पाहिजे— म्हणजे, शिक्षकांस, शाळा-चालकांस व विद्यार्थ्यांस अधिक स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, व त्यांच्याकडून अधिक जबाबदारीचीं कामें करून घेण्याची तजवीज झाली पाहिजे. शिक्षकांचे कैवारी म्हणून मिरवणारे कित्येक लोक शिक्षकांच्या कामाचें महत्त्व व भावी पिढीस योग्य वळण लावण्याची त्यांजवरील जबाबदारी ह्यांचें वर्णन करतांना आढळतात. परंतु तेच कैवारी शिक्षक-वर्गास अधिक स्वातंत्र्य देऊन व त्यांजवर अधिक जबाबदारी टाकून बाह्यपरीक्षांचें दडपण नाहींसें करण्यास विरोध करतात !

संघटना, स्वातंत्र्य-वृत्ति व जबाबदारीची जाणीव अथवा कर्तव्यनिष्ठा हे गुण इंग्रजांपासून घेण्यासारखे आहेत; व ते १०० वर्षांच्या परिचयानंतरहि आपण अजून आत्मसात् केले नाहींत. ह्या गुणांचें बाळकडू रोजच्या शिक्षणद्वारा विद्यार्थ्यांस मिळालें पाहिजे— म्हणजे अर्थातच शिक्षकांत हे गुण असले पाहिजेत. तशी स्थिति नसेल तर शिक्षकांच्या अंगीं ते गुण निर्माण होतील अशी व्यवस्था झाली पाहिजे. ह्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्याशिवाय जबाबदारीची खरी जाणीव उत्पन्न होणें जवळ जवळ अशक्य आहे ही गोष्ट डोळ्यांसमोर नेहमीं ठेवली पाहिजे.

८. शिक्षकांचें 'ट्रेनिंग' ही आणखी एक शिक्षणव्यवस्थेंतील अत्यंत महत्त्वाची बाब होय. हल्लींच्या परिस्थितींत वर निर्दिष्ट केलेले गुण व शिक्षणासंबंधानें निश्चित केलेलें ध्येय कसें साध्य करून घ्यावें ह्याबद्दल प्रत्यक्ष ट्रेनिंग देण्याची तजवीज जारीनें झाली पाहिजे. ह्यासाठीं ट्रेनिंगच्या मुदतींत शिक्षकांस राहण्याची व्यवस्थित सोय करून प्रॅक्टिसिंग स्कूलमधील व्यवस्था शिक्षणाच्या ध्येयाप्रमाणें आंखण्याचें कामीं त्यांचें सहकार्य संपादन करण्याची

विशेष तजवीज झाली पाहिजे. त्याचप्रमाणें 'शाळांतून निरनिराळे विषय शिकविण्याचे मूलभूत उद्देश' याबद्दल सांगोपांग चर्चा होऊन ते निश्चित स्वरूपानें त्यांचे मनांवर बिंबवून देण्यांत यावेत. इतकें झाल्यावर उपयुक्त शिक्षण-पद्धति त्यांस दाखविण्यांत याव्या व शिक्षण-शास्त्राच्या तत्त्वांच्या अनुरोधानें शिक्षणाच्या विषयांचे मूलभूत उद्देश साध्य होतील अशा पद्धतीचें अवलंबन करण्याची त्यास पूर्ण मुभा असावी.

९. शिक्षणाच्या हल्लींच्या परिस्थितींत आणखी एका बाबीचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. ती म्हणजे शिक्षणक्षेत्रांत प्रयोगाची आवश्यकता ही होय. शाळाखातें निर्माण झाल्यापासून आज जवळ जवळ १०० वर्षे शाळाखात्यानें तयार केलेलीं अभ्यासपत्रकें शाळांतून सर्रास चालू आहेत. म्हणजे शिक्षणाची गाडी एका ठराविक चाकोरींतून किंवा साच्यांतून चालविण्यांत आलेली आहे. ग्रँट-इन्-एड कोडांत अभ्यासपत्रकांत बदल करून घेण्याची सवलत सूत्ररूपानें एका कलमांत करून ठेवलेली आहे हें खरें. तरी पण असा फरक करून घेण्याचा प्रयत्न क्वचितच झालेला आहे व त्याहि पेक्षां क्वचितच प्रसंगीं असा फायदा करून घेण्याची संधि शाळा खात्याकडून मिळालेली आहे— म्हणजे शाळाखात्याच्या पूर्ण नियंत्रणाचा फायदा शिक्षण संस्थांस १०० वर्षेपर्यंत भरपूर मिळाला आहे. तरी पण साक्षरतेचें प्रमाण शेंकडा १० वर गेलेलें नाहीं, व हिंदी समाजास सुसंघटित जिवंत राष्ट्राचा दर्जा प्राप्त झालेला नाहीं; व एकजुटीनें सामुदायिक अगर सार्वजनिक स्वरूपाचीं कामें शिक्षणसंस्थांतून करून घेण्याची खटपट अगर तजवीज फारशी झालेली नाहीं. अशा स्थितींत शिक्षकांस व शाळा-चालकांस आर्थिक स्वातंत्र्य देऊन अभ्यास-पत्रकांत अगर विशिष्ट शैक्षणिक बाबींत निश्चित स्वरूपांत प्रयोग करण्याची मुभा देणें हें उतावीळपणाचें आहे असें म्हणतां येईल काय? असले प्रयोग प्रथम सरकारी शाळांतून होणें अत्यंत इष्ट आहे. तेथें ते निश्चित स्वरूपांत पूर्ण सावधगिरीनें व विशेष काळजीपूर्वक होतील हें सांगणें नकोच. हल्लीं सरकारी प्राथमिक शाळा क्वचितच आहेत. ह्यापुढें दुय्यम शाळा चालविण्याचें कार्य होतां होईलतों खाजगी संस्थांकडेच सोपवावें हें धोरण सर्वमान्य झालेलें आहे. अशा स्थितींत सरकारी शाळांतून प्रयोग सुरू करणें थोडेंसें सुलभ होण्यासारखें आहे. तरी पण निवडक खाजगी शाळांनाहि शिक्षणक्षेत्रांत शाळाखात्यांस आधीं

कळवून प्रयोग करण्याची पूर्ण मुभा असली पाहिजे. जेथें जेथें असे प्रयोग चालले असतील तेथें तेथें जाऊन ते बारकाईनें पाहण्याची व त्यासंबंधानें पूर्ण माहिती मिळविण्याची शिक्षकांस व शिक्षकप्रेमी गृहस्थांस पूर्ण परवानगी असावी. अशा रीतीनें ४–५ वर्षेंपर्यंत प्रयोग करण्यासंबंधानें मुभा व जरूर तेव्हां विशेष उत्तेजन दिल्यावर सर्व प्रयोगक्षेत्रांची पूर्ण पाहणी करून त्यापासून घेण्यासारख्या कोणत्या गोष्टी निष्पन्न झाल्या त्या प्रसिद्ध करण्यांत याव्यात. अशा रीतीनें अनुभव व निश्चित माहिती मिळविल्यानें हिंदी समाजाच्या जीवनास, परिस्थितीस, गरजांस व आकांक्षांस विशेष अनुरूप अशी शिक्षण-योजना आंखण्याचें काम बरेंच सुकर होईल यांत संदेह नाहीं.

१०. शिक्षण हें समाजाच्या जीवनास, परिस्थितीस, गरजांस व आकांक्षांस पूर्ण अनुरूप असावें हें वर स्पष्ट केलेंच आहे. ह्या तत्त्वानुरोधानें शिक्षणाचे टप्पे कसे असावेत ह्याबद्दल एक सामान्य विचार मांडल्याशिवाय राहवत नाहीं. शिक्षणाचे टप्पे स्थूलमानानें खालीलप्रमाणें असावेत:—

| टप्पा | वयोमर्यादा |
|---|---|
| प्राथमिक | ६—१०<br>११—१४ |
| दुय्यम | १५—१८ |
| उच्च | १८ वर्षानंतर |

बहुसंख्य लोकांचा भरणा गरीब अगर मध्यम स्थितींत आहे. ह्या दृष्टीनें पाहतां तरुणांचें शिक्षण दुय्यम शिक्षणाचे अखेर म्हणजे १८ वर्षांचे सुमारास सामान्यतः संपावें अशी योजना असावी. तितक्या अवधींत हल्लींच्या कॉलेजांतील इंटरमीजिएटअखेर जें उदार स्वरूपाचें शिक्षण (Liberal Education) विद्यार्थ्यांस मिळतें तें मिळून, त्याशिवाय शेतकी, व्यापार, अगर सामान्य उद्योगधंद्याचें शिक्षण मिळण्याची योजना असावी. सारांश, अठरा वर्षांअखेर विद्यार्थी होतां होईलतों मिळविता व्हावा; त्यानंतर शक्य तें लष्करी शिक्षण, (त्यासंबंधानें विशिष्ट सोय करणें आतां क्रमप्राप्त आहे, घेऊन व विशिष्ट धंद्याचें) प्रत्यक्ष ज्ञान संपादन करून वयाच्या २० वर्षांपर्यंत सामान्य तरुणास पुढचा जीवनक्रम स्वतः निश्चित करतां यावा. उच्च दर्जाचें शिक्षण फक्त विशेष अनुकूल परिस्थितीच्या मुलांसाठीं व गरीब किंवा मध्यम वर्गांतील असामान्य

बुद्धिमत्तेच्या विद्यार्थ्यांस उपलब्ध होईल अशी योजना असावी. असामान्य बुद्धिमान विद्यार्थ्यांस सढळ हातानें शिष्य-वृत्त्या ठेवण्यांत याव्यात. वयाच्या ११ वर्षांपर्यंतचें शिक्षण सक्तीचें असावें. अनुकूल परिस्थिति येतांच सक्तीच्या शिक्षणाची मर्यादा १४ वर्षेपर्यंत नेण्यांत यावी. स्थूलमानानें, शालेय शिक्षणाची अशा प्रकारची रूपरेषा प्रस्तुत सामाजिक परिस्थितीला अनुरूप होईल, असें वाटतें.

११. वरील विचार अगदीं सामान्य आहेत; त्यांत नवीन असें कांहीं नाहीं, ह्याची जाणीव लेखकास आहे; तरी पण ते महत्त्वाचे आहेत व त्यांची पूर्ण चर्चा होऊन त्यासंबंधानें स्पष्ट लोकमत बनविणें अत्यंत आवश्यक आहे. त्यासाठीं शिक्षण-परिषदा व शिक्षकांचीं संमेलनें यामधून ह्या बाबींचा पूर्ण विचार होऊन कांहीं निश्चित निर्णय करून घेण्याची खटपट झाली पाहिजे. प्रबुद्ध लोकमताच्या अनुरोधानें शिक्षणसंस्थांचें काम चालू झाल्यास शिक्षण विशेष परिणामकारक होणार आहे. तसें तें व्हावें ह्या हेतूनेंच वरील विचारांचा पुनरुच्चार येथें केला आहे.

१२. सरतेशेवटीं, आद्यसंस्थापक विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांच्या इच्छेप्रमाणें न्यू इंग्लिश स्कूल हा एक राष्ट्रीय समाज होवो; व त्यांतील सर्व घटकांस आपल्या नैसर्गिक गुणाचा योग्य विकास करून घेण्यास पूर्ण वाव मिळून ते एकजुटीनें, सलोख्यानें व चिकाटीनें सामुदायिक कामें करण्याचें प्रत्यक्ष शिक्षण मिळवून जन-सेवेनें प्रेरित व देशाच्या सर्वांगीण सुधारणेसाठीं झटणारे, प्रभावी व उपयुक्त नागरिक बनोत अशी इच्छा प्रदर्शित करून हा लेख संपवितों.

---

# शास्त्रीय शिक्षणाची योग्य दिशा



लेखकः—गोपाळ रामचंद्र परांजपे

— १ —

हिंदुस्थान शेतीप्रधान आहे, येथें सर्व प्रकारचीं खनिजें उपलब्ध आहेत, जलौघशक्ति अमर्यादित आहे, एकंदरींत सृष्टिजन्य संपत्ति इतकी मोठी आहे, कीं शास्त्रीय सुधारणा केल्यास हिंदुस्थानाला दुसऱ्या कोणत्याहि देशाकडे पाहण्याची जरूरी पडणार नाहीं. हीं किंवा अशाच तऱ्हेचीं विधानें आपण पुष्कळ वर्षें ऐकत आहों. गेल्या महायुद्धापूर्वीं हींच विधानें आपल्याला ऐकविलीं जात. यानंतर युद्ध सुरू झालें. यःकश्चित् साध्यासुध्या व नेहमींच्या व्यवहारांत लागणाऱ्या गोष्टींची आपल्याला फार तीव्र अडचण भासूं लागली. तें युद्ध संपल्याला वीस वर्षें होऊन गेलीं. मध्यंतरींच्या काळांत देशांत पुष्कळ शास्त्रीय सुधारणा झाल्या. यंत्रांचा जास्त उपयोग होऊं लागला. आधुनिक वैद्यक प्रचारात आलें. विजेच्या गाड्या सुरू झाल्या. नौकानयन नियमानें चालू झालें. बिनतारीचा उपयोग करण्याची सर्वसाधारणपणें जनतेला चटक लागली. शेतीभातींत रासायनिक खतें वापरण्याचे फायदे दृष्टोत्पत्तीस येऊं लागले. शीतकांचा उपयोग केल्यानें द्राक्षादि नाजुक फळें, मासे किंवा दूध न बिघडतां दूरदूर अंतरावर पाठविणें शक्य झालें. लोकांचें शास्त्रीय उपकरणांशीं जास्तजास्त संघट्टण होऊं लागलें.

अशा तऱ्हेनें हिंदुस्थानांतील शास्त्रीय प्रगतीस नुकतीच कोठें सुरुवात होत होती तों दुसरें व मागच्यापेक्षां जास्त भयंकर असें महायुद्ध सुरू झालें व हिंदुस्थानची परावलंबी अवस्था जास्तच गंभीर वाटूं लागली. जे कांहीं नवे शास्त्रीय उद्योगधंदे इकडे सुरू झाले होते त्यांच्यासाठीं लागणारा आवश्यक माल इकडे तयार होत नसल्यामुळें पुष्कळ प्रमाणांत मागचीच अवस्था पुन्हा दिसूं लागली.

अशी बिकट परिस्थिति कां उत्पन्न झाली यासंबंधीं जरी दुसरीं कित्येक कारणें असलीं तरी सार्वजनिक शिक्षणांत शास्त्रीय ज्ञानाची आजतागायत

झालेली आबाळ हें एक कारण नजरेआड करून चालणार नाहीं. खरोखर पाहिलें तर आपल्या शिक्षणक्रमांत शास्त्रीय ज्ञानाला योग्य स्थान अद्यापपर्यंत कधींच प्राप्त झालेलें नाहीं. पुष्कळांचा असा समज असतो कीं, प्रत्येक मनुष्य-प्राण्याला आवश्यक शिकण्यासारखे जे विषय असतात त्यांत शास्त्रीय विषयांचा समावेश होऊंच शकत नाहीं. आपल्याकडेच अशी विचारसरणी आहे असें नाहीं, तर पाश्चिमात्य देशांतहि गेल्या कांहीं वर्षांपर्यंत सुमारें याच विचारपद्धतीचा अवलंब केला जाई. ज्याला हौस असेल त्यानें शास्त्रीय विषय घ्यावे, बाकी भाषा, गणित वगैरे सक्तीचे विषय समाईक असून त्यांत जणूं हौसेचा प्रश्नच येत नाहीं. परंतु विचार करण्यासारखी गोष्ट अशी कीं, या पद्धतीनें शास्त्रीय ज्ञानाची हौस वाढण्यास अवसर मिळत नाहीं. शिक्षण-क्रमांत जे शास्त्रीय भाग असतात तिकडे बहुतेककरून दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति असते. कांहीं वर्षांपूर्वी आपल्याकडील इंग्रजी शाळांत, किंबहुना मराठी शाळेंतील वरच्या वर्गात, सृष्टिशास्त्र या नांवाखालीं निरनिराळ्या शास्त्रीय विषयांसंबंधीं गोष्टी ऐकविण्याची प्रथा पडली, तरी त्या विषयाला भाषा किंवा गणित यांचें महत्त्व कधींच मिळालें नाहीं. शाळांच्या शिक्षण-क्रमांत व इतर शिक्षण-व्यवस्थेंत शास्त्रांना फार गौण स्थान दिलें जाई. क्वचित्-प्रसंगीं एखादा हौशी शिक्षक भीडभाड न बाळगतां आपल्या मनाला योग्य वाटेल त्या पद्धतीनें शास्त्रीय ज्ञान देण्याचा प्रयत्न करी, परंतु त्यांत त्याचा गौरव होण्याऐवजीं बहुधा त्याला विक्षिप्त हीच पदवी मिळे. जेव्हां शास्त्रीय विषया-वरील ठराविक साच्याचीं पुस्तकें शाळांतून शिकविण्याचा प्रघात पडला तेव्हां तो विषय बहुतकरून क्लिष्ट व दुर्बोध होत असे, त्यामुळें साहाजिकच मुलांचें त्याकडे दुर्लक्ष होऊं लागलें. अशा विलक्षण परिस्थितींत सांपडल्यामुळें शाळांतील शास्त्रीय शिक्षणक्रम ठरविणाऱ्यांवर व तो मनोरंजक पद्धतीनें शिकविणाऱ्यांवर फार मोठी जबाबदारी पडते. परंतु कांहीं थोडेसे अपवाद सोडून दिले तर हें जोखमीचें काम अगदीं निष्काळजीपणें चालविलें जातें असें अतिशय दुःखानें म्हणावें लागतें.*

* पूर्वी न्यू इंग्लिश स्कूलमध्यें चवथी, पांचवी व सहावी या वर्गात शास्त्रीय शिक्षणाचे तास असून शिक्षक स्वतःच्या अंतःस्फूर्तीनें सप्रयोग व मराठींतून

[ पुढील पानावर

शास्त्रीय साधनांची माहिती, तीं वापरण्यापासून फायदे, त्यांची रचना व उपयुक्तता या गोष्टी ऐतिहासिक पद्धतीनें शिकविल्यास कधींच मनोरंजक व्हावयाच्या नाहींत. सूर्यग्रहण पडलें असतां एकंदर विश्वाची उत्पत्ति तेजो-मेघांतून कशी झाली याची चर्चा लहान मुलांच्या तडफदार मनाला रुचणार नाहीं. ग्रहण कसें पडलें हीच गोष्ट स्पष्टपणें व विस्तार न करतां समजावली पाहिजे. आतांशा बहुतेक शाळांतून मुलांना इंग्रजी तिसऱ्या-चौथ्या इयत्तेपर्यंत शास्त्रीय शिक्षण दिलेंच जात नाहीं; आणि यापुढें तें जेव्हां दिलें जातें तेव्हां प्रत्येक वर्गांत निदान तीस-चाळीस मुलें असतात. अशा परिस्थितींत शिक्षणक्रम कितीहि उत्तम असला किंवा शिक्षक आपल्या कौशल्यांत कितीहि तरबेज असला तरी त्याला यश येण्याचा संभव फार कमी उरतो.

— २ —

शास्त्रीय शिक्षणाचा मुख्य उद्देश अनेक प्रकारांनीं सांगतां येतो. ज्या सत्य जगांत आपण वास्तव्य करतों त्यासंबंधींची होईल तेवढी ओळख करून देणें; सभोंवतालच्या सृष्टिरचनेंत व समाजव्यवस्थेंत ज्या कांहीं महत्त्वाच्या व उपयुक्त गोष्टी आढळतात त्यांची त्रोटक माहिती पुरविणें; शास्त्राची वाढ कसकशी होत गेली व त्याचा आपल्या राहणीवर व एकंदर संस्कृतीवर कसकसा परिणाम होत गेला त्याची माहिती मिळवून आपली विचारशक्ति तीव्र व तर्कशुद्ध ठेवण्यास शिकणें; जेव्हां जेव्हां जरूर पडेल तेव्हां याच तर्कशुद्ध पद्धतीचा अवलंब करून केलेल्या निरीक्षणापासून निष्कर्ष काढणें; या सर्व गोष्टींचा शास्त्रीय शिक्षणांत समावेश होतो. आपल्याकडे प्रचलित असलेल्या शिक्षणपद्धतींत कदाचित् पहिले एक दोन हेतु थोड्याबहुत प्रमाणांत सिद्धीस जात असतील, परंतु शेवटच्या हेतूविषयीं बहुतेकांचें मन साशंक आहे.

शाळांतील शास्त्रीय ज्ञानाची मर्यादा इतकी आकुंचित व विलक्षण प्रकारानें आखलेली असते, कीं त्याचा व्यवहारांतील शास्त्रीय बाबींशीं अगदीं दूरचा व

मागील पानावरून ]
शिकवीत. हा विषय परीक्षेला नसे. त्यामुळेंच कीं काय तो विद्यार्थ्यांचा अगदीं आवडीचा झाला होता. शिक्षक आणि त्यांची विलक्षण हातोटी हीं महत्त्वाचीं कारणें होतींच.

फार अस्पष्ट असा संबंध आढळतो. बहुतकरून शंभर वर्षांपूर्वींचें पदार्थ-विज्ञान व तेवढेंच प्राचीन रसायन शिकविण्यांत येतें. शिक्षक नियम सांगतात, नियम बरोबर आहे अशी खात्री पटविण्यासाठीं क्वचित्प्रसंगीं प्रयोगहि दाखवितात, परंतु सर्व शास्त्रीय पाठ पुरे झाल्यावर सत्यसृष्टींतील कोडीं उलगडण्याचें तर दूरच राहतें, परंतु सृष्टींतील ज्या गोष्टी सहज परंतु नियमानें घडतात असें आपण बघतों त्यांच्याबद्दल कौतुकसुद्धां वाटत नाहीं. शकुन-अपशकुन, फलज्योतिष, मुहूर्त, नशीब, ईश्वराचा कोप, कालचक्र, काय होईल कोण जाणें अशासारखे अविश्वासदर्शक शब्दप्रयोग ज्या अर्थी आपल्या समाजांत व भाषेंत अद्यापि रूढ आहेत त्या अर्थी खऱ्या शास्त्रीय ज्ञानास आपल्याकडे अद्यापि सुरुवातच झाली नसावी असें वाटतें.

सध्यांच्या शास्त्रीय शिक्षणक्रमांत जे कांहीं दोष आढळतात त्यांतले बरेचसे दोष शिक्षणपद्धतीमुळें उत्पन्न झालेले आहेत. शाळेंतील प्रत्येक मुलानें जसे इतर विषय शिकलेच पाहिजेत त्याचप्रमाणें त्यानें शास्त्रीय विषयहि शिकले पाहिजेत असा दंडक आहे. अर्थात् विद्यार्थी शिकतात परंतु त्यामुळें त्यांची शास्त्रीय विषयांतील हौस वाढत नाहीं. ज्यांना जात्याच मेकॅनो, विजेच्या, रेडिओ, चिलकाम, पुष्पसंग्रह, कीटकसंग्रह वगैरे वगैरे करण्याचा नाद असतो त्यांची ती हौस शाळेंतील शिक्षणपद्धतीखालीं चिरडली जाते. कारण त्यांना शाळेंत पदार्थविज्ञानांतील नियम व रसायनांतील परमाणूंचीं वजनें ध्यानांत ठेवावयाचीं असतात. रसायनांतील, विज्ञानांतील किंवा प्राणिशास्त्रांतील ठळक नियम सहा-सात वर्षांच्या मुलाला नीट सांगितले तर समजण्यासारखे असतात; परंतु आपल्या शाळेंतील शिक्षणक्रमांत गंभीरपणें चालविलेली 'वस्तुमान आणि वजन' यांतील फरकाबद्दलची तात्त्विक चर्चा कॉलेजांतील विद्यार्थ्यांनासुद्धां स्पष्ट होण्यासारखी नसते. अशा प्रकारचें शास्त्रीय शिक्षण सर्वांना सक्तीनें देण्यांत कांहीं फायदा नाहीं.

आपल्या देशांत शास्त्रीय शिक्षणाचा उपयोग फक्त दुसऱ्याला शास्त्रीय शिक्षण पाजण्याकडेच होतो. शास्त्रीय उद्योगधंद्यांच्या अभावीं यापेक्षां निराळी परिस्थिति निर्माण होईल असा सध्यां तरी संभव नाहीं. शाळेंत शास्त्रीय शिक्षण मिळालेल्या मुलांपैकीं जीं कांहीं पुढें कॉलेजांत शास्त्रीय शिक्षण चालू ठेवतात

त्यांचा मुख्य उद्देश शिक्षक होणें हाच असतो. फारच थोडे यांत्रिक किंवा वैद्यकी शिक्षणाकडे वळतात. जे वळतात ते सुद्धां त्यांना जात्याच शास्त्रीय ज्ञानाची हौस असते म्हणून नव्हे, तर यंत्रशास्त्र व वैद्यक हे साधारणपणें किफायतशीर व्यवसाय वाटतात म्हणून. संशोधनापर्यंत ज्यांची मजल जाते त्यांची संख्या फारच थोडी असते हें विश्वविद्यालयांतील परीक्षामय शिक्षण-पद्धतींची छाननी केल्यास सहज दिसून येतें. संशोधनाचा उद्योगधंद्यांशीं संबंध अपवादाइतका अल्प असतो. त्यामुळें देशाला ऊर्जितावस्था आणण्याचें शास्त्रीय ज्ञानप्रसार हें एक अमोघ साधन आपणास अद्यापि नीट वापरतां येऊं लागलें नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं.

शास्त्रीय ज्ञान शाळेंत व कॉलेजांतच शिकलें पाहिजे असें नाहीं. तेथें शिक्षणाची एका ठराविक पद्धतीनें योजना केलेली असते खरी, तरी वाङ्मयद्वारा शास्त्रीय ज्ञानाचा वाटेल तेवढा प्रसार होऊं शकतो. आणि खरोखर हा प्रकार फार महत्त्वाचा आहे. या शास्त्रीय ज्ञानप्रसाराचा हेतु, संशोधन करण्याची लायकी उत्पन्न करण्याचा नसून, शास्त्रीय उपकरणांची व साधनांची उपयुक्त माहिती पुरविण्याचा व त्या योगें शास्त्रीय उद्योग-धंद्यांना चालना देण्याचा असतो. आपण सर्व सिनेमा पाहतों, रेडिओ ऐकतों, मोटारींत बसतों, टेलिफोनच्या साहाय्यानें दूरच्या मित्रांशीं संभाषण करतों; तरी सिनेमांत दृष्टिभ्रम घडवून आणण्यासाठीं काय योजना केलेली असते ती किंवा रेडिओंत निरनिराळ्या प्रेषकांची निरनिराळी आंदोलनसंख्या काय युक्तीनें ठेवण्यांत येते याची आपणाला उत्कृष्ट माहिती असण्याची अर्थातच आवश्यकता नसते. परंतु सध्यांच्या युगांत आपल्याभोंवतीं इतक्या शास्त्रीय योजना एकसारख्या वापरण्यांत आहेत, कीं जशी सूर्यचंद्राची माहिती तशीच या योजनांची कामचलाऊ माहिती अवश्य होऊन बसली आहे. अशा गोष्टींची माहिती म्हणजे शास्त्रीय योजनांचें ज्ञान होय. तिला शास्त्रीय शिक्षण अशी संज्ञा देतां यावयाची नाहीं. अशा तऱ्हेच्या शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करणाऱ्या स्वतंत्र संस्था अस्तित्वांत आल्या पाहिजेत. हा प्रसार मातृभाषेंतूनच झाला पाहिजे. प्रसार व्याख्यानांच्या, बोलपटांच्या, प्रयोगांच्या किंवा वाङ्मयाच्या साहाय्यानें होऊं शकेल. अलीकडे शाळांतून, कॉलेजांतून मातृभाषेचा प्रचार जारीनें सुरू होत आहे. शाळांतून बहुतेक विषयांचें शिक्षण मातृभाषेंतूनच दिलें जातें. कॉलेजांत महाराष्ट्र वाङ्मय-

मंडळें स्थापिलेलीं आढळतात. बहुतेक मोठमोठ्या शहरीं नियमित व्याख्यानसत्रें घडवून आणलीं जातात. त्यांत सर्व प्रकारच्या विषयांना जागा मिळते. तरी शास्त्रीय विषयांना मात्र स्थान मिळणें कठीण पडतें. लघुकथा, काव्य, नाटक हे वाङ्मयाचे भाग जितके आकर्षक आहेत तितकेच शास्त्रीय विषयांतील कथाभाग आकर्षक करतां येतील.

सुबोध शास्त्रीय वाङ्मय हा एक शास्त्रीय ज्ञानप्रसाराचा उत्तम मार्ग आहे असें वर दर्शविलेंच आहे; परंतु दुर्दैवानें त्याकडे अजूनपर्यंत फारच थोड्या व्यक्तींचें लक्ष गेलें आहे. व्यवस्थितपणें अशा प्रकारच्या वाङ्मयनिर्मितीचा प्रयोग करण्यासाठींच 'सृष्टिज्ञाना'नें जन्म घेतला आहे. परंतु असें एकादें नियतकालिक कितीसा ज्ञानप्रसार करूं शकणार? 'शास्त्रीय वाङ्मय' असा खास विभाग असलेलीं अनेक मासिकें, साप्ताहिकें व दैनिकें चालू ठेविलीं पाहिजेत. असलें वाङ्मय अजून मोठ्या प्रमाणांत उपलब्ध नसल्यामुळें तें कितपत उपयुक्त होतें याचा नीटसा अंदाज करतां येत नाहीं. केवळ शास्त्रीय वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठीं निरनिराळीं, सचित्र, आकर्षक, कमी किमतीचीं सुबोध पुस्तकें, माला, नियतकालिकें शहरांत आणि खेड्यांपाड्यांतहि घरोघर दिसूं लागलीं पाहिजेत. त्यांतील भाषा साधी, बालबोध असून मांडणी मनोरंजक असावी. त्यांत परिभाषेचें स्तोम नसावें परंतु असल्या दीर्घ उद्योग सिद्धीस जाण्यास लायक विद्वानांचा, संस्थांचा व सरकारचा पाठिंबा पाहिजे. पैशाचें बळ मोठ्या प्रमाणांत लागेल. शाळांतील शास्त्रीय विषयांचा क्लिष्ट पद्धतीचा शिक्षणक्रम बदलावा लागेल. विश्वविद्यालयाची उदासीनता जाऊन त्यांनीं शास्त्रीय ज्ञानप्रसाराकडे लक्ष वळविलें पाहिजे. उपयुक्त शास्त्रीय ज्ञान आणि केवळ ज्ञानासाठीं (म्हणजे परीक्षेसाठीं) मिळविलेलें शास्त्रीय ज्ञान यांत फरक आहे ही गोष्ट सत्ताधारी विद्वानांनीं प्रांजलपणें कबूल केली पाहिजे. प्रचलित मराठी वर्तमानपत्रांत शास्त्रीय विषयांना योग्य स्थान मिळणें अवश्य आहे. आधुनिक जीवन शास्त्रीय प्रगतीशीं अगदीं निगडित झालेलें आहे ही गोष्ट स्पष्टपणें दिसत असूनसुद्धां पुष्कळ वर्तमानपत्रें फलज्योतिषासारख्या अंधुक व अस्पष्ट बाबींना मुख्य स्थान देण्यास प्रवृत्त झालेलीं दिसतात. शास्त्रीय प्रश्नांचें त्यांना महत्त्व वाटत नाहीं. अशा परिस्थितीचीं कारणें अनेक आहेत. खऱ्या शास्त्रीय वाङ्मयाला खप नाहीं; आणि शुद्ध व बालबोध भाषेंत शास्त्रीय रहस्यें उलगडवून दाखवि-

ण्यास लेखक तयार होत नाहींत. ललित-वाङ्मयक्षेत्रांत सेवा करणें लेखकांना जास्त सोईचें वाटतें.

शास्त्रीय शिक्षणाचा व्याप फक्त शास्त्रीय विषयांपुरताच असतो असा पुष्कळांचा गैरसमज झालेला आढळतो, आणि भाषा, इतिहास इत्यादि विषय अगदीं भिन्न भिन्न लेखिले जातात. शास्त्रीय शिक्षणाचा परिणाम समाजाच्या प्रत्येक अंगावर होऊं शकतो, देशाची शिक्षणमर्यादा वाढते, त्यांतून नवीन नवीन उद्योगधंदे निर्माण होतात, संपत्ति वाढते, देश निरोगी होत जातो, समाजांतील अनिष्ट नियम बदलले जाऊन परस्परांना जास्त सुखावह होतात. राजकारणांना योग्य वळण लागतें. शास्त्रीय शिक्षणाचा जर या दिशेनें परिणाम होत असेल तरच तें योग्य, नाहीं तर त्यांत सुधारणा करणें अवश्य आहे असें समजून त्या दृष्टीनें प्रयत्न करण्यास प्रारंभ करावा.

---

# शाळांतील शारीरिक शिक्षण
## व
# त्याचा अभ्यासक्रम



लेखक : द. ब. कोठीवाले

## प्रास्ताविक—शिक्षण व शारीरिक शिक्षण

शारीरिक शिक्षणासारख्या गौण समजल्या जाणाऱ्या विषयाकडे सरकारचें, जनतेचें व शाळाधिकाऱ्यांचें वाढत्या प्रमाणांत लक्ष लागत चाललें आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. एक काल असा होता कीं 'शाळा' म्हणजे भाषा, गणित, इतिहास वगैरे विषय शिकण्याची जागा! विद्यार्थ्यांची बौद्धिक उन्नति करणें हें त्यांचें ध्येय! व 'शिक्षण' म्हणजे शाळेंत जें मिळतें तें! ही संकुचित वृत्ति आतां नाहींशी होत चालली असून 'शिक्षण' म्हणजे निवळ वेगवेगळ्या विषयांचा अभ्यास नसून, विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण उन्नतीचें साधन. तें मिळण्याची जागा म्हणजे 'शाळाच' केवळ नसून क्रीडांगण, समाज व जग; व तें घेण्याचें वय म्हणजे विद्यार्थिदशाच नसून आयुष्य होय! ही विचारसरणी आतां मान्य होत चालली आहे. शिक्षणाकडे पाहण्याचा असा विशाल दृष्टिकोन निर्माण झाल्यानें विद्यार्थ्यांच्या बौद्धिक विकासाबरोबरच शारीरिक, मानसिक व सामाजिक विकास करणें हें शाळांच्या ध्येयाच्या व कार्यांच्या कक्षेंत येऊन बसलें! शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र वगैरे विषयांतील तज्ज्ञांनीं असाहि एक सिद्धान्त प्रतिपादन केला कीं, जरी शरीर, मन व आत्मा हीं मनुष्याचीं विविध अंगें मानलीं जातात तरी तीं सुटीं व एकमेकांपासून अलग नसून या सर्वांच्या परिस्थितीचा एकमेकांवर परिणाम होत असतोच. या दृष्टीनें बौद्धिक विकासाकरितां भाषा व गणित वगैरे विषय, सामाजिक विकासाकरितां इतिहास, भूगोल शासनपद्धति वगैरे विषय,

शारीरिक विकासाकरितां खेळ, कवायती, कसरती वगैरे व्यायामप्रकार, ही रूढ असलेली कल्पना अशास्त्रीय अतएव त्याज्य समजली जाऊन व्यक्तीच्या सर्व अंगोपांगांच्या विकासाकरितां या सर्व विषयांचा उपयोग होऊं शकतो हें तत्त्व सर्वांस पटत चाललें आहे. म्हणजे अभ्यासाच्या दृष्टीनें जरी निरनिराळे विषय ठेविले तरी **शिक्षण हें एकच, तें द्यावयाचें तें व्यक्तीला व व्यक्तिमत्वाचा विकास करणें हें त्याचें ध्येय !** मॉंटेन हा सुप्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ म्हणतो:—"It is not a soul, it is not a body, that we are training up; it is a man and we ought not to divide him into two parts." अशा रीतीनें शारीरिक शिक्षणाचा विद्यार्थ्यांच्या शारीरिक विकासाबरोबरच, बौद्धिक, मानसिक व सामाजिक विकासासहि उपयोग होऊं शकतो हें सिद्ध होतें. व खरें शारीरिक शिक्षण म्हणजे तेंच कीं जें व्यक्तीच्या शारीरिक अंगाचाच केवळ विचार न करतां इतर अंगांचाहि विचार करतें व व्यक्तिमत्वाची पूर्णतया वाढ करण्यास मदत करतें. आतांपर्यंत शक्ति, आरोग्य, व्यायाम, सुदृढता वगैरे प्रामुख्यानें शारीरिक बाबींचाच शारीरिक शिक्षणांत विचार केला जाई. पण आतां शारीरिक बाबींबरोबरच इतरांचाहि शारीरिक शिक्षण परामर्श घेतें. शारीरिक शिक्षण ही एक शैक्षणिक बाब आहे. यासंबंधीं कोलंबिया युनिव्हर्सिटीचे प्रो. डॉ. विल्यम्स म्हणतात, " We must get the conception that **Physical Education is Education;** that we are teachers and not acrobats; that we are training for health, neuro-muscular skills, sportsmanship, personality and not developing weight-lifters, high jumpers and parallel-bar champions." थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आपला **उद्देश शरीर तयार करण्याचाच** (body-building) **नसून उत्तम माणसें तयार करण्याचा** (man-building) **आहे.** ह्याच गोष्टी **शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्। धर्मार्थ काम मोक्षाणां मूलमुक्तं कलेवरम्। नायमात्मा बलहीनेन लभ्यः, तस्मात् बलमुपास्व।** ह्या संस्कृत वचनांनीं सिद्ध होत नाहीं काय?

शारीरिक शिक्षणाचा उपयोग मनुष्याचे सर्वांगीण विकासाचे दृष्टीनें होऊं शकतो ही कल्पना मान्य झाल्यानें शारीरिक शिक्षणास शिक्षणसंस्थांच्या व

शाळांच्या अभ्यासक्रमांत स्थान मिळणें किती आवश्यक आहे हें दिसून येईल. ही गोष्ट ध्यानांत घेऊनच पाश्चात्य राष्ट्रांत व आपलेकडेहि या दृष्टीनें प्रयत्न होऊं लागले.

## २ ऐतिहासिक काळांत शारीरिक शिक्षण सुरू करण्याचे प्रयत्न

आधुनिक काळांत शारीरिक शिक्षणाचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न जरी जर्मनीनें ( गुट्स्मुथस्, यॉन, स्वीस, यांचे प्रयत्नामुळें ) केले तरी या विषयाचें शैक्षणिक महत्त्व जाणून अभ्यासक्रमांत त्यांना **स्थान देण्याचा मान डेन्मार्क** या चिमुकल्या राष्ट्राकडे जातो. शाळांत जिमनॅस्टिक्स सुरू करण्यासंबंधीं कायदा **इ. स. १८१४ सालीं** ( नॅक्टेगॉल्ड याचे प्रयत्नामुळें ) झाला व लायक शिक्षक तयार करण्यासंबंधींहि योजना झाली. **स्वीडन** या राष्ट्रानें तर जगाला शारीर-शास्त्रावर ( Anatomy ) आधारलेली सुविख्यात 'स्वीडिश व्यायाम पद्धतीची ( The Swedish or The Ling System ) देणगी' दिली तथापि शाळांत शारीरिक शिक्षण सुरू करण्यासंबंधीं इ. स. १८२० सालीं कायदा करण्यांत आला व शिक्षक तयार करणारी संस्थाहि ( Royal Central Gymnastic Institute) निर्माण झाली. **जर्मनींत** इ. स. १८३७ पासून शारीरिक शिक्षणाचा कायदा झाला. वरील राष्ट्रांत शारीरिक शिक्षणाचें ध्येय लेकांत शारीरिक लायकी ( Physical fitness ) निर्माण करणें हें होतेंच पण **लोकांत एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण** करून त्यांना **लष्करी दृष्ट्याहि सामर्थ्यवान करणें** यावर विशेष भर होता. या दृष्टीनें अभ्यासक्रमांत जिमनॅस्टिक्स ( डबल बार, सिंगल बार, रिंग्ज, स्टॉल बार्स, लॅडर्स, हॉर्स, बॅलन्स बीम्स ) साधनांसहित व विरहित कवायती, भालफेंक, द्वंद्व युद्ध, फेन्सिंग, लांब उड्या, क्रॉस कंट्री रेस, लष्करी चाल, लष्करी शिक्षण वगैरे गोष्टींचा मुख्यतः समावेश होई. फुटबॉल, हॉकी, व्हॉलीबॉल, बास्केट बॉल, वगैरे सांघिक खेळांचा व क्रीडांचा ( games and sports ) अलीकडेच अंतर्भाव करण्यांत आला आहे.

इंग्लंड हें राष्ट्र नैसर्गिक परिस्थितीमुळें परचक्रापासून संरक्षित असल्यानें 'जिमनॅस्टिक्स'ची चळवळ तेथें कधींच फोंफावली नाहीं. हॉकी, फुटबॉल, क्रिकेट, गोल्फ, टेनिस, तिरंदाजी वगैरे खेळ तिकडे कित्येक शतकें–पिढ्यान्

पिळ्या खेळले जात आहेत. **इंग्लंडच्या शिक्षणपद्धतीचें हें एक वैशिष्ट्य आहे.** शारीरिक शिक्षणास 'Physical Training' ही संज्ञा असून त्यांत ड्रिल, कवायती व स्वच्छंद क्रीडन यांचा समावेश होतो. सांघिक संघटित खेळांस (games and sports) शारीरिक शिक्षणांत (Physical Training) स्थान नाहीं. तथापि आतां ही कल्पना बदलत चालली आहे. 'बोर्ड ऑफ एज्युकेशन' या संस्थेनें 'शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम' 'Syllabus of Physical Training' सन १९०४ मध्यें प्रथम आंखला. वेळोवेळीं पास झालेल्या (Education Acts) शिक्षण-कायद्यांत शारीरिक शिक्षणास महत्त्व दिलें. **शारीरिक लायकी** (Physical fitness) **ही राष्ट्रीय ठेव** म्हणून समजली जावी अशी बोर्डाची शिफारस आहे. या विषयांखेरीज आरोग्याशिक्षण, आहारशास्त्र वगैरे विषयांवरहि भर दिला जातो. शाळांतील अध्यापक बहुधा 'स्वीडिश पद्धति' शिकलेले (विशेषतः स्त्रिया) व लष्करी व स्काउटिंगचें शिक्षण घेतलेले असतात. इ. स. १९३६ सालीं पास झालेल्या 'Physical Training and Recreation Act' या कायद्यान्वयें शारीरिक शिक्षणाची व्याप्ति वाढली असून तें सार्वत्रिक करण्यासंबंधीं शिफारसी आहेत.

अमेरिकेंत शारीरिक शिक्षणास शैक्षणिक महत्त्व विशेष आहे. लष्करी दृष्टि जवळ जवळ नाहींच. व्यक्तिमत्वाच्या विकासास मदत करणें, आरोग्य, मनरंजन नागरिकत्वाचे गुण निर्माण करणें वगैरे शारीरिक शिक्षणाचें उद्दिष्ट समजलें जातें. **शारीरिक शिक्षणाचा तेथें सार्वत्रिक प्रचार** झालेला असून 'Play for all and everybody in the play' हें त्यांचें ब्रीदवाक्य आहे. प्रत्येक शिक्षणसंस्थेंत शारीरिक शिक्षणास प्रमुख स्थान असून इतर अभ्यासक्रम त्याच्यावरच उभारलेला असतो. नैसर्गिक खेळ व व्यायामप्रकार (Natural physical activities) यांनाच कार्यक्रमांत विशेष स्थान आहे. शिक्षक तयार करणाऱ्या स्वतंत्र संस्था असून प्रत्येक विश्वविद्यालयांत या विषयाचीं स्वतंत्र खातीं आहेतच.

आपल्या इकडे शाळांत शारीरिक शिक्षण सुरू करण्याचे प्रयत्न ४०-५० वर्षांपासून होत आहेत. गांवांत असलेल्या तालमींचा उपयोग त्या दृष्टीनें पुष्कळ होत आहे. पूर्वीच्या तालमींत मलखांब, मल्लयुद्ध, जोर, जोडी, करेला, संतोला वगैरे व्यायाम-प्रकार व क्वचित् हुतुतू, पाट्या सारखे खेळ या गोष्टींकडे

लक्ष दिलें जात असे. इ. स. १८५७ नंतर क्रिकेट, हॉकी, फुटबॉल वगैरे इंग्रजी खेळांचा प्रसार बऱ्याच ठिकाणीं झाला. इ. स. १८८० पासून **शाळांत शारीरिक शिक्षण सुरू** करण्याचे प्रयत्न झाल्यासंबंधीं उल्लेख सापडतो. त्याच सुमारास ड्रिल व जिमनॅस्टिक्स शिक्षकांच्या नेमणुकाहि शाळांत कित्येक ठिकाणीं करण्यांत आल्या. बहुतेक शिक्षक हुशार परंतु अशिक्षित असे लष्करी शिक्षण घेतलेले लोक असावयाचे. ते शिकवीत असलेले जिमनॅस्टिक्सचे व्यायाम-प्रकार सर्वसाधारण मुलांच्या कुवतीबाहेरचे असत. शिवाय मोजकीं पण विशेष निष्णात (Star performers) अशीं मुलें तयार करण्याकडे त्यांचा विशेष भर असे. त्यामुळें शारीरिक शिक्षणाचा फायदा फारच थोड्या मुलांना मिळून ज्यांना त्याची विशेष जरूरी आहे अशीं मुलें दुर्लक्ष केलीं जात. शिवाय शिकवली जाणारी ड्रिल विद्यार्थ्यांचे दृष्टीनें तयार केली नसल्यानें त्यांना तिच्यासंबंधीं कधींच आस्था व प्रेम वाटलें नाहीं. उलट तो तास चुकविण्याची प्रवृत्ति बळावूं लागली! इ. स. १९१५ पासून परिस्थिति बदलत चालली. खेळ हे विद्यार्थ्यांस विशेष प्रिय असल्यानें खेळांचे शालेय व आंतरशालेय सामने व चढाओढी सुरू झाल्या. शाळेच्या क्रीडानिधीचा बराचसा हिस्सा क्रिकेटसारख्या खर्चिक व अप्रस्तुत खेळावर व एकाददुसऱ्या संघावरच खर्च होऊं लागला. सर्व विद्यार्थ्यांना त्यापासून फायदा होईना! ही स्थिति बदलण्याचे प्रयत्न सरकारकडून व शाळांतर्फेंहि होऊं लागले व होत आहेत. वेबर, नोरेन यांसारख्या शारीरिक शिक्षण-तज्ज्ञांच्या नेमणुकी झाल्या. त्यांनीं शारीरिक शिक्षणाचें वैयक्तिक स्वरूप बदलून सांघिक व सामुदायिक खेळ व व्यायाम-प्रकार यांना महत्त्व दिलें. अध्यापक तयार करण्यासाठीं वेगवेगळे वर्ग त्यांनीं उघडले. सरकारी शाळांत ड्रिल, जिमनॅस्टिक्स यांखेरीज खेळहि सुरू झाले. **इ. स. १९२७ सालीं** मुंबई सरकारनें **श्री. मुनशी यांचे अध्यक्षतेखालीं एक समिति** नेमली. दोन वर्षें या विषयावर संशोधन करून तयार केलेला समितीचा अहवाल सरकारनें पैशाचे अभावीं बाजूस ठेवला. मध्यंतरीं प्राथमिक शाळांत व अध्यापन संस्थांतही शारीरिक शिक्षण सुरू करण्याचे प्रयत्न झाले. शारीरिक शिक्षणाचे अध्यापक तयार करण्याचे दृष्टीनें कांहीं प्रमुख तालमींचा, व शिक्षणसंस्थांचा फार उपयोग झाला. पण शारीरिक शिक्षण हा विषय विशेष बाळसें धरीना! इ. स. १९३७ सालीं कॉंग्रेसनें अधिकार-

सूत्रें धारण केल्यावर 'शारीरिक शिक्षणास' जोमानें हात घातला गेला. सरकार व जनता यांचें या विषयाकडे सारखेंच लक्ष लागलें! वर्तमानपत्रें, सभा, संमेलनें या सर्व ठिकाणीं हा विषय चर्चिला जाऊं लागला.श्रीमत् स्वामी कुवलयानंद यांचे अध्यक्षतेखालीं नेमलेल्या समितीनें शारीरिक शिक्षणाच्या योजना सरकारपुढें मांडल्या. त्यांचा स्वीकार होऊन कार्यास सुरुवात झालेली आहे. शारीरिक शिक्षणास इतर विषयांइतका दर्जा प्राप्त करण्याचे दृष्टीनें व या विषयाचा तात्त्विक व प्रात्यक्षिक भागांचा अभ्यास करून योग्य शिक्षक तयार करण्याचे दृष्टीनें **कांदिवली** येथें १ नोव्हेंबर १९३८ पासून **एक संस्था** (T. I. P. E.) निर्माण करण्यांत आली. शाळांतील इतर शिक्षकांसहि या विषयाचें सर्वसाधारण ज्ञान होऊन त्यांच्यांत ह्या विषयाविषयीं आस्था निर्माण करण्याचे दृष्टीनें तीन महिन्यांचे वर्ग सुरू करण्यांत आले. येत्या एप्रिलमध्यें दुय्यम शाळांच्या व अध्यापन-विद्यालयांच्या मुख्याधिकाऱ्यांकरितांहि एका वर्गाची योजना केलेली आहे. शारीरिक शिक्षण हा आवश्यक विषय समजला जाऊन, त्यासंबंधीं योग्य त्या सर्व गोष्टी उदा० लायक शिक्षक, क्रीडांगणें, साधनसामुग्री, योग्य वेळ वगैरे गोष्टी करण्यासंबंधीं प्रयत्न सुरू झाले आहेत. व्यायामशाळा व तालमी-मंडळें यांनाहि मदत देण्याच्या योजना तयार होऊन त्यांच्या अंमलबजावणीसहि सुरुवात झालेली आहे. आपल्या लोकांचें **शारीरिक व राष्ट्रीय दृष्ट्या झालेलें अधःपतन थांबवून राष्ट्राचें पुनरुज्जीवन करण्याचे** दृष्टीनें शारीरिक शिक्षणाची मदत होऊं शकते ही कल्पना या सर्व योजनांच्या मुळाशीं आहे. ह्या योजनांना सरकारची आर्थिक मदत, व्यायामप्रेमी जनतेचें सौहार्द व सहानुभूति व शाळाधिकाऱ्यांचें व शिक्षकांचें सहकार्य मिळालें तर यशाची आशा!

शारीरिक शिक्षणासंबंधीं इतकी तात्त्विक व ऐतिहासिक पार्श्वभूमि तयार केल्यावर त्याचें प्रात्यक्षिक स्वरूप कसें असावें या गोष्टीकडे आतां आपण वळूं.

## ३ शारीरिक शिक्षण कसें असावें ?

शारीरिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमांत अनेक विषयांचा समावेश होऊं शकतो. पण प्राधान्य कोणास द्यावें व कां द्यावें यासंबंधीं एकमत होणें कठीण. याचें कारण या विषयाकडे पाहण्याची **निरनिराळी दृष्टि. शक्ति, शरीर-सौष्ठव, व्यायाम** ही दृष्टि असणारे जोर, जोडी, दंड, बैठका, मल्लखांब, डबल

बार, रिंग्ज, वजनें उचलणें, स्नायु-संयमन (मसल कंट्रोल), यांनाच जास्त पसंत करतात. तर **आरोग्य, दीर्घायुष्य** प्राधान्य मानणारे लोक सूर्य-नमस्कार, आसनें, प्राणायाम यांना महत्त्व देतात. **आत्मसंरक्षण, चढाई** ही दृष्टि असणारे लोक कुस्ती, लाठी, बॉक्सिंग, जुजुत्सु, जंबिया, लकडी, फरीगदगा यांनाच प्रथम स्थान देतात. **चपळाई, काटकपणा, दमछाट, व्यायाम,** यांचे दृष्टीनें कुस्ती, लंब पल्ल्याच्या शर्यती, मैदानी व मर्दानी खेळ यांना महत्त्व दिलें जातें. तर **मनरंजन, मानसिक श्रमपरिहार, न कळत व्यायाम,** या दृष्टीनें सामुदायिक क्रीडाप्रकार महत्त्वाचे ठरतात. **शिस्त, लष्करी लायकी** ही दृष्टि, सांघिक कवायती, द्वंद्वयुद्धें ( Combative games and sports ), मार्चिंग, क्रॉसकंट्री रेसिस्, वननिवास यांस प्राधान्य देते. तर मनुष्याच्या अंगीं असलेल्या **विविध मानसिक प्रवृत्तींची** ( tendencies of the mind, instincts etc. ) कुचंबणा न करतां प्रगट होण्यास त्यांना योग्य तो वाव दिला जावा, मनुष्यांत **समाजोपयोगी गुणांचा** प्रादुर्भाव होऊन तो शीलवान् असा उत्तम नागरिक व्हावा, ही दृष्टि असणारे, विविध सामुदायिक खेळांकडेच धाव घेतात. यांपैकीं योग्य दृष्टि कोणती व त्या अन्वयें कोणत्या गोष्टींस प्राधान्य द्यावें हेंहि ठरविणें अत्यंत कठीण काम आहे. परंतु तें अशक्य नाहीं. सर्वसाधारणपणें आपण जर असें ठरविलें कीं, ज्या गोष्टी मनुष्याचे व्यक्तिमत्वाचे विकासास मदत करूं शकतात, ज्या गोष्टी विद्यार्थ्यांच्या शारीरिक, मानसिक व सामाजिक गरजा ( Needs ) भागवूं शकतात, ज्या ( Biology, Anatomy and Physiology, Psychology, Sociology ) प्राणिशास्त्र, शारीर व इंद्रिय विज्ञानशास्त्र, मानसशास्त्र, वगैरे शास्त्रांवर आधारलेल्या आहेत अशाच गोष्टींना योग्य तें स्थान द्यावें. चुकीच्या रूढि व परंपरा, पूर्वग्रहदूषित दृष्टि, वगैरे संकुचित वृत्ति सोडून जर **शास्त्रीय दृष्टिकोन** स्वीकारला गेला व त्याप्रमाणें अभ्यासक्रम आंखला गेला तर त्यापासून निःसंशय फायदा झालाच पाहिजे. या दृष्टीनें आतां आपण शारीरिक, मानसिक व सामाजिक परिस्थिति व गरजा यांचा विचार करूं व त्यानुसार अभ्यासक्रम आंखण्याचा प्रयत्न करूं.

**( अ ) शारीरिक परिस्थिति व गरजाः—**

शाळांतील विद्यार्थ्यांचें वय साधारणपणें ६ ते १७ पर्यंत धरल्यास या

**कालांतच त्यांच्या शारीरिक विकासाचा पाया** घातला गेला पाहिजे. अस्थि, स्नायु, हृदय, फुफ्फुसें, मज्जातंतु यांची वाढ होऊन त्यांच्यांत सहकार्य (co-ordination) निर्माण व्हावयास पाहिजे. या ठिकाणीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, स्नायुविकास (Muscular development) हें साध्य न समजलें जातां, त्यांच्या व्यायामानें मज्जा, श्वसन, रक्ताभिसरण, पचन वगैरे **संस्थांचा विकास व कार्यक्षमता** हें साध्य समजलें जावें. याशिवाय अपुरी व दोषपूर्ण वाढ, कमी वजन (Under-weight), लांब मान, खोल व अशक्त छाती, पृष्ठवंशाचा अनैसर्गिक बाक, सपाट तळवा, डोळ्यांचे, नाकाचे व कानांचे रोग वगैरे शारीरिक व्यंगें दूर करून शरीरयष्टि सुदृढ व सुडौल होण्यास ह्याच कालांत प्रयत्न व्हावयास पाहिजेत. श्वसन, चालणें, धावणें, उड्या मारणें, फेकणें, नेम मारणें, वगैरे नैसर्गिक क्रिया (Natural activities) चपळाईनें डौलदार व निर्दोष रीतीनें करतां येऊन शरीरावर ताबा आला पाहिजे. ज्या ज्या ठिकाणीं विद्यार्थ्यांची शारीरिक व वैद्यकीय तपासणी केली त्या त्या ठिकाणीं हेंच दिसून आलें कीं, विद्यार्थ्यांची वाढ अपुरी व सदोष झालेली असून त्यांची शारीरिक स्थिति अत्यंत खालावलेली आहे. ही स्थिति बदलून त्यांना शारीरिक-दृष्ट्या लायक करण्यास मदत करणें हें शाळांचें कर्तव्य ठरतें! या दृष्टीनें शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम जर आंखला गेला तर योग्य प्रमाणांत सूर्य-नमस्कार, आसनें, पोटाचे व्यायाम, कवायती वगैरे वैयक्तिक व सांघिक व्यायाम-प्रकारांबरोबरच आपणांस धावणें, उड्या मारणें, नेम मारणें, झगडणें वगैरे नैसर्गिक क्रियांवर आधारलेले सांघिक छोटे-मोठे, देशी-विदेशी मर्दानी व मैदानी खेळ यांचाच समावेश करावा लागेल. या ठिकाणीं एक गोष्ट ध्यानांत ठेवावी लागेल कीं, **नैसर्गिक व्यायाम-प्रकार** (Natural activities) हे मौजेचे व आनंददायक असून त्यांत न कळत व्यायाम होतो. शरिरांतील वेग-वेगळ्या संस्थांत (Bodily systems) सहकार्य निर्माण होऊन मुलें चपळ, काटक, सुदृढ व कार्यक्षम होऊं शकतात. ही गोष्ट कवायती, डबल बार, वजन उचलणें वगैरे **कृत्रिम व्यायाम-प्रकारांची** (Formal activities) नाहीं. खेळाइतका आनंद निर्माण करण्याची त्यांच्यांत कुवत नसून शारीरिक विकासावर त्यांचा पूर्णतया परिणाम होत नाहीं. उलट पुष्कळ वेळां हृदय, फुफ्फुसें, स्नायु, मज्जातंतु यांवर फाजील ताण पडतो, त्यांची कार्यक्षमता कमी होते. म्हणून त्यांची योजना

करतांना विद्यार्थ्यांची शारीरिक तपासणी करूनच त्यांना ते ते व्यायाम-प्रकार योग्य त्या प्रमाणांत द्यावेत. कृत्रिम व्यायाम-प्रकारांचा ( Formal exercises, gymnastics etc. ) शरीरयष्टि डौलदार होण्याकडे ( good posture ) व स्नायुविकासाकडे होतो. शिवाय त्यांच्यांत दर्शनीयताहि ( spectacular ) असते. त्यांना जागाहि कमी लागते व वयानुसार त्यांची ( विशेषतः Formal exercises ) मांडणीहि करतां येते. त्यांचाहि योग्य प्रमाणांत उपयोग करावा.

**( ब ) मानसिक परिस्थिति व गरजाः—**

मानसिक परिस्थितीचा विचार करतांना विद्यार्थ्यांचे **मानसिक विकासानुरूप** ( stages of mental development ) निरनिराळे **गट पाडावे** लागतील. ६–७ वर्षे वयाच्या मुलांची परिस्थिति व गरजा १३–१४ वर्षे वयाच्या मुलांच्या स्थितीपेक्षां वेगळ्या असतात. तेव्हां सर्वांसच एका मापानें मोजणें चुकीचें होईल. या दृष्टीनें बाल्य ६–१० ( childhood ), ११–१३ ( later childhood ); १४–१७ ( Boyhood ) या तीन गटांचा आपणांस वेगवेगळा विचार करावा लागेल. सर्वसाधारणपणें विचार केला असतां असें आढळून येईल कीं ( १ ) **प्रथम दशेंतील** विद्यार्थ्यांत स्वत्वाच्या भावनेचा ( self display, self-assertion ) जोर अधिक असतो. जो तो आपणांस जास्त वाटा कसा मिळेल इकडे लक्ष देतो. ( Imagination, Imitation, Dramatization ) कल्पना, अनुकरण नाट्यकरण वगैरे मनोवृत्ति प्रबळ असतात. या दृष्टीनें शारीरिक शिक्षण त्यांच्या वरील वृत्तीस पोषक असेंच असावयास पाहिजे. स्वच्छंद क्रीडन (Free-play) (साधनांसहित व विरहित निरनिराळ्या प्राण्यांच्या व वेगवेगळ्या लोकांच्या ( धोबी, लोहार, सुतार, मोटारवाला, शेतकरी, सर्कसवाला ) नकला, ( Make-belive tendency ) सोप्या सोप्या गोष्टींचें नाट्यकरण, पाठशिवणीचे, चक्रांत खेळले जाणारे छोटे खेळ ( Games of low organization ) हस्तकाम, 'शिशुवीराचें शिक्षण' ( Cubbing ) वगैरे क्रीडाप्रकार या दशेंत उपयुक्त ठरतील.

( २ ) **द्वितीय दशेंतील** ( ११–१३ ) विद्यार्थ्यांत स्वत्वाची वृत्ति कमी होत जाऊन **संघ-भावना** ( Gang spirit ) निर्माण झालेली असते. संघाच्या

हेताकरितां लांडी-लबाडी करण्याचीहि मुलांची या वेळेस तयारी असते. घर व घरांतील माणसांपेक्षां बाहेरील जगच त्यांना विशेष प्रिय असते. या परिस्थितींत स्काउटिंग, प्रवास, सहली, सांघिक छोटे खेळ व व्यायाम-प्रकार यांचाच जास्त उपयोग होईल.

**( ३ ) तिसऱ्या दशेंतील** ( १४–१७ ) विद्यार्थ्यांची मानसिक परिस्थिति नाजूक व चमत्कारिक असते. स्वत्वाची त्यास तीव्र जाणीव होत असल्यानें तो जास्त भावनाप्रधान ( emotional ) होत जातो. लैंगिक भावनांचा उदय झाल्यानें त्याची परिस्थिति चमत्कारिक होते. चराचर जगाविषयीं पडलेलें कोडें उलगडण्याच्या प्रयत्नांत तो जास्तच बुचकळ्यांत पडतो. अशा वेळीं थोर लोकांचे गुण ( Hero-worshsip), समाजसेवा, धर्म ( Religion ) व शास्त्रें ( Sciences ) यांकडे त्याची दृष्टि वळवली पाहिजे. मानसिक प्रवृत्ति दडपून न टाकतां त्यांना प्रगट होण्यास **आरोग्यकारक वातावरण निर्माण** केलें पाहिजे. या दृष्टीनें सामुदायिक खेळ स्काउटिंग वगैरे व्यायाम-प्रकारांचा जास्त उपयोग होऊं शकतो. खेळांचे योगानें स्वतःशींच विचार करण्याची प्रवृत्ति कमी होऊन, मनाची बावरलेली स्थिति सुधारते. आयुष्याकडे पाहण्याची दृष्टीहि दिलदारपणाची होऊं लागते. याशिवाय खेळांचे योगानें निरीक्षणशक्ति ( Observation ), चिकाटी, धैर्य, आत्मविश्वास, संयमशीलता, स्वयंस्फूर्ति ( Initiative & Resourcefulness ) व योजकता वगैरे मानसिक गुणांचा परिपोष होऊं शकतो. अर्थात् ह्या गोष्टी मुलांची परिस्थिति समजावून घेणारा योजक असा शिक्षक व नेता ( Leader ) व योग्य प्रकारचे खेळ यांवर अवलंबून राहील.

### ( क ) सामाजिक परिस्थिति व गरजाः—

मनुष्य हा **समाजप्रिय** प्राणी असल्यानें त्याचे ठिकाणीं समाजोपयोगी गुणांचा प्रादुर्भाव होणें अवश्य आहे. **व्यक्तिमत्त्वाचा विकास** (Personality Development ) हें जरी शिक्षणाचें ध्येय ठरलें तरी व्यक्तीला समाजापासून दूर ठेवून तो साधत नाहीं. समाजांतील व्यक्तींचा एकमेकांवर परिणाम होतच असतो; व याचमुळें व्यक्तीचे ठायीं असलेले स्वार्थीपणा, एकलकोंडेपणा, चिडखोरपणा वगैरे दुर्गुण **समाजांत राहिल्यानें** नाहीसे होऊं शकतात. ज्या व्यक्तीला

दुसऱ्यांच्याविषयीं व त्यांच्या मताविषयीं आदर नसतो, त्यांच्या अधिकाराची जाणीव नसते, ती व्यक्ति कितीहि बुद्धिमान् असली तरी समाजास तिचा उपयोग होऊं शकत नाहीं. प्रामाणिकपणा, आज्ञाधारकपणा, न्यायप्रियता, सहकार्य, नेतृत्व, क्रीडादाक्षिण्य वगैरे समाजोपयोगी गुणांचा परिपोष व्यक्तीचे ठायीं करण्याचें सामर्थ्य खेळांत–सांघिक खेळांतच (Team games) सांपडेल. **म्हणून** शारीरिक शिक्षणानें अभ्यासक्रमांत त्यांनाच प्राधान्य देणें आवश्यक आहे. मनुष्याची समाजप्रियता (Gregariousness) व **लढाऊ वृत्ति** (Combative instinct) प्रगट होण्यास आरोग्यकारक वातावरण निर्माण करण्याचें सांघिक खेळांशिवाय दुसरें परिणामकारक साधन नाहीं. खेळांत **कृत्रिम प्रकारचें लढाऊ वातावरण** निर्माण होतें; व मनुष्य दोन द्यावयास व दोन घ्यावयास शिकतो. विजयाचें समाधान व आनंद लुटण्यास आणि अपजयाचें दुःख व अपमान सहन करण्यास तो खेळांतच शिकतो. **खेळांइतका 'यशस्वी शिक्षक' पाहूं जातां सांपडणार नाहीं.** याशिवाय खेळांत लहान-मोठा, उच्च-नीच, गरीब-श्रीमंत हा भाव नाहींसा होऊन एकमेकांविषयीं सहानुभूति व आदर निर्माण होणें शक्य असतें. **समाजांतील विषमतेचें वातावरण** नाहींसें करून प्रेम निर्माण होण्यास खेळांचा बराच उपयोग होऊं शकेल.

सामाजिक गरजांमध्यें **राष्ट्रीय गरजांचा** व परिस्थितीचाहि आपणांस समावेश करतां येईल. आतांपर्यंत अनेक राष्ट्रांनीं शारीरिक शिक्षणाची कांस राष्ट्राभिमान, स्वदेशप्रेम, ऐक्य या दृष्टींनीं धरलेली आहे. आपणांससुद्धां खेळांतून त्या गुणांची शिकवण नाहीं का देतां येणार? स्वदेशी वस्तु, स्वदेशी खेळ, स्वदेशी व्यायाम-प्रकार ह्यांवर जर आपण भर दिला तर ही गोष्ट नाहीं का साधणार? जरूर साधेल! पण याचा अर्थ परदेशी गोष्टींचा, खेळांचा, व्यायाम-प्रकारांचा तिटकारा हा नव्हे. शारीरिकदृष्ट्या कोणत्याहि व्यायाम-प्रकारांचा शारीरिक विकासावर सारखाच परिणाम होईल. कारण **अखिल मानवजातीची शरीर व इंद्रिय-रचना सारखीच** आहे. देशकालमानाप्रमाणें गरजा वेगवेगळ्या असूं शकतील. मानसिक दृष्ट्याहि तीच स्थिति! **मानवजातीचें मन,** त्याचें वैशिष्ट्य व **विकासाच्या पायऱ्या सारख्याच** आहेत; पण मानसिक गरजा वेगवेगळ्या असूं शकतील. **समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें** जरी **सारखीं** असलीं तरी सामाजिक गरजा व परिस्थिति वेगळी असूं शकेल! **राष्ट्रीय गरजा तर निःसंशय**

**वेगळ्या** आहेतच. **राष्ट्रीय खेळांचा** उपयोग या दृष्टीनें बराच होऊं शकेल. वास्तविक पाहतां सर्व खेळ ( Games & Sports ) मनुष्याच्या नैसर्गिक क्रीडा-प्रकारांवरच ( उदा. धांवणें, पकडणें, झगडणें, नेम मारणें, वगैरे ) उभारलेले असल्यानें त्यांवर सर्वांचा सारखाच हक्क आहे. तेव्हां या दृष्टीनें आपण असें म्हणूं, कीं जे खेळ मनुष्याच्या सर्वांगीण विकासास मदत करूं शकतील ते देशी-विदेशी ही भावना न ठेवतां सर्वत्र उपयोगांत आणणेंच **शास्त्रोक्त होईल.** या गोष्टीवर एकमत होणें कठीण आहे. तरी पण साधन-सामुग्रीचा उपयोग करून उपयुक्त असे परदेशी खेळ व व्यायाम-प्रकार जर आपण स्वीकारले तर त्यांत उपयुक्तता, स्वदेशी व स्वदेशप्रेम या सर्वच गोष्टी साधतील.

## ४ अभ्यासक्रमांतील महत्त्वाचें व मानाचें स्थान

अशा रीतीनें विद्यार्थ्यांच्या शारीरिक, मानसिक व सामाजिक गरजा आणि परिस्थिति यांचा अभ्यास करतांना आपणांस एक गोष्ट प्रामुख्यानें दिसून येते कीं, शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम विद्यार्थ्यांना सर्वोपयोगीं करावयाचा झाल्यास त्यांत **सांघिक खेळांसच** (Team games) **प्राधान्य** द्यावें लागेल ही गोष्ट अनुभवावरूनहि सिद्ध करतां येईल. आतांपर्यंत शाळांत शारीरिक शिक्षण सुरू करण्याचे अनेक प्रयत्न झाले; पण ते यशस्वी झाले नाहींत. याला अनेक कारणें असूं शकतील; पण अत्यंत महत्त्वाचें असें कारण म्हणजे हेंच कीं, जें शारीरिक शिक्षण त्यांच्या शारीरिक गरजा भागवूं शकतें, मानसिक दृष्ट्या त्यांची वाढ करण्यास मदत करतें, त्यांच्या नैसर्गिक मनोवृत्तींस प्रगट होण्यास आरोग्य-कारक वातावरण निर्माण करतें, त्यांच्या **क्रीडन-प्रवृत्तीची** (Play tendency) तहान भागवितें, त्यांच्यामध्यें समाजोपयोगी गुणांचा विकास करून त्यांना लायक असे समाजाचे घटक करण्यास मदत करतें, अशा प्रकारचें शारीरिक शिक्षण अद्यापपर्यंत दिलें गेलेंच नाहीं. आतांपर्यंत कंटाळवाणे कृत्रिम व्यायाम प्रकार ( formal exercises ) व कवायती ( formal drills ) वैयक्तिक गरजांचा विचार न करतां सर्वांनीं करावयाचे असत. जिमनॅस्टिक्स व इतर व्यायाम वगैरे गोष्टींचाच अभ्यासक्रमांत समावेश होत असे. **मुलांच्या नैसर्गिक प्रवृत्तीं-वर** (Instinctive tendencies) **आधारलेलें शिक्षण हेंच खरें शिक्षण व**

**तेंच यशस्वी होणार! क्रीडन-वृत्ति** ( Play tendency ) **ही मनुष्याची एक नैसर्गिक वृत्ति आहे.** हिच्यामुळें शरिराच्या वाढीस मदत होते, मानसिक विकास साधला जातो, समाजोपयोगी गुणांचा प्रादुर्भाव होतो. ही मनुष्याला आनंदित करते, उत्साहित करते, कार्यक्षम बनविते ( Play is spontaneous, joyous, creative activity ). **शालेय अभ्यासक्रमांतहि या वृत्तीचा** ( Playway in education ) **दिवसेंदिवस जास्त प्रमाणांत उपयोग** केला जात असतां, शारीरिक शिक्षणासारख्या 'खेळाशीं' व क्रीडनवृत्तीशीं अत्यंत निगडित असलेल्या विषयांत या वृत्तीचा अभाव असावा ही किती आश्चर्याची गोष्ट आहे? शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम या वृत्तीवर तर उभारला पाहिजेच, पण हा विषय शिकवितांना देखील जुनाट अशास्त्रीय अशा पद्धतींचा अवलंब न करतां **खेळकरवृत्तीचा** ( Play-spirit ) अवलंब केला गेला पाहिजे. क्रीडनवृत्तीवर उभारलेला अभ्यासक्रम यशस्वी झालाच पाहिजे. खेळाची अनुकूल परिस्थिति दिसली कीं मुलाचें अंग फुरफुरूं लागतें. वर्गात दडपून ठेवलेली क्रीडनवृत्ति जागृत होते. मांजर उंदरावर झडप घालतें त्याप्रमाणें तीं खेळांवर झडप घालतात. आजारी असतांना देखील त्यांची ही वृत्ति दडपून राहात नाहीं. खेळणें हा मुलांचा धर्म! **खेळणें हा मुलांचा जन्मसिद्ध हक्क! तो त्यांना गाजवूं दिलाच पाहिजे! खेळणें यांतच मुलांचें ब्रह्मांड सांठविलेलें आहे. तो ब्रह्मानंद त्यांना मिळवून दिला पाहिजे!! खेळणें हेंच त्यांचें जीवित. त्याचें साफल्य होण्यास आपण मदत केली पाहिजे. या धर्माच्या, या हक्काच्या, या ब्रह्मानंदाच्या, या जीविताच्या आड येणारांचे प्रयत्न केव्हांहि यशस्वी झाले नाहींत, होत नाहींत व होणार नाहींत.**

म्हणून "क्रीडनप्रवृत्ति, क्रीडा व क्रीडनमार्ग" हेंच आपलें ध्येयवाक्य झालें पाहिजे (Play tendency, play and playway).

शाळांतील शारीरिक शिक्षणाच्या अभ्यासक्रमाविषयीं अशा रीतीनें आपण वर विचार केला आहे. शारीरिक शिक्षण यशस्वी होण्यास 'अभ्यासक्रम' ही एक महत्त्वाची बाब आहेच. पण याशिवाय विद्यार्थ्यांशीं व विषयांशीं समरस होणारा हुशार नेता व शिक्षक, इतर शिक्षकांचें सहकार्य, क्रीडांगण,

तालीमखाना, व्यायाम व खेळ यांची साधनसामुग्री, शारीरिक शिक्षणास दिलेला वेळ वगैरे गोष्टी तितक्याच महत्त्वाच्या आहेत.

इतक्या गोष्टी असूनहि '**शारीरिक शिक्षणाची योजना यशस्वी होईलच हें सांगवत नाहीं.** शारीरिक शिक्षणाबरोबरच आरोग्य-शिक्षण, स्वच्छ व मोकळया हवेंतील राहणी, आरोग्यकारक वातावरण, पौष्टिक व सत्त्वयुक्त आहार, मनुष्याच्या सवयी, आनुवंशिकत्व, शिक्षणाकडे व आयुष्याकडे पाहण्याची दृष्टि या अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी आहेत. यांची अनुकूलता असेल तरच सर्वांगीण उन्नतीप्रत आपण पोंहोचणार! पण या सर्व गोष्टींची सिद्धता होईपर्यंत निष्क्रिय राहणें ह्यांत पुरुषार्थ आहे काय? ध्येय उच्च ठेवून आपल्या सामर्थ्याप्रमाणें कार्य करीत राहणें हेंच खरें जीवित! ध्येय दूर, साधण्यास अशक्य म्हणून त्याची कास सोडून स्वतःची नैतिक अवनति करून घेणें हें मानवी जीविताचें साफल्य नव्हे! तर झगडणें, झगडतां झगडतां पडणें, पुनः उठणें, पुनः झगडणें त्यांतच आयुष्याच्या यशस्वितेची गुरुकिल्ली साठविलेली आहे.

* * *

# शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम

## (१) (वय ६–१०) प्राथमिक शाळा

(Elementary or Primary School)

(१) **स्वच्छंद क्रीडन** (Free play) चालणें, धांवणें, उड्या मारणें (लांब, उंच, दोरीच्या), चेंडू फेंकणें, नेम मारणें वगैरे.

(२) **नकला व नाट्यकरण** (Imitation, Dramatization, Story play etc.) घोडा, कुत्रा, गाढव, हत्ती, बेडूक, ससा, बगळा, वगैरे पशु-पक्ष्यांच्या नकला. सुतार, लोहार, नावाडी, धोबी, शेताचीं कामें करणारा, गवत कापणारा, मोटहाक्या, मोटार, ट्रॅम, विमानें वगैरे हाकणारा वगैरे लोकांच्या नकला. सोन्याची कुऱ्हाड, दोन मांजरें, माकड व सुतार, कोल्हा व द्राक्षें वगैरे सोप्या गोष्टींचें नाट्यकरण. (वरील गोष्टींत नैसर्गिक क्रियांवरच Natural big muscular activities जास्त भर देणें.)

( ३ ) **साभिनय गाणीं व गाण्याचे खेळ** ( Action Songs ) चेंडूचें, फुलांचें, आकाशाचें, मोटारचें, गाडीचें, बोटीचें वगैरे गाणें.

( ४ ) **सोपे खेळः**—पाठशिवणीचे, आबादाबीचे, गोलाचे वगैरे ( Circle games ).

( ५ ) **शिशुवीराचें शिक्षण** ( Cubbing ) व सहली वगैरे.

( ६ ) **हस्तकाम** ( Handicraft )—मातीचीं व पुठ्ठयाचीं चित्रें, बाग तयार करणें वगैरे.

## ( २ ) वय ११–१३ ( Middle School ):—

( १ ) **नकला व नाट्यकरण**—( शिकंदर, शिवाजी, बाबर वगैरे वीरांच्या आयुष्यांतील गोष्टींचें ( ज्यांत शरीरचलनवलन आहे अशा ) नाट्यकरण. ( संवाद महत्त्वाचा नाहीं; कृतींवर भर आहे. )

( २ ) **सोपे खेळः**—नैसर्गिक क्रीडाप्रकारांवर ( Natural activities ) आधारलेले.

( ३ ) **संघटित खेळः**—लंगडी, विटीदांडू, खोखो, फुटबॉल वगैरे खेळांचे तयारीचे खेळ ( Lead-up games ) व ते प्रत्यक्ष खेळ.

( ४ ) **स्काउटिंगः**—सहली वगैरे

( ५ ) **तालबद्ध व्यायाम-प्रकार** ( Rhythmic activities):—लेझीम, टिपऱ्या, झिम्मा, फुगड्या वगैरे.

( ६ ) **सांघिक कवायतीः**—सर्वांगसुंदर व्यायामाचे हात, बालकवायत, डम्बेल्स, रुमाल वगैरे साधनांच्या.

( ७ ) **शरिरावर ताबा येणारे व्यायामः**—(Balance exercises)—निरनिराळ्या उड्या Tumbling, Rolling, Diving, Cartwheels etc.)

( ८ ) **द्वंद्वें,** ( Combative arts and Sports ):—लाठी, लकडी, साधी कुस्ती.

( ९ ) **सूर्यनमस्कार आसनें, प्राणायाम जोर, दंड** वगैरे.

( १० ) **पोहणें.**

( ११ ) **हस्तकाम** ( Handicraft )—सुतारकाम, बागेचें काम वगैरे,

## ( ३ ) वय १४-१७ ( High School ) दुय्यम शाळा:–

( १ ) **लहान जागेतील साधे खेळ:**–(Games of low organization)

( २ ) **सांघिक खेळ:**–विटीदांडू, खोखो, हुतुतू, आट्यापाट्या, फूटबॉल, व्हॉली बॉल, बास्केट बॉल वगैरे खेळ व तयारीचे खेळ ( Lead-up games ).

( ३ ) **शर्यती व खेळ** ( Athletic sports ):–१०० यार्ड्स ते १ मैल धावणें, लांब व उंच बांबूची उडी, गोळा व चेंडू फेकणें, वगैरे टप्प्यांच्या शर्यती ( Relay Races ).

( ४ ) **सांघिक कवायती:**—सर्वांगसुंदर व्यायाम, कवायत, जोडी, लाठी, बांबू वगैरे.

( ५ ) **मार्चिंग:**—मिलिटरी मार्चिंग, नेम मारणें ( Aiming and shooting )

( ६ ) **द्वंद्वें** ( चढाईचे व बचावाचे ) Combative:– लाठी, लकडी, फरीगदगा, कुस्ती, बॉक्सिंग वगैरे.

( ७ ) **जिमनॅस्टिक्स** ( Gymnastics ):—मलखांब, डबल बार, वगैरे.

( ८ ) **झाडें** ( Pyramid building ).

( ९ ) **सूर्यनमस्कार, आसनें,** प्राणायाम, दंड, बैठका वगैरे.

( १० ) **स्काउटिंग**—वननिवास वगैरे.

# राष्ट्रीय शिक्षणांत परभाषेचें स्थान
# मराठी हायस्कुलें काढा

लेखकः—महादेव रामचंद्र परांजपे

सध्यां अस्तित्वांत असलेल्या शिक्षणसंस्था निर्दोष नाहींत. त्यांची वाढ चालू आहे; पण ती योग्य दिशेनें व योग्य प्रमाणांत होत नाहीं ही तक्रार कांहीं नवी नव्हे. कमींत कमी चाळीस वर्षें ती मी ऐकत आहे व आणखी चाळीस वर्षांनंतरहि ती मिटणार नाहीं. असमाधानांत प्रगतीचें बीज असतें व आहे. तें बदलून कांहीं तरी नवीन करावें ही बुद्धि सर्वत्र दिसून येते. चाळीस वर्षांपूर्वी शास्त्रीय शिक्षणाची सोय नव्हती; तेव्हां लोक म्हणत शास्त्रीय शिक्षण वाढवा; कोणी म्हणत स्वभाषेंतून शिक्षण द्या, तेंच शिक्षण प्रभावी होईल. कित्येकांच्या मतानें स्वतंत्र देशांत स्वतंत्रतेच्या वातावरणांत मिळणारें शिक्षण तेंच खरें शिक्षण. म्हणून परदेशांत जाऊन तेथून देशसंजीवनी विद्या आणावी हें योग्य. सार्वत्रिक सक्तीचें शिक्षण, देशाभिमानवर्धक शिक्षण, धर्म-शिक्षण, धंदे-शिक्षण वगैरे अनेक शिक्षणांचा समावेश शाळेच्या शिक्षणक्रमांत करण्याचा आग्रह धरीत. या सर्व उपायांची योजना गेल्या तीस वर्षांत झाली व त्या उपायांचा थोडाबहुत उपयोगहि झाला. पण शिक्षण निर्दोष करण्यासारखे कडक उपाय ते नव्हते व त्यामुळें तीस वर्षांपूर्वीचें असमाधान आजहि तसेंच आहे.

शिक्षणाचा सर्वमान्य दोष हा कीं, सुशिक्षितांची संख्या वाढत आहे त्याच प्रमाणांत सुशिक्षितांची बेकारीहि वाढत आहे. नोकरवर्ग निर्माण करणारें शिक्षण म्हणून ज्याला आजपर्यंत नांवें ठेविलीं त्याच शिक्षणानें आज नोकरी मिळत नाहीं म्हणून तें आपण टाकाऊ म्हणतों. प्रत्येक निरुपयोगी वस्तु टाकाऊ नसते. एकादी चांगली मोटारगाडी खरेदी केल्यावर मालक आजारी पडला व त्या गाडीचा उपयोग त्याला झाला नाहीं तर मोटारीला दोष देणें अन्यायाचें होईल. सध्यां मिळणाऱ्या शिक्षणानें पोटाचा प्रश्न सुटत नाहीं

म्हणून त्या शिक्षणाला नांवें ठेवणें हाहि अन्यायच आहे. ज्या सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थितींत आज आपण आहों ती परिस्थिति बदले-पर्यंत कोणतेंहि शिक्षण सुशिक्षितांची बेकारी नष्ट करूं शकणार नाहीं. कारण आपल्याला मिळालेल्या शिक्षणाला पोषक अशी परिस्थिति निर्माण करणारा पुरुषसिंह एखादाच; बहुतेक सगळे परिस्थितीला बळी पडतात. म्हणून शिक्षणावरील हा दोष घालविणें असल्यास परिस्थिति बदलणारें शिक्षण मिळालें पाहिजे.

शंभर वर्षांपूर्वी असा प्रयत्न परकी सरकारनें केला. जुनी शिक्षणाची प्रथा मोडून इंग्रजी भाषेंतून अर्वाचीन वाङ्मयाचें व शास्त्रांचें शिक्षण देण्याचा मुख्य हेतु हिंदुस्थानची निद्रावस्था जाऊन त्याला जागृतावस्था प्राप्त व्हावी हा होता. हें मत आज कोणाला न पटो; तत्कालीन पुढाऱ्यांना तें पटलें होतें यांत शंका नाहीं. आणि म्हणूनच विष्णुशास्त्री चिपळोणकरांनीं इंग्रजी शिक्षणाला वाघिणीचें दूध म्हटलें व तें तेजस्वी इंग्रजी शिक्षण लोकांना विनायासानें व अल्पमोलानें मिळावें म्हणून न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना ( १८८० सालीं ) केली. त्या गोष्टीला आतां साठ वर्षें झालीं व या साठ वर्षांत चिपळोणकरांच्या न्यू इंग्लिश स्कूलसारख्या अनेक इंग्रजी शाळा महाराष्ट्रांत निघाल्या; पण मर्म न जाणणाऱ्यानें अस्सलाची नक्कल केली तर त्या नकलेंत अस्सलाची उठावणी दिसत नाहीं; व न्यू इंग्लिश स्कूलच्या ज्या नकला गांवोगांव झाल्या त्या सर्वांत न्यू इंग्लिश स्कूलचा जिवंतपणा दिसून येत नाहीं.

आणि याचें कारण इंग्रजी शिक्षण म्हणजे इंग्रजी भाषेचें शिक्षण असा समज बहुतेकांनीं करून घेतला. इंग्रजी शिक्षण हें साध्य व इंग्रजी भाषेचें शिक्षण हें साधन हा फरक आपण विसरतों. अत्तर सांडून गेल्यावर अत्तराच्या बाटलीला असलेल्या वासावरच लोक खूष राहूं लागले व दूध नसलेलें दुधाचें भांडें चाटूनच वाघाचा पराक्रम आपल्याला यावा अशी त्यांनीं अपेक्षा केली. इंग्रजी भाषेचें शिक्षण सर्वांना जमत नाहीं. पण इंग्रजी शिक्षण सर्वांना मानवतें. इंग्रजी शिक्षण म्हणजे बर्क व मिल् यांची राजनीति, मेकॉलेचें इति-हास-विवेचन, न्यूटनचे सिद्धान्त— यांचें शिक्षण जर्मनींत जर्मन भाषेंत देतात; फ्रान्सांत फ्रेंच भाषेंत देतात; जपानांत जपानी भाषेंत देतात. आपल्या महाराष्ट्रांत तें मराठी भाषेंतच मिळालें पाहिजे. मराठी भाषेच्या सामर्थ्याची कल्पना नव्हती

त्या वेळीं इंग्रजी भाषेचा पांगुळगाडा इंग्रज सरकारनें आपल्या हातीं दिला, कल्पना अशी कीं थोड्या दिवसांनीं आपण हा पांगुळगाडा फेकून देऊन आपल्या मराठी पायावर आपण उभें राहण्यास शिकूं. मराठी भाषा समर्थ आहे हें मत आतां सर्वांना पटतें, पण पांगुळगाडा सोडण्याचें धैर्य मात्र होत नाहीं. हे पांगुळगाडे पुरविणारीं दुकानें—इंग्रजीवर्ग— आतां खेड्यांतहि निघाले आहेत व एखाद्या बाटग्याची आपल्या नव्या धर्मावर जशी भक्ति जडते तशी आमची इंग्रजी भाषेवर भक्ति जडली आहे. नाइलाज म्हणून घरांत घेतलेलें हें उंटाचें पिलूं आतां इतकें मोठें झालें आहे कीं तें कोणत्याहि दरवाजांतून बाहेर जात नाहीं.

उत्कृष्ट इंग्रजी बोलतां व लिहितां येणें हें भूषण आहे व ज्याला शक्य असेल त्यानें इंग्रजी जरूर शिकावें. दैवयोगानें आपला संबंध इंग्रजांशीं जडला आहे व त्या कारणानें आपणांस इंग्रजीची जरूरी भासते. हा संबंध कदाचित् तुटला तरीहि आपणांस इंग्रजी शिकावें लागेल. फ्रान्स, जर्मनी, रशिया, जपान वगैरे स्वतंत्र देशांतहि मुलांना इंग्रजी शिकवितात; कारण जगाशीं संबंध राखण्याला इंग्रजीचा उपयोग होतो. पण इंग्रजी शिकण्याची सक्ती तेथें नाहीं. इंग्रजी येत नाहीं म्हणून वरच्या दर्जाचें शिक्षण मिळूं शकत नाहीं ही हिंदुस्थानांतील विलक्षण पद्धति कोणत्याहि स्वतंत्र देशांत नाहीं. इतर देशांपेक्षां हिंदुस्थानांत इंग्रजी भाषेच्या अभ्यासाची जरूरी जास्त हें खरें; पण ती कोणाला? वरच्या थरांतील पुढाऱ्यांना; कोर्ट-कचेरींत काम करणाऱ्या कारकुनांना; वरच्या कोर्टांत कज्जे लढविणाऱ्या वकिलांना; आफिसरांना व परदेशांशीं व्यापार करणारांना. पण यांच्या दसपट लोक खेड्यापाड्यांत राहतात, त्यांना इंग्रजी नको पण इंग्रजी शिक्षण हवें व इंग्रजी न शिकतां हें इंग्रजी शिक्षण त्यांस मिळालें पाहिजे.

ज्या टिळक आगरकरांनीं न्यू इंग्लिश स्कूल काढलें त्यांना ही गोष्ट पटली होती व म्हणूनच इंग्रजी भाषा न शिकलेल्या लोकांनाहि इंग्रजी शिक्षण मिळावें म्हणून केसरी पत्र त्यांनीं चालू केलें. मूळ इंग्रजी शिक्षण सुरू करणाराचा हेतूहि असाच होता. १७९८ मध्यें चार्ल्स ग्रँट या गृहस्थांनीं हा प्रश्न व्यवस्थित रीतीनें लोकांपुढें मांडला. ते म्हणतात, " आपलें कार्य करण्याचे मार्ग दोन, देशी भाषांच्या द्वारानें अगर आपल्या इंग्रजी भाषेच्याद्वारानें...या बाबतींत नक्की मत देण्याची आमची इच्छा नाहीं. पण मूळ हेतु सुटतां कामा नये. हिंदुस्थानांतील लोकांना अर्वाचीन वाङ्मय व शास्त्रें यांचें ज्ञान देणें जरूर आहे व तें देणें शक्य

आहे. आणि कोणत्या मार्गानें हें साध्य गांठावयाचें हें तत्कालीन परिस्थितीवर अवलंबून राहील." शंभर वर्षांपूर्वीची परिस्थिति आतां बदलली आहे. ज्या वेळीं इंग्रजी व मराठी जाणणारे दुभाषी विद्वान् देशांत नव्हते, ज्या वेळीं इंग्रजी शिक्षण देण्याचें काम इंग्रजांना करावें लागे, त्या वेळीं लोकांना इंग्रजी शिकवून नंतर इंग्रजींतून इंग्रजी शिक्षण देणें त्यांना सोयीचें वाटलें. पण आतां देशभाषा येत असतांना " आम्हीं इंग्रजींतून शिकविणार व त्यासाठीं सर्वांनीं इंग्रजी शिकलें पाहिजे " असा हट्ट गुलामगिरींत खितपणाऱ्यांनीं करावा. स्वातंत्र्याकांक्षी महाराष्ट्रीयांना तो शोभत नाहीं.

इंग्रजी भाषेला मिळालेला अग्रपूजेचा मान मराठीला मिळावा हें आतां सर्वांना पटतें. पण ही गोष्ट पंचवीस वर्षांपूर्वी सरकारनें आपण होऊनच केली आहे हें पुष्कळांना ठाऊक नाहीं. सन १९१४ सालीं बनविलेल्या अभ्यासपत्रकांत ( म्हणजे 'डी' शेड्यूलमध्यें ) पहिला उल्लेख मराठीचा असून इंग्रजीचा नंबर चौथा आहे. ही कागदी सुधारणा कृतींत उतरली नाहीं. अकबर बादशहाच्या लहानपणीं अधिकार गाजवून शिरजोर झालेल्या बहिरामखानाप्रमाणें इंग्रजी भाषा शिरजोर झाली आहे व या वेळीं अकबर बादशहाचा उपाय अमलांत आणून इंग्रजी भाषेची हकालपट्टी केल्यावांचून गत्यंतर नाहीं.

पण इंग्रजीची हकालपट्टी करणें याचा अर्थ इंग्रजी शिकविण्याचें बंद करणें असा नाहीं. वरच्या दर्जाचें शिक्षण घेण्यासाठीं इंग्रजी भाषा शिकण्याची सक्ती बंद झाली म्हणजे झालें. सध्यांच्या परिस्थितींत शक्य असेल त्यानें इंग्रजी शिकावें हें इष्ट आहे, व अशा इंग्रजी भाषा शिकूं इच्छिणाऱ्या मुलांची इंग्रजी शिक्षणाची सोय होणें अवश्य आहे. पण मराठी चौथी इयत्ता पास झालेल्या प्रत्येक मुलाला "वरच्या दर्जाचें शिक्षण हवें असेल तर इंग्रजी भाषा शीक नाहीं तर व्ह. फा. होऊन तेथेंच जन्मभर कुजत राहा" असें सांगणें परक्या सरकाराला शोभलें. स्वातंत्र्योन्मुख सरकारला शोभत नाहीं. ज्ञानसंवर्धनासाठीं स्वभाषेखेरीज एखादी भाषा शिकावी हें इष्ट व ती इंग्रजीच शिकावी हा आग्रह एका वेळीं योग्य होता. कारण वरच्या दर्जाचें शिक्षण देण्याचें काम मराठीला झेपेल अशी त्या वेळीं खात्री नव्हती. आतां मराठीच्या सामर्थ्याची योग्य कल्पना

आपणास आली आहे व यापुढें इंग्रजी शिकण्याची सक्ती करण्याची जरूरी नाहीं. सध्यांच्या परिस्थितींत शेंकडा नव्वद मुलें इंग्रजीच शिकतील; त्यांची सोय जरूर करा. पण बाकीच्या दहांची उपासमार करूं नका. इंग्रजी न शिकतांहि उच्च दर्जाचें शिक्षण त्यांस मिळालें पाहिजे; तो त्यांचा हक्क आहे.

शिवाय हा प्रश्न आतां नुसता तात्त्विक स्वरूपाचा राहिला नाहीं. प्राथमिक शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळें मराठी चार-पांच इयत्ता शिकलेलीं मुलें पुढील शिक्षणासाठीं इंग्रजी शाळांत जातात. पुष्कळांना हा खर्च झेपत नाहीं व केलेल्या खर्चाचा योग्य मोबदला त्यांना मिळत नाहीं. परकी भाषेच्या पायावरच ज्ञानमंदिर उभारलें पाहिजे या दुराग्रहामुळें किती तरी होतकरू विद्यार्थ्यांना ज्ञानाचे दरवाजे बंद झाले आहेत; व जे थेडे आशेनें व उत्साहानें इंग्रजी शाळांत जातात त्यांतील बऱ्याचजणांना परकी भाषेची अडचण दुर्लंघ्य वाटल्यामुळें परतावें लागतें. जे नेटानें पुढें जातात त्यांच्या पदरांत तरी काय पडतें? हायस्कुलांत घालविलेल्या सात वर्षांपैकीं जवळजवळ तीन वर्षें ज्या भाषेच्या अभ्यासाला दिलीं ती भाषा नीट बोलतां येत नाहीं; शुद्ध लिहितां येत नाहीं. इंग्रजी पुस्तक वाचलें तर त्याचा सारांश मराठींत सांगतां येत नाहीं व इतर विषय चांगले येत असूनहि इंग्रजीच्या अज्ञानामुळें नापासाचा शिक्का घेऊन परतावें लागतें. इंग्रजीसारखी परकी भाषा आत्मसात् करतां येत नाहीं म्हणून महाराष्ट्रांतील मुलांना महाराष्ट्रांत वरच्या दर्जाचें शिक्षण घेतां येऊं नये यापरती गुलामगिरी कोणती? दुसरी भाषाच पाहिजे तर तो हिंदी, उर्दू, गुजराती, कानडी शिकेल व त्याच्या आयुष्याच्या मर्यादित क्षेत्रांत त्याला इंग्रजीपेक्षां या भाषांचा उपयोगहि जास्त होईल. पण हा विचार सुचण्याला जरूर असलेलें बुद्धिस्वातंत्र्य आहे कोठें? इंग्लंडमधील विद्यापीठांचा आग्रह हा कीं, विद्यार्थ्याला इंग्रजी उत्तम आलें पाहिजे; दुसरी भाषा त्यानें वाटेल ती -फ्रेंच, जर्मन, इटॅलियन, लॅटिन, ग्रीक घ्यावी. जर्मन विद्यापीठांचा आग्रह हा कीं, विद्यार्थ्याला जर्मन उत्तम यावें; दुसरी भाषा वाटेल ती त्यानें घ्यावी. जपानी विद्यापीठांना जपानी उत्तम येणारे विद्यार्थि हवे. दुसरी भाषा त्यांनीं वाटेल ती— इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, चिनी-निवडावी. पण आमच्या महाराष्ट्रांतील विद्यार्थ्याला मराठी आलें नाहीं तरी हरकत नाहीं; त्याला इंग्रजी आलें पाहिजे; अगदीं इंग्रज मुलासारखें आलें पाहिजे. हसूं

कोसळण्यासारखा आचरटपणा आहे हा! पण त्या आचरटपणानें घेतलेल्या बळींच्या संख्येकडे लक्ष गेलें म्हणजे रडूं कोसळतें!

इंग्रजी भाषेचें ज्ञान म्हणजे इंग्रजी शिक्षण नव्हे. इंग्रजी भाषा येत नसलेल्यांनाहि इंग्रजी शिक्षण—म्हणजे अर्वाचीन वाङ्मयाचें व शास्त्राचें शिक्षण—देतां येतें ही गोष्ट आज अनुभवसिद्ध आहे. इतिहास, राजनीति अर्थशास्त्र, समाजशास्त्र या विषयांवरील इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन पंडितांचे विचार निर्मळ मराठींत अगर गुजरातींत मांडतां येतात ही गोष्ट टिळकांच्या केसरीनें व गांधींच्या नवजीवनानें सिद्ध केली आहे. हेंच कार्य जास्त मोठ्या प्रमाणावर व व्यवस्थित स्वरूपांत करण्यासाठीं इंग्रजी शिक्षणाची सक्ती नसलेलीं मराठी हायस्कुलें व मराठी कॉलेजें निघणें जरूर आहे. न्यू इंग्लिश स्कूल काढून चिपळोणकरांनीं राष्ट्राला स्वतंत्रतेच्या मार्गावर आणून सोडलें. पण या अरुंद इंग्रजी मार्गाचा मोठा मराठी राजरस्ता झाल्याशिवाय आपल्या प्रगतीचा वेग वाढणार नाहीं. न्यू इंग्लिश स्कूलच्या चालकांना त्या शाळेच्या षष्ठयब्दिपूर्तीचें स्मारक म्हणून हें नवें कार्य अंगावर घेणें अत्यंत उचित होईल. पण डेक्कन एजुकेशन सोसायटीचे हात रिकामे नसल्यास महाराष्ट्रभर पसरलेल्या संस्थांनीं या कार्यांत पुढाकार घ्यावा.

कल्पना चांगली असली तरी ती यशस्वी होण्यास कालाची अनुकूलता लागते. इंग्रजी शिकण्याची सक्ती न करतां वरच्या दर्जाचें शिक्षण देणारीं हायस्कुलें असावीं हें बुद्धीला पटतें; पण त्या प्रयत्नांना यश मिळेल अशी खात्री वाटत नाहीं. कित्येकांच्या मतें हें इंग्रजीविरहित शिक्षण निकामी होईल. पण सध्यां गांधींसारख्या अद्वितीय पुढाऱ्याचा या कल्पनेला पाठिंबा असल्यामुळें कालाची अनुकूलता आहे. न्यू इंग्लिश स्कूलच्या संस्थापकांचा उत्साह, त्यांची कामाची धडाडी व हातीं घेतलेलें कार्य यशस्वी करण्याची त्यांची चिकाटी असलेले तरुण हें कार्य अंगावर घेतील तर १९४५ च्या अखेरीस मराठी हायस्कुलें महाराष्ट्रांत पसरलेलीं दिसतील व चिपळोणकरांचें कार्य आज स्थगित झालें आहे त्याला जोराची चालना मिळेल.

मराठी हायस्कुलें वाढीला लागलीं म्हणजे मराठी कॉलेजें, मराठी धंदे-शाळा व मराठी विद्यापीठें ओघानेंच येतील; आणि राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रश्नाला इष्ट

दिशा लागेल. आधुनिक विचार महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्याला पोंचतील. इंग्रजीच्या मदती शिवाय जगाच्या राजकारणाची ओळख करून घेणें लोकांना शक्य होईल व खरें इंग्रजी शिक्षण सध्यांच्या दसपट लोकांना मिळूं लागेल. बसलेल्याचें दैव बसून राहतें व चालणाराचें दैव चालूं लागतें. इंग्रजी भाषेच्या मोहानें आपली प्रगति थांबली आहे; व म्हणून आपलें दैव बसून राहिलें आहे. हा मोह दूर सारून प्रगतीचा वेळ वाढविला तर आपलें दैवहि गतिमान् होईल. म्हणून इंग्रजीच्या अभ्यासाची सक्ती नसलेलीं मराठी हायस्कुलें काढा म्हणजे परिस्थिति बदलेल व सुशिक्षितांच्या बेकारीला आळा बसेल.

# समाजानें आपल्या शाळांकडून काय अपेक्षावें ?



लेखकः—पु. ना. वीरकर

"The School should be an idealized epitome or model of the world, not only the world of ordinary affairs, but the whole of humanity, body and soul, past, present and future."

—*Mr. Branford*

आजचें सुधारलेलें जग प्राचीन काळच्या लोकांच्या स्वप्नींहि नसेल! काशी-यात्रा करून आलें कीं केवढा मोठा प्रवास केला असें वाटून प्रत्येकास पृथ्वीप्रदक्षिणा केल्याचा आनंद होत होता. थोडेंसें चातुर्य व थोडीशी विद्या असली, कीं मानसन्मान होऊं लागलाच म्हणून समजावें. पण आतां? आगगाड्या, मोटारी, आगबोटी, विमानें, तारायंत्रें, रेडिओ– कितीक गोष्टी सांगाव्यात? जगांतील येवढे मोठमोठाले व लांबलांबचे देश पण तेहि आतां शेजारच्या गांवासारखे भासूं लागले आहेत. सारें जग म्हणजे जणूं एक मोठी वसाहतच! आपल्या रोजच्या संवयी, आपल्या विचारांचे विषय व क्षेत्र सारेंच पार बदललें. उद्योग-धंदे तरी किती व त्यांत गुंतागुंती तरी केवढ्या! साधें चांभारकाम चांगलें यावें म्हटलें तरी किती तरी शिकावें लागेल. आतांच्या युगांत गाळण न उडतां व अगदीं मागासलेलें न राहतां जीवन कंठूं म्हटलें तर नुसते चार ग्रंथ घोकून भागणार नाहीं. उत्तम नागरिक बनावयाचें असेल तर सध्यां मिळतें तसेंच नव्हे, तर अत्यंत उत्कृष्ट प्रकारचें शालेय शिक्षण व तेंहि दीर्घकालपर्यंत घेतलें, तरच ठीक! खरोखर, शाळा ही सध्यां इतकी महत्त्वाची बाब होऊन बसली आहे कीं, शाळेव्यतिरिक्त आणखीहि शिक्षण देणाऱ्या कित्येक संस्था आहेत; आपलें घर, आपला रोजचा व्यवसाय,

आपला समाज, येवढेंच नव्हे तर हरघडी आपणांस येत असलेला प्रत्येक अनुभव, यांपासूनहि मनुष्य किती तरी शिकत असतो याची आपणांस शुद्धहि राहिली नसल्यासारखें झालें आहे. ही परिस्थिति ध्यानांत घेतली कीं अमेरिका, रशिया इत्यादि राष्ट्रांत सध्यां शाळेला सर्वश्रेष्ठ स्थान देऊन तिचा समाजास जास्तींत जास्त उपयोग करून घेण्याची प्रवृत्ति कां दिसून येत आहे याचा उलगडा होईल. आपणांस विचारवंतांचे पुढारी म्हणवून घेणारे अमेरिकन लोक तर बेदिक्कतपणें सांगतात कीं सारा समाज हा शिक्षकानेंच बनविलेला आहे.

परंतु शाळांस सध्यां जेवढें महत्त्व प्राप्त झालें आहे तेवढेंच त्यांवरील जबाबदारीहि मोठी आहे हें विसरून चालणार नाहीं. सारा समाज बनविण्याचें कार्य त्यांना करावयाचें आहे, आणि यासाठीं जास्तींत जास्त व्यक्तींचें जास्तींत जास्त हित करणें याकडे त्यांनीं लक्ष पुरविलें पाहिजे. समाज हा व्यक्तींचा बनलेला आहे आणि म्हणून व्यक्तींची प्रगति होण्यानेंच समाज पुढें जाऊं शकेल. तेव्हां **प्रत्येक व्यक्तीस शिक्षण देऊन तिच्या अंगीं असलेल्या सर्व गुणांचा जेवढा विकास होणें शक्य असेल तेवढा विकास घडवून आणणें व तिला समाजाच्या जास्तींत जास्त उपयोगीं पडण्यास समर्थ बनविण्याचा आटोकाट प्रयत्न करणें** हेंच शाळेनें आपलें ध्येयसर्वस्व मानलें पाहिजे, आणि हें ध्येय निश्चित झाल्यावर एक महत्त्वाचा मुद्दा आपोआपच सिद्ध होतो. तो हा कीं, शालेय शिक्षण—मग तें श्रीगणेशापासून प्रवेश परीक्षेपर्यंत कोणत्याहि दर्जाचें असो— घेण्याची संपूर्ण मोकळीक व सोय सर्वत्रांस असली पाहिजे. गरीब असो कीं श्रीमंत असो, बाल असो कीं वृद्ध असो, स्त्री असो कीं पुरुष असो, खेडेगांवचा असो कीं शहरचा असो, जो जो म्हणून शिक्षण-मंदिराचें द्वार ठोठावील त्याला आंत प्रवेश मिळविण्याचा हक्क आहे व या तत्त्वास अनुसरून राजधानीच्या शहरापासून ते अरण्यापर्यंत—जेथें जेथें मनुष्यवस्ती असेल, तेथें तेथें शाळा निघाल्या पाहिजेत आणि त्यांत शिक्षण घेण्यास कोणासहि मज्जाव असतां कामा नये.

आतां शाळांनीं शिक्षणक्रमाच्या ज्या ज्या तपशिलाकडे पहावयास पाहिजे, त्याची विस्तृत यादी या लेखांत देण्याचा माझा उद्देश नाहीं. सर्वसामान्यपणें विचार करतां शिक्षणाच्या ज्या अंगाकडे शाळांचें व अधिकारी वर्गाचें जावें

तितकें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. त्यावर मी विशेष विस्तारानें लिहून एकंदरींत शिक्षणाच्या कार्याकडे शाळांनीं कोणत्या दृष्टीनें पहावें हें दिग्दर्शित करणार आहें. असो. प्रत्येक व्यक्तीस शिक्षण देऊन तिच्या अंगीं असलेल्या सर्व गुणांचा जेवढा विकास होणें शक्य असेल, तेवढा विकास घडवून आणणें व तिला समाजाच्या जास्तींत जास्त उपयोगीं पडण्यास समर्थ बनविण्याचा आटो-काट प्रयत्न करणें हें जें शाळेचें अंतिम ध्येय म्हणून वर सांगितलें आहे, त्या ध्येयाच्या दृष्टीनें पाहतां मुलां-मुलींच्या शारीरिक व मानसिक आरोग्यास व विकासास पहिलें स्थान दिलें पाहिजे. त्यांतहि शरीराच्या धडपणावर मनाचा धडपणा अवलंबून असल्यानें शरीरासच अधिक महत्त्व देणें प्राप्त आहे. पाश्चात्य देशांत प्रचलित असलेल्या पद्धतीचें अवलोकन करतां ज्या ज्या गोष्टी मला दिसल्या त्यांवरून या विषयाबाबत मला पुढील सूचना कराव्याशा वाटतात. प्रत्येक मुलास दररोज नियमितपणें अवश्य तेवढा व्यायाम करावयास लावणें व त्या व्यायामाची सोय करणें हें तर सर्व शाळांतून प्रथम सुरू झालें पाहिजेच; पण याशिवाय अगदीं आरंभापासून मुलांमुलींची नियमितपणें वैद्यकीय दृष्ट्या तपासणी करून त्यांचें आरोग्य नीट राहत आहे किंवा नाहीं, त्यांची वाढ व्हावी तशी होत आहे किंवा नाहीं, त्यांच्या प्रकृतींत कांहीं दोष आहेत किंवा काय व ते तसे असल्याचें आढळून आल्यास त्यावर कोणकोणते इलाज करा-वयाचे हें शाळेनें अवश्य पाहिलें पाहिजे. प्रत्येक गांवीं तेथील शाळांतील मुलांची वैद्यकीय दृष्ट्या तपासणी करण्यासाठीं एक तज्ज्ञ अधिकारी (Medical officer) नेमला गेला पाहिजे. त्याच्या हाताखालीं कांहीं नर्सेस असाव्यात व त्यांना ठराविक कालांतरानें मुलांच्या प्रकृतीबद्दल चौकशी करणें व सर्वसामान्य आरोग्याबाबत त्यांच्या मातांना जरूर तो सल्ला देणें इत्यादि कामें नेमून द्यावींत. अधिकारीवर्गानें केलेल्या वैद्यकीय सोयींचा फायदा पालकांनीं मुलांस घ्याव-यास लावण्याचा नियम केला जावा. इतकेंच नव्हे तर मानसोपचार करण्यांत तज्ज्ञ असलेल्या कांहीं लोकांचें एक एक मंडळ ( Child guidance clinic ) सध्यां प्रत्येक जिल्ह्यांत जरी नाहीं तरी निदान प्रत्येक प्रांतांत अवश्य स्थापन झालें पाहिजे. जरा वेडसर असलेल्या किंवा मानसिक दृष्ट्या बारीकसारीक व्यंगें असलेल्या मुलांवर जरूर तेवढे उपचार करण्याची व्यवस्था त्यांच्याकडून होत जावी. प्रत्येक व्यक्तीची उन्नति घडवून आणावयाची असल्यामुळें शारीरिक व

मानसिक विकृति असलेल्या मुलांवर सुद्धां अवश्य तेवढे इलाज करून त्यांना शिक्षणास शक्य तितकें लायक बनविणें हें अधिकारीवर्गाचें कर्तव्य आहे व म्हणून वर निर्देशिलेल्या साऱ्या गोष्टींकडे शाळा, स्कूल बोर्ड व शिक्षणाधिकारी यांनीं लक्ष पुरविलें पाहिजे. याखेरीज शाळेच्या इमारतीची रचना, शिक्षणोपयोगी साहित्य ठेवण्याची व्यवस्था, शिकविण्याच्या तासांची योग्य विभागणी, इत्यादि बारीकसारीक भासणाऱ्या गोष्टींचाहि मुलांच्या शारीरिक व मानसिक आरोग्यावर परिणाम होतो हें ध्यानांत घेऊन त्या सर्वांचा समावेश शाळेनें आपल्या कर्तव्यक्षेत्रांत करावयास हवा.

यानंतरचा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे शिक्षण आणि उदरनिर्वाह यांच्या परस्परसंबंधाचा होय. सामान्यपणें पाहतां समाजांतील प्रत्येक व्यक्तीस आपली रोजची मीठ-भाकरी निढळाच्या घामानें मिळवावी लागते. शिक्षणाबद्दल कोणाच्या कितीहि उदात्त कल्पना असोत, पण कोणत्याहि व्यक्तीला शिक्षणाशिवाय ज्या तऱ्हेनें आपलें पोट भरतां येईल त्याहून, योग्य शिक्षण घेतल्यास तें अधिक चांगल्या रीतीनें भरतां आलें पाहिजे, हें तत्त्व कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं. तेव्हां निदान स्वतःचें व आपल्या कुटुंबाचें पोषण करण्याची विवंचना पडणार नाहीं इतकी आर्थिक सुरक्षितता ( Economic Security ) ज्यायोगें प्राप्त करून घेतां येईल असा कोणतातरी व्यवसायधंदा प्रत्येक व्यक्तीस शिकवणें हें शाळांनीं आपलें प्रमुख कर्तव्य मानलें पाहिजे.

अर्थात् आयुष्यांतील साऱ्याच गोष्टी रुपये आणे पैनीं मोजावयाच्या नसतात. या जगांत आपणांस नुसतेंच जिवंत रहावयाचें नसून शक्य तितकें उच्च व सर्वांगसुंदर जीवन जगावयाचें आहे. उदरनिर्वाहाचीं साधनें जरी अत्यावश्यक असलीं तरी शेवटीं तीं जीवनाचीं साधनेंच रहाणार असून साध्यें कधींहि होणार नाहींत हें विसरतां कामा नये. म्हणून शालेय शिक्षण म्हणजे केवळ पोटाच्या व्यवसायाचें द्वार खुलें करून देणारी किल्ली अशी जी सामान्य लोकांची समजूत असते तेवढ्यापुरतेंच शाळेनें पाहिलें तर भागणार नाहीं. जीवनाच्या सर्व अंगांचा विचार तिला सर्व पातळींवरून ( planes ) केला पाहिजे.

फ्रेंच लोकांना आपल्या अभ्यासू वृत्तीचा व पांडित्याचा फार मोठा अभिमान आहे असें म्हणतात. त्याबाबत त्यांना उत्तर देतांना एक इंग्रजी ग्रंथकार म्हणतो : फ्रान्समधील शाळा आपले विद्यार्थी जाडे विद्वान् कसे बनतील या चिंतेंत मग्न असतात, तर इंग्लंडमधील शाळा आपले विद्यार्थी शीलवान् कसे निपजतील हें प्रथम पाहतात. आणि खरोखरच मनुष्य किती हुशार आहे या विचारापेक्षांहि त्याचें मन, त्याच्या संवयी, त्याचें इतर लोकांशीं होत असलेलें वर्तन इत्यादि कशीं आहेत या प्रश्नासच अधिक महत्त्व देणें जरूर आहे. आणि हें मान्य झाल्यावर कोणत्याहि शाळेची खरी इभ्रत तींतून प्रवेश परीक्षेस पाठविलेल्या मुलांपैकीं शेंकडा किती पास झालीं यावर अवलंबून नसून तींतील मुलांपैकीं कितीजण शीलवान्, सभ्य व समाजोपयोगी आहेत यावरच असते, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. प्रत्येक विद्यार्थ्यास शालेय अभ्यासक्रम संपल्यानंतर मोठा विद्वान् बनून शाळेंतून बाहेर पडतां येईलच असें नाहीं, व तसा आमचा आग्रहहि नाहीं. परंतु प्रत्येक विद्यार्थ्यास शाळेंतून बाहेर पडेपर्यंत जर कमींत कमी सभ्य व सद्वर्तनी नागरिक बनण्यास शिकतां आलें नाहीं, तर त्याचें सारें शिक्षण व्यर्थ होय.

शील ही एका दिवसांत बनणारी गोष्ट नाहीं, कीं शेंकडों उपदेशपर व्याख्यानें देण्याचाहि तो परिणाम नव्हे. तें कमवावयासाठीं कित्येक संवयी लावून घ्यावयाच्या असतात, व केवढी तरी दीर्घ तपश्चर्या करावी लागते. मनुष्याच्या मनांत येणारा प्रत्येक विचार, त्याचा प्रत्येक शब्द आणि त्याची प्रत्येक कृति यांनीं त्याचें शील सारखें बनत राहतें, आणि याबाबत शिक्षण देण्याचें कार्य केवळ अप्रत्यक्षपणें आणि अत्यंत सावकाशीनेंच होऊं शकेल. खऱ्या शिक्षकानें हेंच आपलें आद्य कर्तव्य मानून आपणांवरील जबाबदारी केवढी मोठी आहे हें जाणावें, आणि ती यशस्वीपणें पार पाडण्याचा प्रयत्न अव्याहत चालू ठेवावा.

शील म्हटलें म्हणजे त्याच्या नैतिक बाजूकडेच प्रथम लक्ष जातें व त्याला बौद्धिक व भावनात्मक अशा आणखीहि दोन बाजू आहेत हें कित्येकांच्या गांवींहि असलेलें दिसत नाहीं. परंतु या बाजूंसंबंधीं कांहीं विवेचन करण्यापूर्वी या त्रिविध शीलाचा, किंबहुना साऱ्या सुसंस्कृत जीवनाचा पाया जो शिस्त, त्याविषयीं मीं थोडेंसें लिहिण्याची परवानगी घेणार आहे. पाश्चात्य

देशांतील लोकांचें सारें जीवन शिस्तमय असलेलें पाहून आपण तोंडांत बोटें घालतों. शिस्त लागलेलें मन व शिस्त लागलेलें आचरण हें तेथील लोकांचें डोळ्यांत भरणारें वैशिष्टय व त्यांच्या साऱ्या उत्कर्षाचें मूळ आहे. त्यांच्याशीं तुलना करतां आपणांमध्यें शिस्तीची थोडीहि जाणीव ( Sense of discipline ) असलेली आढळत नाहीं. प्रत्येक प्रसंगीं आपणांस शरमेनें खालीं मान घालावी लागते. तें असो. सध्यांच्या प्रौढांची पिढी या दृष्टीनें गेली ती गेली, **पण यापुढील पिढ्यांचा अधःपात सावरावा अशी इच्छा असेल तर आतांपासून हें शिस्तीचें बाळकडू शिक्षकांनीं शिशुवर्गापासून पाजावयास सुरुवात केली पाहिजे. तरच आपल्या राष्ट्राचा तरणोपाय आहे.** मात्र या बाबतींत मला शिक्षकांना थोडें जागें करावयाचें आहे. शिस्त म्हणजे तेवढ्या वेळेपुरती शांतता व व्यवस्था पाळण्याचें साधन नव्हे, तर नेहमीं शिस्तीनें वागण्याची मुलांस संवय झाली पाहिजे. शिस्त हें एक स्वतंत्र साध्य मानून शिक्षकानें त्याचें महत्त्व मुलास पटवून द्यावें. शाळेंतच नव्हे तर शाळा सोडल्यानंतरहि शिस्त मुलांच्या हाडीं-मांसीं खिळलेली दिसली पाहिजे. हें कार्य सक्तीचें नाहीं. तें आंतूनच स्फुरलें पाहिजे. सारें जीवित सुरळीतपणें चालावें यासाठीं शिस्तीची आवश्यकता आहे हें ध्यानांत येऊन आपण व शिक्षक यांमधील संबंध परस्परांच्या गरजा व परस्परांचीं अंतःकरणें यांचें आकलन होऊन विद्यार्थ्यांकडून स्वयंस्फूर्तीनें शिस्त पाळली गेली तरच पुढील आयुष्यांत नेहमींच ती शिस्तीनें वागतांना दिसतील.

आतां शीलाच्या बौद्धिक बाजूकडे आपण वळूं या. या दृष्टीनें मुलांच्या स्वाभाविक प्रवृत्ति, आवडी आणि ज्या हेतूंनीं प्रेरित होऊन तीं एखादें कार्य करतात ते हेतु ( Motives ) यांचा शिक्षणाच्या कामीं शक्य तेवढा उपयोग शिक्षकानें करून घेत राहिलें पाहिजे. या मुद्द्याच्या स्पष्टीकरणार्थ आपण एक उदाहरण घेऊं. मुलांस वाचावयास शिकवण्यामध्यें काय उद्देश आहे ? पुढें कधींहि त्यांच्या लक्षांत न रहाणारी अशी त्या त्या पुस्तकांत सांपडणारी माहिती त्यांच्या डोक्यांत भरणें हा तो आहे काय ? अर्थात् नाहीं, तर वाचनाच्या द्वारें त्यांनीं पुढें स्वकष्टानें ज्ञान संपादन करीत रहावें यासाठीं वाचनाची आवड त्यांचे मनांत उत्पन्न करावी हाच आहे व शिक्षकानें तो केव्हांहि विसरतां कामा नये. जी गोष्ट वाचनाची तीच इतर विषयांचीहि. कोणताहि विषय शिकवितांन्ना त्या विषयाची गोडी मुलांस लागावी व त्यासंबंधीं अधिक ज्ञान

मिळविण्याची इच्छा व सामर्थ्य त्यांस प्राप्त व्हावें हीच दृष्टि शिक्षकांनीं सतत ठेविली पाहिजे. याकरितां विषयाचें महत्त्व, त्यानें वेळोवेळीं मुलांस पटवून द्यावयास पाहिजे, आणि त्या विषयांतील मौजा ज्या ज्या वेळीं मुलांस दाखविण्याची संधि येईल त्या त्या वेळीं ती संधि केव्हांहि दवडतां उपयोगी नाहीं.

मुलांच्या शीलाची भावनात्मक बाजू बनविणें म्हणजे त्यांच्या भावनांवर उत्तमोत्तम संस्कार घडवून आणून त्या भावना निर्माण करणाऱ्या अनेक विषयांकडे त्यांचें लक्ष वेधणें होय. उच्च दर्जाच्या सुसंस्कृत भावना आणि सौंदर्यसमीक्षणाची आवड व संवय यांनीं मानवी जीवनाचा दर्जा व सुंदरता हीं किती तरी वाढतात. आणि म्हणूनच वाङ्मय, खेळ, संगीतादि कला, आवडीचे व्यवसाय किंवा छंद (hobbies) यांचें महत्त्व फार आहे. जीवनाच्या रूक्ष वाळवंटांत वणवण फिरत असतां अशा सजल सौंदर्यस्थलासाठीं आपण केवढे तरी आतुर असतों ! आणि म्हणून मुलांची सौंदर्यसमीक्षक दृष्टि शक्य तेवढी सुसंस्कृत व व्यापक बनवून सर्व प्रकारच्या कलाकृतींतील सौंदर्य जाणण्याचा आनंद त्यांना मनमुराद लुटतां येईल इतकी रसिकता त्यांच्या मनांत निर्माण करण्याचा प्रयत्न शाळेनें केला पाहिजे. निसर्गांत जें जें सुंदर असेल, शास्त्रांत जें जें चमत्कृतिपूर्ण असेल व कलाकृतींत जें जें आल्हादकारक असेल त्याकडे पाहण्याची दृष्टि मुलास शाळेंतच प्राप्त व्हावयास लागणें जरूर आहे. **याबरोबरच काव्य रचणें, लिहिणें, चित्रें काढणें, गाणें—कोणतीहि सौंदर्यकृति निर्माण करण्याची प्रवृत्ति मुलांमध्यें असल्यास ती हुडकून काढून त्याबाबत शाळेनें त्यांना शक्य तों उत्तेजन देणें व मदत करणें आवश्यक आहे.** अर्थात् अशा विषयांत शक्य तेवढी विविधता असावी, म्हणजे कशांत आपली आवड जास्त असून कोठें आपली बुद्धि जास्त चालते हें समजण्याची प्रत्येक मुलास संधि मिळेल. अर्थात् आपल्या आवडीच्या विषयाची निवड करण्याच्या आणि त्यावरील आपला व्यासंग वाढविण्याच्या कामीं शाळेनें मुलांस देतां येईल तेवढी मोकळीक द्यावी.

शीलाच्या तिसऱ्या म्हणजे नैतिक अंगाचें महत्त्व सर्वमान्य असल्यानें त्याबद्दल मी फारसें लिहीत नाहीं. मुलांची नीतिमत्ता वाढविण्याचा सर्वोत्कृष्ट उपाय म्हणजे निरनिराळे आदर्श त्यांजपुढें ठेवणें हा होय म्हणून थोर

देशांतील लोकांचें सारें जीवन शिस्तमय असलेलें पाहून आपण तोंडांत बोटें घालतों. शिस्त लागलेलें मन व शिस्त लागलेलें आचरण हें तेथील लोकांचें डोळ्यांत भरणारें वैशिष्ट्य व त्यांच्या साऱ्या उत्कर्षाचें मूळ आहे. त्यांच्याशीं तुलना करतां आपणांमध्यें शिस्तीची थोडीहि जाणीव ( Sense of discipline ) असलेली आढळत नाहीं. प्रत्येक प्रसंगीं आपणांस शरमेनें खालीं मान घालवी लागते. तें असो. सध्यांच्या प्रौढांची पिढी या दृष्टीनें गेली ती गेली, **पण यापुढील पिढ्यांचा अधःपात सावरावा अशी इच्छा असेल तर आतांपासून हें शिस्तीचें बाळकडू शिक्षकांनीं शिशुवर्गापासून पाजावयास सुरुवात केली पाहिजे. तरच आपल्या राष्ट्राचा तरणोपाय आहे.** मात्र या बाबतींत मला शिक्षकांना थोडें जागें करावयाचें आहे. शिस्त म्हणजे तेवढ्या वेळेपुरती शांतता व व्यवस्था पाळण्याचें साधन नव्हे, तर नेहमीं शिस्तीनें वागण्याची मुलांस संवय झाली पाहिजे. शिस्त हें एक स्वतंत्र साध्य मानून शिक्षकानें त्याचें महत्त्व मुलास पटवून द्यावें. शाळेंतच नव्हे तर शाळा सोडल्यानंतरहि शिस्त मुलांच्या हाडीं-मांसीं खिळलेली दिसली पाहिजे. हें कार्य सक्तीचें नाहीं. तें आंतूनच स्फुरलें पाहिजे. सारें जीवित सुरळीतपणें चालावें यासाठीं शिस्तीची आवश्यकता आहे हें ध्यानांत येऊन आपण व शिक्षक यांमधील संबंध परस्परांच्या गरजा व परस्परांचीं अंतःकरणें यांचें आकलन होऊन विद्यार्थ्यांकडून स्वयंस्फूर्तीनें शिस्त पाळली गेली तरच पुढील आयुष्यांत नेहमींच ती शिस्तीनें वागतांना दिसतील.

आतां शीलाच्या बौद्धिक बाजूकडे आपण वळूं या. या दृष्टीनें मुलांच्या स्वाभाविक प्रवृत्ति, आवडी आणि ज्या हेतूंनीं प्रेरित होऊन तीं एखादें कार्य करतात ते हेतु ( Motives ) यांचा शिक्षणाच्या कामीं शक्य तेवढा उपयोग शिक्षकानें करून घेत राहिलें पाहिजे. या मुद्द्याच्या स्पष्टीकरणार्थ आपण एक उदाहरण घेऊं. मुलांस वाचावयास शिकवण्यामध्यें काय उद्देश आहे ? पुढें कधींहि त्यांच्या लक्षांत न रहाणारी अशी त्या त्या पुस्तकांत सांपडणारी माहिती त्यांच्या डोक्यांत भरणें हा तो आहे काय ? अर्थात् नाहीं, तर वाचनाच्या द्वारें त्यांनीं पुढें स्वकष्टानें ज्ञान संपादन करीत रहावें यासाठीं वाचनाची आवड त्यांचे मनांत उत्पन्न करावी हाच आहे व शिक्षकानें तो केव्हांहि विसरतां कामा नये. जी गोष्ट वाचनाची तीच इतर विषयांचीहि. कोणताहि विषय शिकवितांना त्या विषयाची गोडी मुलांस लागावी व त्यासंबंधीं अधिक ज्ञान

मिळविण्याची इच्छा व सामर्थ्य त्यांस प्राप्त व्हावें हीच दृष्टि शिक्षकांनीं सतत ठेविली पाहिजे. याकरितां विषयाचें महत्त्व, त्यानें वेळोवेळीं मुलांस पटवून द्यावयास पाहिजे, आणि त्या विषयांतील मौजा ज्या ज्या वेळीं मुलांस दाखविण्याची संधि येईल त्या त्या वेळीं ती संधि केव्हांहि दवडतां उपयोगी नाहीं.

मुलांच्या शीलाची भावनात्मक बाजू बनविणें म्हणजे त्यांच्या भावनांवर उत्तमोत्तम संस्कार घडवून आणून त्या भावना निर्माण करणाऱ्या अनेक विषयांकडे त्यांचें लक्ष वेधणें होय. उच्च दर्जाच्या सुसंस्कृत भावना आणि सौंदर्यसमीक्षणाची आवड व संवय यांनीं मानवी जीवनाचा दर्जा व सुंदरता हीं किती तरी वाढतात. आणि म्हणूनच वाङ्मय, खेळ, संगीतादि कला, आवडीचे व्यवसाय किंवा छंद (hobbies) यांचें महत्त्व फार आहे. जीवनाच्या रूक्ष वाळवंटांत वणवण फिरत असतां अशा सजल सौंदर्यस्थलासाठीं आपण केवढे तरी आतुर असतों! आणि म्हणून मुलांची सौंदर्यसमीक्षक दृष्टि शक्य तेवढी सुसंस्कृत व व्यापक बनवून सर्व प्रकारच्या कलाकृतींतील सौंदर्य जाणण्याचा आनंद त्यांना मनमुराद लुटतां येईल इतकी रसिकता त्यांच्या मनांत निर्माण करण्याचा प्रयत्न शाळेनें केला पाहिजे. निसर्गांत जें जें सुंदर असेल, शास्त्रांत जें जें चमत्कृतिपूर्ण असेल व कलाकृतींत जें जें आल्हादकारक असेल त्याकडे पाहण्याची दृष्टि मुलास शाळेंतच प्राप्त व्हावयास लागणें जरूर आहे. **याबरोबरच काव्य रचणें, लिहिणें, चित्रें काढणें, गाणें--कोणतीहि सौंदर्यकृति निर्माण करण्याची प्रवृत्ति मुलांमध्यें असल्यास ती हुडकून काढून त्याबाबत शाळेनें त्यांना शक्य तों उत्तेजन देणें व मदत करणें आवश्यक आहे.** अर्थात् अशा विषयांत शक्य तेवढी विविधता असावी, म्हणजे कशांत आपली आवड जास्त असून कोठें आपली बुद्धि जास्त चालते हें समजण्याची प्रत्येक मुलास संधि मिळेल. अर्थात् आपल्या आवडीच्या विषयाची निवड करण्याच्या आणि त्यावरील आपला व्यासंग वाढविण्याच्या कामीं शाळेनें मुलांस देतां येईल तेवढी मोकळीक द्यावी.

शीलाच्या तिसऱ्या म्हणजे नैतिक अंगाचें महत्त्व सर्वमान्य असल्यानें त्याबद्दल मी फारसें लिहीत नाहीं. मुलांची नीतिमत्ता वाढविण्याचा सर्वोत्कृष्ट उपाय म्हणजे निरनिराळे आदर्श त्यांजपुढें ठेवणें हा होय म्हणून थोर

पुरुषांच्या चरित्रांची किंमत फार मोठी आहे. वाङ्मयांत जें जें उदात्त असेल व इतिहासांत जें जें धैर्याचें असेल त्याची गोडी मुलांस शाळेंतच लागावयास हवी. याकरतां सक्तीनें किंवा कृत्रिम उपायांनीं मुलांमध्यें निरनिराळ्या आवडी (Tastes) निर्माण करण्याचे व संवयी लावण्याचे प्रयोग केव्हांहि सफल होणार नाहींत. तत्त्वदृष्ट्या पाहतां शिक्षा चुकविण्याच्या भीतीनें किंवा बक्षिसें मिळविण्याच्या आशेनें मुलांस कामें करावयास शिकविणें अत्यंत घातक होईल. आपण करीत असलेली कार्यनिष्पत्ति हाच आपल्या श्रमांचा मोबदला ही उदात्त दृष्टि पुढें ठेवूनच कार्य करण्याची मुलांस संवय लागली पाहिजे. म्हणून आपल्या अंगच्या गुणांचा उपयोग करण्याचे, मोहांचा प्रतिकार करण्याचे, शाळेंतील नेहमींची व्यवस्था व शालेय जीवनांतील कांहीं कांहीं कार्यें स्वतःच्या नेतृत्वाखालीं पार पाडण्याचे प्रसंग निर्माण करतां येतील तितक्या वेळां मुलांस प्रत्यक्ष प्राप्त झाले पाहिजेत—आणि हे प्रसंग जबाबदारीनें कसे पार पाडावेत, यासंबंधीं आधीं बेत करणें व त्याप्रमाणें ते सिद्धीस नेणें या बाबतींत सुरुवातीस जरी नाहीं तरी पुढें पुढें मुलांस शक्य तेवढें स्वातंत्र्य दिलें जावें. या स्वातंत्र्याबरोबरच प्रादुर्भूत होणारी जबाबदारीची जाणीव मोह आणि बारीकसारीक अडचणी यांची कदर न करण्याचें सामर्थ्य मुलांस खात्रीनें प्राप्त करून देईल.

आतां जीवनाच्या सामाजिक अंगासंबंधीं मी थोडेंसें लिहिणार आहें. शिस्त व शीलाची नैतिक बाजू यासंबंधीं विवेचन करतांना या विषयास अप्रत्यक्षपणें सुरुवात केल्यासारखें झालें आहे. परंतु त्याची ही बाजू इतक्या स्पष्टपणें मांडली गेली नाहीं, आणि माझ्या दृष्टीनें तो एक महत्त्वाचा विषय असल्यानें त्यावर स्वतंत्रपणें मी थोडें लिहिणार आहें. समाजांतील इतर व्यक्तींशीं आपला पदोपदीं संबंध येत असतो आणि आपल्या व त्या व्यक्तींच्या गरजा व हक्क हीं सारख्याच महत्त्वाचीं आहेत याची जाणीव प्रत्येक व्यक्तीस सदोदित असली पाहिजे. याकरितां शाळेनें मुलांस एकमेकांशीं मिळूनमिसळून वागावयास व सहकार्य करावयास शिकवणें आवश्यक आहे. अर्थात् शाळेंत होणारे खेळ हीं मुलांमध्यें वरील भावना निर्माण करून त्यांची वाढ करण्याचीं उत्तम साधनें आहेतच, पण तेवढ्यानें भागणार नाहीं. मनुष्यास इतरांशीं केवळ खेळावयाचेंच नसून कामेंहि करावयाचीं असतात. तेव्हां अशीं इतरांबरोबर कामें

करण्यासहि शाळेनें मुलांस शिकविलें पाहिजे. सुतारकाम, बागकाम इत्यादि कामें करीत असतांना, उत्सव व इतर सामुदायिक कार्यासारख्या प्रसंगीं मिळून-मिसळून काम करतां येण्यास शिकविणें शक्य आहे. या योगें समता, इतरांबद्दल सहानुभूति व आपलेपणा, विनय, न्यायप्रियता इत्यादि अनेक गुण विद्यार्थ्यांमध्यें निर्माण करण्याचें कार्य शाळेस अनायासें साधतां येईल.

मला तर याच्याहि पुढें जाऊन असें म्हणावयाचें आहे कीं, या बाबतींत शाळेनें यापेक्षांहि अधिक कार्य केलें पाहिजे. जरूर तेव्हां अत्यंत विशाल दृष्टिकोन ठेवण्याची पात्रता व संवय प्रत्येक मुलाच्या अंगीं येऊं शकली तरच शिक्षणानें आपल्या कार्यावर कळस चढविला असें होईल. मधून मधून इतर शहरींच नव्हे तर आसपासच्या खेडेगांवांतहि जाऊन तेथील लोकांच्या जीवनाविषयीं माहिती मिळविणें, त्यांना असें कां रहावें लागतें याचीं कारणें समजून घेऊन त्यांस कमीपणानें न लेखतां त्यांच्याबद्दल सहानुभूति बाळगणें ह्या कर्तव्याचें पालन विद्यार्थ्यांकडून अवश्य झालें पाहिजे. दुसऱ्यास क्षुद्र लेखणें, ( तिकिटें काढणें, सभा इ. असंख्य प्रसंगीं ) दुसऱ्याचे न्याय्य हक्क झुगारून बेशिस्तपणें वागणें वगैरे गोष्टी स्वतःस व आपल्या शिक्षणासच नव्हे तर आपल्या शाळेस व परगांवच्या लोकांशीं वागण्याचा प्रसंग आल्यास आपल्या गांवांसहि कालिमा फांसणाऱ्या आहेत याची जागृति प्रत्येक मुलानें ठेवावी; आणि परदेशीय लोकांशीं संबंध आल्यास प्रत्येकावरील जबाबदारी तर यापेक्षांहि मोठी आहे; कारण त्या वेळीं अयोग्य वर्तन घडल्यास देशाची इभ्रत जाण्याचा प्रसंग येतो. आपल्या देशासारखेच दुसरेहि देश आहेत, ते जसे आपल्यावर अवलंबून आहेत, तसे आपणहि त्यांच्यावर अवलंबून आहोंत. यासाठीं तरी त्यांच्याशीं समभावानें वागणें आपलें कर्तव्य आहे ही भावना प्रत्येकास असावी— हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे जरूर तेव्हां आंतरराष्ट्रीय दृष्टीनें विचार करण्याचें सामर्थ्य ( The power of thinking internationally ) प्रत्येक व्यक्तीस आलें पाहिजे. हा परिणाम घडवून आणण्याचें कामीं शाळेला पुष्कळच मार्गांचा अवलंब करतां येणें शक्य आहे. भूगोलासारखा विषय शिकविणारास ही दृष्टि अवश्य असावी. भूगोल शिकणें म्हणजे पुष्कळांस माहीत नसतील अशा गोष्टींचा डोक्यांत भरणा करून घेणें नव्हे.

तर यांत्रिक सुधारणांच्या योगें आसपासचे देश आपणांस आपल्या शेजाऱ्या-सारखे जवळचे झाले असतांना, हे आपले शेजारी कोण आहेत, त्यांची राहणी, चालीरीति कशा आहेत, प्रत्येक देश इतर देशावर कसा अवलंबून आहे वगैरे गोष्टी जाणून घेऊन, परस्परांबद्दल प्रेमभाव बाळगण्यास शिकणें हें होय. इतर लोकांच्या जीवनासंबंधीं याहूनहि अधिक माहिती मिळविण्याचे कामीं परभाषा शिकण्याचाहि पुष्कळच उपयोग होईल. सहज आठवली म्हणून येथें आणखीहि एक गोष्ट सुचवावीशी वाटते. अर्थात् हा प्रयोग सर्वत्र अंमलांत आणणें शक्य नाहीं; पण अमेरिकन शिक्षण-शास्त्रज्ञ थॉर्नडाइक् म्हणतो त्याप्रमाणें प्रत्येक वर्गांत जर निरनिराळ्या जातींचीं, धर्मांचीं व दर्जांचीं मुलें आणतां आलीं तर भेदभाव नष्ट करण्याच्या आणि सर्व समाजाचें हित व प्रगति घडवून आणण्याचें महत्त्व पटण्याच्या कामीं त्याचा फार मोठा उपयोग निःसंशय होईल.

जातां जातां शिक्षण आणि नागरिक-नीति ( Civics ) याबद्दल थोडेंसें सांगतों. ज्या ज्या राष्ट्रांत लोकसत्ताक राज्यपद्धतीचा अवलंब केला जात आहे त्या त्या राष्ट्रांतील मुलांना आपापल्या राष्ट्राच्या राज्यव्यवस्थेंत पुढें कोणता ना कोणता तरी भाग घ्यावाच लागतो, याची शाळेनें विस्मृति होऊं देतां कामा नये. डयूयी ( Dewey ) आणि इतर अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ नागरिक-नीतीस शिक्षणाचें एक प्रमुख अंग समजतात. हें नागरिकत्व मुलांच्या अंगीं बाणावें यासाठीं लोकसत्ताक पद्धतीवर आधारलेल्या जीवनांतील निरनिराळ्या प्रसंगांचे पुष्कळसे अनुभव मुलांस मिळाले पाहिजेत. म्हणून शाळांत चालणाऱ्या निवडणुकी, शाळांतील मुलांनीं आपल्यांतून बनवलेलीं पार्लमेंटें, डिबेटिंग सोसायटीज़ इत्यादि गोष्टींस कमी न लेखतां तशीं कार्यें शक्य तितक्या चांगल्या तऱ्हेनें व वस्तुस्थितीबरहुकूम करण्यास शाळेनें मुलांस शिकविणें जरूर आहे. इतिहास, भूगोल, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, देशाचा राज्यकारभार व राज्य-व्यवस्था ( Administration ) हे विषय या दृष्टीनें अत्यावश्यक आहेत.

उत्कृष्ट जीवन जगणें ही एक कला आहे. आणि शाळेंतील शिक्षण म्हणजे पुढील सर्वांगीण जीवनाची पूर्वतयारी होय. इतर कलांचें शिक्षण घ्यावयाचें असलें म्हणजे त्या त्या कलांचीं अंगें असलेल्या कृति प्रत्यक्ष अभ्यासाव्या लागतात. मग या जीवनकलेचें शिक्षण घेतांनाहि तसेंच करावयास नको काय ? म्हणून शाळेंतील जीवन आणि तेथें करावीं लागणारीं कार्यें हीं

जर बाहेरील जगांतील जीवन आणि कार्यें यांहून भिन्न नसतील, तरच शालेय शिक्षण म्हणजे पुढील जीवनाची खरीखुरी पूर्व तयारी होईल. याकरितांच शाळेंतील जीवन हें कृत्रिम किंवा अस्वाभाविक नसलें पाहिजे, आणि त्यांत व बाहेरील जीवनांत विसंगति भासविण्याइतका फरक केव्हांहि नसावा.

परंतु मानवी आयुष्य हें अखंड बदलत राहणारें आहे. आतांची सुधारणा ही अनादिकालापासून आतांपर्यंत हळूहळू पण सारखी होत आलेली आहे, आणि तिच्या प्रगतीचा शेवट कशांत होणार आहे हें मनुष्याच्या कल्पना-शक्तीच्या बाहेरचें आहे. आणि जग जसें बदलेल तसतसें शिक्षणहि भिन्नभिन्न प्रकारचें द्यावें लागेल. म्हणून शाळा चालविण्याचें काम तज्ज्ञ व द्रष्ट्या लोकांच्याच हातीं दिलें पाहिजे; कारण तेच लोक आपल्या व्यवसायांतून डोकें वर काढूं शकतील, व परिस्थितींत कोणकोणते बदल होऊं पाहत आहेत हें अजमावून त्यावर विचार करूं शकतील. शिक्षणतज्ज्ञ माणूसच प्रचलित शिक्षण-पद्धतींत व्यंगें कोणतीं आहेत हें हुडकून काढून त्यांवर हल्ला चढवील, व त्यामुळें सध्यां होत असलेल्या अनर्थांपासून तिचें संरक्षण करील. आहेत त्या साधनांतून योग्य तीं निवडून नवीन पद्धति आणि नवीन अवजारें शोधून काढण्याच्या विचारांत तोच डोकें घालील आणि अशा तऱ्हेनें शाळेचें वातावरण बदलत्या काळाला शक्य तों अनुरूप करण्याचा प्रयत्न करील. प्रख्यात आंग्ल लेखक एच्. जी. वेल्स्. म्हणतो, "The educator is the anticipator, the planner and the foundation–maker of the new and greater order of human life that arises now visibly amids the decaying structures of the old." तेव्हां राष्ट्रास अंतर्मुख दृष्टि करावयास लावून स्वतःमध्यें कोणकोणते दोष आहेत याचें अखंड निरीक्षण करीत रहावयास लावण्याला व जुनीं झालेलीं ध्येयें टाकून अनुरूप अशा नवीन ध्येयांचा अंगीकार करावयास लावण्याला शाळाच कारणीभूत झाली पाहिजे. शेवटीं, प्रस्तुत लेखाच्या आरंभीं दिलेल्या इंग्रजी उताऱ्याचा सारांश सांगावयाचा तर साऱ्या मानवजातीचा आजपर्यंतचा इतिहास, तिचें सध्यांचें स्वरूप आणि ती पुढें कशी असावी यासंबंधीं तिच्या हिताची तळमळ असणाऱ्या द्रष्ट्यांना पडलेलीं व पडत असणारीं स्वप्नें या सर्वांतील जें जें सारभूत, सर्वांगसुंदर व सर्वश्रेष्ठ असेल त्याचें शाळा हें प्रात्यक्षिक असलें पाहिजे.

---

# विद्यार्थी व सैनिक शिक्षण

लेखकः—दत्तात्रय गोपाळ कर्वे

प्रचलित शिक्षणपद्धतीबद्दल सामान्यतः सर्वकाळीं असमाधान दिसून येतें. साठ वर्षांपूर्वी जेव्हां न्यू इंग्लिश स्कूल स्थापन झालें, तेव्हां तें टिळक, चिपळूणकरादि मंडळीस त्या वेळच्या प्रचलित पद्धतीबद्दल वाटणाऱ्या असमाधानाचेंच फळ होतें. सध्यांहि सर्व लोक शाळा-कॉलेजांस नांवें ठेवतांना आढळतात. हा प्रकार अगदीं स्वाभाविक आहे. कारण कोणतीहि शिक्षणपद्धति अगर संस्था चांगली अगर वाईट हें ज्या दोन गोष्टींच्या सापेक्षानें ठरावयाचें असतें त्या एकसारख्या बदलत असतात. बदलत्या परिस्थितीस शैक्षणिक जीवन जुळतें करून घेण्याची समाजाची आकांक्षा टीकेच्या रूपानें प्रकट होत असते.

ह्या दोन मूलभूत गोष्टींपैकीं पहिली शैक्षणिक ध्येय ही होय. कोणत्या हेतूनें शिक्षण दिलें जात आहे, हें स्पष्ट होऊन त्या हेतूस सर्वमान्यता मिळाल्याखेरीज शिक्षणाची परीक्षा करतां येणार नाहीं. पाश्चात्य अगर इंग्रजी किंवा पौर्वात्य अगर हिंदी संस्कृतीचा प्रसार करणें हें ध्येय असल्यास शिक्षणपद्धतींत तें कितपत साध्य होतें हें प्रथम पाहिलें पाहिजे. निव्वळ एकाद्या विशिष्ट प्रकारच्या शास्त्रीय अगर सामाजिक ज्ञानाचा प्रसार करणें हें ध्येय असल्यास शिक्षणपद्धतीचा बरेवाईटपणा त्या धोरणानुसार ठरविला पाहिजे. परंतु देशामध्यें आपणांस अमुक एक प्रकारचा बदल घडवून आणावयाचा आहे व त्या कार्यास योग्य असे नागरिक तयार करणें जरूर आहे असें वाटल्यावरून शिक्षणास प्रारंभ झाला असल्यास ह्या राष्ट्रीय ध्येयानुसार शिक्षणाचें परीक्षण केलें पाहिजे.

संघटित राष्ट्रीय पुनरुज्जीवनाचें एक साधन ह्या नात्यानें न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना झाल्याचें अधिकृतरीत्या वारंवार जाहीर करण्यांत आलें आहे. बौद्धिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय इत्यादि क्षेत्रांत गेल्या साठ वर्षांत जी प्रगति झाली आहे त्यावरून शिक्षणसंस्थांनीं राष्ट्रीय

पुनरुज्जीवनाच्या कार्यास पुष्कळच मदत केल्याचें दिसून येईल. परंतु ह्या बाबतींत दोन दृष्टींनीं साधार टीका होत आहे. झाली ह्यापेक्षां अधिक मदत शैक्षणिक संस्थांकडून होण्यासारखी होती किंवा नाहीं, व राष्ट्रीय प्रगतीच्या कार्यानें आज जी पायरी गांठली आहे, त्यास अनुसरून शैक्षणिक ध्येयांत फरक करणें इष्ट आहे किंवा काय, ह्या दोन्ही प्रश्नांस जो निश्चयानें नकारात्मक उत्तर देण्यास तयार असेल त्यासच प्रचलित शिक्षणपद्धतीबद्दल निर्धास्त राहतां येईल. अशा संतुष्ट जनांची संख्या फार असेल असें वाटत नाहीं.

शैक्षणिक ध्येयाबरोबरच शैक्षणिक पद्धतीचा अगर तंत्राचा विचार व्हावयास पाहिजे. शिक्षणाचें माध्यम, विद्यार्थि व शिक्षक ह्यांचे परस्पर व आपसांतील शिक्षणक्रमांतील निरनिराळ्या विषयांचें तौलनिक महत्त्व, बौद्धिक, शारीरिक व नैतिक शिक्षणाचा क्रम, इत्यादि तात्त्विक महत्त्वाचे व त्यांस अनुसरून इतर अनेक प्रश्न आज सकारण विचारले जात आहेत. ह्यांपैकीं अनेकांचा प्रस्तुत ग्रंथांत व इतरत्र विचार होत आहेच. परंतु ध्येय व तंत्र त्यांच्या प्रचलित परिस्थितीस व भविष्यकालीन वाढीस सारख्याच प्रमाणांत लागू असणाऱ्या एका विषयाकडे सर्व समाजाचें लक्ष वेधणें अत्यंत आवश्यक आहे.

सार्वजनिक शिक्षणसंस्था एखाद्या विशिष्ट राजकीय पंथाच्या अगर सामाजिक वर्गाच्या मतप्रसारार्थ किंवा हितवर्धनार्थ चालणें सर्वस्वीं गैर आहे. जी संस्था सर्वांच्या साहाय्यानें सर्वांच्या हितार्थ चालविलेली आहे ती पक्ष व वर्ग-भेदातीतच असणें आवश्यक आहे. विशिष्ट मतें व विशिष्ट हितसंबंध बाजूला ठेवून सर्वराष्ट्रीय प्रगतीच्या कार्यास शैक्षणिक क्षेत्रापुरतें साहाय्य करणें हेंच शिक्षणसंस्थांचें कार्य होय. शिक्षणसंस्थांस असें कार्य करूं देणें हें न्याय्य आहे, एवढेंच नव्हे तर तसें करण्यांत सर्व पक्षांचें व वर्गांचेंहि अंतिम हित आहे, ही गोष्ट त्यांनीं उमगली पाहिजे. पक्षनिष्ठ राज्यकारभारास आपल्याकडे नुकतीच सुरुवात होत असल्यानें हा मुद्दा जोरानें पुढें मांडणें जरूर आहे.

राष्ट्रीय प्रगतीच्या सर्व अंगांस पोषक अशी कामगिरी शिक्षणसंस्थांकडून व्हावयाची असल्यास विद्यार्थ्यांमध्यें शिस्त व संघटित कार्याची हौस उत्पन्न होणें अत्यंत आवश्यक आहे, ही गोष्ट न्यू इंग्लिश स्कूलच्या संस्थापकांस पटलेली होती. चिपळूणकर, टिळक, आगरकर अशा राष्ट्र-पुरुषांच्या सान्निध्यानें

व त्यांच्यानंतर त्यांनीं स्थापन केलेल्या परंपरेनें विद्यार्थ्यांमध्यें देशाभिमानाची ज्योत निर्माण होण्याची खात्री होती. परंतु देशाभिमानाच्या भावनेस कांहीं विधायक स्वरूप प्राप्त व्हावयाचें असल्यास शिस्तीच्या नियमांनीं एकवट झालेल्या संघटनेंत आपापलीं नियुक्त कामें करण्यास विद्यार्थ्यांना शिकविणें जरूर होतें.

न्यू इंग्लिश स्कूलमध्यें पुष्कळ वर्षांपूर्वी 'स्पेशल ड्रिल क्लासेस' म्हणून जे वर्ग चालविले होते ते निव्वळ शारीरिक शिक्षणाकरितां होते असें वाटत नाहीं. शारीरिक कार्यक्षमतेबरोबरच संघटित व शिस्तीच्या कार्यपद्धतीचें शिक्षण देण्याचा त्यांचा मुख्य हेतु होता. लष्करी तुकड्यांच्या बरोबरीनें शिस्त व कार्यक्षमता ह्यांचा त्यांत फैलाव झालेला होता. खऱ्या शिस्तींत वरिष्ठांच्या आज्ञेस कनिष्ठांनीं बिनशर्त व तात्कालिक मान्यता द्यावयाची असते. शिस्तपालनाचा हा गुण ज्या राष्ट्रांत दिसून येत नाहीं त्याच्या कोणत्याहि अंगाची प्रगति होणें अशक्य आहे. बौद्धिक अगर शारीरिक शिक्षणाच्या इतर अंगांकडे जेवढें लक्ष दिलें गेले तेवढेंहि ह्या, म्हणजे शिस्त व संघटना, ह्या भागांकडे लक्ष दिलें न गेल्यानें राष्ट्रीय प्रगतीस पुष्कळच अडथळा आल्याचें आज सर्वत्र दिसून येत आहे.

न्यू इंग्लिश स्कूलमधील वरील उपक्रम बंद होण्यास त्या वेळच्या सरकारचें धोरण हें एक कारण असूं शकेल. परंतु, गेल्या १८-२० वर्षांतहि ह्या बाबतींत त्या किंवा इतर सर्वमान्य शाळांतून जोराचा उपक्रम झाला नाहीं, ती एक मोठी उणीव समजली पाहिजे. ह्या कामांत देशांत जी परिस्थिति उत्पन्न झाली आहे व ज्या चळवळी सुरू झाल्या आहेत त्यांचा अभ्यास केल्यास शैक्षणिक संस्थांनीं विद्यार्थ्यांस संघटित व जोरदार जीवनास वाव न दिल्यानें त्यांच्या नैसर्गिक शक्तीचा विकास थांबविल्याचें दिसून येईल. पक्ष व जातिभेदातीत सामान्य ध्येयप्राप्त्यर्थ संघटित रीतीनें व शिस्तीनें काम करण्याचे धडे शाळा व कॉलेजें येथेंच मिळूं शकतील. ह्या बाबतींतील आपल्या कर्तव्याची जाणीव शिक्षणसंस्थांच्या चालकांत सध्यांपेक्षां अधिक होणें जरूर आहे. शिक्षण-संस्थांतच शिस्तीची घटना व त्यास अनुसरून शिक्षणक्रम सुरू झाल्यास अनेक महत्त्वाचे अंतर्गत व इतर प्रश्न शाळांच्या चालकांपुढून दूर होतील.

खर्चाची अडचण ह्या बाबतींत प्रमुख नाहीं. त्याचप्रमाणें अलीकडील सरकारी धोरणहि अशा उपक्रमास प्रतिकूल होण्याची भीति नाहीं. मुख्य अडचण म्हणजे शिक्षणाच्या ह्या अंगाची शिक्षणसंस्थांच्या चालकांकडून उपेक्षा झालेली आहे हीच होय. अशा तऱ्हेच्या 'सैनिक' शिक्षणाचा प्रत्यक्ष संबंध जोडलाच पाहिजे असें नाहीं. शैक्षणिक संघटनेच्या चौकटींतून तयार झालेला विद्यार्थी पुढें शिपाई अगर प्रचारक, व्यापारी अगर लेखक, वकील अगर शेतकरी, कांहींहि झाल्यास त्याच्या स्वतःच्या व्यवसायांत व नागरिक ह्या नात्यानें त्यानें करावयाच्या कर्तव्यक्षेत्रांत त्या शिक्षणाचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं. कर्तव्याबद्दल भावनायुक्त व पराकोटीची निष्ठा असणें, व तें कर्तव्य करण्यास उद्युक्त झालेल्या सहकाऱ्याबरोबर निःस्वार्थबुद्धीनें झटत राहणें ह्या गोष्टी जरी प्रायः लष्करी महत्त्वाच्या समजल्या जात असल्या तरी कोणत्याहि उदयोन्मुख राष्ट्राच्या सर्वच अंगांत त्यांचा प्रसार झाल्याखेरीज त्या राष्ट्रास उन्नतीचें व स्वातंत्र्याचें शिखर गाठतां येणार नाहीं.

शिक्षणाधिकाऱ्यांच्या उपेक्षेप्रमाणें दुसरीहि एक अडचण शिक्षणसंस्थांमध्यें संघटनेचा प्रसार होण्यास प्रतिकूल ठरत आहे. शिस्तीचें आमच्या विद्यार्थ्यांस वावडें आहे असें नेहमीं म्हटलें जातें. मला स्वतःला ही गोष्ट बहुंशीं अमान्य आहे. शिस्तीचें मुळांत समाजास व शिक्षणाधिकाऱ्यांसच वावडे आहे असें म्हणणें भाग पडतें. ज्याप्रमाणें अभ्यासाच्या विषयाचें शिक्षण द्यावयाचें असतें, त्याप्रमाणेंच चांगल्या कामाकरितां सर्वसंमत झालेल्या नियमानुसार सर्वांनीं एकत्र बांधलें जाण्याच्या, म्हणजेच शिस्तीच्या व संघटनेच्या, विषयांचेंहि शिक्षण दिलें पाहिजे. विद्यार्थ्यांचें जन्मतःच चांगलें व वाईट असे वर्ग असून दुसऱ्या वर्गांतील मुलें बेशिस्त निघतात असें नाहीं. मूळ प्रवृत्ति कांहींहि असली तरी जो विषय शिकवलाच नाहीं तो येणार नाहीं. शिकवूनहि परिस्थितीनुसार अगर मुलांच्या इतर कांहीं गुणावगुणांनीं शिस्तीची पूर्ण वाढ कदाचित् होणार नाहीं. परंतु सध्यांप्रमाणें सर्व राष्ट्राच्या वाढीचें एक अंगच लुळें राहिलें असेंहि होणार नाहीं.

राष्ट्रीय प्रगति ही एखाद्या लढाईसारखी असून तिचीं अंगें हीं निरनिराळ्या रणक्षेत्रासारखीं आहेत. सर्व अंगांत शौर्यानें, एकजुटीनें व विजयिष्णु इच्छाशक्तीनें काम करणारे 'सैनिक' निर्माण करणें हें शिक्षण-संस्थांचें कार्य

होय. संस्थेंतील सर्व विद्यार्थ्यांची संघटना करून त्यांस शिस्तीची कवाईत व खेळ शिकविण्यानें असे सर्वकार्यधुरंधर सैनिक निर्माण होण्यास मदत होईल. राष्ट्रीय प्रगतींत लष्करी संघटना हा एक भाग आहे; त्यासहि सैनिक शिक्षणानें प्राथमिक स्वरूपाची मदत होईल. शिस्त, संघटना, खेळ, निशाणबाजी, कवाईत इत्यादिकांमुळें विद्यार्थ्यांमधील लष्करी गुणांचा अंकुर वाढीस लागेल व अशा विद्यार्थ्यांस उत्तेजन देऊन पुढें लष्करी शिक्षणसंस्थांत पाठवितां येईल. राष्ट्राच्या संरक्षणाबद्दल आस्था उत्पन्न करून तरुण पिढींतील लष्करी व्यवसायांकडे कल असलेल्या इसमास वेळेवरच योग्य दिशा दाखविणें हें सैनिक शिक्षणाचें एक अंग आहे. तें तर महत्त्वाचें आहेच, परंतु सैनिक शिक्षणाचें महत्त्व लष्करी अंगापुरतेंच मर्यादित नसून तें राष्ट्रीय प्रगतीच्या सर्व अंगांस लागू आहे, हा मुद्दा विशद होणें जरूर आहे.

अशा तऱ्हेच्या संघटित शिक्षणाबद्दल शिक्षकांत उपेक्षा वृत्ति आहे हें कबूल करूनहि असें म्हटलें पाहिजे कीं पालक अगर सरकार यांसहि ह्या गोष्टीचें महत्त्व अजून पूर्णपणें पटावयाचें आहे. शिस्तीच्या व थोड्याबहुत खर्चाच्या बाबतींत पालक, सरकार व पुढाऱ्यांचा वर्ग ह्यांनीं शिक्षणसंस्थांच्या चालकांशीं पूर्ण सहकार्य केल्यास त्यास सध्यांहून पुष्कळच अधिक पद्धतशीरपणें कार्य करण्यास उत्तेजन येईल. निशाणबाजी, संरक्षणाच्या सर्व अंगांची प्रत्यक्ष माहिती व मैदानांतील छावण्यांची व्यवस्था इत्यादि बाबतींत प्रांतिक व मध्यवर्ती सरकारचें पूर्ण साहाय्य मिळाल्यास देशाच्या संरक्षणाच्या बाबतींत शिपाई व अधिकारी ह्या दोहोंचाहि पुरवठा करण्याचें कार्य शिक्षणसंस्थांकडून समाधानकारक रीतीनें पार पडेल.

संघटित शारीरिक शिक्षणाबद्दल सध्यां सर्वत्र जागृति दिसत आहे. ह्याच वेळीं लोक व सरकार ह्यांच्या सहकार्यानें ह्या संघटनेस शिस्तीच्या सैनिक शिक्षणाचें वळण मिळाल्यास देशाच्या लष्करी व इतर सर्व विधायक अंगांच्या वाढीस पुष्कळच मदत होईल. किंबहुना अशा तऱ्हेचें वळण आतांच न मिळाल्यास राष्ट्रीय प्रगतीचा गाडा सध्यांसारखाच थबकत व अडखळत चालणार. हिंदुस्थानांतल्या व त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रांतल्या आगामी शिक्षणयुगांत 'संघटित व सार्वत्रिक सैनिक शिक्षणाची वाढ' ही पायरी गांठली जावी ह्या उद्देशानें सर्व शिक्षणतज्ज्ञांनीं जोराची खटपट करणें जरूर आहे.

---

# प्राथमिक शिक्षण—इतिहास व प्रगति

लेखकः—रामचंद्र शंकर दीक्षित

प्राथमिक शिक्षणाचें रोप इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत स्थापन झाल्यानंतर नव्या राज्यकर्त्यांनींच लावलें अशांतली कांहीं बाब नाहीं. हें रोप फार पुरातनचें व मूळचें या देशाचेंच आहे. फक्त नव्या राजवटींत त्याला पद्धतशीर स्वरूप देऊन त्या रोपाची काळजी घेण्याचे व वाढ करण्याचे प्रयत्न करण्यांत आले.

फार प्राचीन काळीं शिक्षणाचा प्रश्न वर्णव्यवस्थेनेंच सोडविला होता. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं शिकलेंच पाहिजे असा नियम असून त्याकरितां उपनयन हा संस्कार धर्मांत घातलेला होता. त्रैवर्णिकांच्या प्रत्येक मुलाला शिकण्यासाठीं गुरुगृहीं कांहीं काल रहावें लागे आणि तेथेंच त्याचें अगदीं आरंभापासून उच्च शिक्षणापर्यंतचें शिक्षण ज्याचे त्याचे कुवतीप्रमाणें व व्यवसायाप्रमाणें पुरें होत असे. त्या वेळीं शिक्षणाचे आजच्याप्रमाणें प्राथमिक, दुय्यम व उच्च असे विभाग पाडलेले नव्हते. त्यामुळें प्राथमिक शिक्षणाची पद्धत आणि इयत्ता यांची अधिकार-युक्त माहिती मिळत नाहीं. रा. मुजुमदार यांनीं आपल्या 'प्राचीन हिंदुस्तानांतील शिक्षणाचा इतिहास' यांत उल्लेखिलेल्या ललित विस्तार या ग्रंथावरून असें दिसतें कीं गौतमबुद्ध लिहिणें, वाचणें, हिशेब शिकण्याकरितां एका शाळेंत जात असे. त्यावरून बुद्धाचे वेळीं लेखन, वाचन,—गणना हीं शिकविण्याच्या शाळा होत्या असें दिसून येतें. सारांश, पूर्वकालीं गुरुगृहीं किंवा ठिकाठिकाण-च्या पाठशाळांतून प्राथमिक शिक्षणापासून उच्च शिक्षणापर्यंत सोय असे. शिवाय काशी, उज्जनी, पाटलीपुत्र, नालंद, तक्षशिला या ठिकाणचीं विद्यापीठें प्रसिद्ध होतीं. ह्या संस्थांना राजे किंवा धनिक लोक उदारपणानें देणग्या देत किंवा— जमिनीहि तोडून देत. परंतु त्या वेळच्या राजांनीं ह्या पाठशालांना अगर विद्यापीठांना कितीहि मोठी मदत दिली तरी ते त्यांच्या अंतर्गत व्यवस्थेंत किंवा शिक्षणक्रमांत केव्हांहि हात घालीत नसत.

मुसलमान राजेसुद्धां विद्येचे भोक्ते असल्यामुळें तेहि मशिदीस जोडून असलेल्या मद्रासांना ( पाठशालांना ) मदत करीत. मात्र त्यांचें लक्ष कुराणाचें शिक्षण, आरबी व फारसी भाषांचें अध्ययन आणि गणित इत्यादि शास्त्रें यांजकडेच विशेष असे. अकबरासारखे उदारमतवादी बादशहा वगळल्यास बाकीच्या मुसलमान राजांचें लक्ष हिंदूंच्या पाठशालांकडे व विद्यापीठांकडे कमीच असे. त्या वेळचे हिंदु राजेच त्या संस्थांना शक्य ती मदत करीत. मुसल्मानांचे राजवटींत प्राथमिक शिक्षणाच्या साधारण मोठ्या गांवीं गांवठी शाळाहि होत्या.

मराठ्यांच्या अमदानींत सरदार, इनामदार, मुत्सद्दी व प्रतिष्ठित लोक आपल्या मुलांच्या प्राथमिक अगर व्यावहारिक शिक्षणाकरितां घरीं शिक्षक ठेवीत. गांवांतील इतर ब्राह्मण, मराठे, वाणी उदमी यांचीं मुलें गांवठी पंतोजीच्या शाळेंत जात. या शाळांतून विशेष भर अक्षर, उजळणी, हिशेब, जमाखर्च, बखरी वाचणें, स्तोत्रें व कविता पाठ म्हणणें यावरच असे. या मुलांचें इतर शिक्षण ज्याच्या त्याच्या धंद्याप्रमाणें वडिलांजवळ अथवा अन्यत्र आप-आपल्या धंद्यांत उमेदवारी करूनच होई. मग तो धंदा लष्करी पेशाचा असो कीं कारकुनीचा असो अगर इतर कोणताहि असो. मात्र त्या वेळीं गांवठी शाळांचा फायदा मिळत नसे. ब्राह्मण, मराठे, वाणी, उदमी वगैरे पांढर-पेशांच्या मुलांच्याच शिक्षणाची सोय त्यांतून होई. कुणबी, मजूर व इतर धंदेवाले लोक, या लोकांचीं मुलें साहजिकच साधारणपणें निरक्षर रहात व तीं आपल्या वडिलांजवळ फक्त आपापला धंदा शिकत. पूर्वीच्या व हल्लींच्या शाळांमधील फरक हाच कीं, पूर्वीं फक्त पांढरपेशांचीं मुलें साक्षर होत. हल्लींच्या शाळांतून सर्वांस सारखी वागणूक मिळते.

मराठ्यांचें राज्य जाऊन इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर शिक्षणाची स्थिति सामान्यतः वरीलप्रमाणेंच होती. ईस्ट इंडिया कंपनी ही मूळ व्यापार करण्यासाठीं स्थापन झालेली. पैसा मिळविण्याकरितां स्थापन झालेल्या कंपनीनें आपल्या प्रजेच्या प्रगतीकडे लक्ष कां द्यावें? अर्थात् तिच्या अधिकाऱ्यांनीं शिक्षणासारख्या बाबीकडे दुर्लक्ष केलें यांत नवल नवल नाहीं. कंपनीच्या कांहीं चांगल्या अधिकाऱ्यांनीं शिक्षणाचें बाबतींत व्यक्तिशः जबाबदारीवर थोडेसे प्रयत्न केले. उदाहरणार्थ, वॉरन हेस्टिंग्जनें

कलकत्त्यास आरबी व फारशी भाषा शिकण्याकरितां एक मद्रासा स्थापन केली. काशीचा रेसिडेन्ट डंकन यानें एक संस्कृत पाठशाळा स्थापिली आणि पेशवाई नष्ट झाल्यावर एल्फिन्स्टननें पेशव्यांच्या दक्षिणेच्या पैशांतून पुण्यास एक संस्कृत कॉलेज उघडलें. पण हे सर्व प्रयत्न फारच तुटपुंज्या स्वरूपाचे व लोकांना खूष ठेवण्यासाठीं केले गेले. मात्र इंग्लिश राज्य प्रांतोप्रांतीं पसरूं लागल्यावर धर्म-प्रसाराकरितां ज्या ज्या मिशनरी मंडळींनीं देशाचे निरनिराळे भाग व्यापले त्यांनीं मात्र देशी भाषांतून शिक्षण देण्याकरितां जागोजाग शाळा स्थापन केल्या. त्या वेळच्या स्थानिक गांवठी शाळांतून स्पृश्य हिंदूनाच फक्त प्रवेश मिळत असे. ह्या मिशनरी शाळांतून खालच्या वर्गाच्या मुलांच्या शिक्षणाची सोय साहजिकच झाली. मिशनऱ्यांच्या प्रयत्नांबरोबर राजा राममोहन रायांसारख्या त्या काळच्या उदारधी हिंदी पुढाऱ्यांनींहि शिक्षण-क्षेत्रांत प्रयत्न केले. सन १७७३ चा रेग्युलेटिंग ॲक्ट झाल्यानंतर कंपनीची सनद दर वीस वर्षांनीं वाढविण्याकरितां ब्रिटिश पार्लमेंटपुढें विचारासाठीं यावी लागे. १७९३ सालीं या सनदेची मुदत वाढविण्याचे वेळीं चार्लस ग्रंट व वुइल्बरफोर्स यांसारख्या प्रजाहितदक्ष व कनवाळू सभासदांनीं हिंदी प्रजेस शिक्षण देणें हें कंपनीचें कर्तव्य आहे याची जाणीव पार्लमेंटास करून देण्याचे फार प्रयत्न केले पण ते फुकट गेले. पुन्हा सन १८१३ सालीं सनदेची मुदत वीस वर्षांनीं वाढविण्याचा प्रश्न पार्लमेंटपुढें आला, त्या वेळीं मात्र या सभासदांच्या प्रयत्नांना यश येऊन प्रजेस शिक्षण देणें हें राज्यकर्त्यांचें कर्तव्य आहे असें ठरलें. आणि हिंदी लोकांच्या शिक्षणा-करितां दरसाल एक लक्ष रुपये खर्च करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलला देण्यांत आला. अशा रीतीनें सार्वजनिक महसुलावर शिक्षणाचा हक्कानें वांटा आहे हें तत्त्व पहिल्यानेंच प्रस्थापित झालें. हें नवें कलम सनदेंत घातलें गेल्यावर कंपनीनें हिंदुस्थानांतील आपल्या अधिकाऱ्यांस शिक्षणाचे बाबतींत जरूर ती तजवीज करण्याचे हुकूम सोडले. लागलीच निरनिराळ्या प्रांतांमधून प्रजेच्या शिक्षणविषयक गरजांची चौकशी सुरू झाली. यांतच ८-१० वर्षें गेलीं. १८२५ मध्यें अशा गणतींत मुंबई प्रांतांत ( अर्थात् सिंध सोडून ) जवळ जवळ १४५० गांवठी शाळा असल्याचें आढळून आलें. याच सुमारास मुख्य तीन प्रांतांत अधिकृत शिक्षण-मंडळें स्थापिलीं गेलीं. मुंबई इलाख्यांतील बोर्डास ' दि नेटिव्ह स्कूल बुक ॲन्ड स्कूल सोसायटी ' हें नांव होतें. ह्याचे पहिले

अध्यक्ष मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेब हे होते. ह्याच मंडळाचें पुढें रूपांतर होऊन १८४० मध्यें 'बोर्ड ऑफ एज्युकेशन'ची स्थापना आपल्या इलाख्यांत झाली. दोन हजार वस्तीच्या गांवच्या लोकांनीं शिक्षकाचा अर्धा पगार व शाळेला जागा आणि पुस्तकें देण्याचें कबूल केलें तर हें बोर्ड त्या गांवीं शाळा उघडी. या शाळांच्या देखरेखीकरितां तीन इन्स्पेक्टर्स व जिल्ह्याकरितां व्हिजिटर्स नेमले गेले. बंगाल्यांतील मंडळाचें नांव 'जनरल कमिटी ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' असें होतें व मद्रास इलाख्यांत 'बोर्ड ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' होतें. सन १८३३ मध्यें कंपनीच्या सनदेची मुदत वाढविण्याचा प्रश्न पार्लमेंटपुढें आला तेव्हां शिक्षणावर पूर्वीपेक्षां जास्त लक्ष द्यावें असें ठरलें आणि कलकत्त्यास मुख्य 'बोर्ड ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन'ची स्थापना होऊन या बोर्डाचे पहिले चेअरमन लॉर्ड मेकॉले हे झाले. त्यांचा पौर्वात्य शिक्षण व पाश्चात्य शिक्षण यांजवरचा खलिता प्रसिद्धच आहे. त्यासंबंधीं लिहिण्याचें हें स्थळ नाहीं. या खलित्याचा परिणाम म्हणून इंग्रजी ही कोर्ट कचेऱ्यांची भाषा झाली. इंग्रजी भाषेचें ज्ञान हें सरकारी नोकरींत प्रवेशाचें साधन झालें आणि ती भाषा ही उच्च शिक्षणाचें माध्यम असावें असें ठरलें. आतांपर्यंत सार्वजनिक शिक्षणाकरितां देण्यांत येणारा पैसा थोडा असल्यामुळें प्राथमिक व देशभाषांच्या शिक्षणाची प्रगति फारशी झालीच नव्हती. मेकॉलेच्या खलित्यानंतर तर त्या पैशाचा बराच भाग इंग्रजी शिक्षणावर खर्च होऊं लागल्यामुळें प्राथमिक शिक्षणाची गळचेपीच झाली असें म्हटलें तरी चालेल.

यानंतर शिक्षणकार्यांत बराच बदल घडून आणण्याचें कार्य १८५४ च्या सर चार्लस वूड यांचे खलित्यानें केलें. ईस्ट इंडिया कंपनीस दिलेल्या सनदेची मुदत वाढविण्याचें काम जेव्हां पार्लमेंटपुढें १८५३ मध्यें आलें तेव्हां हिंदुस्थानांतील शिक्षणाबाबतची अर्थात् चर्चा होऊन त्या वेळीं असें दिसून आलें कीं, प्रत्येक प्रांतांतील एज्युकेशन बोर्डाचे धोरणांत फरक आहे. कांहीं प्रांतांचें पाऊल पुढें, तर कांहींत प्रगति कमी प्रमाणावर. कोठें इंग्रजी शिक्षणावर जोर देऊन देशी भाषांची व प्राथमिक शिक्षणाची हेळसांड केलेली तर कोठें गांवठी शाळांना उत्तेजन देऊन जनतेंत शिक्षणाची थोडी फार प्रगति झालेली अशी स्थिति आढळून आली. म्हणून सर्व देशांत एकच धोरण ठेवण्याच्या हेतूनें पार्लमेंटनें या प्रश्नाची चौकशी करण्यास सांगितलें. तेव्हां कंपनीच्या बोर्ड ऑफ

कंट्रोलचे त्या वेळचे वर उल्लेखिलेले अध्यक्ष सर चार्लस वूड यांनीं चौकशी करून शिक्षणविषयक आपल्या धोरणाचा आपला खलिता १८५४ मध्यें प्रसिद्ध केला. त्यांत मेकॉलेसाहेबांच्या धोरणावर प्रतिकूल टीका करून तें त्याज्य ठरविण्यांत आलें; आणि इंग्रजी शिक्षणाबरोबर देशी भाषांची वाढ व प्राथमिक शिक्षणांत सुधारणा करण्याकडे प्रांतिक सरकारांचें लक्ष वेधलें. प्रत्येक प्रांतांत विश्वविद्यालय स्थापणें, स्वतंत्र शाळाखातें निर्माण करून त्यावर जबाबदार अधिकारी नेमणें, प्राथमिक, माध्यमिक व उच्च शिक्षण अशी शिक्षण-क्षेत्रांत सुसूत्र पद्धत निर्माण करणें, शिक्षक तयार करण्याकरितां ट्रेनिंग कॉलेजें काढणें, आणि प्रांतोप्रांतीं प्राथमिक शिक्षणाची वाढ करण्याकरितां देशभाषांच्या शाळा जास्त उघडणें या गोष्टींवर त्या खलित्यांत जोर दिला होता. येथून पुढें सर्व प्रांतांत शिक्षणाचें कार्य या खलित्याचे धोरणाबरहुकूम चालू झालें. १८५४ सालच्या अहवालांत मुंबई प्रांतांत ( सिंध प्रांत सोडून ) २६०० प्राथमिक शाळा असून त्यांत ८४५४५ मुलें शिकत होतीं. या शाळांत बिनमदतीच्या गांवठी शाळा २४०३ होत्या.

मुंबई प्रांतांत सरकारी शाळाखातें स्थापन केल्यावर सरकारी प्राथमिक शाळा उघडण्यावरच भर दिला गेला. बंगाल व मद्रास इलाख्यांत गांवठी शाळांना उत्तेजन देण्याचें धोरण स्वीकारलें गेलें. पूर्वी शिक्षकांच्या पगाराच्या निम्म्या-इतकी मदत व शाळेस जागा गांवकरी यांनीं दिल्यास त्या गांवीं शाळा उघडण्यांत येत. हा पैसा वसूल करणें पुढें पुढें कठीण होत गेलें. म्हणून १८६३ मध्यें सरकारी जमीनमहसुलावर रुपयास एक आणाप्रमाणे लोकल फंड वसूल करण्याचें मुंबई सरकारनें ठरविलें व त्यांतील तिसरा हिस्सा ज्या त्या तालुक्यांतील वसुलाच्या मानानें त्या त्या तालुक्यांत प्राथमिक शाळांवर खर्च करावा असें ठरलें. या रकमेंत प्रांतिक सरकार आपल्या उत्पन्नांतून भर घालीत असे. याच कालखंडांत प्राथमिक शिक्षक तयार करण्याकरितां अध्यापन-शाळा काढल्या गेल्या. सन १८८२ मध्यें मुंबई प्रांतांत ( सिंध धरून ) ५३३८ शाळा असून त्यांत ३,३२,६८८ मुलें शिकत होतीं. यांतच १३८१ बिन-मदतीच्या गांवठी शाळांचा समावेश होतो. १८५७ पूर्वी दर वीस वर्षांनीं कंपनीच्या सनदेची मुदत वाढविण्याचे निमित्तानें हिंदुस्थानांतील कंपनीचे कारभारासंबंधीं पार्लमेंटमध्यें चर्चा होत असे. १८५८ मध्यें कंपनी सरकार

नामशेष झाल्यावर विशेष कारणांशिवाय अशी चर्चा होणेंच थांबलें. तेव्हां १८५४ पासून शिक्षणाचें कार्य कसें काय झालें आहे व त्यांत प्रगति कशी करावी याबद्दल सविस्तर चौकशी करण्याकरतां १८८२ मध्यें हिंदुस्थान सरकारनें डॉ. हंटर यांचे अध्यक्षतेखालीं एक कमिशन नेमलें. त्या कमिशनला प्राथमिक शिक्षणाबाबत विस्तारानें शिफारसी करावयास सांगितलें होतें. आजपर्यंतची प्राथमिक शिक्षणाची प्रगति समाधानकारक नाहीं व यापुढें त्या क्षेत्रांत जास्त प्रयत्न झाले पाहिजेत, मागासलेल्या वर्गाच्या शिक्षणाकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे आणि स्थानिक प्रयत्न जास्त नेटानें होण्याकरतां नुकत्याच स्थापन झालेल्या म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्ड या स्थानिक संस्थांचें ताब्यांत प्राथमिक शिक्षण द्यावें अशा या कमिटीच्या मुख्य शिफारसी होत्या.

प्राथमिक शिक्षणाकडे जास्त लक्ष द्यावें असा जरी प्रांतिक सरकारांना हंटर कमिशननें सल्ला दिला तरी यापुढील २५-३० वर्षांत त्याचें पाऊल लोकांच्या अपेक्षेप्रमाणें द्रुतगतीनें पडलेलें दिसत नाहीं. स्थानिक स्वराज्य संस्थांचे ताब्यांत प्राथमिक शिक्षण द्यावें अशी हंटर कमिटीची शिफारस होती, तरी तो ताबा नांवाचाच होता. ग्रामीण क्षेत्रांतील शाळांना जरी लोकल बोर्ड शाळा असें नामाभिधान होतें तरी त्या शाळांची सर्व व्यवस्था सरकारी शाळा-खातेंच पहात असे. फक्त जिल्हा लोकल बोर्ड, शिक्षणविषयक अंदाजपत्रकें मंजूर करीत; परंतु सर्व कारभार सरकारचे इन्स्पेक्टरच पहात. ताबा बोर्डाचा पण कारभार शाळाखात्याचा अशी स्थिति होती. म्युनिसिपालिट्यांना थोडेंबहुत स्वातंत्र्य असे. पण ट्रेन्ड मास्तर नेमणें, त्यांच्या बदल्या करणें, शाळांची तपासणी करणें हीं सर्व कामें सरकारचे इन्स्पेक्टरच करीत. याशिवाय भांड्यांत तांदूळ केवळ पुरवठ्याचेच असल्यामुळें प्रगति होणें दुरापास्त होतें. शिक्षणप्रसार व्हावा अशी लोकांची ओरड सुरू झाली. त्या ओरडीस, भारताचे खरे सेवक व **डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे** आजीव सभासद नामदार **गोपाळ कृष्ण गोखले** यांनीं बड्या कौन्सिलांत १९१० सालीं प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करावें असा ठराव आणून व पुन्हा १९११ सालीं त्याबाबत बिल आणून, वाट फोडली. ठराव व बिल हीं दोन्ही सरकारच्या बाजूच्या बहुमतानें नापास झालीं. तरी पण याचा इष्ट परिणाम कांहीं अंशीं लवकरच झाला. १९११ चे शेवटीं बादशहा पांचवे जॉर्ज यांच्या राज्यारोहणाचा दिल्लीस जो दरबार झाला

त्या दरबारांत हिंदुस्थानच्या तिजोरींतून दरसाल ५० लक्ष रुपये प्रांतिक सरकारांना शिक्षणाकरितां दिले जातील अशी बादशहांनीं घोषणा केली. १८८२ सालीं मुंबई प्रांतांत प्राथमिक शाळांची संख्या ५,३३८ होती ती १९११-१२ सालीं घोषणेचे वेळीं ८,३०३ ( सिंध सोडून ) झालेली होती. म्हणजे २९ वर्षांत फक्त ३००० च शाळा वाढलेल्या होत्या. या घोषणेचा परिणाम म्हणून पुढें दरसाल प्राथमिक शाळांची संख्या कांहीं प्रमाणांत वाढविण्यांत आली. सन १९१४ ते १९१८ च्या युद्धामुळें या प्रगतीचें मान तोटकें होतें. तरी महायुद्धानंतर मॉंटेग्यु-चेल्म्सफोर्ड सुधारणा अमलांत आल्या त्या वर्षी मुंबई इलाख्यांत ( सिंध सोडून ) प्राथमिक शाळांची संख्या १०,०४६ व त्यांतील मुलांची संख्या ६,४५,२१४ झाली. म्हणजे १० वर्षांत १७४३ शाळा वाढल्या. त्याचे मागील ३० वर्षांच्या कासवाच्या गतीच्या मानानें ही प्रगति साधारण समाधानकारकच म्हटली पाहिजे.

मुंबई प्रांतांत या नव्या सुधारणांमुळें प्रांतिक कौन्सिलें स्थापन झाल्यावर पहिले शिक्षणमंत्रि ना. **डॉक्टर परांजपे** यांचे प्रयत्नानें प्राथमिक शिक्षणाचा कायदा १९२३ सालीं पास झाला. त्यापूर्वी त्यांनीं प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याबद्दल चौकशी करून शिफारसी करण्याकरितां कै. ना. सर नारायणराव चंदावरकर यांचे अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीच्या शिफारसींस धरून डॉ. परांजपे यांचा कायदा होता. त्यापूर्वी १९१६ सालीं कै. नामदार विठ्ठलभाई पटेल यांनीं प्रयत्न करून जुन्या कौन्सिलांत म्युनिसिपल हद्दीपुरता सक्तीचे शिक्षणाचा कायदा पास करविला होता. परंतु त्याचा फायदा सांपत्तिक स्थितीचे अभावीं फारच थोड्या म्हणजे चार पांचच म्युनिसिपालिट्यांनीं घेतला. डॉ. परांजपे यांचे कायद्यानें प्राथमिक शिक्षणाचा ताबा सर्वस्वीं स्थानिक स्वराज्य संस्थांकडे देण्यांत आला. शिक्षक नेमणें व काढणें, त्यांना पगारवाढ देणें, देखरेखीसाठीं सुपरवायझर* नेमणें हे सर्व अधिकार स्थानिक स्वराज्य संस्थांकडे देण्यांत आले. शाळांचा कारभार पाहाण्यास व मुख्य देखरेख करण्यास ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसरची नेमणूक मात्र सरकारचे मंजुरीवर ठेवण्यांत आली. शाळांची तपासणी करणें व परीक्षा घेणें ह्यासंबंधींचे सर्व अधिकार व जबाबदारी स्थानिक संस्थांकडे सोपविण्यांत आली. या कायद्यानें सरकारनें आपलेकडे फक्त सल्ला देणें व मदतीची रक्कम ठरविण्याकरितां हिशेब तपासणें व स्थानिक संस्थांचे

ताब्यांत दिलेल्या जुन्या शिक्षकांचे हितसंबंध पहाणें एवढ्याच बाबी ठेवल्या. स्थानिक संस्थांना प्राथमिक शिक्षणासंबंधीं सगळ्या गोष्टी पाहणें शक्य नसल्यामुळें कायद्यानें मान्य केलेली स्कूल बोर्डें मुद्दाम प्राथमिक शिक्षणाचे व्यवस्थेकरितां स्थापण्यांत आलीं. या स्कूल बोर्डांचे सभासद स्थानिक संस्थांनींच निवडावयाचे आहेत; फक्त जरूर तर विशिष्ट हितसंबंधासाठीं ३-४ सभासद सरकार-नियोजित असतात. स्थानिक संस्थांनीं खर्चावर ताबा, सर्वसामान्य देखरेख ठेवावयाची व इतर सर्व कारभार स्कूल बोर्डांनीं पहावयाचा असें कायद्यानें ठरविलें गेलें. म्युनिसिपालिट्यांना प्राथमिक शिक्षणावर होणाऱ्या वाजवी खर्चा-च्या निम्याइतकी मदत व जिल्हा बोर्डांना १९२३ पूर्वी देण्यांत येणाऱ्या सरकारी मदतीखेरीज नवीन होणाऱ्या वाजवी खर्चावर $\frac{2}{3}$ इतकी मदत देण्याकरितां सरकारनें आपल्याला कायद्यानें बांधून घेतलें. मात्र शाळांच्या वाढीकरितां केलेल्या सर्व योजनांना सरकारची आगाऊ मंजुरी स्थानिक संस्थांनीं घेणें जरूरीचें आहे असें ठरविण्यांत आलें. १९२३ च्या कायद्याची आंखणी या मुख्य गोष्टींवर केलेली आहे.

हा कायदा १९२३ मध्ये मुंबई कौन्सिलांत पसार होऊन त्याला वरिष्ठ सरकारची मंजुरी १९२४ चे आरंभीं मिळाली. या कायद्यान्वयें करावयाचे नियम १९२५ चे आरंभीं मंजूर झाल्यावर त्या वर्षाच्या जून महिन्यापासून पुढें ज्या त्या स्थानिक संस्थांना प्राथमिक शिक्षणाचा ताबा शाळाखात्याकडून सुपूर्त करण्यांत आला. हा ताबा देण्याचे वेळीं मुंबई प्रांतांत ( सिंध वगळून ) ११,०७१ प्राथमिक शाळा असून त्यांतून ७,५८,५०७ मुलें शिकत होतीं.

या स्कूल बोर्डांची रचना कांहीं बाबतींत सदोष होती. जे प्रतिनिधी निवडून द्यावयाचे त्यांचे बाबतींत शैक्षणिक किंवा अनुभवाची लायकी ठेवलेली नव्हती. यामुळें शिक्षणावर हुकमत चालविणाऱ्या बोर्डांत शिक्षणाचा काडी-इतकाहि गंध नसलेले उमेदवार पैशाच्या किंवा अन्य वजनावर प्रतिनिधी म्हणून येऊं शकत. शिवाय जातिनिष्ठ तत्त्वांवर प्रतिनिधित्व बरेच प्रमाणांत असल्यामुळें कांहीं प्रतिनिधी केवळ जातिविशिष्ट धोरणानेंच निवडून येत. अशीं बोर्डें आपल्या अधिकाऱ्यांना कारभाराचीं सर्वमान्य धोरणें व तत्त्वें घालून देण्याऐवजीं जातिनिष्ठ अगर व्यक्तिनिष्ठ बाबींचाच पुरस्कार करूं लागलीं यांत नवल नाहीं. नेमणुका करणें,

बढती देणें, बदल्या करणें, टेंडरें मंजूर करणें, पुस्तकें नेमणें वगैरे अधिकार हातीं आल्यामुळें या बोर्डांची स्थिति श्रीमंतांनीं घेतलेल्या गरीब कुळांतील दत्तक मुलासारखी झाली. अर्थात् वशिलेबाजी, आपला स्वार्थ साधणें वगैरे गोष्टी घडूं लागल्या. याचा परिणाम शाळांच्या कामावर होऊं लागला. जातवार भांडणें तर या बोर्डांतून होतच, पण शिवाय आपापल्या हक्कांकरितां व गैरवाजवी अधिकार मिळविण्याकरतां मुख्य स्थानिक संस्था, स्कूल बोर्डें आणि ॲडमिनि-स्ट्रेटिव्ह ऑफिसर यांमध्यें त्रिकोणी सामने होऊं लागले. कांहीं खर्च अना-ठायींहि होऊं लागला; म्हणून सरकारहि खर्चाच्या बाबींकडे जास्त कसून लक्ष देऊं लागलें. प्राथमिक शिक्षणावर होणाऱ्या निम्या खर्चाचा बोजा म्युनिसि-पालिट्यांवर व नव्या होणाऱ्या खर्चाच्या $\frac{1}{3}$ चा बोजा लोकल बोर्डांवर असल्यामुळें स्थानिक संस्था जादा पैसा उभारण्यास नाखूष असत. याच वेळीं मुंबई सरकारची सांपत्तिक स्थिति कांहीं अंशीं खालावल्यामुळें आणि बोर्डें पैसा अना-ठायीं खर्च करतात या सबबीवर सरकारचे धोरणांत काटकसर डोकावूं लागली. कांहीं म्युनिसिपालिट्यांनीं व जिल्हा बोर्डांनीं नवा पैसा उभारून शाळा वाढवि-ण्याच्या व कांहीं टापूंत शिक्षण सक्तीचें करण्याच्या योजना सरकारकडे पाठविल्या; परंतु सरकारचे वरील धोरणामुळें आणि स्कूल बोर्डांच्या नालायकीच्या सबबीवर त्यांतील बऱ्याच योजना सरकारनें अमलांत आणण्यास संमति दिली नाहीं. स्थानिक संस्था सरकारवर टेपर ठेवीत व उलट सरकार स्थानिक संस्थां-वर खापर फोडी. चंदावरकर कमिटीनें १० वर्षांचा आराखडा आंखून त्या मुदतींत मुंबई इलाख्यांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें कसें करतां येईल याचें दिग्द-र्शन केलें होतें; परंतु शिक्षणाचा ताबा स्थानिक संस्थांकडे सर्वस्वी जाऊन १२ वर्षांत फक्त तीन म्युनिसिपालिट्यांत आणि एका जिल्ह्याच्या कांहीं खेड्यांत शिक्षण सक्तीचें झालें व कांहीं प्रमाणांत शाळा वाढल्या. १९३७ मध्यें मुंबई प्रांतांत ( सिंध सोडून ) १२९०१ शाळा होत्या, आणि त्यांतून ११,४०,२९९ मुलें शिकत होतीं. बारा वर्षांत १८३० च शाळा नव्या उघडणें व जवळजवळ ३॥ लक्ष मुलें वाढणें, ह्या गोष्टी ज्या अवसानांत कायदा पसार झाला व त्या वेळीं प्राथमिक शिक्षणाचे वाढीच्या ज्या भराऱ्या मारल्या होत्या त्याशीं विसंगत नाहींत काय? या कालखंडाचे आधींच्या ५ वर्षांत शाळांची वाढ १०३० नें झालेली होती. १९३७ सालीं प्रांतिक स्वायत्तता अमलांत येऊन लोकनियुक्त

प्रधानांकडे सर्व कारभार आला. लोकांचें सरकार आल्याबरोबर यक्षिणीची कांडी फिरली. काँग्रेस प्रधानमंडळानें राष्ट्र-संवर्धक व खेडेगांवच्या जनतेच्या उपयोगी ज्या गोष्टी हातीं घेतल्या त्यांत लोकशिक्षण ही बाब प्रामुख्यानें होती. काँग्रेसचा जनतेशीं निकटचा संबंध असल्यामुळें मंत्र्यांनीं कोठें खुपतें हें पाहून प्राथमिक शिक्षणाचे कारभारांत इष्ट सुधारणा घडवून आणण्यास सुरुवात केली. गांवठी शाळांना उत्तेजन दिलें. १९३८–३९ मध्यें २३८९ नव्या गांवठी शाळा उघडण्यांत आल्या. १९३९ चे मार्च अखेर प्राथमिक शाळांची संख्या हल्लींच्या मुंबई प्रांतांत १६,४३५ झाली व त्यांतून १३,२२,६६८ मुलें शिकत होतीं. म्हणजे दोन वर्षांत ३५३४ शाळा जास्त उघडल्या गेल्या व मुलांची संख्या १,८२,३६९ नें वाढली. प्राथमिक शिक्षणाचा कायदा पास झाल्यावरचीं १२ वर्षें व हीं २ वर्षें या मुदतीच्या प्रगतींत किती अंतर !

जनतेच्या कल्याणाची खरी कळकळ व खजिन्यावर पूर्ण ताबा यामुळें ही प्रगति होणें शक्य झालें. त्या आधींच्या मंत्र्यांना कळकळ होती पण त्यांची पैशावर हुकमत नव्हती; देतील त्या तुकड्यावर त्यांना निभवावयाचें होतें.

काँग्रेस-मंत्र्यांनीं स्कूल बोर्डाच्या रचनेंतहि जरूर त्या सुधारणा केल्या. स्कूल बोर्डांत निवडून येण्यास शैक्षणिक लायकीची अट ठेवली गेली; आणि थोडे अपवाद सोडून जातवार प्रतिनिधींच्या जागा कमी केल्या. यामुळें बोर्डाची लायकी आपोआप वाढली. शिवाय सर्व स्कूल बोर्डांना सल्ला देण्यासाठीं एक मध्यवर्ती प्राथमिक शिक्षण-बोर्ड स्थापण्यांत आलें. शाळांची तपासणी स्थानिक संस्थांकडून काढून सरकारी शाळाखात्याकडे दिली. यामुळें वशिलेबाजी बंद होऊन शिक्षक आपल्या वाजवी कामाकडे जास्त लक्ष देऊं लागले.

आजतागायत प्राथमिक शिक्षणाची वाढ मुंबई इलाख्यांत कसकशी झाली हें वर थोडक्यांत दिलें आहे. वाढीचें प्रमाण व गति एकदम लक्षांत येण्यासाठीं इंग्रजी राज्य स्थापन झाल्यापासूनच्या कालाचे कांहीं मुख्य टप्पे घेऊन त्या टप्प्यांच्या वर्षांचे आंकडे पुढें दिले आहेतः—

| टप्प्यांचें वैशिष्ट्य | वर्ष | मुंबई प्रांतांतील प्राथमिक शाळांची संख्या | प्राथमिक शाळांतील मुलांची एकंदर संख्या | प्रा० शाळांतील मुलांचें लोकसंख्येशीं शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|
| वूडसाहेबांच्या खलित्यानंतरचें वर्ष | १८५४-५५ | २,६००× | ८४,५४५ | ०·८ |
| हंटर कमिशनचें वर्ष | १८८१-८२* | ५,३३८ | ३,३२,६८८ | १·९ |
| बादशहा पांचवे जॉर्ज यांच्या दिल्ली येथील घोषणेचें वर्ष | १९११-१२ | ८,३०३ | ५,०७,२४२ | ३·४ |
| मॉँटफर्ड सुधारणांचें वर्ष | १९१९-२० | १०,०४६ | ६,४५,३१४ | ४·३ |
| शिक्षणाचा ताबा बोर्डाकडे जाण्यापूर्वीचें वर्ष | १९२४-२५ | ११,०७१ | ७,५८,५०७ | ४·८ |
| प्रांतिक स्वायत्ततेचे पूर्वीचें वर्ष | १९३६-३७ | १२,९०१ | ११,४०,२९९ | ६·५ |
| १९३९ मार्चअखेर | १९३८-३९ | १६,४३५ | १३,२२,६६८ | ७·४ |

* ८१-८२ खेरीज करून सर्व आंकडे सिंध प्रांत सोडून बाकीच्या मुंबई इलाख्याचे आहेत.

× यांत २४०३ गांवठी बिनमदतीच्या शाळांचा समावेश केला आहे.

मागील तक्त्यावरून प्राथमिक शिक्षणाची नवीन प्रगति झालेली आढळून येईल; पण ती खरोखरच कौतुक करण्याजोगी, टिकाऊ, भरीव आणि परिणामकारक झाली आहे कीं कसें हें आतां पाहूं. प्राथमिक शाळांतून शिकण्याचे वयाचीं मुलें लोकसंख्येच्या शेंकडा १५ या प्रमाणांत असतात. म्हणजे अद्यापि प्रांतांतील निम्मीं मुलें प्राथमिक शिक्षणास आंचविलेलीं अशीं राहिलीं आहेत. १८५५ सालीं प्राथमिक शिक्षण मिळत असलेलीं मुलें जवळ जवळ शेंकडा १ होतीं तीं आतां शेंकडा ७·४ झालीं आहेत; म्हणजे शेंकडा ६·५ मुलांस आवश्यक असें शिक्षण मिळण्याची तजवीज होण्यास ८५ वर्षांचा काळ लागला! मात्र मुंगीच्या पावलानें जर पुढें यावयाचें असेल तर सर्व मुलें शाळेंत येऊं शकतील इतक्या शाळा उघडण्यास आणखी इतका काळ लागेल! जगांत सर्वांत सुधारलेल्या राष्ट्राच्या कारभाराखालीं आपण असतांना ही प्रगति कौतुकास्पद आहे असें कोण म्हणेल?

वर दिसून येणारी प्रगति इतर कसोट्यांना उतरते कीं कसें तें पाहूं. ज्या मुलाचें शिक्षण मराठी चवथ्या इयत्तेपर्यंत होतें तो मुलगा खरोखरीचा साक्षर होऊन पुस्तकें वाचून आपल्या माहितींत उपयुक्त भर घालण्यास समर्थ होतो. चवथी-पूर्वी शाळा सोडलेलीं मुलें शिकलेलें विसरून जाऊन जवळ जवळ निरक्षरच राहतात असें प्रत्ययास आलेलें आहे. निरनिराळ्या चांचण्या घेऊन असें दिसून आलेलें आहे कीं शाळेंत येणाऱ्या मुलांपैकीं शेंकडा ३५च मुलें चवथीपर्यंत जातात व टिकाऊ साक्षरता संपादन करतात, आणि बाकीचीं शेंकडा ६५ मुलें त्या आधींच शाळा सोडतात व त्यांजवर होणारा खर्च फुकट जातो. म्हणजे प्राथमिक शिक्षणावर जर एक कोट रुपये खर्च होत असतील तर त्यांतील ६५ लाख रुपये समुद्रांत टाकून दिल्याप्रमाणेंच होय. गतकाळीं प्राथमिक शिक्षणप्रसाराचे प्रयत्न झाले पण त्याबरोबरच संपादित साक्षरता टिकवि-ण्याचे बाबतींत कांहींच झालेलें आढळून येत नाहीं. फिरतीं वाचनालयें काढणें, जनतेस समजतील अशीं मोठ्या टायपांत छापलेलीं व सोप्या भाषेंत लिहिलेलीं वर्तमानपत्रें लोकांस उपलब्ध करणें आणि बालवर्गांत दाखल झालेलीं सर्व मुलें मध्येंच न कुचंबतां ४ वर्षें शाळेंत राहतील असे इलाज करणें वगैरेसारख्या प्रयत्नांनीं हें करतां आलें असतें आणि फुकट जाणारा पैसा सार्थकीं लागला असता. प्राथमिक शाळांतून खालच्या वर्गांत मुलांच्या कुचंबणेचें व तीं चवथी-

पर्यंत न शिकण्याचें कारण म्हणजे अध्यापनशास्त्रास पारखे असलेले बरेच शिक्षक त्या शाळांतून असतात हेंहि आहे. हल्लीं आपल्या प्रांतांत सर्व प्रकारच्या प्राथमिक शाळांतून फक्त शेंकडा ४५ च ट्रेन्ड शिक्षक आहेत. काँग्रेस शिक्षणमंत्र्यांनीं हा दोष जाणून सर्व शिक्षक ट्रेंड करण्याचें धोरण यंदापासून घालून दिलें आहे. ह्या योगानें गळती बरीच थांबेल.

वर प्राथमिक शाळांची व शिकणाऱ्या मुलांची संख्येंत वाढ कसकशी झाली, त्यांत गळती कशी होते व ती कशी थांबवितां येणें शक्य आहे याचें त्रोटक सिंहावलोकन केलें; पण झालेली प्रगति ही भरीव व परिणामकारक आहे कीं नाहीं हें पहावयाचें उरलें आहे. स्थलाभावीं ह्या गोष्टीचें फक्त दिग्दर्शन करतां येईल. कोणत्याहि शिक्षणाची कसोटी त्याच्या अभ्यासक्रमावरून होते. वास्तविक मुलांना जें शिक्षण द्यावयाचें त्याचा मुख्य उद्देश त्यांच्या शारीरिक, मानसिक व नैतिक शक्तीचा विकास करून त्यांचें जीवन सुखी व सुंदर करणें आणि त्यांना इतरांच्या उपयोगीं पडणारे चांगले नागरिक तयार करणें हा होय. शिक्षणाचा उद्देश मुलांच्या डोक्यांत माहिती कोंबून त्यांची वारंवार परीक्षा घेणें हा नाहीं. निवळ पुस्तकें वाचतां येणें हें कांहीं शिक्षण नाहीं. मुलाला जीवनक्षम करण्यासाठीं त्याला निरीक्षण, परीक्षण, प्रयोग इत्यादि साधनांचा उपयोग करण्यास शिकविलें पाहिजे व तो श्रमविन्मुख होणार नाहीं ह्याची काळजी घेतली पाहिजे. प्राथमिक शाळांतील आजवरच्या अभ्यासक्रमाचा ह्या दृष्टीनें विचार करतां तो केवळ पोशाकी होता असें म्हणावें लागतें. अगदीं पहिल्यानें खेडेगांवचा वेगळा व शहरी वेगळा असे दोन अभ्यासक्रम 'मोडी इयत्ता' व 'बालबोध इयत्ता' या नांवाखालीं प्रचलित होते. १९१० सालीं खेडेगांवांकरितां वेगळाच अभ्यासक्रम आला. त्याविरुद्ध फार तक्रारी आल्यामुळें १९१७ पासून सर्व शाळांतून एकच अभ्यासक्रम ठेवला गेला. त्यांत हळूहळू चित्रकला, सृष्टिनिरीक्षण, हस्तव्यवसाय, शारीरिक शिक्षण यांची भर पडली. मुलांकडून पुष्कळशा बाबी करवून घेणें जरी आलें तरी अभ्यासक्रम पोशाकीच राहिला. याचा परिणाम धंदेवाइकांचीं मुलें आपआपल्या धंद्यापासून परावृत्त होऊं लागलीं. म्हणून प्रत्येक जिल्ह्यांतून कांहीं शाळा शेतकीप्रधान शिक्षणाच्या ( agricultural bias ) उघडण्यांत आल्या; तरी पण शाळांतून बाहेर पडणाऱ्या मुलांची प्रवृत्ति कारकुनी पेशा पतकरण्याकडेच

होऊं लागली. त्यामुळें बेकारी वाढली. साहजिकच अशा अभ्यासक्रमाबद्दल सर्व देशांत जोरानें विचार होऊं लागला. याचाच परिणाम म्हणून महात्मा गांधींची वर्धा-योजना २ वर्षांपूर्वी बाहेर पडली. आपल्याहि इलाख्यांत गुदस्तां याबद्दल कमिटी नेमून तिच्या सूचनांवर आधारलेला व्यवसायात्मक अभ्यासक्रम तयार करण्यांत येत आहे. त्याचा विशेष मूलोद्योगांतून (Basic craft) शिक्षण देणें हा आहे. प्रयोगादाखल हल्लीं ह्या शिक्षणक्रमाच्या ६० शाळा उघडल्या आहेत. शिक्षण हें प्रयोगाअंतीं ठरविण्यांत येणारें शास्त्र आहे. असे प्रयोग सरकारी कायम ठशांच्या शाळांपेक्षां खाजगी शाळांतून होण्यास वाव असतो. आपल्या इलाख्यांत प्राथमिक शिक्षणक्षेत्रांत आपल्या लोकांचे खाजगी प्रयत्न गेल्या शतकांत फारच थोडे झाले. **डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें** या बाबतींत पुण्यास या शतकाचे आरंभीं प्राथमिक शिक्षणक्षेत्रांत पहिल्यानें पाऊल टाकलें. त्यांचे शाळेंत झालेले प्रयत्न नांवाजण्यासारखे व अनुकरण्या-सारखे आहेत. परंतु असे प्रयत्न खेडेगांवांतून मोठ्या प्रमाणावर मागेंच झाले असते तर शिक्षणास वेगळी दिशा मागेंच लागली असती. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत शिक्षणाचा जीवनाशीं मेळ ठेवलेला होता. श्रीकृष्णा-सारख्यास गुरु सांदीपनीच्या आश्रमांत काम करावें लागे. असो; आतां नवीन दृष्टि डोकावूं लागून शिक्षण जीवनक्षम करण्याचे बरेच प्रयत्न होत आहेत, त्याचा योग्य तो परिणाम होईलच.

सारांश, प्राथमिक शिक्षण खेडोखेडींच नव्हे तर घरोघरीं पोंचविलें पाहिजे व तें देतांना विद्यार्थि श्रमविन्मुख होऊन आपल्या व्यवसायास पारखा न होईल अशी दक्षता ठेविली पाहिजे. या दृष्टीनें प्रांतिक स्वायत्ततेंत जारीनें प्रयत्न झाले पाहिजेत. इंग्रजी राज्य स्थापन होऊन १२५ वर्षे झालीं तरी अजून देशांतील शेंकडा ८५ लोक निरक्षर व डोळे असून आंधळे आहेत. त्यांना साक्षरते-ची पहांट भेटून ज्ञानाचे किरण केव्हां पाहावयास मिळणार? मोटारी व विमानें आल्यावर गेल्या ८५ वर्षांची बैलगाडीची गति आतां ठेवून काय उपयोग? निदान गेल्या दोन वर्षांतली गति जरी राखली तरी पुढील १५ वर्षांत शिकण्या-जोग्या सर्व मुलांस साक्षरता संपादितां येऊन तीं आयुष्यांत कार्यक्षम होतील. तरी प्राथमिक शिक्षणासारख्या महत्त्वाच्या राष्ट्रसंवर्धक क्षेत्रांत जनतेनें स्वार्थ-त्याग करून जारीनें लक्ष घालावयास नको काय?

---

# विद्यार्थि-जीवन

लेखकः— **नरहर काशीनाथ घारपुरे**

'लहानपण देगा देवा', किंवा 'बाल्पणींचा काळ सुखाचा' अशा प्रकारचे बोल प्रौढांच्या तोंडून पुष्कळ वेळां ऐकूं येतात. प्रापंचिक व इतर मानापमानाची चिंता मनाला शिवत नसल्यामुळें त्या कालांत मन शुद्ध व सुप्रसन्न असतें. जगांतील नानाविध गोष्टींचे बरेवाईट अनुभव नित्य येत असल्यामुळें मनुष्यप्राणी त्यांतच रमून जातो. विद्यार्थिदशेंत बालकाला नित्य नव्या गोष्टी शिकावयास मिळतात. प्रसंगांचें नावीन्य व अनुभवांचें वैचित्र्य ह्या दृष्टीनें विचार करतां विद्यार्थिजीवन हें जरी सुखावह वाटलें, तरी पुढील जीवनक्रमाचा विचार करूं लागल्यास, हा काळ नुसता सुखाचा नसून अत्यंत महत्त्वाच्या अशा खडतर तपश्चर्येचा आहे ही गोष्ट पटेल. विद्यार्थि-जीवन हा भावी जीवनाचा पाया आहे.

आयुष्यांतील पहिलीं पांचसहा वर्षें बाल्यावस्थेंतील निरुपद्रवी, सात्त्विक आनंदांत मातापितरांच्या प्रेमळ कृपाछत्राखालीं घालविल्यावर शालेय विद्यार्थिजीवनाला प्रारंभ होतो. कांहीं श्रीमंत आईबाप आपल्या मुलांना 'किंडर गार्टेन्' पद्धतीनुसार चाललेल्या बालविकास-मंदिरांत शिक्षणाकरितां पाठवितात व अशा रीतीनें ह्या बालकांना वयाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या वर्षापासूनच शिक्षक व पालक ह्या दोघांच्याहि देखरेखीचा व अनुभवाचा फायदा मिळतो. परंतु सगळ्याच पालकांची सांपत्तिक स्थिति इतकी समाधानकारक नसल्यामुळें सगळ्याच बालकांना अशा प्रकारचें 'बालविकास मंदिरां'तलें शिक्षण मिळूं शकत नाहीं. ही गोष्ट जशी खरी आहे, त्याचप्रमाणें शाळेंत असेपर्यंत तें बालक आईबापांच्या सहवासाला अंतरतें हीहि गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. एक गोष्ट माल, खरी कीं बालक शाळेंत जावयास लागल्यावर त्याच्या विद्यार्थिजीवनांतील कार्यक्रमाला योग्य तें वळण लावण्याची जबाबदारी शिक्षक व पालक या दोघांवर पडते. ते त्याच्या जीवनांतील चंद्र-सूर्यच होत आणि म्हणून

बालकाच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें शिक्षक-पालक एकत्र येणें अत्यंत जरूर आहे. ह्याकरितांच शिक्षक-पालकसंघ असावेत असें अट्टाहासानें प्रतिपादिलें जातें.

आपल्याकडील विद्यार्थि-जीवनाचा काल स्थूलमानानें पुढीलप्रमाणें मांडतां येईल:—शाळेंत प्रवेश मिळाल्यापासून मॅट्रिक परीक्षा पास होईपर्यंत साधारणपणें एक तपाचा काल जातो. शिक्षणाचें माध्यम मातृभाषा केलें तर हा काल दोन वर्षांनीं तरी निदान कमी करतां येईल असें वाटतें. मॅट्रिक परीक्षेनंतर विद्यार्थि उच्च शिक्षणाकरितां कॉलेजांत जातो व तो शिक्षणक्रम पुरा झाल्यावर व वयाची पंचविशी उलटल्यावर संसारांत पडतो. साधारणपणें या ठिकाणीं त्याचें विद्यार्थि-जीवन संपतें. कांहीं लोक असेहि सांपडतात कीं ते सर्व आयुष्यभर कांहीं ना कांहीं तरी नवीन गोष्टी शिकत असतात व त्यांचे विद्यार्थि-जीवन अखंड चालू असतें. सर्वसाधारण लोकांसंबंधीं बोलावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल, कीं वयाच्या पांचव्या वर्षी सुरुवात झालेलें विद्यार्थि-जीवन वयाच्या पंचविसाव्या वर्षी संपतें. अशा रीतीनें वयाचीं वीस वर्षे विद्यार्थीदशेंत जातात. विद्यार्थि-जीवनाच्या सर्व आंगोपांगांचा यथातथ्य व सविस्तर विचार ह्या लहानशा लेखांत करतां येणें शक्य नसल्यामुळें मुख्य मुलांचा विचार करून बाकीच्यांचा नुसता नामनिर्देशच करावा लागेल. शिक्षण हें विद्यार्थि-जीवनाचें मुख्य अंग असल्यामुळें त्याची दिशा कशी असावी म्हणजे त्या विद्यार्थ्याचें भावी आयुष्य सुखावह होईल, हें पाहणें जरूरीचें आहे.

आपल्या भरतखंडांत शिक्षणाचा काल अंदाजें बारा वर्षांचा होता. आठव्या वर्षी व्रतबंध झाल्यावर बटूस गुरूच्या स्वाधीन करावयाचें व मग त्यानें एक तपापर्यंत विद्यार्जन करावयाचें. त्या वेळच्या गुरुशिष्यांचे संबंध जास्त जवळचे व जिव्हाळ्याचे होते. तरी पण विद्यार्थि-जीवन अधिक त्रासाचें असें एक खडतर व्रतच होतें; कारण गुरूला संतुष्ट करून त्याच्याजवळून विद्या साध्य करून घेणें म्हणजे फारच अवघड काम! सांदीपनि व श्रीकृष्ण या गुरुशिष्यांची कथा सर्वश्रुतच आहे. तेव्हां ही खडतर तपश्चर्या मध्यम स्थितींतील लोकांनाच करावी लागत नसून, श्रीमंतांच्या मुलांना सुद्धां गुरूच्या घरीं पुष्कळ वेळां राबावें लागे. ही कल्पनाच आधुनिक मनाला असह्य वाटेल. श्रीमंतींत वाढलेल्या श्रीकृष्णासारख्या बालकानें गुरु सांदीपनींच्या घरीं लाकडाच्या मोळ्या आणून

टाकाव्यात ही गोष्टच त्या वेळच्या शिक्षणक्रमांतील व विद्यार्थि-जीवनांतील रहस्य स्पष्ट करून सांगण्यास पुरेशी आहे. श्रीकृष्णाला मोळीविक्या व्हावयाचें, नव्हतें ही गोष्ट अगदीं उघड आहे; तरी पण पुढील आयुष्यांत तसलाच काय; पण त्याहूनहि एखादा दुर्धर प्रसंग आपल्यावर आला तरी त्याला तोंड देण्याची आपली तयारी पाहिजे हेंच ह्यांतील रहस्य आहे. शिक्षण हा पुढील आयुष्याचा पाया असल्यामुळें शिक्षणाची व जीवनाची सांगड घातली गेली पाहिजे आणि भावी आयुष्यांत कसलाहि प्रसंग आला तरी त्यांतून निभावून जाण्यास तो विद्यार्थि समर्थ झाला पाहिजे ही गोष्ट प्रामुख्यानें डोळ्यांपुढें ठेवली जात असे.

त्या वेळची परीक्षापद्धति व शिक्षण देण्याची वेळहि याच अनुरोधानें ठरविलेली असे. आरोग्यदृष्ट्या व इतर पुष्कळ दृष्ट्या बौद्धिक शिक्षणाकरितां सकाळची वेळ जास्त उपयुक्त असल्यामुळें तिचाच अवलंब केला जात असे. विद्यार्थ्यांच्या अंगीं वसत असलेल्या व्यक्तिगत गुणांचा पूर्ण विकास झाला पाहिजे ह्याकडे दृष्टि देण्यांत येत असे. बौद्धिक शिक्षण त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें थोडेंसें एकांगी असलें तरी विद्यार्थि ज्या शास्त्राचा अभ्यास करी तें शास्त्र तो पूर्णपणें अवगत करून घेण्याचा प्रयत्न करीत असे. शास्त्रावरील मुख्य ग्रंथ, उपग्रंथ, टीका, प्रतिटीका वगैरे जेवढें कांहीं उपलब्ध असेल तेवढ्या सर्वांचें तो परिशीलन करीत असे व कोणत्याहि परीक्षेंत उत्तीर्ण होण्यास त्याला शंभरांपैकीं शंभर गुण मिळवावे लागत व ह्यामुळेंच त्या विषयाचा त्याचा अभ्यास पूर्ण होत असे. हल्लीं विद्यार्थ्यास कांहीं विषयांत शेंकडा ३५ तर कांहींत शेंकडा ४० गुण मिळाले तरी तो पास होतो. तेव्हां अंदाजें अर्धे मार्क मिळवून परीक्षा पास होणारे विद्यार्थि अर्धवट म्हणायाचे कीं काय? परंतु पूर्वीची ती एकमार्गी रीत कांहीं अंशीं बरी असली तरी हल्लींच्या शिक्षणपद्धतीनें विद्यार्थि बहुश्रुत होऊन त्याच्या बुद्धीला विशालत्व प्राप्त होतें यांत शंका नाहीं. विद्यार्थ्यांनीं पुष्कळ विषय जरूर शिकावेत; परंतु त्यांपैकीं कोणत्या तरी एका विषयांत विशेष प्रावीण्य मिळविण्यावर जास्त कटाक्ष ठेवावा. विश्वविद्यालयांचा हल्लीं त्याच गोष्टीकडे रोख आहे ही समाधानाची गोष्ट आहे.

विद्यार्थ्यानें विद्या हाच परमोच्च अर्थ असें समजून विद्या संपादन करणें हें आपलें प्रथम पवित्र कर्तव्य मानलें पाहिजे. हल्लींच्या विद्यार्थि-जीवनांतील कार्यक्रमांत पुष्कळच इतर गोष्टींना महत्त्व देण्यांत येऊन त्याकरितां पैसाहि

खर्च करण्यांत येतो. इतर गोष्टी करूंच नयेत असें सांगावयाचें नसून विद्यार्जनाला प्राधान्य देण्यांत येऊन, त्याकरितां विशेष प्रयत्न व्हावेत.

पूर्वी मुलींना गृहशिक्षण घरांतच मातेच्या देखरेखीखालीं मिळत असे; परंतु मुलांच्याबरोबरीनें त्यांच्याच पद्धतीचें शिक्षण मुलीहि घेऊं लागल्यामुळें त्यांना जरूर तें गृहशिक्षणहि देण्याची सोय शाळेंत करण्याची पाळी आली आहे.

जर्मनीनें मुलांना शारीरिक शिक्षण व शेतावर काम आणि मुलींना गृहशिक्षण जवळजवळ सक्तीचें केलें आहे. ह्यांतील रहस्य म्हणजे शारीरिक श्रमाचीं कामें करण्यांत त्यांना कोणत्याहि प्रकारचा कमीपणा वाटूं नये हें होय.

शिक्षण ही पुढील आयुष्याची पूर्वतयारी असल्यामुळें शिक्षणाचा व जीवनाचा संबंध अत्यंत जवळचा आहे व ज्या वेळीं हा अन्योन्य संबंध दुरावतो त्या वेळीं शिक्षणांत सुधारणा करणें भाग पडतें. आज जवळजवळ ७०-८० वर्षें चालू असलेल्या शिक्षणपद्धतीनें चरितार्थाचा प्रश्न सुटत होता; परंतु आतां ती गोष्ट होऊं शकत नाहीं, हें पटल्यामुळें शिक्षणक्रमांत बदल केला पाहिजे असें वाटूं लागलें व वर्धा-शिक्षण-योजना आंखण्यांत आली. देशांतील पुढाऱ्यांचीहि विशेष नजर शिक्षणक्रमावरच असते; कारण आपली विचारसरणी मान्य असलेले अनुयायी त्यांना निर्माण करावयाचे असतात. शिक्षणानें ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांस स्वावलंबी बनविलें पाहिजे त्याचप्रमाणें राष्ट्रीय वृत्तीहि त्यांच्या ठिकाणीं बाणली पाहिजे.

"Life and Learning must be intimately connected. Schools should not distort, disturb or interrupt life but interpret and fulfil it." ह्या गोष्टी डोळ्यांपुढें ठेविल्या म्हणजे शिक्षणक्रम कसा असावा व विद्यार्थि-जीवनाचें ध्येय काय असावें इत्यादि गोष्टी आपोआपच स्पष्ट होतील. जीवनांतील सगळ्या गोष्टी चांगल्या रीतीनें करण्याची पात्रता तर मनुष्यांत यावयास पाहिजे असेल तर तो नुसता विद्यार्थि असून भागणार नाहीं तर वीर पुरुषहि बनला पाहिजे. राष्ट्रसेवा हा उत्युच्च धर्म आहे; वैयक्तिक, कौटुंबिक, सामाजिक कर्तव्याबरोबर राष्ट्रीय कर्तव्य म्हणून कांहीं आहे व त्याकरितां वीरवृत्ति व स्वसंरक्षणाची पात्रता ह्या गोष्टीहि मनुष्यांत उतरणें जरूर आहे.

स्त्री-पुरुषांची निसर्गदत्त शारीरिक ठेवण व कर्तव्यें लक्षांत घेतलीं म्हणजे त्यांना एकाच प्रकारचें शिक्षण देणें कसें इष्ट नाहीं हें पटेल. अपत्योत्पादन व

अपत्यसंगोपन ह्या दोन गोष्टींत तरी निदान स्त्रियांचाच मक्ता आहे. शिकलेल्या सर्वच स्त्रिया सार्वजनिक कार्यांत पडतील हें संभवत नाहीं. म्हणून त्या सुगृहिणी व सुमाता कशा होतील ह्याच्यावर दृष्टि दिली पाहिजे. सर्वच अविवाहित राहूं शकत नाहींत. वैवाहिक जीवनांत पदार्पण केल्यास तें चांगल्या रीतीनें घालविण्याची योग्यता अंगीं आली पाहिजे. गृहशिक्षण व शालेय शिक्षण हीं एकमेकांना पूरक झालीं पाहिजेत व त्या दृष्टीनें स्त्री-शिक्षणाची दिशा ठरविली पाहिजे.

चौकसबुद्धि, चपळाई, मनमोकळेपणा, धीटपणा, शिस्त, कष्टाची हौस, सौंदर्याभिरुचि नीटनेटकेपणा, वीरवृत्ति वगैरे गुणसमुच्चयापैकीं विद्यार्थि-जीवनक्रमांत जितक्या गोष्टी मनुष्यास मिळवितां येतील तितक्या त्यानें मिळवाव्या. हल्लींच्या शिक्षणक्रमांत बऱ्याचशा गोष्टी नुसत्या परीक्षेकरितांच शिकविल्या जातात. मनुष्याची बुद्धि व कर्तृत्वशक्ति ह्यांचा जेणेंकरून उत्तम समन्वय होईल व मनुष्य एक व्यावहारिक वृत्तीचा, शिस्तीनें वागणारा, कर्तबगार व जबाबदार नागरिक बनेल अशा प्रकारची 'शिक्षणपद्धति' पाहिजे व त्याप्रमाणें विद्यार्थि-जीवनाला दिशा लागली पाहिजे.

राष्ट्रांतील शेंकडा ९५ लोक हे सर्वसाधारण बुद्धिमत्तेचे असतात; त्यांच्या आयुष्यांत विशेषशी घडामोड होत नाहीं, म्हणून त्यांना जरूर असलेलें शिक्षण जितकें स्वस्त, सोपें, स्वावलंबी व अल्पावधींत मिळण्यासारखें असेल तितकें चांगलें. असाधारण बुद्धिमत्तेचे लोक केव्हांहि पुढें आल्याशिवाय राहणार नाहींत; तेव्हां त्यांना विशेषेंकरून बौद्धिक शिक्षण मिळाल्यास फायदाच होईल. एक गोष्ट मात्र खरी कीं बुद्धीच्याच सर्वस्वीं आहारीं न जातां, आपल्या कार्याकरितां आपण तिला राबवली पाहिजे. तेव्हां सर्वसाधारण लोकांचें विद्यार्थि-जीवन अशा प्रकारें गेलें पाहिजे कीं तो विद्यार्थि वा ती विद्यार्थिनी आपल्या पुढील आयुष्यांत वैयक्तिक व राष्ट्रीय कर्तव्यें बजावण्यास लायक झाली पाहिजे.

विद्यार्थि-जीवन कशा प्रकारचें असावें म्हणजे विद्यार्थ्यांस पुढें फायदा होईल ह्यासंबंधींची मुख्य कल्पना मांडून स्थूलमानानें विचार वर केला आहे.*

---

* शारीरिक, लष्करी, धार्मिक, औद्योगिक वगैरे निरनिराळ्या तऱ्हेचें शिक्षण किती, केव्हां व कसें द्यावें ह्या गोष्टी तपशीलाच्या आहेत. तसेंच सहशिक्षण असावें कां नसावें ? अगोदर स्त्री-शिक्षणाचीच जेथें ओरड आहे

 [ पुढें चालू

वाचनालयें, प्रयोगशाळा वगैरे शिक्षणाच्या आधुनिक साधनांनीं सुसज्ज असलेल्या शाळेंत शिक्षण घेणारे हल्लींचे विद्यार्थि एका दृष्टीनें दैववानच म्हटले पाहिजेत. मात्र मनुष्याचे ठिकाणीं सुप्तावस्थेंत असलेले गुण कार्यप्रवण करण्याकडे त्यांचा उपयोग झाला पाहिजे. ह्याकरितां खेडेगांवांतील विद्यार्थ्यांना कांहीं दिवस शहरांत व शहरांतील विद्यार्थ्यांना कांहीं काल खेडेगांवांत घालविण्याची संधि मिळाली पाहिजे. प्रवास केल्यानें किती तरी निरनिराळे अनुभव येतात.

विद्यार्थि-जीवनावर फक्त शाळेंतील वातावरणाचाच परिणाम होतो असें नाहीं. देवालयें, नाटक-गृहें, सिनेमा, रेडिओ, वर्तमानपत्रें, लोकप्रिय थिल्लर मासिकें, चित्र-संग्रह, पदार्थ-संग्रहालयें, स्काउटिंग, गर्ल्स गाइड्स, व्याख्यानें वगैरे किती तरी गोष्टींचा विद्यार्थ्यांच्या मनावर बरा-वाईट परिणाम होत असतो. तेव्हां शाळेंत ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांचा नेता शिक्षक आहे, त्याचप्रमाणें शाळेबाहेरील वातावरणाचा वाईट परिणाम विद्यार्थ्यांवर होऊं नये ह्याची काळजी त्याच्या पालकानें घेतली पाहिजे व समाजांतील बेजबाबदार व थिल्लर वातावरणाचा कोंवळ्या बालकांवर अनिष्ट परिणाम होऊं नये म्हणून सरकारनेंहि कांहीं निर्बंध घातले पाहिजेत. अमुक एका वयापर्यंतच्या तरुण-तरुणींनीं अमुक तऱ्हेचे बोलपट पाहतां कामा नये अशा प्रकारचें बंधन जर्मनीसारख्या सुधारलेल्या देशांत व इतरहि देशांत सरकार घालतें; परंतु आमचा वाली कोण आहे? तेव्हां आमचें आम्हींच त्या उद्योगाला लागलें पाहिजे.

---

मागील पानावरून ]
तेथें सहशिक्षणासंबंधीं विचार अत्यंत तातडीनें करावयास हवा काय? स्त्री-शिक्षणाची योग्य दिशा काय हें ठरविल्यावर हा प्रश्न आपोआपच सुटतो. तरी पण जें शिक्षण मुलामुलींना एकत्र देण्यासारखें आहे तें वयाच्या १३ वर्षांपर्यंत द्यावें. त्यानंतरचीं पांच वर्षें मुलींना मुलांबरोबर एकत्र शिक्षण देण्यांत येऊं नये. अठरा वर्षांनंतर मुलीला स्वतःचीं जबाबदारी समजत असल्यामुळें कॉलेजांतील विश्वविद्यालयीन शिक्षण दोघांना एके ठिकाणीं दिल्यास हरकत नाहीं. सूक्ष्म विचारांतीं वरील गोष्टी सहज पटतील.

# हस्तव्यवसाय आणि औद्योगिक शिक्षण यांच्या मर्यादा



लेखकः—गजानन श्री. खैर

## दोन पिढ्यांनंतरचा मॅट्रिक

चाळीस वर्षांपूर्वी मॅट्रिक झालेला विद्यार्थी आणि आज मॅट्रिक झालेला विद्यार्थी यांच्या परिस्थितीमध्यें किती जमीन-अस्मानाचें अंतर आहे! दोन पिढ्या गेल्या आणि त्या अवधींत शिक्षणाची व माणसांची किंमतहि बदलली. मॅट्रिक होण्याकरितां चाळीस वर्षांपूर्वी जे बौद्धिक श्रम पडत होते, त्यापेक्षां कांकणभर अधिकच श्रम आज मॅट्रिक होणाऱ्या तरुणाला करावे लागतात. जुन्या मॅट्रिक विद्यार्थ्यांपेक्षां आज मॅट्रिक झालेल्या विद्यार्थ्याला जगांतील ज्ञान निश्चितपणें अधिक आहे. मातृभाषा, भौतिकशास्त्रें, भूगोल, सामान्य ज्ञान इत्यादि क्षेत्रांत आजचा मॅट्रिक तरुण निःसंशय सरस आहे. खर्चाच्या दृष्टीनें पाहिलें तरी आजच्या मॅट्रिक विद्यार्थ्याला पूर्वीपेक्षां किती तरी अधिक खर्च करावा लागतो. फी, पुस्तकें, परीक्षा-फी, राहणीचा खर्च इत्यादि अनेक मार्गांनीं त्याला करावा लागणारा खर्च गेल्या दोन पिढ्यांच्या अवधीमध्यें पुष्कळच वाढलेला आहे. सारांश, बौद्धिक श्रम आणि द्रव्य या दृष्टीनें आज मॅट्रिक होणाऱ्या तरुणाला अधिक भांडवल शिक्षणांत घालावें लागतें.

परंतु त्या प्रमाणांत त्याची समाजांतील किंमत वाढलेली नाहीं. वाढलेली नाहीं एवढेंच नव्हे, तर विषम प्रमाणांत खालीं घसरलेली आहे.

चाळीस वर्षांपूर्वी मॅट्रिक पास अथवा नापास झालेला तरुण सर्वांना हवा होता. सरकारी कचेऱ्या, रेल्वे, व्यापारी पेढ्या, लग्नाचा बाजार इत्यादि सर्वत्र त्याची चलती होती. त्याच्या विद्वत्तेच्या लायकीपेक्षां अधिक वेतन देऊन नोकरी देण्याची समाजाची तयारी होती. हायस्कूलच्या तीन-चार यत्ता झालेल्या तरुणांनाहि अनेक ठिकाणीं मागणी होती. साध्यासुध्या कारकुनी

कामाला तर त्याची विद्वत्ता जरूरीपेक्षां अधिकच समजली जात असे. उच्च शिक्षणाच्या अनेक क्षेत्रांत त्याला सरकारी शिष्यवृत्त्या देऊन शिक्षण देण्याची तयारी होती. मेडिकल स्कूल, एंजिनियरिंग कोर्स इत्यादि अभ्यासक्रमाकडे विद्यार्थ्यांनीं जावें म्हणून त्यांना सरकार आपल्या पदरच्या शिष्यवृत्त्या देऊन "या-या" असें म्हणत होतें. मॅट्रिक होण्यापूर्वी एकदोन वर्षें विद्यार्थ्यांना अशा अभ्यासक्रमांत प्रवेश मिळत असे.

परंतु आज या प्रत्येक ठिकाणीं मॅट्रिक तरुणाला फारशी किंमत राहिलेली नाहीं. सरकारी कचेऱ्या व व्यापारी पेढ्या इत्यादि क्षेत्रांत अगदीं मर्यादित उमेदवारांशिवाय बहुसंख्य तरुणांना नकार मिळतो. ज्यांची लायकी—वशिला-दैव इत्यादि कारणांनीं वर्णी लागते त्यांना मिळणारी आर्थिक प्राप्ति ही पूर्वीच्या मॅट्रिक तरुणाला होणाऱ्या प्राप्तीच्या मानानें कमी आहे.

सारांश, गेल्या दोन पिढ्यांमध्यें हायस्कूल-शिक्षणाची किंमत वाढली परंतु हें शिक्षण घेणाऱ्या तरुणांची बाजारांतील किंमत कमी झाली.

## मागणीपेक्षां पुरवठा अधिक

मागणी, पुरवठा आणि किंमत यांचा सिद्धान्त शिक्षणाच्या क्षेत्रांतहि लागू पडतो. हायस्कूल-शिक्षण घेतलेल्या तरुणांना जी मागणी होती त्या मानानें पुरवठा जोंपर्यंत थोडा होता तोंपर्यंत त्यांना किंमत होती. आज मागणीचें प्रमाण तेंच आहे परंतु पुरवठ्याचें प्रमाण मात्र अनेक पटींनीं वाढलें आहे. त्यामुळें भाव उतरला.

संख्येच्या दृष्टीनें पाहतां गेल्या दोन पिढ्यांनंतर हायस्कूल-शिक्षण घेणाऱ्या आणि मॅट्रिक होणाऱ्या तरुणांची संख्या अफाट वाढली आहे. पूर्वी पांढरपेशा वर्गातील थोडे तरुण हें शिक्षण घेत असत आणि इतर वर्गातील विद्यार्थी अगदीं विरळा असत. आतां पांढरपेशा वर्गातील बहुसंख्य तरुण हें शिक्षण घेतात आणि इतर वर्गातील अधिकाधिक तरुण स्वतःच्या आर्थिक आणि सामाजिक उन्नतीकरितां हायस्कूल-शिक्षणाकडे जात आहेत. त्यामुळें हें शिक्षण घेणारांची संख्या गेल्या चाळीस वर्षांत अनेक पटींनीं वाढलेली आहे.

हा प्रकार आपल्या देशांतच नवीन झाला आहे असें नव्हे, पाश्चात्य देशांत-हि गेल्या पन्नास वर्षांत हीच स्थिति झालेली आहे. माध्यमिक शिक्षण

पूर्वी अगदीं थोड्या तरुणांच्या आटोक्यांत असे, तें आतां हळूहळू बहुजन समाजाच्या आटोक्यांत आलेलें आहे. त्यामुळें माध्यमिक आणि उच्च शिक्षण संस्थांतून बाहेर पडणाऱ्या तरुणांची संख्या सर्वत्रच वाढत चाललेली आहे. या परिस्थितीमुळें उत्पन्न होणारे प्रश्न इतर देशांत निर्माण झाले तसे ते आपल्याहि देशांत आतां उत्पन्न झालेले आहेत.

## बेकारी-चौकशीचा निष्कर्ष

माध्यमिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढल्यामुळें निर्माण झालेला महत्त्वाचा प्रश्न म्हणजे शिक्षितांची बेकारी हा आहे. गेल्या दहा-पंधरा वर्षांपासून हा प्रश्न आपल्या देशांत भासमान होऊं लागलेला आहे. प्रत्येक प्रांताला त्याची कमीअधिक झळ लागू लागली, तेव्हां ठिकाठिकाणीं बेकारी-चौकशी-समित्या स्थापन झाल्या. मुंबई इलाख्यांतहि अशी चौकशी होऊन तिचा अहवाल प्रसिद्ध झालेला आहे. अगदीं अलीकडे संयुक्त प्रांतांत बॅ. तेज बहादूर सप्रू यांचे अध्यक्षतेखालीं चौकशी-मंडळ नेमलें गेलें होतें त्यानें विस्तृत अहवाल प्रसिद्ध करून बेकारीच्या प्रश्नाची विस्तृत चर्चा केलेली आहे.

माध्यमिक शिक्षणाचे दृष्टीनें विचार करतां या विविध अहवालांतून निर्दिष्ट केलेले कांहीं निष्कर्ष महत्त्वाचे आहेत. त्यांवरून आज आपल्या शिक्षण-संस्थांतून शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या शिक्षितांच्या मनोवृत्ति आणि अपेक्षा काय असतात त्यांची कल्पना आपणांला करतां येते. त्या जमेला धरून पुढें शिक्षणांत काय धोरण ठेवावयाचें तें ठरविलें पाहिजे.

आजचा शिक्षित तरुण कष्टाच्या आणि श्रमाच्या व्यवसायापेक्षां पोषाखी आणि बैठ्या अशा व्यवसायाची अपेक्षा करीत असतो, हा सिद्धान्त अनेक अहवालांतून मांडला गेलेला आहे. केवळ बौद्धिक शिक्षण-संस्थांतून बाहेर पडलेल्या तरुणांची ही मनोवृत्ति आहे. यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु औद्योगिक शिक्षण-संस्थांतून बाहेर पडलेल्या कांहीं तरुणांची देखील हीच वृत्ति असते, असा अनुभव या चौकशींतून बाहेर आलेला आहे. कारकुनी आणि बैठ्या अशा व्यवसायांना आपलें माध्यमिक शिक्षण पुरें पडूं शकलें; परंतु अशा प्रकारचे व्यवसाय फार थोडे म्हणजे शेंकडा तीन-चार इतकेच असल्याकारणानें त्यांत सर्व शिक्षितांचा समावेश होऊं शकत नाहीं.

बहुसंख्य शिक्षितांना यापुढें श्रमाचे आणि कष्टाचे व्यवसाय करावयास हवेत. परंतु अशा प्रकारच्या व्यवसायांना लागणारी शारीरिक श्रमाची मनोवृत्ति आणि कष्टाची संवय यांचें वळण तरुणांना मिळालेलें नसतें. त्यामुळें आर्थिक धकाधकीच्या मामल्यांत ते मागें पडतात.

बेकारीच्या चौकशींतून निदर्शनास आलेली दुसरी गोष्ट म्हणजे शिक्षितांची आर्थिक अपेक्षा ही होय. यापूर्वी हायस्कूलचें शिक्षण घेतलेल्या पूर्वपिढींतील तरुणांना चांगल्या वेतनाचे व्यवसाय मिळाले. ते दृष्टीपुढें असल्याकारणानें आजचा तरुणहि त्या मानानें आपली आर्थिक अपेक्षा ठेवतो. मध्यमवर्गीयाला शोभेल असा आर्थिक दर्जा आपल्याला मिळावा अशी त्याची महत्त्वाकांक्षा असते. मध्यमवर्गीय तरुणांना आपला त्या समाजांतील दर्जा टिकवावयाचा असतो. कनिष्ठवर्गीय तरुण हायस्कूल-शिक्षणाकडे धांव घेतात याचें कारण त्यांनाहि वर्गान्तर करण्याची महत्त्वाकांक्षा असते. समाजाच्या खालच्या थरांतून वरच्या थरांत येण्यास आज शिक्षण हें एक साधन आहे. केवळ विद्येकरितां कोणी शिक्षण घेत नाहीं. त्या शिक्षणानें आपला दर्जा वाढावा असें प्रत्येक तरुणाला वाटत असतें. त्यामुळें हायस्कूल-शिक्षणांतून बाहेर पडणाऱ्या तरुणाची कांहीं विवक्षित आर्थिक अपेक्षा असते. या अपेक्षांना पुरे पडणारे पुरेसे व्यवसाय आज समाजांत नाहींत आणि खालच्या दर्जाचे व्यवसाय करण्याची शिक्षितांची तयारी नाहीं. त्याकारणानें शिक्षितांमधील बेकारी वाढत आहे.

## औद्योगिक शिक्षणाची लाट

शिक्षितांमधील बेकारी वाढून व्यवसायाचे बाजारपेठेंत त्यांना असलेली मागणी कमी होऊं लागली, त्यामुळें शिक्षणक्षेत्रांतील कार्यकर्त्यांचें लक्ष औद्योगिक शिक्षणाकडे जाऊं लागलें. कारकुनी आणि पोषाखी व्यवसायांत तरुणांना वाव मिळत नाहीं तर औद्योगिक क्षेत्रांत प्रवेश करण्याकरितां त्यांची लायकी वाढवावी या विचारानें धंदे शिक्षणाच्या प्रश्नाकडे लक्ष जाऊं लागलें, 'केवळ बौद्धिक शिक्षण घेऊन आतां उपयोग काय, धंदेशिक्षण घेतलें पाहिजे' अशा प्रकारचे तात्त्विक विचार वातावरणामध्यें उठूं लागले. कांहीं शाळा-चालकांनीं थोड्याफार प्रमाणांत औद्योगिक शिक्षण देण्याचे उपक्रम सुरू केले. कांहीं सरकारमान्य शाळांनीं उपलब्ध असलेल्या साहित्य-सामग्रींत औद्योगिक शिक्षणाचे लहानसहान प्रयोग सुरू केले. राष्ट्रीय शिक्षणाच्या ज्या चळवळी झाल्या त्यांतहि औद्योगिक शिक्षणाला

प्राधान्य दिलें गेलें. परंतु यांपैकीं कोणत्याच उपक्रमांना म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. परंतु औद्योगिक शिक्षणाच्या आवश्यकतेकडे समाजाचें प्रामुख्यानें लक्ष गेलें. बौद्धिक शिक्षणाला जोडून किंवा स्वतंत्रपणानें औद्योगिक शिक्षण कसें देतां येईल याविषयीं विचार आणि प्रयोग सुरू झाले. हिंदुस्थान सरकारनें ॲबट आणि वुड या तज्ज्ञांना खास विलायतेहून बोलाविलें आणि कांही प्रांतांची पाहणी करून या विषयावर आपला अभिप्राय देण्यास सांगितलें. त्यानंतर काँग्रेस सरकारचे हातीं शिक्षण-कारभार आल्यावर त्यानेंहि खास समित्या नेमून औद्योगिक शिक्षणाच्या प्रश्नावर अभिप्राय आणि योजना मागविल्या. कांहीं प्रांतांतून जुन्या शिक्षणसंस्थांचें औद्योगिक शिक्षणसंस्थांत रूपांतर झालें. अशा प्रकारें सध्यां औद्योगिक शिक्षण हा माध्यमिक शिक्षणाच्या क्षेत्रांतील एक महत्त्वाचा प्रश्न झालेला आहे.

## विचारांचा व अर्थांचा घोटाळा

औद्योगिक शिक्षण, धंदेशिक्षण, हस्तव्यवसाय शिक्षण इत्यादि शब्दप्रयोग इतक्या मोघमपणानें वापरले जातात, कीं सर्वांचा अभिप्रेत अर्थ एकच आहे कीं काय अशी शंका मनांत येते. औद्योगिक शिक्षणामध्यें त्याच्या उपयोगाच्या आणि दर्जाच्या दृष्टीनें विविध प्रकार आहेत. त्यांचें स्वरूप निश्चित केल्याशिवाय माध्यमिक शिक्षणांत कोणतें विशिष्ट शिक्षण द्यावयाचें त्याचें स्वरूप स्पष्ट होणार नाहीं. प्राथमिक चार-सहा यत्ता शिकलेल्या उमेदवाराला सुतारी-लोहारी-विणकाम शिक्षण दिलें तरी तें औद्योगिक शिक्षण आणि मॅट्रिक झालेल्या उमेदवारांना टेक्निकल् इन्स्टिटयूटमध्यें चार वर्षें दिलें जातें तेंहि औद्योगिक शिक्षणच. एकाद्या हायस्कूलमध्यें सुतारीचे वर्ग काढले तरी तें औद्योगिक शिक्षण आणि महिन्यांतून एकाद्या रविवारीं पेपरमिंट, टूथपावडर इत्यादि वस्तु तयार करण्याची जुजबी माहिती दिली तरी तें औद्योगिक शिक्षणच. अर्थाच्या आणि नांवाच्या दृष्टीनें त्या शिक्षण-प्रकारांची निश्चित वर्गवारी केली म्हणजे कोणत्या शिक्षण-संस्थेमध्यें कोणत्या दर्जाचें औद्योगिक शिक्षण द्यावयाचें त्याचें स्वरूप स्पष्ट होऊं शकेल.

## हस्तव्यवसाय आणि औद्योगिक शिक्षण यांतील भेद

स्थूलमानानें प्रथम अशी वर्गवारी करतां येईल कीं, तरुणांच्या भावी व्यव-

सायाला प्रत्यक्ष उपयोगी पडणारें तें औद्योगिक शिक्षण आणि व्यवसायाशीं प्रत्यक्ष ज्याचा संबंध नाहीं तें हस्तव्यवसाय-शिक्षण. अर्थात् प्रत्यक्ष व्यवहारांत इतकी कांटेकोर विभागणी करतां येत नाहीं हें खरें. कारण बौद्धिक शिक्षणाचा औद्योगिक शिक्षणाकडे आणि औद्योगिक शिक्षणाचा बौद्धिक शिक्षणाकडे थोडा फार उपयोग होतोच. परंतु स्थूल दृष्टीनें औद्योगिक शिक्षण आणि हस्तव्यवसाय-शिक्षण असे दोन वर्ग करण्यास हरकत नाहीं. औद्योगिक शिक्षणांत विद्यार्थ्यांच्या पूर्वशिक्षणाच्या आणि औद्योगिक अभ्यासक्रमाचे दृष्टीनें प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च शिक्षण असे भेद पाडतां येतील. प्राथमिक औद्यौगिक शिक्षणांत लहानसहान एकेरी धंद्यांचाच समावेश होईल म्हणून त्याला धंदेशिक्षण असें नांव देण्यास हरकत नाहीं. हें विशिष्ट धंद्यांनाच उपयोगी पडेल. माध्यमिक आणि उच्च औद्योगिक शिक्षण मात्र अधिक व्यापक व लवचिक स्वरूपाचें असल्यामुळें त्याचा उपयोग एकाच लहान धंद्यापुरता मर्यादित राहणार नाहीं.

या विविध शिक्षण-प्रकारांचा तरुणांचे भावी व्यवसायांवर, त्यांच्या आर्थिक स्थितीवर आणि सामाजिक दर्जावर काय परिणाम होईल या दृष्टीनें विचार केला पाहिजे. त्याचप्रमाणें शिक्षणाला लागणारी साधनसामुग्री आणि द्रव्यानुकूलता या दृष्टीनें अशा प्रकारचें शिक्षण देण्याची पात्रता कोणत्या संस्थांच्या ठिकाणीं आहे हाहि व्यवहाराच्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रश्न आहे.

## हस्तव्यवसाय-शिक्षणाचें स्वरूप

हस्तव्यवसायाचें शिक्षण हें औद्योगिक किंवा धंदेशिक्षण नाहीं. तरुणांच्या भावी धंद्यांशीं त्याचा संबंध नाहीं. सर्वसामान्य शिक्षणाचा एक भाग म्हणून हस्तव्यवसायाला स्थान मिळेल. बौद्धिक शिक्षणाचा एकांगीपणा नाहींसा होऊन तरुण चौकस बनावा, भावी आयुष्यांत श्रमाचीं कामें करण्याचा प्रसंग आला तर त्याला संवय असावी आणि हातानें काम करणें हलक्या दर्जाचें लक्षण आहे ही त्याची मनोवृत्ति पालटावी अशा अनेक उद्देशांनीं हस्तव्यवसायाचें शिक्षण दिलें जातें. वाढत्या वयामध्यें पुस्तकी शिक्षण आणि बैठें जीवन यांमुळें तरुण भावी कष्टाच्या आयुष्याला अपात्र बनत जातो. बेकारी चौकशी-समित्यांनीं असाच अनुभव नमूद केलेला आहे. त्याचा निर्देश पूर्वी

केलाच आहे. ही अपात्रता कांहीं अंशानें कमी करावी आणि पुस्तकी शिक्षणाचे एकांगी अनिष्ट परिणाम नाहींसे करावेत हा हस्तव्यवसाय-शिक्षणाचा उद्देश आहे. हा उद्देश लक्षांत ठेवला म्हणजे त्याचें स्वरूप, अभ्यासक्रम आणि योजना करणें फारसें अवघड जाणार नाहीं.

## निव्वळ औद्योगिक शिक्षणांतील प्रकार

औद्योगिक शिक्षणांत प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च असे तीन विभाग पाडलेले आहेत. यांतील प्राथमिक औद्योगिक शिक्षण हें खालच्या दर्जाचें आहे. सुतारी, लोहारी, शिवणकाम इत्यादि धंद्यांतील कनिष्ठ प्रतीचे कारागीर या शिक्षणांतून तयार होतील. त्यांचें उत्पन्न अगदीं बेताचें राहील. सामाजिक दर्जाहि अर्थात् त्याच मानानें मिळेल. हें शिक्षण देण्याला खर्च कमी येईल. परंतु माध्यमिक शिक्षणाकडे येणाऱ्या तरुणांची आर्थिक आणि सामाजिक दर्जाविषयीं जी अपेक्षा असते तिला हें धंदेशिक्षण पुरें पडणार नाहीं. म्हणून हायस्कूल शिक्षणाला जोडून अशा शिक्षणाची सांगड घातली तरी त्याचा फक्त हस्तव्यवसाय-शिक्षण या दृष्टीनेंच उपयोग होईल; कारण हें शिक्षण घेतलेले तरुण पुढें त्या त्या धंद्यांत पडणार नाहींत. आपल्या आर्थिक आकांक्षांना योग्य असा व्यवसाय ते पाहतील आणि तो मिळेपर्यंत बेकार राहतील. पोषाखी आणि बैठ्या वृत्तीचा मनुष्य एक वेळ आपली वृत्ति विसरून श्रम करण्यास तयार होईल, परंतु आर्थिक आणि सामाजिक दर्जा विसरणें त्याला फार जड जाईल. आपल्या समाजांतील सद्यःस्थितीचें वर्णन म्हणून हें सांगितलें; चिरंतन सत्य म्हणून नव्हे. कारण यापेक्षां निराळी वृत्ति असलेलेहि अनेक समाज आहेत. प्रत्येक समाज आपल्या पूर्वपरंपरेनें शक्यतोंपर्यंत चालतो. नाइलाज होऊन उपाशी मरण्याचीच पाळी आली तर मात्र निराळा मार्ग आंखतो.

औद्योगिक शिक्षणांतील माध्यमिक आणि उच्च दर्जाच्या शिक्षणांत यांत्रिक उद्योगधंदे, व्यापारी व्यवसाय इत्यादि गोष्टी येतील. या व्यवसायांच्या अभ्यासक्रमांत सर्वसामान्य बौद्धिक शिक्षणापेक्षां त्या त्या व्यवसायांचे तात्त्विक आणि व्यावहारिक शिक्षणालाच प्राधान्य द्यावें लागतें. हा अभ्यासक्रम संभाळून हायस्कूलच्या शिक्षणाचा बौद्धिक अभ्यासक्रम पूर्ण होणें शक्य नाहीं. वेळेच्या दृष्टीनें हा विचार झाला. खर्चाच्या दृष्टीनें पाहतां हें शिक्षण बौद्धिक शिक्षणा-

पेक्षां तिपटीनें किंवा अधिक महाग जातें. हायस्कूल शिक्षण देण्यास एका तरुणा-मागें रु. ६०-६५ इतका खर्च येतो. परंतु माध्यामिक दर्जाचें औद्योगिक शिक्षण द्यावयाचें झाल्यास याच शिक्षणाला रु. १५० ते रु. २५० पर्यंत खर्च येईल. इतका खर्च करून हें शिक्षण देणें खाजगी किंवा निमसरकारी संस्थांना शक्य होणार नाहीं. स्थानिक स्वराज्य, सरकार, कारखानदारसंघ इत्यादि संस्थांनीं व्यक्तिशः अथवा सहकार्यानें अशा प्रकारच्या संस्था चालविल्या पाहिजेत.

आर्थिक दृष्टीनें तरुणाला मध्यमवर्गीयाचा दर्जा प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य या वरच्या दर्जाच्या औद्योगिक शिक्षणामध्यें आहे. याच्या संस्था सार्वत्रिक निघाल्यास त्यांतून विद्यार्थी आपणहून जातील. परंतु आपल्या सध्यांच्या हायस्कूल-शिक्षणाला जोडून या दर्जाचें औद्योगिक शिक्षण देणें शक्य नाहीं. वेळेच्या आणि द्रव्याच्या दृष्टीनें त्यांची असमर्थता असल्यामुळें अशा औद्योगिक शिक्षण-संस्था स्वतंत्रच निघाल्या पाहिजेत.

## चाणाक्ष विद्यार्थी व धोरणी पालक

विद्यार्थी आणि त्यांचे पालक हे औद्योगिक शिक्षणाची किंमत ओळखण्याचे दृष्टीनें मोठे चाणाक्ष असतात. कोणत्याहि व्यावसायिक शिक्षणांत घातल्यानंतर प्रथम प्रथम विद्यार्थी त्यांत मोठ्या हौसेनें व उत्साहानें काम करतो; पण लौकरच त्याच्या मनांत असा विचार जागृत होतो कीं "मी हा व्यवसाय पुढें आयुष्यांत करणार आहे का? केलाच तर मला प्राप्ति काय होईल?" अशा विचारांतील त्याच्या अपेक्षेला जर अंगीकृत धंदेशिक्षण उतरलें नाहीं तर तो तें यथाशक्य लवकर सोडून देतो. पालकांची देखील हीच विचारसरणी असते. पालक आणि विद्यार्थी औद्योगिक शिक्षणाविषयीं उदासीन दिसतात आणि मॅट्रिककडेच अद्याप त्यांचा ओढा असतो तो याच कारणाकरतां. मॅट्रिक झाल्यानंतर लायकी-वशिला-दैव इत्यादि मार्गांनीं जी प्राप्ति आणि जो दर्जा मिळेल तो केवळ हलक्या दर्जाच्या औद्योगिक शिक्षणानें मिळणार नाहीं असें त्यांना वाटतें. म्हणून मॅट्रिककडील मार्ग व्यवसायाचे दृष्टीनें अनिश्चित असला तरी तिकडेच जाण्याची पालकांची व विद्यार्थ्यांची प्रवृत्ति आहे. माध्यमिक शिक्षणाच्या संस्थांना जोडून कितीहि—कसेंहि—कोणतेंहि औद्योगिक शिक्षण दिलें

तरी तिकडे त्यांचा ओढा लागणार नाहीं. माध्यमिक व उच्च शिक्षणाच्या स्वतंत्र संस्था सर्वत्र काढल्या पाहिजेत. तरच औद्योगिक शिक्षणाविषयीं विद्यार्थ्यांना व पालकांना आस्था वाटेल.

## हायस्कूलमध्यें काय शक्य आहे ?

भावी व्यवसायाला उपयोगी पडणारें धंदेशिक्षण देणाऱ्या संस्था स्वतंत्रच पाहिजेत. आपलीं हायस्कुलें तें काम घेऊं शकत नाहींत. त्यांनीं तें घेतलें तरी वेळ आणि द्रव्य या साधनांच्या दृष्टीनें विचार करतां त्यांच्याकडून तें यशस्वी रीतीनें होणार नाहीं. जें कांहीं अपुरें काम होईल त्याविषयीं विद्यार्थ्यांना आणि पालकांना आस्था न वाटल्यामुळें खर्चाचे मानानें त्याचा फारसा उपयोग होणार नाहीं.

वरील सिद्धान्ताचा उपसिद्धान्त असा नव्हे, कीं या बाबतींत माध्यमिक शिक्षण-संस्थांनीं कांहींच करूं नये किंवा त्यांना कांहींच करतां येणार नाहीं; भावी व्यवसायोपयोगी असें प्रत्यक्ष औद्योगिक शिक्षण त्यांना देतां येणार नाहीं. परंतु सर्वसामान्य शिक्षण या दृष्टीनें हस्तव्यवसायाचें शिक्षण प्रत्येक विद्यार्थ्याला आवश्यक आणि सक्तीनें देणें हें माध्यमिक शिक्षणसंस्थांचें कर्तव्य आहे. आयुष्यांत कोणताहि व्यवसाय करावयाचा झाला तरी हातानें कष्ट करण्याची तयारी, संवय आणि श्रमाचें काम कमी न लेखण्याची प्रवृत्ति हे गुण प्रत्येक नागरिकामध्यें असणें आवश्यक आहे. सध्यांच्या औद्योगिक युगामध्यें उद्योगप्रवृत्ति ही प्रत्येक व्यक्तीमध्यें निर्माण झाली पाहिजे. पोषाखी वृत्तीचा अभाव, कष्टाची आवड, हाताला व इंद्रियांना विधायक वळण, उद्योग-प्रवृत्ति इत्यादि गुण कोणताहि व्यवसाय यशस्वी रीतीनें करण्याकरितां आवश्यक असतात. सध्यांच्या निवळ केवळ पुस्तकी आणि बैठ्या शिक्षणानें हे गुण मारले जातात, आणि आपले तरुण व्यवसायाला व कष्टाला कुचकामी होतात. भावी पिढीचें हें फार भयंकर असें नुकसान आहे. तें होणार नाहीं इतकी काळजी आपल्या माध्यमिक शिक्षणसंस्थांनीं घेणें आवश्यक आहे. इतिहास, भूगोल, भाषा, गणित, विज्ञान, चित्रकला इत्यादि विषय जितके महत्त्वाचे आहेत तितकाच हस्तव्यवसाय हाहि विषय सर्वसामान्य शिक्षण या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. हायस्कूलच्या अभ्यासक्रमांत प्रारंभापासून अखेरपर्यंत तो आवश्यक असावा. इंग्रजी,

गणित, विज्ञान इत्यादि विषयांवर जेवढा वेळ खर्च होतो तितकाच हस्तव्यवसाय या विषयाला देणें आवश्यक आहे. हायस्कूलमध्यें सुरू केलेल्या सुतारी, लोहारी, शेती, बागाईत, मुद्रणकला, हातमाग इत्यादि हस्तव्यवसायांकडे औद्योगिक शिक्षण या दृष्टीनें न पाहतां सर्वसामान्य व्यावहारिक शिक्षण या दृष्टीनें पाहिलें पाहिजे. तें प्रत्यक्ष धंदेशिक्षण नाहीं, परंतु कोणत्याहि यशस्वी धंद्याला आवश्यक अशा गुणांचा विकास तरुणांमध्यें करणारें तें सर्वसामान्य शिक्षण आहे. ही दृष्टि पुढें ठेवून साधनसामुग्री आणि अभ्यासक्रम यांची योजना केली तर या हस्तव्यवसाय-शिक्षणाचा योग्य उपयोग तरुण पिढीला होईल.

माध्यमिक शिक्षणामध्यें हस्तव्यवसायशिक्षणाला आवश्यक स्थान आहे. परंतु त्याच्या मर्यादा चालक, पालक आणि विद्यार्थी या सर्वांना स्पष्टपणें समजल्या तर चालकांची या शिक्षणावर निष्ठा बसेल, विद्यार्थ्यांचा उत्साह वाढेल आणि पालकांचें औदासीन्य नाहींसें होईल.

---

वंदे मातरम्

# स्वावलंबी शिक्षण



लेखकः—सेवक सेवानंद—बाळूकाका कानिटकर

( जागेच्या अभावीं या लेखांत देशांतील पंचाण्णव टक्के, अशिक्षित ग्रामीण जनतेच्याच शिक्षणाचा विचार केला आहे. )

**'मन करारे प्रसन्न । सकळ सिद्धींचें कारण ॥ '**
**'अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि देऊं ॥'**
**—श्रीतुकाराम.**

**'स्वावलंबनें गुलामगिरिचे तुरुंग फोडावे ।**
**स्वतंत्र होउनि अतुल, चिरंतन सुयशा जोडावें ॥ '**
**—सेवानंद.**

**मानवी जीवनाची कमान**—मुख्यत्वेंकरून अन्न, वस्त्र, आरोग्य, शिक्षण, न्यायदान, शांततारक्षण आणि परचक्रनिवारण या सात अंगांची मिळून बनलेली आहे. या कमानीच्या या सात चिऱ्यांतून मध्यवर्ती किल्लीच्या दगडाचा—Key-stone-चा मान शिक्षणाला दिला पाहिजे.

**टकळी वा चरखा**—वस्त्रनिर्मितीला जरूर तें सूत निर्माण करणाऱ्या वस्तु व त्यासंबंधींचें शास्त्र व कार्य यांना कांहीं सज्जन ग्रामीण ग्रहमालिकेचा मध्यबिंदु—सूर्य—समजतात. हें मत ग्राह्य वाटत नाहीं. योग्य संस्कारांनीं युक्त असें शिक्षण हेंच नागरी वा ग्रामीण जीवनाचें केंद्र होऊं शकतें.

**' मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः । '**

या वचनांत ब्रह्मांड सांठलेलें आहे. मन ही एक प्रचंड विध्वंसक तशीच विधायक शक्ति आहे. कोणत्याहि मृत्युकिरणापेक्षां जास्त मारक अथवा कोणत्याहि अमृतवल्लीपेक्षां जास्त तारक असें तें यंत्र आहे. जगताचें नरक वा नंदनवन यांत रूपांतर करण्याचें अद्भुत सामर्थ्य त्यांत आहे, हा वरील मंत्राचा आशय.

**नियंत्रण**—मानवी प्रपंचास हितावह अशा प्रकारचें– परिस्थिति तपासून निश्चित केलेल्या योग्य अशा शिक्षणानें वरील मनरूपी यंत्राचें होऊं शकतें. तें तसें झाल्यास मनुष्य आपल्या ध्येयसिद्धीसाठीं वाटेल तो त्याग करावयास तयार होतो. किंबहुना–

**' सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोही वेंचावा '**

या श्रीसमर्थ रामदासांच्या उपदेशानुसार तो आपल्या पंचप्राणांची आहुतीहि देण्यास मागें पुढें पहात नाहीं.

**मार्गदर्शक**—मानवी संस्कृतीचे– भरतखंडांतील प्राचीन ऋषि आणि मुनि– यांनीं वरील तत्त्व बिनचूक ओळखलेलें होतें. शाळेच्या चार भिंतींच्या आंत मिळणारें पुस्तकी शिक्षण मिळालें कीं शिक्षणाचें कार्य संपलें अशी त्यांची शिक्षणाबद्दल आकुंचित व मर्यादित दृष्टि नव्हती. ती फार व्यापक होती. श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें—

**' घालोनि अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहूनि जाड ।**
**तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटेपण ? ॥ '**

असा त्यांचा तेजस्वी दंडक होता. त्यावर दृष्टि खिळवूनच त्यांनीं मानवाच्या जन्मापासून तों अंत्येष्टीपर्यंतच्या जीवनांतील संस्कारांची, विचारांची, उच्चारांची व आचारांची आंखणी केलेली होती.

**रशियन राष्ट्रसंघ**—मानवी जीवनांतील उत्क्रांति व क्रांति यांच्या बाबतींत आज एक अपूर्व प्रयोग करीत आहे. त्या राजवटीचेहि मार्गदर्शक असे कांहीं आधुनिक मंत्रद्रष्टे ऋषि व मुनि आहेत. त्यांच्या समजुतीनें मानवी जीवनाची सफलता होण्यास समाजवादी तत्त्वज्ञान अत्यंत आवश्यक आहे. समाजवादरूपी या वेदाचा देशांत व दुनियेंत योग्य त्या प्रकारचा व जरूर त्या प्रमाणांत प्रचार व्हावा ही त्यांची इच्छा ! ती साध्य व्हावी म्हणून त्यांच्या सल्ल्याप्रमाणें रशियन सरकार मूल उपजलें कीं तें आईबापांकडून आपल्या ताब्यांत घेतें व त्या मुलाचें किंवा त्या मुलीचें मन, बुद्धि व शरीर यांवर योग्य ते संस्कार तज्ज्ञांकडून घडवून आणण्याचा तें शक्य तो यत्न करतें. इतर कोणत्याहि गोष्टींपेक्षां रशियन विद्वान् शिक्षणालाच पराकोटीचें महत्त्व देतात ही गोष्ट यावरून सिद्ध होते. एकपत्नी, एकवचन व एकबाण, एवंगुणविशिष्ट अशी रामकथा—

'ब्रह्मांड भेदून । पैलाड न्यावी ॥'

ही अत्यंत दिव्य व भव्य महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या अर्वाचीन भारतीयांनीं आपलें ध्येय साध्य करण्यासाठींहि हेंच तत्त्व ओळखून त्याप्रमाणें जरूर त्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी केली पाहिजे. त्यासाठीं पडेल ती किंमत मोजण्याची तयारी ठेवली पाहिजे.

**तात्पर्य**—वस्त्रप्रपंचासारख्या जडवस्तूंशीं संबद्ध अशा उद्योगाला मानवी ग्रामीण जीवनाचें केंद्र न मानतां तो मान चिच्छक्तीचा अमर्याद विकास करणाऱ्या चैतन्यमूलक शिक्षणालाच देणें सर्व दृष्टींनीं उचित आहे. शिक्षणाखेरीज इतर बाबीहि महत्त्वाच्या खऱ्या; त्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असल्याशिवाय मानवी जीवित सफल व सुरक्षित होऊं शकत नाहीं हेंहि तितकेंच खरें. पण त्या सर्व गोष्टी योग्य व सुसंस्कृत अशा शिक्षणाशिवाय पूर्णांशानें हस्तगत होऊं शकत नाहींत. म्हणून शिक्षण— सार्वत्रिक, सर्वांगीण व राष्ट्रहितक्षम– हीच शास्त्रशुद्ध दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची गोष्ट ठरते.

**शिक्षण**—विषयच मूळचा अति बिकट; आणि त्या शब्दामागें स्वावलंबी हें विशेषण लावलें म्हणजे तर नानाविध गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न होतात. प्रथम स्वावलंबी या शब्दप्रयोगाचा अर्थच काय, एथपासून चर्चेला प्रारंभ होतो. या शब्दयोजनेचे अनेक सज्जन अनेक अर्थ करूं शकतील. त्यांचा ऊहापोह करूं लागलों तर तें एक रामायणच होईल. सामान्यतः आजचा रूढ अर्थ विचारांत घेणेंच्च चांगलें.

**खर्च**—शिक्षणाचा ज्या योजनेमुळें विद्यार्थ्यांनीं शिक्षणकालांत केलेल्या कामांच्या उत्पन्नांतून व केलेल्या मालाच्या किंमतींतून निघूं शकतो त्या योजनेनुसार दिलेलें शिक्षण तें स्वावलंबी शिक्षण— हा आजचा त्या शब्दप्रयोगाचा स्थूलमानानें रूढ अर्थ आहे. शिक्षणाची ही योजना कितपत ग्राह्य आहे याचा खालीं विचार केला आहे.

**तत्त्व**—त्रिकालाबाधित असूं शकतें. व्यवहार माल स्थल, काल, मानवाची अंतर्बाह्य प्रगति व परिस्थिति यांवर अवलंबून असतो. म्हणून वरील योजनेबद्दल एकदम कांहीं एक निश्चित मत देणें सोपें नाहीं. धोक्याचें आहे. यशाच्या शक्याशक्यतेचा विचार करतांना शिक्षणक्षेत्र, शिष्य व शिक्षक यांच्या लायकीचा

व परिस्थितीचा विचार होणें अत्यावश्यक आहे. तो करण्यापूर्वी एक सर्व-सामान्य सिद्धांत मात्र नमूद करून ठेवणें जरूर वाटतें.

**मुलें व मुली**—ही एक शक्ति आहे. तिचा कांहीं एक काळपर्यंत धनोत्पादक कार्याकडे उपयोग केला तर धनाची कांहींच निर्मिति होणार नाहीं असें नाहीं. गणित मांडून अमुक एका संख्येकडून अमुक तासपर्यंत अमुक प्रकारचें अमुक काम अमुक मनुष्यानें करून घेतलें तर अमुक फल मिळेल हा हिशेब कोणीहि करून दाखवूं शकेल. त्याला एखादा रँग्लर वा न्यूटनच हवा असें नाहीं. अमुक अटी अमलांत आल्या तर एक वर्षांत स्वराज्य मिळेल या घोषणेनें एकदां भल्याभल्यांना गुंगवलें. अनेक कारणांनीं ती योजना फलद्रूप होऊं शकली नाहीं. तीच गोष्ट मुलांच्याकडून काम करून घेऊन शाळेचा खर्च भागवण्याच्या योजनेची. कल्पनेंत जरी ती पराकाष्ठेची रम्य वाटली तरी प्रत्यक्षांत तिच्या मार्गांत अनेक अनुल्लंघनीय अडचणी आहेत असा गेल्या तीस वर्षांत वेळोवेळीं केलेल्या प्रयोगांतील अनुभव आहे. विशेषतः कोंवळ्या वयाच्या लहान मुलामुलींच्या बाबतींत तर ही नियोजित घटना कांहींशी हास्यास्पद, अतएव अग्राह्य वाटते व ती घेऊन कोणी सज्जन जेव्हां तिचा मोठ्या गंभीर-पणानें फार मोठ्या प्रमाणावर देशांत प्रचार करूं लागतात तेव्हां एका नामांकित बोलपटांतील एक अति हृदयस्पर्शी प्रसंग डोळ्यांपुढें उभा राहतो. बेन हूर हें त्या चित्रपटाचें नांव.

**एक युवक**—त्यावर सरकारचा रोष झाला. त्याची तुरुंगांत पाठवणी होणारच. प्रचंड गलबतें हे त्या वेळचे बंदिखाने. बंदिवानांनीं वल्ह्यांच्या साहाय्यानें जहाज चालविणें हें सक्तमजुरीचें स्वरूप. दुतर्फा कैद्यांनीं बसावयाचें व मधोमध एक नगारा असायचा. त्याच्या तालांत वल्हीं मारलीं पाहिजेत हा दंडक. त्यांत चुकून शिस्तभंग झाला कीं कोरडा बसलाच पाठींत. बेन हूरला वल्हीं मारण्याचा कधींच प्रसंग नसल्यानें त्याच्या पाठींत अनेकदां कोरडे बसून रक्ताच्या चिळकांड्या इतस्ततः उडाल्याचा भीषण देखावा त्या बोलपटांत होता.

**प्रकार**—बेन हूरमधील नि लहान मुलांच्याकडून एकच एक काम तासन् तास करून घेऊन त्याच्या उत्पन्नांतून शाळेचें गलबत हांकारण्याची अपेक्षा

करणें यांत फारसा फरक नाहीं. एक उघड उघड, सांगून सवरून गुलामगिरी; तर दुसरीहि दिसायला अत्यंत सोवळी पण एका अर्थानें प्रच्छन्न व म्हणूनच जास्त घातुक अशी गुलामगिरीच.

**बालपण**--मुलांमुलींचें अति महत्त्वाचें. त्यांच्या अंगच्या सुप्त व गुप्त गुणांची वाढ व विकास होण्याचा तो मोसम. खरें पाहतां या वयांत त्यांचें शिक्षण शक्य तितकें खेळत खेळत, नाचत बागडत, रमत गमत, उड्या मारीत मारीत, मोठ्या मजेंत झालें पाहिजे. कोणत्याहि प्रकारचा तांत्रिक, यांत्रिक वा मांत्रिक भुंगा त्यांच्यामागें असतां कामा नये. त्यांचें मन, बुद्धि व शरीर यांवर कसल्याहि प्रकारचें कृत्रिम दडपण असून चालणार नाहीं. तें जरा का असलें कीं बालशिक्षणाचा तात्त्विक व व्यावहारिक पाया ढांसळून मुलांची वाढ खुंटलीच म्हणून समजावें. खरोखर--

**'रम्य तें बालपण देइ देवा!'**

अशी ज्या कालबद्दल एका बालिकेकडून एका कविवर्यांनीं एका प्रसंगीं ईश्वराची प्रार्थना करविली आहे तो काळ शक्य तितका निसर्गसुंदरतेला व सहजतेला धरूनच असला पाहिजे. विष्णुदासाला अहंकाराचा वारा सुद्धां लागणें गैर त्याप्रमाणेंच या बालवयाला कृत्रिमाचा किंचित्‌हि वास येतां कामा नये.

**दुसरी गोष्ट**—शिक्षकांची. त्यांना पोट आहेच. साहजिकच त्यांना त्यांचा ठराविक पगार वेळेवर मिळणें ही गोष्ट महत्त्वाची वाटल्यास त्यांना कसा दोष देतां येईल? गेल्या शें-दीडशें वर्षांच्या ज्या एका पगारी परंपरेंत त्यांची वृत्ति मुरलेली असते तिला धरूनच ही त्यांची अपेक्षा असते. म्हणून ज्या कोंवळ्या मुलामुलींच्या श्रमांवर त्यांचा योगक्षेम अवलंबून, त्यांच्याकडून शक्य तितकें काम, विशेष दयामाया न दाखवितां, करून घेऊन आपल्या पगाराचा पडाव सुखरूप-पणें पैलतीराला पोंहोचविणें या एका गोष्टीवर त्यांचा विशेष कटाक्ष राहील व त्यामुळें विद्यार्थ्यांच्या बौद्धिक व सांस्कृतिक शिक्षणाकडे त्यांचा कानाडोळा होईल अशी भीति वाटते.

**आणीक एक गोष्ट**—मुलें म्हणजे मुलें. न उमललेल्या कळ्याच त्या. जन्मजात, आनुवंशिक लायकी असेल व बाहेरून बरेवाईट संस्कार होतील त्याप्रमाणें त्यांचें किडलेल्या, अर्धविकसित वा पूर्ण फुललेल्या फुलांत किंवा

पिकलेल्या फळांत रूपांतर होणार. अर्थात् एकसारखें तासन् तास एखाद्या आदर्श उद्योगी बच्चाप्रमाणें इकडे तिकडे न बघतां निमूटपणें काम करीत राहणारीं मुलें थोडींच. जेमतेम शेंकडा दहा. बहुतेकांची वृत्ति निसर्गतःच खिलाडू, चंचल, स्वातंत्र्योन्मुख व कांहींशी खोडकर असणार. अशांपैकीं ज्यांना जरूर तसें व तितकें काम करतां येणार नाहीं त्यांच्यावर पंतोजींचा रोष होणारच. अशांची दशा अनेक दृष्टींनीं केंविलवाणी झाल्यास आश्चर्य नाहीं.

**शिक्षण**—काम करीत करीत घेणें (Learning by doing) हें तत्त्व शहाजोग आहे—मान्य आहे; जिवंत शिक्षणाचा तो पाया आहे. बाल-शिक्षणाच्या योजनेंत त्या तत्त्वाला अवश्यमेव अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. पण त्या तत्त्वाचा उपयोग करून त्याच्या जिवावर अनेक कुटुंबांचा संसार ज्यावर अवलंबून असा द्रव्योत्पादक किफायतशीर धंदा होऊं शकेल ही गोष्टच खोटी. मुलें आलीं कीं उपकरणांची मोडतोड व उधळमाधळ आलीच; ती टाळणें शक्यच नाहीं. स्वराज्य चालवितांना वा तें मिळविण्याचा यत्न करतांना हिमगिरी-तुल्य प्रमाद करणें हा प्रजेचा वा पुढाऱ्यांचा जन्मसिद्ध हक्क मानला जातो. पोहायला शिकणारानें चारदोन गटांगळ्या खाल्ल्याच पाहिजेत. नाकातोंडांत थोडेंबहुत पाणी गेलेंच पाहिजे; तरच त्याची पाण्याची भीति मोडते. नानाविध प्रयोग करतां करतां हातपाय भाजून घेणाऱ्या उमेदवारांमधूनच आजचे मोठमोठे शोधक व नवयुगप्रवर्तक निर्माण झाले आहेत. म्हणून चुका करतां करतांच शिकण्याची पूर्ण मुभा मुलांमुलींना मिळाली पाहिजे. त्यांच्यावर राग होऊं नये. त्यांच्या श्रमांतून थोडेंबहुत उत्पन्न झालें तर जरूर घ्यावें; मात्र त्यांच्या श्रमांवर शिक्षणाचा खर्च अवलंबून असूं नये. जें उत्पन्न होईल त्याचा उपयोग मुलांना बक्षिसांच्या रूपानें उत्तेजन देण्यांत व्हावा. मुलांचीं मनें प्रसन्न ठेवण्याचा हा एक उत्कृष्ट उपाय आहे.

**सारांश**—मुलांच्या श्रमांवर शाळा चालवून शिक्षण। प्रत्यक्ष रीतीनें स्वाव-लंबी करण्याची योजना पूर्णांशानें यशस्वी होईल हा संभव फार कमी. याचा अर्थ असा नव्हे कीं इतर कोणत्याहि अप्रत्यक्ष पद्धतीनें शिक्षण स्वावलंबी व इष्टफलदायी होऊं शकणार नाहीं. या बाबतींत अनुभवानें पटलेले कांहीं विचार, योजना व कार्यक्रम पुढें दिले आहेत. जागेच्या अभावीं ते अत्यंत त्रोटक पद्धतीनें द्यावे लागत आहेत याला इलाज नाहीं.

( १ ) हिंदुस्थान आज परतंत्र, निःशस्त्र, नानाविध पक्षोपपक्षभेदांमुळें विस्कळित व माणशीं रोजचें दीड आणाहि सरासरी उत्पन्न नसलेला असा आहे, हें बहुजनसमाजाचा शिक्षणक्रम ठरवितांना विसरून चालणार नाहीं. राजसत्ता खऱ्या खऱ्या अर्थानें हिंदवासीयांच्या हातीं आल्यानंतर त्या वेळचे शिक्षणतज्ज्ञ त्या वेळीं उत्पन्न झालेल्या अनेकपटींनीं जास्त अनुकूल अशा आर्थिक आणि राजकीय परिस्थितीचा फायदा घेऊन खालीं सुचविलेल्या योजनेपेक्षां जास्त खर्चाची, जास्त इष्टफलदायी व जास्त काळ चालणारी योजना कदाचित् आंखूं शकतील. तोंपर्यंत तरी अंथरूण बघूनच हिंदुस्थाननें पाय पसरले पाहिजेत. ज्या शिक्षण-प्रणालेनें जनतेवर ऐपतीपेक्षां खर्चाचा जास्त बोजा पडेल व जीमुळें काम तर नीट होणार नाहीं ती देशाला सध्यां तरी फायदेशीर होणार नाहीं. या बाबतींत ती पद्धति ठरविण्याची जबाबदारी शिरावर असणारांनीं उधळ-माधळ टाळून शक्य तों काटकसरीचेंच धोरण पत्करलें पाहिजे.

( २ ) जिनसांचे भाव उतरल्यानें ( लढाईसारख्या आगंतुक कारणानें कांहीं काळ भाव कडाडले तरी त्याचा फायदा शेतकऱ्याला न मिळतां मधल्या छोट्या मोठ्या दलालांसच मिळतो.) हिंदी शेतकऱ्यांची स्थिति अति शोचनीय झाली आहे. रोख पैसा त्याला दिसतच नाहीं. अशा स्थितींत त्याचीं मुलें कांहीं विशिष्ट वयाचीं होतांच व्यवहाराच्या दृष्टीनें तीं त्याला अत्यंत मोलाचीं वाटतात. त्यांना झेपतील तीं बारीकसारीक कामें तो त्यांच्याकडून करून घेतो. मजुरी देऊन तीं करून घेण्याची ऐपत फार थोड्यांना असते. या त्याच्या मुलांना सात सात वर्षें शाळेच्या कोंडवाड्यांत अडकवून ठेवणें त्याला परवडत नाहीं; तेथें तीं पोशाखी बनतात. थंडीवारा सोसण्याची त्यांची ताकद कमी होते. शेतीला तीं कंटाळ-तात. शहरी जीवनाचें त्यांना प्रेम वाटूं लागतें. आपल्या खेडवळ बांधवांबद्दल त्यांना तिटकारा वाटूं लागतो. त्यांच्या मनांत ग्रामीण जीवनाबद्दल अप्रीति उत्पन्न होते. शहरांतील कोणचीहि हलकी सलकी नोकरी शोधण्याच्या खट-पटीला ते लागतात व 'Where ignorance is bliss, it is folly to be wise' या म्हणीनुसार 'आपला पोऱ्या शाळेंत जाऊन न शिकता तरी बरें होतें' असें त्याच्या आईबापांना वाटूं लागतें. म्हणून शेतकऱ्याच्या मुलांच्या शिक्षणाचा काल एक वर्षाचाच असावा असें अनुभवांतीं विचार करून ठाम झालेलें मत आहे. वेळापत्रक खालीलप्रमाणें असावें.

( ३ ) सकाळीं ७ ते ७। राष्ट्रीय झेंडावंदन. ७। ते ७॥ चार दोन फर्लांग दौड. ७॥ ते ८ आत्मरक्षण करतां येईल इतकी सामुदायिक लाठी व कवाईत. ८ ते ८॥ झेंड्याभोंवतीं शिष्य-शिक्षकांची एकत्र न्याहारी. ८॥ ते ९॥ तिवारी कवींच्या संग्रामगीतांपैकीं एकराष्ट्रीयत्व, स्वाभिमान, जातीय ऐक्य, परंपरेचा अभिमान, स्त्री-दाक्षिण्य, वीरवृत्ति, आत्मविश्वास वगैरे विषयींचे संस्कार विद्यार्थ्यांच्या मनावर उमटवणाऱ्या निवडक गीतांचें एका सुरांत, तालांत व आवाजांत पाठांतर व वस्त्रस्वावलंबनार्थ त्याच वेळीं टकळीच्या साहाय्यानें सूत्रयज्ञ. ९॥ ते १०॥ श्री. अप्पासाहेब भागवतांच्या पद्धतीनुसार पहिल्या दोन महिन्यांत अक्षर-ओळख. पुढच्या तीन महिन्यांत लेखन स्पष्ट, सुवाच्य, शुद्ध व वळणदार व्हावें म्हणून कागदावर प्रथम पेन्सिलीनें व नंतर शाईनें पाठांतरित भाग लिहिणें. मध्यें एक महिना सुट्टी. नंतरच्या सहा महिन्यांत पाठांतरित भागाचा अर्थ व स्पष्टीकरण लिहून घेणें. रोज शेवटच्या पंधरा मिनिटांत परवाचा. १०॥ ते ११ जमीनसपाटी, वाफे, पाटबंधारे वगैरेंची रचना, खतांची जोपासना वगैरेंची माहिती शाळेच्या बागेंत देणें. ११ ते २ सुट्टी. दुपारीं २ ते ३ कात्री, फूटपट्टी, जाड कागद, डिंक वा खळ यांच्या साहाय्यानें डबे, पेट्या, शाळेची इमारत, घरें, बंगले वगैरे पहिल्या दोन महिन्यांत करून घेणें. नंतरच्या दोन महिन्यांत काड्याच्या पेट्यांतून विटा पाडणें, त्या भट्टींत भाजणें व त्यांचीं घरें, देवळें वगैरे इमारती बांधून घेणें. व्यावहारिक रेखाकला व प्रमाणबद्धता यांचें ज्ञान यानें येईल. सुट्टीपूर्वी एक महिना चिखल, वाळू, सीमेंट व दगड यांचा उपयोग करून प्रथम गांव, नंतर तालुका, जिल्हा, प्रांत व देश यांचा नकाशा भूगोलाचें प्रात्यक्षिक ज्ञान होण्यासाठीं जमिनीवर तयार करून घेणें. शेवटच्या सहा महिन्यांत प्रथमोपचार, शरीररचना, शुश्रुषा, रसायन-पदार्थविज्ञान व वनस्पतिशास्त्र यांचीं मूलतत्त्वें वगैरेची कामचलाऊ त्रोटक माहिती देणें. ३ ते ४ पाठांतरित संग्रामगीतांचें मर्म प्रश्नोत्तररूपानें समजावून देणें. शिक्षक लायक असेल तर हें करीत असतां धर्म, संस्कृति, राजकारण, समाजशास्त्र, अर्थविद्या वगैरेबद्दलची माहिती सोप्या भाषेंत तो विद्यार्थ्यांना ऐतिहासिक गोष्टींचा उपयोग करून देऊं शकतो असा अनुभव आहे. त्याचवेळीं सूत्रयज्ञहि. ४ ते ५ बागेंत भाजीपाला, फलझाडें, धान्य, कपाशी वगैरेची लागवड व जोपासना यांची सप्रयोग माहिती. ५ ते ६ आट्यापाट्या, हुतुतू, फूटबॉल-

सारखे सामुदायिक खेळ. ६ ते ६॥ झेंड्याभोंवतीं बसून एक दिवस ससूत्रयज्ञ भजन; दुसऱ्या दिवशीं पाठांतरित अभंग व पद्यें यांचें स्पष्टीकरण. ६॥ ते ७ झेंडावंदन व सुट्टी.

( ४ ) वरील वेळापत्रकानुसार एक वर्षपर्यंत मुलांना अखंड, आस्थेनें शिक्षण मिळाल्यास त्यांना शेती, वस्त्रस्वावलंबन, साक्षरताप्रसार, आरोग्यरक्षण, परस्पर-सहकार्य व आत्मसंरक्षण यांना जरूर तें प्राथमिक शिक्षण उत्तम रीतीनें मिळेल. दुसऱ्या वर्षीं त्याच वयाचीं आणिक मुलें घ्यावींत व त्यांना त्याच पद्धतीनें शिक्षण द्यावें. हें एका वर्षांत घेतल्यावर पुढचा काळ विद्यार्थ्यांनीं आपआपल्या पालकांच्या हाताखालीं त्यांच्या त्यांच्या पिढीजात धंद्यांत त्यांना साहाय्य करून त्या धंद्याचें उमेदवारपद्धतीनें पुढील प्रत्यक्ष शिक्षण घेण्यांत घालवावा. शाळेंत मिळालेल्या प्राथमिक शिक्षणाचा या कामीं त्यांना आणि त्यांच्या पालकांना अति उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं. पालकांना लायक असा आज्ञाधारक मदतनीस मिळून त्यांचें काम हलकें होईल. शाळेच्या पांजरपोळांत सात सात वर्षें अडकून पडून होणारें मुलांचें नुकसान थांबेल. तसेंच गचाळ शिक्षणांत देशाच्या व अप्रत्यक्ष रीतीनें शेतकऱ्यांचा निष्फळ खर्च होणाऱ्या कोट्यवधि रुपयांची बचत होईल. जगतांत सार्वत्रिक शस्त्रास्त्रबंदी ( Disarmament ) झालें नाहीं तोंवर, स्वराज्य असो वा परराज्य असो, देशावरचा लष्करी खर्चाचा कोट्यवधि रुपयांचा भार कमी होणें नाहीं. तो वाढतच जाण्याचा संभव. खेरीज कर्जरोख्यांचें द्यावें लागणारें व्याज, बडे बडे पगार व पेन्शनें, राज्य-कारभाराचा वाढता खर्च वगैरेंचें ओझेंहि चालूंच राहणार. जगांतील सर्व देशांत आमूलाग्र क्रांति होऊन राष्ट्रांची साम्यवादाच्या तत्त्वावर पुनर्घटना होई-तों यांत बदल होणें शक्य नाहीं. तोंवर सर्व करांचा भार अखेर शेतकऱ्यावरच प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष पडणार; म्हणून गांवांनींच त्यांच्या हातीं आहे त्या सत्तेचा उपयोग करून काटकसर, सहकार्य व जादा श्रम यांच्या तत्त्वावर गांवराज्यांची स्थापना केली पाहिजे व त्यासाठीं त्या कार्याला अनुकूल अशाच स्वावलंबी व स्वतंत्र शिक्षणाची योजना झाली पाहिजे.

( ५ ) वरील योजना सुचविण्यांत असा हेतु नाहीं कीं विद्यार्थ्यानें शाळेंत एक वर्ष शिक्षण घेतल्यावर पुढें त्याचें शिक्षण अजिबात थांबावें; तें चालूंच

राहवें. मात्र त्याला दिवसाच्या शाळेंत तें न मिळतां टस्केजी पद्धतीनें रात्रींच्या शाळेंत जन्मभर मिळावें. व्याख्यान, पुराण, प्रवचन, भजन, कथा, कीर्तन, चित्रपटदर्शन, चर्चा, वृत्तपत्रें व पुस्तकवाचन वगैरेरूपानें त्याला तें कंटाळा येणार नाहीं अशा पद्धतीनें मिळावें व त्याचा बहुश्रुतपणा वाढावा. शेतीचा मोसम संपल्यावर उरूस, भंडारे, उत्सव यांच्या दिवसांत प्रौढ विद्यार्थ्यांसाठीं छावण्या काढून जनतेची स्वयंसेवा करण्याची हौस त्यांच्या मनांत उत्पन्न होईल अशी तजवीज व्हावी. योग्य मार्गानें काम झाल्यास त्यांचा उपयोग रात्रीच्या शाळेचे वर्ग चालविण्याकडे होऊं शकेल. वरील रूप-रेखेंत स्थानिक परिस्थिति, रीतीरिवाज, परंपरा, ऋतुमान वगैरे लक्षांत घेऊन अंमलबजावणीच्या बाबतींत जरूर तो लवचिकपणा ठेवावा. विद्यार्थ्यांत चाळणी व्हावी व विशेष बुद्धिमान् ठरणाऱ्या विद्यार्थ्यांसच फक्त सार्वजनिक खर्चानें शहरांत दुय्यम व उच्च शिक्षण घेण्यास पाठवावें. मुलांमुलींना सालेसाल पंढरीच्या वाऱ्या करूं देण्याची प्रथा एकदम बंद पडलीच पाहिजे. ती चालू ठेवण्याची विद्यार्थ्यांना मुभा देणें म्हणजे राष्ट्रीय संपत्ति, काळ व शक्ति यांची अक्षम्य उधळपट्टी होय.

(६) वरील शिक्षणक्रम यशस्वी होणें न होणें शिक्षकाच्या लायकी-नालायकीवर अवलंबून राहील. तो यशस्वी होतो असा प्रत्यक्ष अनुभव आहे. शिक्षक मात्र शहाजोग वृत्तीचा पाहिजे.

**मोलें घातलें रडाया । तेथें कैंची असूं, माया ?॥**

या थाटाचा असून चालणार नाहीं. गतमन्वंतील ठोकठशाच्या फर्म्याचे, पगारी वृत्तीचे शिक्षक या कामीं उपयोगी पडण्याची आशा कमीच. देशाच्या सुदैवानें व थोर पुढाऱ्यांच्या पुण्याईनें शेतकऱ्यांची संघटना व सेवा करण्याची इच्छा झालेले उत्साही नवयुवक व युवति यांचा मोठा वर्ग आज निर्माण झाला आहे. त्यांची संख्याहि वाढत जाण्याचीं सुचिन्हें दिसत आहेत. त्यांनीं हें काम हातीं घेतलें पाहिजे. त्यासाठीं जरूर तें शिक्षण त्यांनीं अगोदर घेतलेलें असलें पाहिजे. सरकारी वा खाजगी संस्थांनीं तदर्थ दोन-दोन, चार-चार महिन्यांच्या छावण्या काढून त्यांत त्यांना हें शिक्षण दिलें पाहिजे. तें घेऊन स्वयंसेवक खेडेगांवांत गेले कीं तेथें त्यांच्यासाठीं एकदम जेवणाचें ताट वाढून ठेवलेलें कोठून असणार ? त्यासाठीं त्यांची वर्ष सहा महिने रामदासी

परंपरेनुसार मधुकरी वा कोरडी भिक्षा मागूनहि जनतेची अखंड सेवा करण्याची तयारी असली पाहिजे. तरच खेडेगांवांतील जनतेची आज पांढरपेशांवरील सकारण नष्ट झालेली श्रद्धाबुद्धि जागृत होईल; आणि एकदां खेडुतांची कार्यकर्त्यांवर खरीखुरी श्रद्धा बसली कीं त्यांना—

**निर्वाहापुरतें अन्न, आच्छादन। आश्रमासी स्थान, कोपी, गुहा॥**

या वचनानुसार धान्य व वस्त्रादि आवश्यक गोष्टींची कधींहि तूट पडणार नाहीं. त्या गोष्टी त्यांना खेडेगांवांतील जनता जरूरीहूनहि अनेकपटीनें जास्त देईल; इतकेंच नव्हे तर प्रसंगीं खेड्यांतील भाविक लोक त्यांच्यासाठीं प्राण देण्यासहि बिलकूल कचरणार नाहींत असा निदान महाराष्ट्राचा तरी गतकालीन अनुभव आहे. मात्र एक गोष्ट; रोख पगाराची मात्र कार्यकर्त्यानें अपेक्षा करूं नये. आडांतच नाहीं तर पोहऱ्यांत येणार कोठून? भावउतारामुळें पट्टीपासोडी भरण्याचीहि जिथें शेतकऱ्यांना मुष्कील तेथें ते कार्यकर्त्यांना रोख पगार कोठून देणार? शक्य नाहीं. (खेड्यांतील सुखवस्तु लोकांनाहि त्यांनीं मनावर घेतल्यास वरील पद्धतीनें स्वावलंबी शिक्षणाचा प्रश्न सोडविण्याच्या कामीं मदत करतां येईल.)

(७) बेकारीच्या नांवानें आज आरडा चालू आहे. हसूंच येतें. ती आहे कोठें? मामलेदार कचेरीत वा अबकारींत नोकऱ्या मिळत नसतील. डॉक्टऱ्यावकिल्या चालत नसतील. याचा अर्थ हा नव्हे, कीं देशांत कामेंच नाहींत. त्यांचे तर डोंगर पडले आहेत. नुसता मध्य महाराष्ट्र घेतला तर दहा जिल्हे मिळून दहा हजार लहानमोठीं खेडीं आहेत. प्रत्येकीं एक म्हटला तरी दहा हजार कार्यकर्त्यांना आज मध्य महाराष्ट्रांत काम आहे. निदान जिथें शाळा नसेल त्या गांवांत तरी त्यांना तें आहे. बेकारीच्या नांवानें कां तक्रार करावी? अडचण कोठें येते तें उघड आहे. वरील पद्धतीनें काम करावयाचें तर कार्यकर्त्यांना आपल्या राहणींत आमूलाग्र बदल करावा लागेल. शहरी, खुशालचेंडू जीवनाचा मोह सोडावा लागेल. त्यांना—

**रामरसाची मात्रा घ्यावी। त्यानें पथ्यें सांभाळावीं॥**

या वचनाला मान द्यावा लागेल. मेणबत्ती दोन्ही टोकांनीं जळत ठेवून चालणार नाहीं. किंमत ही दिलीच पाहिजे; तरच खऱ्या खऱ्या रामराज्याची देशांत संस्थापना होणें आणि त्यासाठीं शेतकऱ्यांची परिणामकारक संघटना

करणें यासाठीं जरूर त्या सर्वांगीण, सर्वव्यापी व सर्वशक्तिमान् अशा तेजस्वी शिक्षणाचा प्रसार होऊं शकेल. जनतेचें अज्ञान, परावलंबन, दारिद्य, खुळ्या समजुती, उपासमार, अनारोग्य, कर्जबाजारीपणा वगैरे रूपांनीं देशांत जिथें तिथें दिसणारे गुलामगिरीचे तुरुंग वेळेवर फोडावयाचे असतील तर त्यासाठीं स्वावलंबन आणि कष्टमय जीवन यांच्या अग्निदिव्यांतून स्वतःला क्रांतिकारक म्हणवून घेण्यांत भूषण मानणाऱ्या नवयुवकांनीं व युवतींनीं जाण्याचें धाडस केलेंच पाहिजे. खरें क्रांतिकारकत्व मिजासखोर वेशभूषा, विलासी जीवन आणि नटवेपणा किंवा नकली साहित्य, संगीत व कला यांचा दिखाऊ दिमाख अगर प्रणयपांडित्याच्या नादान नशेनें भोळ्याभाबड्या पोरींसोरींना भुलवून नादीं लावणें यांत नसून तें ज्ञानेश्वर, विद्यारण्य, रामदास, तुकाराम यांच्यासारखे प्रभावी संत आणि शिवाजी, झांशीची राणी, मॅझिनी, ग्यारिबॉल्डी, जॉर्ज वा बुकर टी. वॉशिंग्टन, सुन्यत्सेन, टिळक, डॉ. बेझंट किंवा लेनिन यांच्यासारख्या चोवीस तास भुकेल्या भगवंतासाठीं झिजणाऱ्या खऱ्याखुऱ्या स्वातंत्र्यवीरांच्या अनुकरणांतच आहे. तें झाल्यास मुंगळे गुळाभोंवतीं त्याप्रमाणें खेडूत-जनता कार्यकर्त्यांभोंवतीं जमेल व त्यांच्यावर त्यांच्या योगक्षेमाला जरूर त्या गोष्टींचा वर्षाव करील; आपल्या शिक्षणाचा प्रश्न स्वावलंबी पद्धतीनें सोडवून घेईल; आपली सर्वांगीण शक्ति वाढवील; परकीयांवर परिणामकारक दाब आणण्यास समर्थ होऊन स्वतःवरचा आर्थिक बोजा कमी करून घेऊं शकेल; स्वतःची परकीयांकडून होणारी पिळणूक थांबवण्याचें सामर्थ्य तिच्यांत निर्माण होईल व अशा रीतीनें प्रत्यक्ष नाहीं तरी अप्रत्यक्षपणें स्वावलंबी लोकशिक्षणाचा प्रश्न सुटेल; खऱ्या घटना-परिषदेचे आणि तज्जन्य अस्सल स्वातंत्र्याचे दरवाजे खुले होतील.

वंदे मातरम

# खाजगी संस्था व माध्यमिक शिक्षण

लेखक—नी. वा. किंकर

माध्यमिक शिक्षणाच्या प्रसारासाठीं खाजगी संस्था निघून आतां अर्ध शतकाहून अधिक काळ लोटला आहे. या दीर्घकालांत निरनिराळ्या संस्था निघून त्यांची प्रगति कशी झाली, त्यांनीं राष्ट्राच्या शैक्षणिक व तदनुषंगानें सामाजिक व राजकीय वाढीस कोणती मदत केली, ज्या हेतूनें प्रथमारंभीं या संस्था स्थापण्यांत आल्या तो कितपत साध्य झाला, कालाबरोबरच या संस्थांत कोणते दुर्गुण शिरले व ते कसे पोसले गेले, संस्थेच्या संख्येबरोबर त्यांच्या कोणत्या गुणांची वाढ झाली, सरकारी धोरणामुळें व जनतेच्या बदलत्या वृत्तीमुळें कार्यावर काय परिणाम झाले, असे व अशासारखे इतर किती तरी प्रश्न या विषयावर विचार करणारास सुचतात. या सर्वांचा अंशतःसुद्धां परामर्ष घेणें या ठिकाणीं तरी अशक्य आहे. तरी पण त्यांपैकीं कांहीं थोड्याशा मुद्द्यांवर त्रुटित व मर्यादित स्वरूपाचे विचार प्रस्तुत लेखांत मांडण्याचा प्रयत्न केला आहे. हें करीत असतांना निमसरकारी खाजगी संस्था व बहुंशीं पुण्यांतीलच संस्था डोळ्यांपुढें ठेवून मांडणीचें कार्य मर्यादित केलें आहे.

**थोडा इतिहास**—खाजगी संस्थेच्या द्वारा जनतेस माध्यमिक शिक्षण देऊन तिला सज्ञान करणें व हें विद्यादानाचें कार्य अत्यल्प खर्चांत व स्वार्थत्यागबुद्धीनें करणें हा उदात्त हेतु धरून कै० चिपळूणकर यांनीं एक नवीन शैक्षणिक परंपरा सुरू केली असें म्हणतात; व तें यथार्थ आहे. विष्णुशास्त्री यांच्या कार्यारंभापूर्वी मिशनरी लोकांनीं चालविलेल्या संस्था व सरकारी संस्थाहि या कार्याकरितां होत्याच, परंतु त्यांचा हेतु व पद्धति हीं भिन्न होतीं. नाहीं म्हणायला कै. भावे यांचीच काय ती एक शाळा खाजगी संस्था म्हणून या क्षेत्रांत उतरली होती. परंतु सरकारी सहाय्याची शक्यतों अपेक्षा न धरतां हें दुय्यम शिक्षणाचें कार्य आपल्या ताब्यांत घेऊन राष्ट्रकार्यास मदत करावी अशा कल्पनेस (जिला **चिपळूणकर प्लॅन** म्हणतां येईल) मूर्त स्वरूप देऊन

एक नवीन पायंडा जर कोणी पाडला असेल तर तो कै. चिपळूणकर व त्यांचे सहकारी टिळक व आगरकर यांनींच होय; असें म्हणण्यांत कै. भावे यांच्या कार्यास व अग्रेसरत्वास कमीपणा येत नाहीं. सन १८५४ सालच्या 'Dispatch' (खलित्या) मध्यें, (ज्याला हिंदी शिक्षणाची आद्य सनद Magna Charta म्हणतात) खाजगी शैक्षणिक प्रयत्नास मदत करण्याची आशा व ग्वाही व्यक्त करण्यांत आली होती. मात्र असें करण्याचा हेतु मिशनरी संस्थांनाच अल्पस्वल्प मदत व्हावी असें एकंदरींत दिसतें. प्रो. परांजपे म्हणतात त्याप्रमाणें ( Source–Book of Modern Indian Education ची प्रस्तावना ) 'A demand was made that Government should encourage private efforts, which in those days, meant missionary efforts' अशा स्थितींत 'शिक्षणांतच आपल्या देशाचा उद्धार आहे' या श्रद्धेनें आणि परकीयांकडून व परधर्मीयांकडून मिळत असलेल्या ज्ञानदानाऐवजीं आपण स्वतः या ज्ञानगंगेचा 'सुकाळ मराठियेच्या देशी' करावा या उत्कट भावनेनें जें कार्य कै. चिपळूणकरांनीं महाराष्ट्रांत सुरू केलें तें अभिनव होतें यांत शंका नाहीं.

ज्या धडाडीमुळें त्यांना शैक्षणिक क्षेत्रांत यश मिळालें तिचा व इतर गुणांचा जनतेवर इष्ट तो परिणाम लौकरच झाला. परंपरा सुरू झाली, रुजूं लागली व लौकरच नूतन मराठी विद्यालय निघालें. प्रथमारंभीं सरकारी मदतीच्या 'काडी'चा आधार कां होईना पण तो देण्याचा उदारपणा दाखविण्यांत आला. ( जनरल लॉर्ड केर यांच्या शब्दांत म्हणावयाचें म्हणजे An encouraging smile and a helping hand. ) जनतेची सक्रिय सहानुभूतीहि मिळूं लागली. शैक्षणिक कार्याबरोबरच आपल्या हातून राष्ट्रीय व सामाजिक सेवा होत आहे व त्याची जाणीव जनतेस पटूं लागली आहे या भावनेमुळें कार्यकर्त्यांचा उत्साह व कार्याचें क्षेत्र वाढूं लागलें. हळूहळू क्षेत्राच्या विस्ताराबरोबर निरनिराळ्या कारणांनीं सरकारची वृत्ति मात्र गढूळ झाल्यासारखी दिसूं लागली. वाढत्या व्यापाबरोबर इतर 'संताप' आपले प्रभाव दाखवूं लागले, व दुय्यम शिक्षणाशीं निगडित झालेल्या संस्थेवर सरकारची करडी नजर आली. केलेल्या कार्याचा प्रखरपणा अधिकाऱ्यांच्या डोळ्यांवर येऊं लागला. एका बाजूला अत्याग्रही पण स्वकीय जनता व दुसऱ्या

बाजूला परकीयप्रधान हुकमी अधिकारी वर्ग. या द्वंद्वांतून 'शीर सलामत' राहणें सुद्धां कांहीं संस्थांना कठीण पडूं लागलें व परिस्थितीची झळ अनावर लागूं लागली. राष्ट्रीय शिक्षणाकरितां मनापासून खटपट करणाऱ्या अभिमान्यांकडून एका बाजूनें टोले, तर आर्थिक व एका अर्थानें राजकीय नाड्या ज्यांच्या हातांत अशा सरकारी विद्याखात्याकडून दुसऱ्या बाजूनें दाबादाबी या प्रसंगांत संस्था सांपडल्या. या प्रसंगानुसार कै. टिळक यांनीं 'चतकोर भाकरीची गुलामगिरी' या लेखांत दिलेले विचार मार्मिक पण परिस्थितिदर्शक आहेत. 'हल्लींची सरकारी शिक्षणपद्धति सदोष आहे; इतकेंच नव्हे तर खाजगी शाळांच्या द्वारें हा दोष काढून टाकण्याची जी उमेद होती ती आतां राहिलेली नाहीं. खाजगी शाळांच्या चालकांनीं बराच स्वार्थत्याग करून त्या आजपर्यंत चालविल्या आहेत ही गोष्ट आम्हांला मान्य आहे. पण हा त्यांचा स्वार्थत्याग पालटलेल्या सरकारी धोरणानें आमच्या नाशास आतां कारणीभूत होऊं लागला आहे.' सरकारी नियंत्रणाला झुगारून देऊन स्वतंत्र राष्ट्रीय शाळा काढण्याचे विचार पुढें येऊन ते कृतींतहि उतरले गेले. कै. विजापूरकर व इतर मंडळींनीं आपल्या ध्येयानुसार राष्ट्रीय शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून भगीरथ प्रयत्न केले. समर्थ विद्यालय, चिंचवड येथील संस्था व इतर ठिकाणीं स्थापलेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा यांनीं स्वार्थत्यागपूर्वक केलेली कामगिरी इतर खाजगी संस्थांच्या कार्याप्रमाणें जरी बाह्यस्वरूपांत दाखवितां येण्याजोगी नसली तरी त्यांची शैक्षणिक कामगिरी व त्यांनीं प्रसृत केलेली विचारक्रान्ति दृष्टीआड करितां येणार नाहीं. एवढेंच नाहीं तर असें कबूल करावें लागेल कीं अप्रत्यक्ष रीतीनें त्यांनीं शिक्षणसंस्थांना विचारवन्त व अन्तर्मुख करून पुढील मार्गाची दिशा दाखविली.

**आतांची स्थिति:**—या काळानंतर पुन्हा एकदां १९२० च्या सुमारास असहकारितेच्या झंझावातापुढें या खाजगी संस्थांचें काय होणार ही विवंचना कांहींना पडली. आघात जोराचे असल्यामुळें कांहीं ठिकाणीं संस्था पूर्णपणें राष्ट्रीय झाल्या. तरी पण असहकारितेच्या ओहोटीबरोबर पुन्हा खाजगी संस्थांच्या कार्यास जोर आला व आज कालाच्या ओघाबरोबर वाहत आलेल्या 'भल्याबुऱ्या' गोष्टींची शिदोरी घेऊन स्तुतिनिंदेचे भार वाहत ६० वर्षांचा दीर्घ व चढउताराचा प्रवास या परंपरेनें केला आहे. राजकीय सामाजिक व आर्थिक स्थित्यंतराच्या

हेलकाव्यांचे धक्के सहन करीत, क्वचित् प्रसंगीं सरकारची वक्रदृष्टि तर जनतेची सहानुभूति, केव्हां केव्हां एकाचें जबर नियंत्रण तर दुसरीकडून अभिमानानें पाठिंबा, कधीं कधीं शिक्षणाच्या स्वतंत्र प्रयत्नास राष्ट्रीय असें नांव देऊन या संस्थेबद्दल दाखविण्यांत आलेली तुच्छता, व प्रसंगीं त्या बंद पडाव्यात असा चंग तर लागलीच स्नेहार्द्र दृष्टि, या सर्व प्रसंगांतून जेवढें करतां येईल तितकें करीत या परंपरेनें आजचा हा टप्पा गाठला आहे. निर्विकार बुद्धीनें विचार केल्यास महाराष्ट्राचें द्रव्यबळ व मनुष्यबळ लक्षांत घेतां या परंपरेनें केलेलें कार्य स्पृहणीय आहे असें म्हणावें लागतें. डेक्कन एज्युकेशन सोसायटी, शिक्षण-प्रसारक मंडळ व इतर संस्थांत शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांनीं व या संस्थेच्या कार्यामुळें स्फूर्ति मिळालेल्या शिक्षणप्रेमी व्यक्तींनीं इतरत्र याच परंपरेला अनुसरून हीच कार्यपद्धति व घटना घेऊन दुय्यम शिक्षणाची वाढ केली आहे. आज महाराष्ट्रांतच नव्हे तर कर्नाटक व गुजराथेंतसुद्धां खाजगी संस्था निघत आहेत. विश्वविद्यालयीन सुधारणांबाबत नेमलेल्या सेटलवाड कमिटीनें यासंबंधीं व्यक्त केलेला अभिप्राय यथायोग्य आहे.

"We should take this opportunity of referring with appreciation, to the several Educational Societies which have come into existence on the model of the D. E. Society, in which a band of enthusiastic young men, usually graduates, bind themselves to serve for a certain period of years on small salaries in the High Schools conducted by these Societies. Some very good High Schools are maintained by such organisations, which form particularly in Maharashtra, an admirable feature of educational enterprise in this presidency."

**झालेलें कार्यः**—हा आढावा घेण्याचा हेतु संस्थांचें कार्य तोलतांना त्यांची पार्श्वभूमि कळावी हा आहे व ती समजल्यावर आज ज्या एकांगीं व तुच्छतादर्शक वृत्तीनें त्याकडे पाहण्यांत येतें त्यांत थोडासा फरक होईल असें वाटतें. संस्थेवर असे आक्षेप येतात कीं ज्या कांहीं 'आकांक्षा' या संस्थेबद्दल बाळगण्यांत

आल्या होत्या त्या सफळ झाल्या नाहींत. एकीकडे विश्वविद्यालय तर दुसरीकडे शिक्षणखातें या आडाविहिरीच्या मार्गांतून 'घोपटमार्गा सोडुं नको' हेंच ध्येय बाळगून या शिक्षणसंस्था कशाबशा कार्य करीत होत्या व आहेत. व्यापक दृष्टीच्या अभावीं दुय्यम शिक्षणाचा जसाजसा प्रचार होऊं लागला तसतशी त्याची गुणवत्ता (Quality) कमी होऊं लागली व आजमितीला समाजाची एक गरज भागविण्यापलीकडे जास्त कार्य पुष्कळशा शिक्षणसंस्थांकडून होऊं शकत नाहीं. या व अशांसारख्या आक्षेपांची तीव्रता, ज्या परिस्थितींत या संस्था जगल्या व वाढल्याहि त्या परिस्थितीची साग्र कल्पना आल्यास, बरीच कमी होते. भोंवतालच्या वातावरणाचे वारे कार्यास बाधक असतांनासुद्धां शैक्षणिक क्षेत्रांत सुधारणा करण्याचें काम–जें काम सरकारनें करणें खरोखरीच प्राप्त होतें–करण्यास त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. 'घोपटमार्गा'नें जात असतांनासुद्धां अभिनव व उपयुक्त मार्ग चोखाळण्याचा यशस्वी प्रयत्न कितीतरी ठिकाणीं करण्यांत आला. अभ्यासक्रमांत मराठी भाषेला योग्य तो मान मिळावा म्हणून कै. प्रो. नाईक, कै. प्रो. लिमये व प्रो. परांजपे यांनीं आटोकाट प्रयत्न केले. शारीरिक शिक्षणावर जोर, औद्योगिक शिक्षणाची सुरुवात, स्काउटची चळवळ, स्वदेशी वस्तुभांडाराचा प्रचार इत्यादि कितीतरी लोकोपयोगी व हितकर उपक्रम संस्थांनीं केले व त्याबद्दल शिक्षणाधिकाऱ्यांनीं प्रशंसोद्गार काढिले आहेत. राजाश्रय नसतांना व समाजाचाहि पूर्ण पाठिंबा नसतांना समंजस धोरणानें व 'One step is enough for me' किंवा 'यत्स्वल्पमपि तद्बहु' या उक्तीप्रमाणें पुष्कळशा संस्था काम करीत होत्या, व त्यामुळेंच आज कांहीं तगून आहेत व कांहीं वाढीस लागल्या आहेत. शैक्षणिक बाबतींत या खाजगी संस्थेनें केलेल्या कार्याची तारीफ करून डॉ. मेस्टन आपल्या ग्रंथांत म्हणतात कीं, "Private effort gives to India in the service of education a spirit it cannot do without and a contribution which is an integral part of the National Life. That is why private effort appears at every level of educational activity and that is why it must remain there."

( *Indian Educational Policy*, page 253. )

**उद्यांचें कार्यः**—मात्र हें खरें कीं आतां शिक्षण प्रसार हें एकच ध्येय डोळ्यांपुढें ठेवून काम करण्याचे दिवस संपले आहेत. या कार्याकरितां साठ वर्षें गेलीं व तीं सकारणीं पडलीं. आतां नवीन जोमानें व मागील काळानें दिलेला शहाणपणा घेऊन या परंपरेंतील सर्व दुय्यम शिक्षण-संस्थांनीं परिस्थित्यनुरूप व आपापल्या मगदुराप्रमाणें पाऊल पुढें टाकण्याचा निश्चय केला पाहिजे.

कांहींच्या मतें आज तरी प्राथमिक व उच्च शिक्षण यांच्यामधील एक दुवा या व्यतिरिक्त दुय्यम शिक्षणाला किंमत नाहीं; पण तें व्यापक नाहीं. प्राथमिक शिक्षण सुद्धां त्यांच्या मतानें फक्त साक्षरताच. पण वर्धा शिक्षण-योजनेनें या कल्पनेंत अन्तर्बाह्य सुधारणा केली आहे. तीच व्यापक दृष्टि दुय्यम शिक्षणास लावून पूर्वीच्या संस्थेच्या कार्यांत आलेल्या अडचणी टाळून पुढें पाऊल टाकलें तरच विकासाला वाव आहे.

**व्यापक धोरण**—दुय्यम शिक्षण घेऊन बाहेर पडणारा विद्यार्थि नागरिकत्वाचे हक्क भोगण्यास वयपरत्वें लायक होतो. पण हक्क समजून नागरिक या दृष्टीनें येणारी जबाबदारी जाणून ती पार पाडण्याची क्षमता त्याच्या अंगीं आणणें हें दुय्यम शिक्षणाचें प्रधान उद्दिष्ट व तें त्याची सर्वांगीण उन्नति करून साधणें हें संस्थेचें आतां कार्य झालें आहे. यौवनदशेचा प्रारंभ व विकास-काल जेव्हां सुरू होतो तीच वेळ दुय्यम शिक्षणाची असते; म्हणून आयुष्याची पूर्वतयारी ज्या वेळेस करावयाची त्या वेळेस मिळणाऱ्या ज्ञानाची व अनुभवाची योग्यता श्रेष्ठ, हें जाणून दुय्यम शिक्षणांतील अभ्यासक्रम बौद्धिक, शारीरिक व व्यवसायात्मक या तिहेरी अंगांनीं जितका समृद्ध करतां येईल तितका करणें इष्ट व आवश्यक आहे. कारण त्यामुळेंच विद्यार्थ्यांना आपल्या आवडी-निवडी, पात्रापात्रता उमगण्यास व विशिष्ट दृष्टीनें स्वतःचा विकास—व्यक्तीच्या व समाजाच्या कल्याणाकरितां–करून घेण्यास अवसर व संधि मिळणार आहे. विद्यार्थ्यांचा बौद्धिक व शारीरिक विकास साधून त्यांना सुसंस्कृत, रुचिसंपन्न व कार्यक्षम नागरिक बनविणें हें दुय्यम शिक्षणाचें उच्च ध्येय. तें साधण्याकरितां त्यांतील बौद्धिक विकासाच्या विविध अंगोपांगावर भर देऊन रुचिवैचित्र्य लक्षांत घेऊन पूर्वीच्या परंपरेचा 'गाभा' अचल ठेवून पूर्वीचा अनुभव जमेस घेऊन इतर गोष्टींची जोड दिली पाहिजे.

**कार्याच्या महत्वाच्या गरजाः**—संस्था चालविण्यास, ती तगविण्यास, कार्यक्षम करण्यास मनुष्यबळ व द्रव्यबळ पाहिजे. नवीन व्यापक धोरण स्वीकारण्यास द्रव्य व त्याचा योग्य उपयोग करण्याकरितां माणसें पाहिजे आहेत. मागील 'ठेचां-' वरून मिळालेल्या शहाणपणामुळें ध्येयवादी व्यक्तीच्या अभावीं संस्थेचें कार्य जसें अप्रभावी होतें त्याचप्रमाणें द्रव्यबळाचें साहाय्य नसल्यास कार्यास सफलता येत नाहीं हें आतां कळून चुकलें आहे. संस्थेचा पुढील मार्ग सुकर व यशोदायी व्हावयाचा असल्यास त्यास एका बाजूनें सरकार व जनता यांच्या-कडून द्रव्यबळाचा पुरवठा व दुसरीकडून निःस्वार्थी, ध्येयनिष्ठ, विचारवंत व अविरत कार्यकर्ते यांचा लाभ झाला पाहिजे.

**द्रव्यबळ**—विस्ताराच्या दृष्टीनें प्राथमिक शिक्षण ही खर्चाची बाब आहे यांत शंका नाहीं; पण दुय्यम शिक्षण हेंहि त्याला लागणारी साधनसामुग्री, उपकरणीं इत्यादींच्या दृष्टीनें कमी खर्चाची बाब नाहीं. दुय्यम शिक्षण अधिक प्रभावी व सफल करण्याच्या दृष्टीनें ही साधनांची अनेकता वाढतच आहे, पण त्या मानानें उत्पन्नाचें मार्ग मात्र वाढत नाहींत. प्रथमपासूनच दुय्यम शिक्षणाचे कार्य खाजगी संस्थांवर टाकून आणि एका विवक्षित मर्यादेपर्यंत खर्चाचा वाटा उचलण्याचें पत्करून सरकारनें हें साधनांचें वैपुल्य पुरविण्याचें काम अंगाबाहेर टाकलें. दुय्यम शिक्षणाचा महत्त्वाचा उत्पन्नाचा मार्ग म्हणजे फीचें उत्पन्न; पण समाजाच्या आर्थिक परिस्थितीशीं हा प्रश्न निगडित असल्यामुळें खर्च भागविण्याइतकेंहि उत्पन्न त्यांतून निघत नाहीं असा अनुभव आहे. त्याच कारणामुळें प्रथमपासूनच संपन्न नागरिकांच्या उदारतेवर खाजगी संस्थांना अवलंबून रहावें लागे; पण राष्ट्रीय हिताच्या वाढीसाठीं संगीत, साहित्य, रुग्णालयें इत्यादि शाखोपशाखा निर्माण होऊं लागतांच धनिकांच्या द्रव्याचा ओघ अनेक प्रवाहांनीं वाहूं लागला. त्यांत इतर राजकीय, सामाजिक गोष्टींची भर पडून देशांतील बेकारी हा दुय्यम शिक्षणाचा परिणाम अशी विपरीत समजूत दृढावून, जनतेकडून येणारें द्रव्यसाहाय्य लाभणें दुष्कर होऊं लागलें व ध्येय पुढें असून सुद्धां तें कृतींत आणण्यास लागणारी शक्ति असून सुद्धां 'तण्डुल'च्या अभावीं पुढें पाऊल पडणें जड झालें व दिवसेंदिवस ही अडचण जास्तच भासूं लागली आहे.

**सरकारी मदतः**—वास्तविक पाहिलें तर प्राथमिक शिक्षणाइतकेंच महत्त्व दुय्यम शिक्षणास सरकारनें द्यावयास पाहिजे. लोकशाही राष्ट्रांत बहुजनसमाज साक्षर करणें राष्ट्रहिताचें असतें आणि प्राथमिक शिक्षणावर सरकारचें लक्ष केंद्रीभूत होणें न्याय्यच ठरतें. पण राष्ट्राची प्रगति, संस्कृतीची वाढ, कलांची जोपासना इतकेंच नव्हे तर शासनसंस्थांचा कारभार दुय्यम शिक्षण घेऊन बाहेर पडणारे तरुण नागरिक ह्यावरच अवलंबून आहेत. जोंपर्यंत सरकार परकीय-प्रधान होतें तोंपर्यंत कांहीं विशिष्ट हेतूनें प्रेरित होऊन खाजगी संस्था निर्माण करून व त्यांना आपल्या कह्यांत ठेवून कांहीं तरी व कशी तरी मदत करणें ह्या पलीकडे अधिकारी जाऊं शकले नाहींत. पण आतां बदललेल्या शासनसंस्थेनें तरी त्यांच्याकडे श्रमविभागांत भागीदार म्हणून पाहावयास पाहिजे. इतकेंच नव्हे तर राष्ट्रोपासनेचें एक महत्त्वाचें कार्य ह्या संस्थांनीं स्वीकारलें असल्याकारणानें त्यांना शक्य त्या सवलती व मदत देऊन त्यांना आत्मीयता दाखवून कार्य-प्रवण केलें पाहिजे. पैशाबरोबरच सरकारची नजर जरी ह्या संस्थेवर राहिली तरी ती 'अधिकारी' राहूं नये; तिनें एकीकरणाचें काम करावें, मार्ग दाखवावा व व्यक्तींच्या प्रयत्नाचा फायदा राष्ट्रास करून द्यावा. ( डॉ. मेस्टन म्हणतातः– "It must so control that while it unifies, it does not stereotype; while it directs, it does not destroy individuality, and while it finances, it incurs no suspicion of favouring."

**मनुष्यबळ**—परंतु राजाश्रय किंवा राष्ट्राश्रय मिळो वा न मिळो, त्या संस्थांनीं आपली परंपरा चालविणारीं 'जिवंत' माणसें मिळविलीं पाहिजेत. बदलत्या परिस्थितीप्रमाणें इतर गोष्टींत योग्य सुधारणा करूनसुद्धां परंपरेच्या मुख्य ध्येयाची अव्यभिचारी भक्ति करणारे 'चिपळूणकरानुयायी' जोंपर्यंत ह्या दुय्यम क्षेत्रांत व इतरत्रहि वावरत आहेत तोंपर्यंत खाजगी संस्थांच्या भवितव्यतेबद्दल, मग राजाश्रय किंवा लोकाश्रय असो वा नसो, मुळींच निराश होण्याचें कारण नाहीं; आंतील गाभाऱ्यांत 'नंदादीप' तेवत राहिला म्हणजे झालें. महाराष्ट्र गरीब असूनसुद्धां त्यांनीं ही परंपरा चालविली; संस्था काढल्या, वाढविल्या व त्यांचें उदक जनतेच्या हातावर सोडलें. तेंच ध्येयवादित्व व कर्मनिष्ठता, तोच समंजस-पणा पुढें ठेवून कार्य चालविल्यास शिक्षणाबद्दल आज हळुहळू वाढत असलेला

गैरसमज दूर होईल. कार्यास उठाव व उरक येईल व महाराष्ट्र मागें पडणार नाहीं. ब्राउनिंग कवीनें म्हटल्याप्रमाणें, 'अशाच कार्यकर्त्यांच्या द्वारें परमेश्वर आपणास पुढील कार्याची दिशा दाखवितो व त्याच दैवी ज्योतीमुळें अंधारांत चाचपडत असलेलें राष्ट्र दिव्य दृष्टि मिळून पुढें जातें (Through such souls alone God, stooping shows sufficient of His light for us in the dark to rise by.); व ह्याच बळावर महाराष्ट्रांतील संस्था जगणार, इतरांस जगविणार व जनतेची सेवा करून राष्ट्रास पुढें खेचणार.

# स्त्री-शिक्षण

लेखिका:—सौ. गंगूबाई पटवर्धन

हिंदुस्थानांत इंग्रजांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर लवकरच त्यांनीं शिक्षणासंबंधीं चौकशी केली त्या वेळीं, म्हणजे सन १८१८ सालीं स्त्रियांना शिक्षण देणारी एकहि संस्था अस्तित्वांत नव्हती. एक लाखांत फक्त एका स्त्रीस लिहितां-वाचतां येत होतें. पेशवाईंत राजघराण्यांतील कांहीं स्त्रियांना लिहितां-वाचतां येत असे; पण सार्वत्रिक स्त्री-शिक्षणाच्या दृष्टीनें त्या वेळीं कांहींच प्रयत्न झालेला नव्हता. कथा-पुराणें ह्या मार्गानें श्रवणभक्तीच्या जोरावर त्यांनीं जी कांहीं ज्ञानाची पुंजी मिळविली असेल तेवढीच त्यांची कमाई. ब्राह्मणांच्या मुलांसाठीं मात्र पाठशाळा होत्या. माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनसाहेबांनीं मुलांच्या शिक्षणाची सोय केली व १८४२ च्या सुमारास एक मुलांचें सरकारी हायस्कूल व कॉलेज पुण्यास स्थापन झालें; पण मुलींच्या शिक्षणाची कोणत्याहि प्रकारची सोय करण्यांत आली नव्हती. इ. स. १८५७ सालीं मुंबई विश्वविद्यालय स्थापन झालें. मिशनरी लोकांनीं शाळा-कॉलेजें काढून सरकारला शिक्षणप्रसाराचे बाबतींत पुष्कळच मदत केली. मुलींची शाळा स्थापन करण्याचा पहिला मान अमेरिकन मिशनरींनीं घेतला. १८२४ पासून १८४५ पर्यंत ह्याच लोकांनीं मुलींच्या शिक्षणाचें कार्य केलें म्हणण्यास हरकत नाहीं. १८४५ च्या सुमारास इंग्रजी शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या हिंदी विद्यार्थ्यांनीं युरोपिअन अध्यापकांच्या प्रोत्साहनानें मुंबईस एक संस्था स्थापन करून तिच्या छत्राखालीं मुलींच्यासाठीं शाळा स्थापन केल्या. पाश्चात्य वाङ्मयाचा अभ्यास केल्यानंतर व पाश्चात्य संस्कृतीची ओळख झाल्यानंतर पुष्कळ सुशिक्षित हिंदी तरुणांना आपल्या संस्कृतींतील दोषस्थळें शोधून काढून तीं नाहींशीं करण्याची इच्छा झाली. हर्बर्ट स्पेन्सरचें 'एज्युकेशन' व जॉन स्टुअर्ट मिलचें 'सब्जेक्शन ऑफ वुइमेन' हीं पुस्तकें वाचनांत आल्यानें स्त्रीजीवनाच्या प्रश्नाकडे विचारी लोकांचें स्वाभाविक लक्ष वेधलें. स्त्रीजातीची उन्नति केल्याशिवाय तरणोपाय

उत्तर देतां यावें, शिकलेलें थोडेंच फुकट जातें, मुलगी घरीं ठेवून तरी काय करायचें, अशाच तऱ्हेच्या कारणपरंपरा अजूनहि ऐकूं येतात. त्यामुळें मुलांच्या शाळा चालविणाऱ्या संस्थांपेक्षां मुलींच्या संस्था चालविणाऱ्या संस्थांना अधिक अडचणी व अधिक त्रास पडतो.

उच्च शिक्षणासाठीं पुण्यांत तीन सहशिक्षण संस्था व एक महिला विद्यापीठाचें स्वतंत्र कॉलेज आहे. वर दिलेल्या कारणमीमांसेमुळें महिला विद्यापीठाची पाठशाळा फारशी प्रगति करूं शकली नाहीं. इतर कॉलेजांतून एक स्वतंत्र वर्ग चालू शकेल इतका विद्यार्थिनींचा भरणा होऊं लागला आहे. मुंबईच्या खालोखाल स्त्री-शिक्षणांत पुण्याचाच अंक वर लागेल यांत शंका नाहीं. याशिवाय स्त्रियांची शिक्षणांत प्रगति करणारे अनेक वर्ग, अनेक मंडळें पुण्यांत पेठापेठांनीं आढळून येतील. अशा तऱ्हेनें स्त्री-शिक्षणाची सुरुवात, प्रगति व आजची स्थिति ह्यांचा थोडक्यांत आढावा विशेषतः पुण्याच्या दृष्टीनें वर दिला आहे.*

---

* ह्या लेखाचा पूर्वार्ध लिहितांना मला कु. वेणूताई पानसे यांच्या 'प्रगति-पथावर' ह्या पुस्तकाचा चांगला उपयोग झाला आहे.

# शिक्षणसंस्थांस संग्रहालयांची जोड
# व
# संग्रहालयांचा शिक्षणाकडे उपयोग

लेखकः—भास्कर विश्वनाथ घारपुरे

"We feel the time has come for a movement to sweep away the conventional attitude towards museum and to arouse wide-spread enthusiasm for them. We fear that most educated people in India do not really care for museums or believe in them, for, they have not hitherto played a sufficiently important part in the life of the community to make ordinary people realize what they can do."

"The time has now come when, if the Museums of India are to be as potent a factor in the educational scheme as they are in Europe and America, they must resolutely face and solve the problem of awakening, inspiring and teaching some of India's three-hundred million illiterates."

S. F. MARKHAM,
M. A., B. Litt., M. P.

सार्वत्रिक शिक्षणाच्या प्रचारामध्यें व योजनांमध्यें संग्रहालय संस्थांना फार वरच्या दर्जाचें अढळ स्थान दिलें पाहिजे. संग्रहालयें ह्या शिक्षणसंस्था आहेत व त्यांचें शिक्षणकार्य फार महत्त्वाचें आहे. या संस्थांचे द्वारें समाजांतील घटकांचा बौद्धिक दर्जा सतत वाढत असतो. ज्यांना लिहितां-वाचतां

येत नाहीं अशांनाहि या संस्था सतत शिक्षण देत असतात. संग्रहाल्यांतील प्रत्यक्ष वस्तुदर्शनानें प्रेक्षकांस वस्तुपाठांचें द्वारें ज्ञान मिळतें, प्रोत्साहन मिळतें आणि त्यांच्या अंगचे गुण जागृत होतात. पुस्तकांच्या ज्ञानांत पुस्तकांतील शब्दांचें ज्ञान होत असतें. त्याच्याशीं तुलना केली असतां प्रत्यक्ष वस्तूंच्या साधनानें मिळणारें ज्ञान अधिक श्रेष्ठ, अधिक परिणामकारक व अधिक व्यापक असतें. म्हणून संग्रहाल्यें ह्या फार श्रेष्ठ शिक्षणसंस्था आहेत. हें तत्त्व सर्व जगांत, विशेषतः सुधारलेल्या राष्ट्रांत प्रस्थापित झालेलें आहे.

म्हणून शिक्षण-संस्था म्हणजे शाळा, कॉलेजें, वाचनालयें यांना जोडून संग्रहाल्यें प्रस्थापित करणें अत्यंत अवश्य आहे. हिंदुस्थानांतील संग्रहाल्यांची पाहणी करून लंडन येथील 'साम्राज्य संग्रहालय-संस्थां'च्या समितीनें एक 'पाहणी-ग्रंथ' प्रसिद्ध केला आहे. त्यांत अशी एक सूचना केली आहे कीं ज्या ठिकाणीं लोकवस्ती एक लाख आहे तेथें संग्रहालय स्थापन करण्यांची खटपट व्हावी. सामान्यतः एक लाख वस्तीच्या गांवीं सार्वजनिक वाचनालय, शाळा, प्रौढ-शिक्षण-मंदिर, साक्षरताप्रसार-केंद्र स्थापन झालेलें असतें, व अशा संस्था याहून कमी वस्तीच्या ठिकाणींहि स्थापन होऊं लागल्या आहेत. यांच्या जोडीनें प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणीं व प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं जर संग्रहाल्यें स्थापन झालीं तर त्या त्या ठिकाणच्या शिक्षण-संस्था अधिकाअधिक कार्यक्षम होतील, व शिक्षणहि अधिक साधन-संपन्न होऊन अधिक सामर्थ्यवान् व परिणामकारक होऊं लागेल. संग्रहाल्यांचेसारख्या संस्थांची आपल्या देशांतील परिस्थिति अत्यंत शोचनीय व निराशाजनक आहे. आपण ज्या वर्गास सुशिक्षित म्हणतों त्या वर्गाचें या विषयाकडे लक्ष गेलेलें नाहीं व त्यांचेमध्यें दोषास्पद अशी अनास्थाहि आढळून येते. तसेंच संग्रहालय-संस्थेनें शिक्षणामध्यें व सामाजिक सुधारणेच्या कार्यामध्यें जें श्रेष्ठत्व सुधारलेल्या राष्ट्रांतून संपादन केलेलें आहे व या संस्था जी सेवा व शिक्षण जनतेस देतात त्या दृष्टीनेंहि हिंदुस्थानांतील संग्रहाल्यें कमी दर्जाचीं आहेत व ज्या गुणांच्यामुळें त्यांच्याकडे जनतेचें लक्ष लागावें असे गुणहि या संस्थांचेमध्यें फारसे नाहींत. ही स्थिति पालटण्याचा आटोकाट यत्न झाला पाहिजे. नाहीं तर या देशाचें शिक्षण साधन-संपन्न व कार्यक्षम होणार नाहीं.

वस्तु पाहून आपण ज्ञान मिळवावें यासंबंधीं यच्चयावत् मनुष्यप्राण्याच्या ठिकाणीं अभूतपूर्व जागृति झालेली आढळून येऊं लागली आहे. इंडिया म्यूझियम, कलकत्ता, व व्हिक्टोरिआ व आल्बर्ट म्यूझियम, मुंबई, हीं संग्रहालयें पहावयास प्रतिवर्षी प्रत्येकीं १० लाखांचे वर प्रेक्षक येतात. यांमध्यें सुशिक्षितांचा भरणा फार अत्यल्प असतो. या प्रेक्षक-संख्येवरून संग्रहालयांचें सामर्थ्य केवढें मोठें आहे व त्यांची लोकप्रियता किती आहे, कार्य-क्षेत्र किती विस्तृत व अमर्याद आहे याची कोणासहि कल्पना येईल.

हिंदुस्थानांतील संग्रहालयांची संख्या लोक-संख्येच्या प्रमाणांत व क्षेत्रफळाच्या विस्ताराच्या प्रमाणांत फार थोडी आहे व त्यांवर होणारा खर्चहि फारच अपुरा आहे. एकंदर सर्व संग्रहालयांच्यावर जो पैसा हिंदुस्थानांत खर्च होतो तेवढा पैसा सुधारलेल्या देशांतील पहिल्या प्रतीच्या एक-दोनच संग्रहाल्यांच्यावर खर्च होतो व पैशाची कमतरता हें एक या संस्थेची प्रगति झाली नाहीं याचें प्रमुख कारण आहे.

हिंदुस्थानांत एकंदर १०५ संग्रहालयें आहेत. त्यामध्यें युनिव्हर्सिट्या, कॉलेजें व शिक्षणसंस्था यांनीं चालविलेल्या संग्रहालयांची संख्या २७ आहे व हीं संग्रहालयें खास शिक्षण-संस्थांचेसाठीं तरी स्थापन झालेलीं आहेत अथवा तीं कांहीं विवक्षित शिक्षणकार्य करीत आहेत असें म्हणतां येईल. ज्या संग्रहालयांचा शिक्षणाशीं संबंध सतत ठेविला आहे व जीं शिक्षण-संस्थांतील विद्यार्थ्यांस शिक्षण देतात अशी व्यवस्था फारच थोड्या संग्रहाल्यांनीं ठेविलेली आहे. संग्रहाल्यांचा व शिक्षण-संस्थांचा संबंध उत्तम प्रकारें प्रस्थापित करण्याचे यत्न फारसे झाले नाहींत. तथापि संग्रहाल्यांचें शिक्षणप्रद स्वरूप नीट जाणून कार्यकर्त्यांनीं त्यांचेसंबंधीं योग्य ती व्यवस्था करणें व संग्रहालयांचा शिक्षणाकडे उपयोग करणें अत्यवश्यक आहे.

शिक्षण-संस्थांना संग्रहाल्यांच्यासारख्या संस्थांची जरूरी आहे व संग्रहालयसंस्था उपयुक्त ठरण्यासाठीं शिक्षण-संस्थांनीं आपल्या विद्यार्थ्यांचेसाठीं त्याचा उपयोग करणें तितकेंच आवश्यक आहे.

वस्तुतः शिक्षणाच्या योजनेमध्यें वाचनालयांना जें स्थान प्राप्त झालेलें आहे तेंच स्थान संग्रहालयांना मिळालें पाहिजे व संग्रहालयांचा उपयोग सार्वत्रिक झाला पाहिजे.

डे. ए. सोसायटीच्या न्यू इंग्लिश स्कूलनें म्यूझियम-संस्थेच्या संस्थापनेच्या दृष्टीनें शाळेसाठीं कांहीं योजना आंखलेली आहे; तसेंच पुणें येथील लॉर्ड रे इंडस्ट्रिअल म्यूझियम या संस्थेचाहि शाळेंतील विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठीं उपयोग करावयाचें संस्थेनें ठरविलें आहे.

पुणें शहरांत (१) लॉर्ड रे इंडस्ट्रिअल म्यूझियम, (२) भारत इतिहास संशोधक मंडळाचें संग्रहालय व (३) गणेशखिंड बोटॅनिकल गार्डन्स येथील संग्रहालय, अशीं तीन संग्रहालयें आहेत. आणि (१) नाट्यसंशोधन मंडळाचें चित्रालय, व (२) महाराष्ट्र चित्रकार मंडळाचें चित्रालय, अशीं दोन चित्र-संग्रहालयें आहेत. शिवाय एम्प्रेस बोटॅनिकल गार्डन्स हा एक मोठा बागहि येथें आहे. या संग्रहालयांनीं एकवटून एका धोरणानें शिक्षणविषयक यत्न केले पाहिजेत व शिक्षण-संस्थांनीं त्यांचा उपयोग करून घेतला पाहिजे. यासाठीं शिक्षण-संस्था व या वरील संस्था यांनीं उत्तम प्रकारें सक्रिय सहकार्य केलें पाहिजे. असें झाल्यास या संस्थांच्या अस्तित्वाचें सार्थक होईल.

यासाठीं या संग्रहालयांतून असलेल्या विषयांच्यावर विद्यार्थ्यांस शिकविण्यासाठीं धडे तयार करून पुस्तकें तयार करावीं लागतील व त्यांचा सामान्य ज्ञान म्हणून अभ्यासक्रमामध्यें अंतर्भाव करावा लागेल. या दृष्टीनें या संग्रहालयांच्या अंतर्व्यवस्थेमध्येंहि कांहीं फेरफार करावे लागतील. संग्रहालयांचें कार्यक्षेत्र अमर्याद आहे व त्यांच्यामध्यें कोणत्याहि सृष्ट पदार्थांच्या माहितीचा व विषयांचा समावेश करतां येतो. शिक्षण-संस्थांच्या सहकार्यानें संग्रहालय-संस्थांचें महत्त्व वाढेल व शाळांतून मिळणाऱ्या शिक्षणाची योग्यता संग्रहालय-शिक्षणामुळें द्विगुणित होईल. संग्रहालयांतर्गत शिक्षणाची विषयावलि वरील प्रकारें संघटित सहकार्यानें तयार झाली पाहिजे. शिक्षण-संस्थांनीं आपआपल्या शाळेसाठीं द्विरुक्ति होऊं न देतां लहान लहान विषयांसंबंधीं प्रदर्शनें विद्यार्थ्यांच्या समोर सतत ठेवण्यासाठीं तयार करावीं. शिक्षणक्रमांमध्यें ज्यांचा प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें अंतर्भाव झालेला नाहीं, तथापि ज्यांचें शिक्षण आमच्या विद्यार्थ्यांस मिळणें आजकाल आवश्यक झालें आहे, असे असंख्य विषय आहेत व त्यांच्यासंबंधीं नवीन नवीन प्रत्यक्ष ज्ञान सतत निर्माण होत आहे. या वाढत्या ज्ञानाचा प्रचार करण्यासाठीं अखिल जनतेच्या हितार्थ हें अत्यंत महत्त्वाचें कार्य संग्रहालयसंस्थांनीं हातीं घेतलें पाहिजे.

---

# खेडेगांवांचें खरें शिक्षण

लेखकः—**राजाराम परशुराम सबनीस**

एका तालुका म्युनिसिपालिटीच्या दवाखान्यांत पायावरून गाडीचें चाक गेलेली एक म्हातारी बाई 'मेलें मेलें' म्हणून विव्हळत पडली होती. किती तास ती तशी पडली असेल हें मला माहीत नाहीं; पण मी गेलों तेव्हां डॉक्टर-साहेबांना तिची दाद घेण्याची लहर आली. ते अत्यंत प्रेमळपणानें तिला म्हणाले, "थेरडे, उगाच का 'मेलें मेलें' म्हणून ओरडा चालविला आहेस? मरावयाची असतीस तर जागच्या जागींच मेली नसतीस का?"

पुढें मला एकदां एका मिशनरी संस्थेंत जाण्याचा प्रसंग आला होता. अगदीं फाटके व अतिशय घाणेरडे कपडे घातलेला, प्रेतासारखा भेसूर दिसणारा एक रोगी आम्हीं बसलों होतों तेथें आला. त्याबरोबर बोलत बसलेल्या मिशनऱ्यांपैकीं एक पुढें झाला व म्हणाला, "आपल्याला दवा पाहिजे?" त्यानें रोग्याला हातीं धरून औषध देण्याच्या जागीं नेऊन त्याला योग्य तें औषध देवविलें. नंतर तो पुन्हा येऊन बोलावयास बसला.

पुढारलेले वर्ग व बहुजनसमाज यांच्यांत दुजाभाव उत्पन्न झाला म्हणजे देशांत यादवी माजते व देशाच्या कपाळीं दास्य येतें. महिन्याच्या पहिल्या तारखेला सरकारकडून मिळणाऱ्या पगाराच्या जोरावर मिजास करीत आपल्या बांधवांवर भुंकणें किंवा त्यांना चावणें हीच जोंपर्यंत पुढारलेल्या वर्गांतील बहुतेक लोकांची महत्त्वाकांक्षा राहील, तोंपर्यंत समाजांत एकी होणार नाहीं व आपल्या मानेवरील परदास्याचें जूं हलणार नाहीं, पण मिशनऱ्यांप्रमाणें (त्यांच्या निःस्वार्थीपणाला इतर धर्माच्या अनुयायांना बाटविण्याच्या इच्छेचा डाग लागत नसतां तर अर्थातच बरें झालें असतें!) गरीब लोकांच्या उपयोगी पडण्याचें ध्येय जर पुढारलेल्या वर्गांतील जास्त जास्त लोक ठेवूं लागतील व त्यांच्या सर्वस्वीं निःस्वार्थ सेवेचें फळ निःसंदेहपणें खेडेगांवांतील लोकांच्या पदरांत पडूं लागेल, तर आपल्यांतील वर्गकलह नाहींसे होऊन राष्ट्र एकजीव व म्हणूनच स्वतंत्र होईल.

दररोज पांच-सहा तास एका ठिकाणीं डांबून ठेवून पांच वर्षांच्या अवधींत मुलांना अडखळत र ट फ वाचावयाला शिकविणें याला लोकलबोर्डी शिक्षण म्हणतां येईल, पण तें खरें शिक्षण नव्हे. त्याचप्रमाणें दिवसभर काम करून झोंप आलेल्या, लिहिण्यावाचण्याची मुळींच इच्छा नसणाऱ्या प्रौढांना अक्षरांची ओळख करून देण्याच्या अट्टाहासानेंहि फारसा फायदा होणार नाहीं. खरें शिक्षण म्हणजे तें जीवनाशीं निगडित असलें पाहिजे. तें व्यवहारांत फलदायी असलें पाहिजे आणि त्याबरोबरच त्यानें मनाची उन्नति घडवून आणिली पाहिजे. असें शिक्षण खेडेगांवांना मिळवून देण्याविषयींच्या एका योजनेचें केवळ दिग्दर्शन या लेखांत करावयाचें आहे.

खेडेगांवांच्या व्यापक शिक्षणाचें कार्य हातीं घेऊन तें तडीस नेण्यासाठीं कायम स्वरूपाच्या **सेवासंस्था** निघाल्या पाहिजेत. सेवासंस्थांच्या सभासदांवर प्रथमतः खेडेगांवांचा विश्वास बसला पाहिजे. मोटारीनें येऊन दोनतीन तास राहून चहापाणी किंवा जेवण करून तेवढ्यानें "आलों, खेड्यांचा उद्धार करून आलों!" असा घोष करणारे सुधारक आतां खेडेगांवांना परिचित झाले आहेत. सरकारी अधिकाऱ्याप्रमाणें यांची सरबराई करण्याचा त्रास तेवढा खेडेगांवांना पडतो, उंटावरून शेळ्या हाकणाऱ्या या शहाण्यांच्या 'होस हो' ठोकून खेडेगांवांतील लोक त्यांना वाटेला लावितात, व त्यांची पाठ वळली कीं, त्यांच्या बावळटपणाला हसूं लागतात. (हे शहाणे शहरांत जाऊन सांगतात, खेडेगांवांतील लोक फार समंजस, त्यांना एकादी गोष्ट नीट समजावून दिली कीं झालें!) तेव्हां खेडेगांवांच्या उपयोगीं पडूं इच्छिणाऱ्या सेवासंस्थेच्या सभासदांनीं खेडेगांवांत कायम राहण्याचा निश्चय केला पाहिजे.

सेवासंस्थेनें गांवाजवळ एकादें लोकांच्या उपयोगांत नसलेलें माळरान मिळवावें. या जागीं दवाखाना, लोहारखाना, शाळा वगैरे सार्वजनिक इमारती व सभासदां-साठीं स्वस्त, टिकाऊ व झोपडीवजा घरें बांधावीं. या बांधकामासाठीं खेडे-गांवांतील लोकांना मजुरी मिळेल. त्यामुळें सेवासंस्थेविषयीं त्यांना कृतज्ञता वाटेल, व सेवासंस्थेच्या कामाला आरंभ उत्तम होईल.

साधारणपणें असें दिसतें कीं, खेडेगांवांतील लोकांचा सर्वांत जास्त विश्वास त्यांना किंवा त्यांच्या मुलाबाळांना आजारांतून बरें करणाऱ्या वैद्याबद्दल किंवा डॉक्टराबद्दल असतो. म्हणून सेवासंस्थेच्या सभासदांत एक कर्तबगार, निरलस-

पणें काम करणारा व गोड बोलणारा डॉक्टर हवा. सेवासंस्थेच्या दवाखान्यांत गरिबांना औषधोपचार अगदीं फुकट व्हावा, श्रीमंतांकडून त्यांच्या ऐपतीप्रमाणें पैसे घ्यावे; रोग बरे करण्यापेक्षांहि रोग मुळीं होऊंच न देण्याची खबरदारी या डॉक्टरांनीं घ्यावी.

खेडेगांवाच्या आरोग्याची अशा रीतीनें काळजी घेऊन लोकांचा विश्वास आपल्यावर बसवून घेतल्यावर सेवासंस्थेला शेतकऱ्यांना स्वतःच्या कामांत जास्त कार्यक्षम करण्याच्या उद्योगाला लागावें लागेल. शेतकऱ्याचें उत्पन्न त्याला अवश्य असलेल्या खर्चापेक्षां जास्त झालें नाहीं तोंपर्यंत सुधारणा कशी होणार? धड खावयाला नाहीं, पुरतें वस्त्र नाहीं, घर केव्हां पडेल याचा नेम नाहीं, उद्यां जेवावयाला कसें मिळेल याची सारखी विवंचना, अशा स्थितींतला माणूस म्हणजे निव्वळ जनावर. त्याच्याशीं अन्नवस्त्राशिवाय दुसऱ्या गोष्टींविषयीं बोलणें म्हणजे त्याचा उपमर्द होय.

आर्थिक कार्यक्षमतेंत अनेक गोष्टींचा समावेश होईल. अगदीं साधी गोष्ट घ्या. बाजाराच्या दिवशीं प्रत्येकजण रॉकेल तेलाची एक लहानशी बाटली घेऊन परत जातांना दिसतो. सर्वांनीं मिळून एक तेलाचा डबा नेला व आपल्या गांवीं तेल वांटून घेतलें तर त्यांचें किती पैसे वांचतील? सेवासंस्थेला हा परस्परांविषयींचा अविश्वास व तुटकपणा नाहींसा करतां येईल. सेवा-संस्थेनें लोकांना नेहमीं लागणाऱ्या जिनसांचें दुकान काढून उत्तम माल कमी श्रमांत व किंमतींत मिळूं शकतो हें प्रत्यक्ष दाखवून दिलें म्हणजे हेंच कांहीं दिवसांनीं खेडेगांवचें सहकारी दुकान होईल. शेतकऱ्यांचा माल खप-विण्याच्या कामींहि सहकारी दुकानाची जरूर लागेल. सहकारी दुकान व सहकारी पतपेढी चालविण्यासाठीं म्हणून सेवासंस्थेंत एक हिशेबी व्यापारी असावा.

शेतकीच्या पद्धतींत सुधारणा करावयास शेतकऱ्याला लावणें हें अतिशय कठीण काम आहे. आपली परंपरेनें चालत आलेली, निश्चित जुनी पद्धत सोडून खात्री न पटलेली नवीन पद्धत स्वीकारण्यास मनुष्य व त्यांतल्यात्यांत शेतकरी नाखूष असतो. त्याचें मन वळविण्यासाठीं सेवासंस्थेच्या जागेवर नवे यशस्वी प्रयोग करून दाखविले पाहिजेत. त्यासाठीं सेवासंस्थेच्या सभासदांत एका शेतकी तज्ज्ञाचा

समावेश झाला पाहिजे. सेवाश्रमाच्या जागेंत त्यानें सुंदर फुलझाडें, भाज्या व फळझाडें लावून माळरानांतूनसुद्धां उत्पन्न कसें काढितां येतें हें दाखविलें पाहिजे.( हीं फुलें, व फळें उद्योगी व सद्वृत्त शेतकऱ्यांना बक्षीस म्हणून द्यावीं. ) त्याचप्रमाणें एकाद्या शेतकऱ्याचें शेत घेऊन त्यांतून नेहमींपेक्षां जास्त उत्पन्न सुधारलेल्या पद्धतींनीं करून दाखवावें; म्हणजे दुसरे शेतकरीहि त्याच्याबरोबर चढाओढ करूं लागतील.

पण शेतीचा धंदा वर्षांतून कांहीं महिनेच चालतो. इतर वेळीं स्थानिक परिस्थिति लक्षांत घेतां तेथें लहानसहान उद्योगधंदे कोणते चालवितां येतील हें ठरवून या उद्योगधंद्याच्या उत्पन्नाची जोड शेतीच्या उत्पन्नाला दिली पाहिजे. उद्योगधंद्याच्या खात्यासाठींहि एक तज्ज्ञ लागेल.

खेडेगांवांतील लोकांचा विश्वास सेवासंस्थेच्या सभासदांवर बसला तर खेडेगांवांतील भाऊबंदकीचीं भांडणें बंद होतील. त्यामुळें त्यांचे कोर्ट-कचेरीपायीं खर्च होणारे पैसे वांचतील, त्यांचा निरर्थक जाणारा वेळ उपयोगी कामाला लावितां येईल व त्यांच्यांत सहकार्याची भावना उत्पन्न झाल्यामुळें त्यांचे सर्व व्यवहार सुरळीत चालतील.

सेवासंस्थेच्या जागेंत इमारती योग्य जागीं बसविणें, इमारती स्वस्त टिकाऊ व शक्य तितक्या सुंदर करणें, गांवांतील लोकांना घरांच्या बाबतींत सल्लामसलत देणें, चांगले रस्ते तयार करणें वगैरे नगररचनेसंबंधींच्या कामासाठीं एक एंजिनिअर सभासद लागेल.

आर्थिक दृष्ट्या मनुष्यकोटींत आणिलेल्या खेडेगांवांतील लोकांच्या मानसिक उन्नतीसाठीं जरूर तेवढे शिक्षणतज्ज्ञ सभासद घ्यावयास हवे. त्यांनीं बोधप्रद गोष्टी मनोरंजक रीतीनें सांगून प्रौढांचीं भांडणें व मारामाऱ्या बंद केल्या पाहिजेत; त्यांच्या खुळचट कल्पना घालवून त्यांना ‘ हें कारण—हा परिणाम ’ असें शोधून काढणारी शास्त्रीय दृष्टि दिली पाहिजे, सृष्टिसौंदर्याची जाणीव करून दिली पाहिजे. शिक्षणतज्ज्ञांत एकादा चांगला कविता गायक असेल तर सुंदर कवितांच्या गायनानें मानसिक उन्नति घडवून आणणें सोपें जाईल. लहान मुलांसाठीं शाळा चालविणें हेंहि काम अर्थात् शिक्षणतज्ज्ञांकडेच राहील.

पण हें नुसतें मनोराज्यच राहील काय? डॉक्टर, व्यापारी, एंजिनिअर, शिक्षणतज्ज्ञ वगैरे अनेक प्रकारचे लोक सुसंस्कृत जीवनाला जरूर तेवढेंच वेतन

देणाऱ्या सेवासंस्थेचे सभासद होतील काय? त्यांच्या वेतनाची व्यवस्था काय करावयाची? (वयानें नसले तरी उत्साहानें तरुण असे पेन्शनर सभासद मिळाले तर वेतनाचा प्रश्न सुटेल.) चालू खर्च— आणि अनेक प्रयोग चालू ठेवावयाचे असल्यामुळें हा पुष्कळच होईल— कसा भागवावयाचा?

सेवासंस्थेच्या अंतर्व्यवस्थेच्यासंबंधींचे प्रश्न जेझ्युइट पंथानें सोडविले आहेत. समाजांत स्वार्थ सोडून परमार्थ साधण्यास तयार असे जे लोक असतात, त्यांची निवड करून त्यांना कित्येक वर्षें उमेदवारी करावयास लावतात व त्यांना उत्तम शिस्त—विशेषतः वरिष्ठांचे हुकूम बिनतक्रार पाळण्याची शिस्त—लागली अशी खात्री झाली म्हणजे त्यांना सभासद करून घेण्यांत येतें. राहण्याची जागा, पौष्टिक खाणें, पुस्तकें, साहित्य वगैरेंच्या बाबतींत त्यांचे हाल करण्यांत येत नाहींत; पण या अल्प मोबदल्यांत ते संस्थेसाठीं रात्रंदिवस काम करीत राहतात. सभासदांनीं वर्षासाठीं निवडून दिलेला वरिष्ठ अधिकारी त्या वर्षापुरता सर्वसत्ताधीश असतो व त्याच्या आज्ञा प्रत्येकानें पाळावयाच्या असल्यामुळें भांडणाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. पंथाचे स्त्री-पुरुष सभासद हे अविवाहित असतात. कारण, त्यांना संस्थेचें कार्य कायावाचामनानें एकसारखें करावयाचें असतें. आपल्या सेवासंस्थांनीं या पंथाचें अनुकरण करावयास हवें.

माणसांचा प्रश्न सुटला तरी सेवासंस्थांना लागणाऱ्या लक्षावधि रुपयांच्या निधीचा प्रश्न विशेषतः महाराष्ट्रांत—सोडविणें कमी कठीण नाहीं. जेझ्युइट पंथाच्या लोकांना धर्मनिष्ठ कॅथॉलिकांकडून कोट्यवधि रुपयांच्या देणग्या मिळतात. शास्त्रीय संशोधन व उद्योगधंद्यांचा उत्कर्ष यांचा निकट संबंध जाणून १८७० पासून जर्मनीच्या राष्ट्रीय सरकारनें शास्त्रीय प्रयोगशाळांवर पैशांचा नुसता पाऊस पाडला.

महाराष्ट्राच्या अलीकडील इतिहासाकडे पाहिलें असतां फारशी उमेद बाळगण्यासारखी परिस्थिति नाहीं हें दुःखानें कबूल करावयास हवें. समाजाच्या नानाविध गरजांना पुरतील इतके बुद्धिमंतांपैकीं खरे स्वार्थत्यागी लोक आज नाहींत. देशाच्या शाश्वत हिताला पोषक कार्य आहे हें ओळखून स्वयंस्फूर्तीनें व उदारपणें देणग्या देणाऱ्या महाराष्ट्रीय दात्यांची कोणती डोळ्यांत भरण्याजोगीं उदाहरणें आहेत? बंगलोरच्या संशोधन संस्थेसाठीं तीस लाख रुपये

देणारे टाटा किंवा स्त्रियांच्या विश्वविद्यालयासाठीं पंधरा लाख रुपये देणारे विठ्ठलदास ठाकरसी आपल्यांत झालेले नाहींत. त्यामुळें बहुतेक संस्थांचीं कामें रडतखडत चाललेलीं दिसतात.

पण तीन शतकांपूर्वी अशाच गाढ निराशेच्या परिस्थितींत महाराष्ट्रांत मोठी क्रांति होऊन त्याला स्वातंत्र्यलाभ झाला, ही गोष्ट आज आपल्याला स्फूर्तिदायक व्हावयास पाहिजे. आणि खरोखरच रामदासासारखे दीर्घद्रष्टे समाजसंघटक व त्यांना मुक्त हस्तानें मदत करणारे शिवाजीसारखे राज्यकर्ते हे सांगून येत नसतात. खेडेगांवांच्या पुनर्घटनेचें महत्त्व ओळखणारा क्रांतिकारक समाजसेवक व त्याला निधि पुरविणारा दूरदर्शी दाता आजहि निघेल, या आशेवर जगावयास हरकत नाहीं.

ठराविक चाकोरींतून बाहेर पडून नवीन उपक्रम करणें कठीण असतें, पण त्याचें दुसरीकडे अनुकरण करणें त्या मानानें पुष्कळच सोपें असतें. वर उल्लेख केलेली समाजसेवक व दाता अशी जोडी जमून एका खेडेगांवांत जर सेवासंस्था निघून ती यशस्वी झाली, तर खेडेगांवांच्या उन्नतीच्या प्रश्नाबरोबर महाराष्ट्राच्या व हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याचाहि प्रश्न सुटेल.

---

# सहशिक्षण

लेखक :—गोविंद महादेव जोशी

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥**

—**भगवद्‌गीता**

समाजव्यवस्थेमध्यें कोणत्याहि तऱ्हेचा फरक अगर व्यवस्था करूं इच्छिणाऱ्या कोणत्याहि विषयाचा विचार अगर अभ्यास समाजशास्त्रदृष्ट्या व्हावयास पाहिजे ही गोष्ट सहसा कोणीहि नाकबूल करणार नाहीं. समाजांतर्गत मानवाचा ज्ञात इतिहास पाहिला तर समाजनेत्यांचा प्रत्येक प्रयत्न सामाजिक रचना व्यक्तीला सुखकारक आणि गटाला हितकारक एकसमयावच्छेदेंकरून काय पद्धतीनें करतां येईल याची विवंचना करण्याच्या दिशेनेंच झालेले दिसून येतील. त्याकरितां त्या नेत्यांनीं वेगवेगळ्या स्थळीं आणि काळीं वेगवेगळीं वैयक्तिक आणि सामाजिक ध्येयें आणि तीं सिद्ध करून घेण्याकरितां वेगवेगळे सामाजिक वैयक्तिक आणि सामाजिक आचार आणि विधिनिषेध ( Discipline ) लावून दिलेले आढळून येतात.

ध्येयप्रवृत्तीकडे पाहिलें तर कोणी समाज सुखी कसा होईल याचा विचार करतांना दिसतात, तर कोणी समाज सत्ता कसा मिळवूं शकेल इकडे लक्ष देतात. कोणी समाज त्याच नामरूपानें हिंसामय सृष्टींत चिरंतन करण्याचा प्रयत्न करतात, तर कोणाला समाजसंस्कृतियुक्त बनविण्याची लालसा असते; कोणाला समाजाची प्रगति व्हावी असें वाटतें, तर दुसरे प्रगति वगैरे भ्रामक कल्पनांच्या नादीं लागून समाजाचा स्थायीभाव ( Stable equilibrium ) नष्ट करण्याला तयार नसतात. आतां असें दिसून येईल कीं वर ज्या ह्या कल्पना सांगितल्या त्यांपैकीं एकेकटी कल्पना घेतल्यास त्यांपैकीं कोणतीच चूक नाहीं, परंतु ती एकेकटी कल्पना सिद्ध करण्याकरितां कांहीं विशिष्ट तऱ्हेची रचना ( Type of Society ) निर्माण करावी लागते. अर्थातच तशी

समाजरचना सिद्ध झाली म्हणजे त्या रचनेला पोषक असे विधिनिषेध आणि नीति उत्पन्न होत असते. खरा प्रश्न उत्पन्न होतो तो असा कीं, एका पद्धतीनें उत्पन्न झालेल्या समाजरचनेमध्यें दुसऱ्या तऱ्हेचे गुण उत्पन्न व्हावे असें त्या समाजांतील तत्कालीन नेत्यांना वाटूं लागेल. तेथें नैतिक मूल्यें ( Moral Values ) बदलून घ्यावींत किंवा नाहीं; आणि बदलून घ्यावी असें ठरल्यास ती काय पद्धतीनें बदलून घ्यावीं ? म्हणून सामाजिक चालीरीतींत फरक करूं इच्छिणाऱ्या महाभागांच्या पुढें साध्य ( Aim ), साधन ( Method ) आणि इतिकर्तव्यता ( Activity ) हीं तीन तत्त्वें स्पष्ट असावयास पाहिजेत. सामाजिक प्रश्नांची विवंचना करणारानें प्रथम समाज कोणत्या जातीचा (Type) बनवावयाचा हें निदान स्वतःशीं तरी शक्यतों स्पष्ट केलें पाहिजे. एका तऱ्हेनें उत्पन्न होऊन बनत गेलेल्या समाजांतील चालीरीतींचें मूल्यमापन दुसऱ्या तऱ्हेनें बनत गेलेल्या समाजांतील नीतिनियम लावून ठरविणें हें शास्त्रीय दृष्टया चूक आहे. ( See–'Patterns of Culture' by *Dr. Ruth Benedict* ).

सुखप्रधान समाज निर्माण केल्यास त्यामध्यें सत्ता उत्पन्न होईलच असें नव्हे, स्थायीभावाची इच्छा धरणारा समाज प्रगति या लांबरुंद कल्पनेकडे थोडासा अप्रीतीनेंच पहाणारा. ज्या विशिष्ट प्रेरणेनें नेत्यांनीं समाजरचना केली असेल ती प्रेरणा आणि तदनुसारी समाजरचनेची जाति यांना पोषक आणि अनुसारी असेच सामाजिक आचार ठेवणें इष्ट असतें. यामध्यें अमुक क्रिया किंवा अमुक आचार एका विवक्षित पद्धतीनें व्हावयास पाहिजेत असें म्हणणारा आचार्य ती क्रिया दुसऱ्या पद्धतीनें करतां येणार नाहीं असें कधींच म्हणत नसतो; परंतु गटामध्यें एकरूपत्व व्हावयाचें असेल तर तो दंडक पाळणें अत्यावश्यक असतें. एकाच गटांतील व्यक्ति जर एकच क्रिया विविध तऱ्हेनें करतील तर गटत्व कसें सिद्ध होणार आणि व्यक्तीला कांहींच स्वातंत्र्य न ठेवल्यास व्यक्तिमत्व कसें सिद्ध होणार अशी शृंगापत्ति येथें असते. परंतु मनुष्यस्वभावाचा विचार करतां गटानें आपला कणखरपणा कायम ठेवल्यास सर्वसाधारण व्यक्ति सर्वसाधारण गटांशीं समरस होतात असें मनुष्याच्या ज्ञात इतिहासावरून दिसून येतें.

जी जी क्रिया अंशतः अगर पूर्णतः मनावर अवलंबून असते व समाजानें जिच्यावर चांगलेपणाचा छाप मारला असेल, ती ती क्रिया समाजांत सार्वत्रिक होते. (ए)

सहशिक्षण हें तसें आहे. (ए)

∴ सहशिक्षण हें सार्वत्रिक होईल.

म्हणून मुख्य प्रश्न असतो तो अमुक झालें किंवा नाहीं किंवा अमुक होईल किंवा नाहीं हा नसून, अमुक एका जातीच्या (type) समाजाला अमका आचार हितकारक होईल किंवा नाहीं हा असतो.

हे सर्व सामाजिक प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें वेगवेगळे लोक वेगवेगळीं तत्त्वें प्रवर्तित करीत असतात. कांहीं एकूण एक मानवी हालचाली हा मानवी बुद्धीचा परिणाम आहे असें समजून बुद्धिप्रामाण्य (Rational resources) हेंच समजाला उपकारक होईल असें मानतात; तर दुसरे मानवी बुद्धीला न समजणाऱ्या गूढशक्तीहि क्रियाप्रेरक असूं शकतात व त्यांचें धर्मांतील गूढ तत्त्वानें संतर्पण आणि नियंत्रण होऊं शकतें ही गोष्ट मान्य करून धर्माची आवश्यकता कबूल करतात (Religious resources). अशा तऱ्हेनें वेगवेगळ्या कल्पनांचा आश्रय करून वेगवेगळ्या कल्पना प्रवर्तित केल्या जातात त्यापैकींच आजच्या युगामध्यें शिक्षण ही कल्पना प्रवर्तित केली गेली आहे. आतां शिक्षणानें समाजाचे धर्म, अर्थ, काम, मोक्षविषयक प्रश्न सुटतात अगर सुशिक्षित राष्ट्रामध्यें अशिक्षित राष्ट्रांतल्यापेक्षां सामाजिक अडचणी कमी असतात अगर ते प्रश्न जास्त सोपे असतात किंवा एकाच समाजांतर्गत सुशिक्षित आणि अशिक्षितांची तुलना करून सुशिक्षितांच्या सामाजिक अडचणी अशिक्षितांच्या अडचणींपेक्षां जास्त असतात, असें आंकडेवारीनें तुलना करून दाखविण्याचा फारसा प्रयत्न कोणीहि केलेला दिसून येत नाहीं; परंतु आजच्या तत्त्वज्ञानानें शिक्षण हें नियंत्रणाचें साधन म्हणून मान्य केलेलेंच आहे; तेव्हां आपणहि तें तसेंच धरून चालवयास कांहीं हरकत नाहीं. त्या शिक्षणपद्धतींतील एक दालन म्हणजेच सहशिक्षण होय. अर्थातच या सहशिक्षणानें कांहीं तरी सामाजिक ध्येय साधावयाचें आहे.

येथें सहशिक्षण या पदानें कोणत्या स्थितीचा अगर पद्धतीचा बरोबर बोध

होतो ही गोष्ट बरोबर समजावून घेण्याचा प्रयत्न अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें.

( १ ) मुलें आणि मुली यांच्या शारीरिक आणि मानसिक वाढीमध्यें कोणत्याहि तऱ्हेचा फरक नाहीं आणि त्याप्रमाणेंच त्यांच्या परस्परविषयक भावना आणि त्यांची वाढ हींहि एकरूपच असतात, त्याप्रमाणेंच समाजांतील सर्व कार्यें सर्वांनीं करावीं, त्यामध्यें स्त्री-प्रधान कार्यें आणि पुरुष-प्रधान कार्यें असा भेद करणें शक्य नाहीं असें गृहीत धरून मुलें आणि मुली यांना सरमिसळीनें एकाच वर्गांत बसवून एक तऱ्हेचे विषय शिकविणें.

( २ ) कांहीं एका विवक्षित वयापर्यंत मुलें आणि मुली यांची वाढ ( bio-psychological ) सारखीच असते. परंतु तेथून पुढें मात्र स्त्रीत्व आणि पुरुषत्व या गुणांत अंतर पडत जातें म्हणून कांहीं वयापर्यंत सहशिक्षण ठेवून पुढें मात्र सहशिक्षण बंद करणें.

( ३ ) स्त्रीत्व आणि पुरुषत्व हें जन्मकाळापासूनच त्या त्या पिंडांत असतें तें कांहीं मागून येऊन चिकटत नाहीं; स्त्रीचें मातृपदक्षमत्व पुरुषामध्यें कधींच उत्पन्न होऊं शकत नाहीं आणि संततिरक्षण हाच सर्व समाजरचनेचा पाया आहे. ( See—Parenthood as the Basis of Social Structure—*Malinowsky* ) ही गोष्ट नजरेसमोर ठेवून पहिल्यापासूनच स्त्रीपुरुषांचें शिक्षण ( discipline ) वेगवेगळेंच ठेवावयाचें.

हे तीन शिक्षणविषयक मुख्य पर्याय सांगितले. तपशिलाच्या दृष्टीनें यांचे आणखीहि अनंत पर्याय होणें शक्य आहे. वर आपण पाहिलेंच कीं हे सर्व पर्याय साधनभूत आहेत; म्हणून या साधनानें काय साध्य आपण मिळवूं इच्छितों त्याचा थोडासा विचार करूं. पहिली गोष्ट अशी दिसते कीं, समाज हा स्त्री-पुरुष या घटकावयवांनीं मिळून संमिश्र अशा तऱ्हेनें बनलेला असतो आणि तें नैसर्गिकच आहे. म्हणून शिक्षणक्षेत्रांतहि परस्परसाहचर्यामध्यें विक्षेप येऊन निरर्थक विभक्तपणा आणणें बरें नव्हे. स्त्री-पुरुषांच्या विभक्तीकरणा-मुळें एकमेकांबद्दल जे कांहीं गैरसमज अगर चुकीच्या कल्पना पसरलेल्या अस-तात त्यांचा सहवासानें निरास होऊन समाजामध्यें लैंगिक विरोधाचा (Sex-antagonism) प्रसार होणार नाहीं. परस्परसाहचर्याबद्दल जी सहजप्रवृत्ति

स्त्री-पुरुषांमध्यें दिसून येते त्या प्रवृत्तीचें कांहीं अंशानें संतर्पण होऊन मनामध्यें विकृति, (Complexes) उत्पन्न होणार नाहींत इत्यादि इत्यादि अनेक तऱ्हेचे हितकारक परिणाम सहशिक्षणापासून होऊं शकतात अशी ग्वाही सहशिक्षणाचे पुरस्कर्ते नेहमीं देत असतात.

येथें प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, हे जे वर हितकारक परिणाम सांगितले ते खरोखरच होतात काय? आणि होत असले तर ते सर्व तऱ्हेच्या समाजरचनांना हितकारक होतील काय? खरोखरीच वरच्या तऱ्हेचे मुद्दे पुढें आणणाऱ्यांच्या मनांत खरोखर भाव काय असतो हें समजणें फार कठीण आहे. समाजामध्यें ज्या वेळीं स्त्रीघटक आणि पुरुषघटक यांचें साहचर्य येतें त्या वेळीं ते घटक एका कांहीं तरी विवक्षित नात्यानें भेटत असतात त्यामुळें त्यांच्या अंतःकरणानें तें नातें प्राधान्यानें वास करीत असते आणि तेथें स्त्रीत्व आणि पुरुषत्व हा विचार गौण असतो. त्यामुळें अशा नात्यामध्यें कांहीं पुरुष आणि कांहीं स्त्रिया यांच्यामध्यें लैंगिक भावना उत्पन्न होत असल्या तरी मुख्य भाव तो असूं शकत नाहीं. परंतु सहशिक्षणामध्यें जीं मुलें आणि ज्या मुली संगत होतात, त्यांच्यामध्यें अशा तऱ्हेचें कोणतेंच सामाजिक नातें असूं शकत नाहीं. त्यामुळें सामाजिक नात्याच्या अभावीं नैसर्गिक नातें हेंच नजरेसमोर उभें राहिल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. म्हणून असें दिसून येईल कीं, ज्यांचें सामाजिक नातें निश्चित झालेलें नाहीं आणि ज्यांना मार्गदर्शक अशीं नैतिक मूल्यें ठरलेलीं नाहींत अशा स्त्री-पुरुष व्यक्ति जेथें स्वातंत्र्यानें संघटन होण्याला पुष्कळच संधि असते अशा ठिकाणीं संगत व्हावेत काय. तसें होऊं नयेत असा निश्चय झाल्यास सहशिक्षण हें अर्थातच अग्राह्य ठरेल. निश्चित नैतिक मूल्याच्या अभावीं व्यक्ति नैसर्गिक भावनांनींच हलविली जाईल याबद्दल काडीमात्र शंका धरण्याचें कारण नाहीं. दुसरे जे कांहीं किरकोळ मुद्दे म्हणजे गैरसमज, मानसिक विकृति वगैरे पुढें आणले जातात त्यांचें पृथक्करण केलें असतां ते देखील हेत्वाभासमूलक आहेत असें सहज दाखवितां येईल.

कोणत्याहि व्यक्तीच्या शिक्षणाचा काळ घेतल्यास तो साधारणतः वयाच्या सहाव्या वर्षापासून पंचवीस वर्षांपर्यंत असतो. या काळामध्यें शारीरिक आणि

मानसिक वाढीच्या मानानें आयुष्याचे दोन टप्पे पडतात. (See–Der menschlicha hehlenslanf als psychologisches problems by *Charlotte Buhler* Leipzing 1935), त्यांपैकीं पहिला टप्पा साधारणतः अठरा ते वीस या वयांत संपतो (also see मनुस्मृति) दुसरा टप्पा अठरा ते अठ्ठावीस वर्षांपर्यंत असतो. या दोन्ही टप्यांतील मनःस्थितीचें वर्णन पाहिल्यास अशा वेळीं मार्गदर्शक नैतिक मूल्यें नसतांना स्त्रीपुरुष एका ठिकाणीं येऊं देणें हितकारक आहे असें समाजाचें हित चिंतणारा कोण म्हणूं शकेल, तें मला तरी समजत नाहीं. यांतील दुसरा टप्पा अतिशय अस्थिर स्वरूपाचा असतो आणि लैंगिक बाबतींत तर फारच अस्थिर असतो. शारीरिक वाढ पूर्ण झालेली असते परंतु मानसिक स्थैर्य उत्पन्न झालेलें नसतें आणि नैतिक मूल्यांना अस्तित्वच नसतें. त्यामुळें मनाशीं असंबद्ध असे शारीरिक संबंध होण्याचा संभव असतो. परंतु अशा तऱ्हेचे संबंध फार काळ टिकत नाहींत. (Sexual relations begun by men before their twenty eighth year last considerably less long). अर्थातच एकपत्नीव्रत किंवा पातिव्रत्य हीं अशक्य असतात. परंतु लैंगिक नीतीचा समाजाच्या जीवन-शक्तीशीं जो निकट संबंध आहे त्याचा विचार करतां अशा तऱ्हेच्या समाजां-ची तीन-चार पिढ्यांत धूळधाण झाल्याशिवाय रहाणार नाहीं. (See–Sex Regulations and Human Behaviour, by *J. D. Unwin*, Sex and Culture—the same author). आतां राहिलेला पहिला टप्पा ज्या-मध्यें आमच्या इकडील प्राथमिक आणि दुय्यम शिक्षणाचा काळ येतो. पुरुषा-मध्यें सर्वसाधारणतः पंधरा ते सतरा आणि स्त्रीमध्यें सर्वसाधारणतः वर्ष दोन वर्षें आधीं प्रजोत्पादनाची शक्ति उत्पन्न होते. (Human glnads become active.) हा टप्पा आत्यंतिक अशा स्वार्थी वृत्तीनें प्रेरित झालेला असतो. या काळामध्यें व्यक्तींना वासना आणि कर्तव्यें सांगावयास सांगितल्यास असें दिसून येतें कीं, व्यक्तींना कर्तव्याची फारशी जाणीव अशी नसतेच. साधारणतः एका कर्तव्याला चार वासना असें प्रमाण पडतें. वासना असलेला परंतु कर्तव्याची जाणीव नसलेला हा मानवी पशु सामाजिक मानव बनवावयाचा असतो. तो सह-शिक्षणानें तसा बनूं शकेल असें सप्रमाण दाखविल्यास सहशिक्षण अर्थातच हित-कारक ठरेल; परंतु तसें कोणी दाखविल्याचें माझ्या वाचनांत नाहीं. मनाच्या

बेजबाबदार स्थितींत स्त्रीपुरुषांचें संगतीकरण झाल्यास एकमेकांबद्दलचे गैरसमज दूर होतील असें वाटेल तर म्हणावें.

वयाच्या दृष्टीनें ही सर्वसाधारण चर्चा यथामति केली. आतां व्यक्तिशः मुलामुलीवर परिणाम काय होतील तें पाहूं. अशी गोष्ट सहज दाखवितां येईल कीं, पुरुषांचीं ध्येयें सर्वदा पुरुषी म्हणजे पुरुषत्वप्रधानच असतात; परंतु मुलींचीं ध्येयें मात्र पुरुषत्व प्रधान होऊं लागतात. परंतु स्त्रीमध्यें पुरुषत्वप्रधान ध्येयें उत्पन्न होणें नैसर्गिक अगर सामाजिक दृष्टया पाहिलें तरी हितकारक कसें ठरेल. आपल्या शिक्षणक्रमामध्यें स्त्रीत्वप्रधान ध्येयें मुलींच्या समोर येतील अशी कांहीं व्यवस्था वाङ्मय किंवा इतिहास या विषयांच्या शिक्षणामध्यें केलेली असते का ? उदात्त स्त्री किंवा श्रेष्ठ स्त्री कशी असते त्याचें उदाहरण त्यांच्यापुढें सहसा कधींच येत नाहीं. आपण सुशिक्षित झाल्याकारणानें सीता, सावित्री आतां मागें पडल्या, परंतु त्यांच्या जागीं आतां कोण आल्या तर 'अॅना कॅरेनिना' आणि 'मदाम बोवरी' अथवा चलच्चित्रपटांतील नायिका. ही गोष्ट खरो-खर इष्ट आहे का? लोकमान्य टिळकांचें संवर्धन ज्या आईनें केलें तिनें समाजांत कांहींच कार्य केलें नाहीं का ? खरोखरी सामाजिक स्त्री व्यक्तिशः पूर्ण आहे किंवा मातृत्वानें पूर्ण आहे हें कन्यकांच्या नजरेस यावयास नको काय ? परंतु तसें कांहींच न झाल्यानें आपलें समाजांत कार्य तरी काय आहे याचा त्यांना मुळींच बोध होत नाहीं आणि म्हणून त्या पुरुषत्वप्रधान ध्येयाकडे वळतात. सहशिक्षणानें ही स्थिति फार तीव्रतर होईल असें वाटतें.

आतां मुलांच्या दृष्टीनें पाहिलें तर त्याच वयाची मुलगी असल्यास तिची मानसिक वाढ मुलापेक्षां जास्त झालेली असते. त्यामुळें एकाच वयाचीं मुलें आणि मुली एके ठिकाणीं अध्ययन करूं लागल्यास तेथें मुलींचा वरचष्मा निश्चित होणार. त्यामुळें सर्व वर्गांतील शिस्त, अभ्यासाच्या पद्धति वगैरे बाबतींत वर्ग हा स्त्रीत्वप्रधान होऊं लागेल. मुलांना आणि मुलींना एकाच तऱ्हेची शिस्त, नैतिक मूल्यें, अगर सर्वसाधारण परिस्थिति उत्पन्न करून कसें चालेल. अशा स्थितींत मुलगा हळूहळू, स्त्रीसमोर आपण सर्वथा श्रेष्ठ ठरावें अशी जी नैसर्गिक प्रवृत्ति असते, त्या नैसर्गिक प्रवृत्तीला पारखा होऊं लागतो. समाजामध्यें वावरणाऱ्या स्त्रीपुरुषांमध्यें एकमेकांबद्दल आदर वास करीत असावा असें म्हणतात. हा आदर कांहीं थोडासा गूढ भाव, अनिर्वर्णनीय

भाव व्यक्तींच्याबद्दल राहिला तर उत्पन्न होईल अगर त्या त्या व्यक्तींच्या सर्व मानसिक हालचाली पूर्णत्वानें कळल्यास उत्पन्न होईल हा प्रश्न मानसशास्त्रज्ञांनीं सोडवावयाचा आहे. अनादर-उत्पन्न विवाहाकडे प्रवृत्ति कमी कमी होत गेल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. सुशिक्षितांमध्यें विवाहाची प्रवृत्ति कमी होत चालली आहे ही गोष्ट कोणाच्याहि सहज नजरेस येण्यासारखी आहे. याला तरुण लोक आर्थिक कारणें सांगत असले तरी तें खरें नसून खरीं कारणें मानसिक आहेत. दुसऱ्या कोणत्याहि बाबतींत उधळपट्टी करून कर्ज करणारा तरुण देखील विवाहाचें नांव काढल्यास आर्थिक अडचणी भराभर सांगूं लागतो.

सरतेशेवटीं ही गोष्ट सांगावयास पाहिजे कीं सहशिक्षण काय अगर दुसरी कोणतीहि सामाजिक पद्धति काय, ज्या तऱ्हेची समाजरचना निर्माण करावयाची असेल त्या तऱ्हेला पोषक असली पाहिजे. समाजरचनेच्या जाति (Types) वेगवेगळया असल्याकारणानें एका तऱ्हेच्या जातीला जी पद्धति हितकारक असेल तीच पद्धति दुसऱ्या तऱ्हेच्या जातीला हितकारकच असेल असें नाहीं. निव्वळ अर्थप्रधान समाज आणि अर्थकामाच्या यथायोग्य मिश्रणानें उत्पन्न झालेला समाज या दोहोंमध्येंहि व्यक्तींना एकच घडण देऊन कसें चालेल? असें असल्याकारणानें सहशिक्षण हितकारक का अहितकारक याचें सार्वकालीन आणि सार्वस्थलीन असें एकच उत्तर सांगतां येणार नाहीं. सहशिक्षण हा प्राधान्यानें कामविषयक प्रश्न असल्यानें कामशास्त्रीय नीतीनें सामाजिक परिणाम काय होतात त्याचें थोडेंसें दिग्दर्शन करतों; म्हणजे कार्यशक्ति, चिरंजीवित्व, संस्कृति या दृष्टीनें कामुक नीतीचा कोणता पर्याय समाजांत पसरवावा आणि त्या दृष्टीनें सहशिक्षण हितकारक आहे किंवा नाहीं हें ठरविणें सोपें पडेल.

कामुक नीतीचे स्थूलमानानें (१) अनियंत्रित म्हणजे कोणतीहि स्त्री कोणत्याहि पुरुषाला लभ्य असणें; (२) स्त्रीवर पातिव्रत्याची कठोर जबाबदारी परंतु त्या बाबतींत थोडीशी मोकळीक; आणि (३) स्त्री आणि पुरुष या दोघांनाहि सारखेच कठोर नियम असणें; असे तीन पर्याय असतील. अर्थातच तपशिलाच्या दृष्टीनें त्यामध्यें आणखीहि भेद होणें शक्य आहे. अशा तीनहि तऱ्हेचे समाज या जगतीतलावर होऊन गेलेले आहेत आणि त्यांचा इतिहास सृष्टीनें लिहून ठेवलेला आहे.

पहिल्या तऱ्हेची नीति पाळणारे समाज म्हणजे जेथें 'यथा गावः स्थिता राजन् स्वे स्वे वर्णे तथा प्रजाः '– महाभारत; अशा समाजामध्यें कार्यशक्ति, कल्पनाशक्ति अगदीं किमान दर्जाची असते. कोठेंहि ही नीति नव्यानें उत्पन्न केल्यास हा परिणाम तीन पिढ्यांत घडून येईल.

दुसऱ्या तऱ्हेची नीति पाळणारे म्हणजे—

**इमं हि सर्ववर्णानां पश्यंतो धर्ममुत्तमम् ।**
**यतन्ते रक्षितुं भार्या भर्तारो दुर्बला अपि ॥ —मनुः**

ही मनूची नीति पाळणारे समाज यांच्यामध्यें कार्यशक्ति मध्यम दर्जाची राहते.

तिसरे समाज म्हणजे ' It ( energy ) will be greatest when through out his life the male, as well as the female, is *compelled* to confine himself to one partner.' अथवा

**स्त्रीणां भर्ता धर्मदाराः च पुंसां । इत्यन्योन्यं वत्सयोर्ज्ञातमस्तु ॥**

अशा तऱ्हेची नीति पाळणारे समाज. या समाजामध्यें कार्यशक्ति सर्वश्रेष्ठ असते. खरोखरच समाजांना चिरकाल कर्तृत्ववान् व्हावयाचें असेल तर ' In the event of a vigorous society wishing to display productive energy for a long time or *for ever,* it must recreate itself by rendering it both possible and tolerable for sexual *opportunity to remain at a minimum for an extended period or even for ever.*'

असो; आतांपर्यंत केलेल्या चर्चेवरून सहज नजरेस येईल कीं, घटक व्यक्ति आणि सर्वसाधारण सामाजिक जीवन या दोनहि दृष्टींनीं पाहिलें तरी सह-शिक्षित समाज हा विभक्त ठेवलेल्या समाजापेक्षां जास्त चांगला असतो असें नव्हे. समाजाच्या चिरंतन जीवनाच्या दृष्टीनें सहशिक्षणानें जी कामुक संधींची वाढ होते ती समाजांना सर्वथा मारक आहे. हिंदु समाजानें वेळींच जागें होऊन सहशिक्षणासारख्या कोणत्याहि पद्धति पूर्ण अभ्यास ( विचार नव्हे अभ्यास ) केल्याशिवाय आपल्या येथें पसरूं देऊं नयेत. स्थलाभावास्तव चर्चा फारच त्रोटक झाली याबद्दल सर्वांची माफी मागून येथें रजा घेतों.

---

# आजच्या शिक्षणासंबंधीं पालकांची दृष्टि

लेखक :—भालचंद्र लक्ष्मण लिखिते

"जसें पेरावें तसें उगवतें" या निसर्गाच्या नियमाला मानवी सृष्टि अपवाद कशी असूं शकेल? मनुष्याच्या मनाला भूमीची उपमा देण्यांत येते व ती समर्पकहि आहे. भूमींतून जें पीक काढावयाचें असेल त्या पिकाच्या मानानें भूमीची शास्त्रीय पाहणी करून व जें बीज पेरावयाचें तेंहि शुद्ध असल्याबद्दल खात्री करून पेरलें असतां अधिकांत अधिक पीक पदरांत पडण्याचा बराच संभव असतो. स्वतःच्या जमिनींतून उत्तम व भरपूर पीक मिळावें अशी शेतकऱ्याला सारखी तळमळ लागून राहिलेली असते. परंतु काय केलें असतां पीक चांगलें येईल हें त्याला कळत नाहीं. मुलाच्या शिक्षणाच्या बाबतींत पालकांची स्थितिहि अशीच असते. मुलाच्या मनोभूमिकेंतून उत्कृष्ट व भरपूर पीक निघावें अशी तळमळ पालकांना वाटत असते; परंतु कोणतें व कसें शिक्षण दिलें असतां उत्कृष्ट फळ पदरांत पडेल तें त्यांना कळत नाहीं. शिवाय तें कळूनहि कांहीं उपयोग होत नाहीं. कारण शिक्षण ही बाब देशांतील प्रस्थापित सरकारची असून सरकारकडूनच शिक्षणाचें मुख्य धोरण ठरविलें जातें. त्यामुळें राष्ट्रांतील भावी पिढीच्या सुशिक्षणाची सर्व जबाबदारी सरकारवर येऊन पडते. पालकांची दृष्टि फक्त त्या शिक्षणाचा मुलांवर जो परिणाम होतो व त्यापासून मुलांना जो फायदा होतो त्यावर खिळून राहिलेली असते. मुलाला आपल्या पायावर उभें राहून सन्मानानें स्वतःचें पोट भरण्याचें सामर्थ्य यावें, त्याची शारीरिक व मानसिक वाढ पूर्ण होऊन तो सुदृढ निपजावा, त्याच्या वागण्यांत विचारीपणा व सहानुभूति असावी, तो स्वार्थी नसावा व त्याचा उपयोग प्रथम कुटुंबाला व क्रमाक्रमानें समाजाला, गांवाला व साऱ्या राष्ट्राला व्हावा अशी पालकांची अपेक्षा असते. त्यासाठीं स्वतःच्या पोटाला चिमटा घेऊन पालक खर्च करीत असतो व मोठ्या आशेनें मुलाकडे पाहत असतो. परंतु पालकांची ही अपेक्षा आजच्या शिक्षणाच्या योगानें कितपत सफल होते हें पाहिलें म्हणजे

मात्र अत्यंत निराशा झाल्याशिवाय राहत नाहीं. ही निराशा होण्याचीं कारणें अनेक आहेत; व त्यांपैकीं कांहींचा या लेखांत थोडक्यांत विचार करण्याचें योजिलें आहे.

२. आज दिलें जात असलेलें शिक्षण या देशांत सुरू झाल्याला जवळजवळ शंभर वर्षें झालीं. कंपनी सरकारला इंग्रजी भाषा जाणणाऱ्या एतद्देशीय नोकरांची गरज होती व म्हणून पूर्वीची शिक्षणपद्धति बदलून नवी सुरू करण्यांत आली. परंतु या पद्धतीच्या मुळाशीं उच्च ध्येय मुळींच नव्हतें असें नाहीं. इंग्रजी विद्या हें वाघिणीचें दूध असून त्याच्या प्राशनापासून केव्हां ना केव्हां तरी हिंदी लोक स्वराज्याची मागणी करतील असा एक आक्षेप त्या वेळीं या नवीन शिक्षणपद्धतीवर घेण्यांत येत होता. परंतु लॉर्ड मेकॉलेप्रभृति इंग्रज मुत्सद्द्यांनीं या आक्षेपावर असें उत्तर दिलें होतें कीं, हिंदुस्थानांतील लोकांवर कायमची गुलामगिरी लादणें कधींहि योग्य होणार नाहीं. हिंदी लोकांनीं स्वातंत्र्याची मागणी केली तरी हरकत नाहीं, मागासलेल्या एका मोठ्या देशास जगांतील स्वतंत्र देशाच्या योग्यतेस आणून पोंचविल्याचें श्रेय तरी इंग्रजी राज्यास मिळेल. वरील आक्षेप बरोबर होता असें आज प्रत्ययास येत आहे, व लॉर्ड मेकॉलेप्रभृति इंग्रज मुत्सद्द्यांनीं दिलेल्या उत्तरांतील श्रेय इंग्रजी राज्यास मिळण्याचे दिवसहि दृष्टिपथांत आले आहेत असें दिसतें. असो.

३. इंग्रजी शिक्षणापासून सर्वांत मोठा फायदा झाला तो हा कीं त्यामुळें जगाच्या वाङ्मयाचा परिचय होऊन त्यांतील प्रभावशाली विचार देशांतील सुशिक्षितांत प्रसृत झाले व एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचाहि उगम झाला. इंग्रजी शिक्षणापासून सकृद्दर्शनीं दुसरा एक फायदा म्हणजे त्यामुळें उदर-निर्वाहाचा प्रश्न फार जलद सुटला. चारपांच इयत्तांचें शिक्षण झालेल्या मंडळींनाहि मोठ्या पगाराच्या नोकऱ्या मिळूं लागल्या. यामुळें नोकरी करणें हा आयुष्यांतील मोठा पुरुषार्थ समजण्यांत येऊं लागला. इंग्रजी शिक्षण याप्रमाणें सद्यःफलदायी झाल्यामुळें त्यांतील दोषांकडे साहजिकच दुर्लक्ष झालें. परंतु या शिक्षणाचा जेव्हां अधिकाधिक प्रसार झाला तेव्हां वाघिणीच्या दुधामुळें उत्पन्न झालेल्या आकांक्षा बिलकुल पुऱ्या होईनाशा झाल्या; व जवळजवळ एक शतकाच्या दीर्घ कालानंतरहि जी राष्ट्रीय प्रगति व्हावयास पाहिजे ती न झाल्यामुळें आजच्या शिक्षणपद्धतींतच कांहीं दोष आहेत कीं काय व काल-

मानाप्रमाणें ती आतां अपुरी पडत आहे कीं काय इकडे विचारी लोकांचें लक्ष जाऊं लागलें.

४. आजच्या शिक्षणाकडे पाहण्याची पालकांची दृष्टि मुख्यतः एकाच प्रकारची असते व ती म्हणजे मुलाच्या शिक्षणासाठीं खर्च होणाऱ्या पैशाचा योग्य मोबदला मुलाला मिळावा व त्याच्या पोटापाण्याची विवंचना दूर व्हावी ही होय. परंतु ११ वर्षांच्या शिक्षणानंतर प्रवेश-परीक्षा पास होऊन मुलाला दरमहा १५-२० रुपयांची नोकरीहि मिळत नाहीं व हाडांचीं काडें करून बी.ए. होऊनहि दरमहा २५-३० रुपयांची नोकरी मिळण्याची पंचाईत पडते पाहून पालकांना काय वाटत असेल त्याची कल्पनाच करावी. कॉलेजमध्यें शिक्षणासाठीं मुलाला दरमहा जेवढे पैसे पाठवावे लागत होते, त्याच्या निम्म्यानेंहि अर्थोत्पादन करण्याची शक्ति मुलाच्या अंगीं आजच्या शिक्षणानें येऊं शकत नाहीं. शिवाय शिक्षणक्रमांतून बाहेर पडतांना कोणतेंहि शारीरिक श्रमाचें काम करण्यास तो नालायक ठरतो व फुकटचा पोषाखीपणा व बडेजाव मात्र वाढलेला असतो. अशा परिस्थितींत मुलाचे दोन हातांचे चार हात होऊन त्याला चार मुलेंबाळें झालीं, कीं संसाराच्या ओझ्याखालीं दडपून जाऊन त्याच्या कर्तृत्वाचा ग्रंथ आटोपतो व तो साहाजिकच निराशावादी बनतो. कुटुंबाला किंवा राष्ट्राला त्याचा कांहींहि उपयोग होऊं शकत नाहीं. आजच्या शिक्षणानें मुलगा स्वतःच्या संसाराची जबाबदारीसुद्धां उचलूं शकत नाहीं, मग वडिलांना त्याच्यापासून मदत होण्याचें तर दूरच राहिलें. यापेक्षां मुलाला कोणताहि स्वतंत्र धंदा शिकविला असता व शिक्षणांत खर्च केलेल्या पैशाइतकें भांडवल त्याला दिलें असतें, तर त्याच्या पोटापाण्याचा प्रश्न तरी सुटला असता, असें पालकांना वाटूं लागल्यास त्यांत नवल नाहीं.

५. पालकांच्या दृष्टीनें शिक्षणाचा मुख्य उद्देश जें अर्थोत्पादन त्याविषयीं आजच्या शिक्षणपद्धतीमुळें पालकांची किती निराशा होते हें वर दाखविलेंच आहे. परंतु शिक्षणाचा हा एवढाच उद्देश नाहीं; याशिवाय इतरहि उद्देश आहेत. शिक्षणापासून संस्कृतिसंरक्षण, ज्ञानार्जन, शारीरिक व मानसिक शक्तींचा पूर्ण विकास, व्यक्तिमत्वाचा विकास, शीलसंवर्धन, उदारमतवादित्व, भावी आयुष्याची पूर्वतयारी वगैरे अनेक फायदे होतात. पालकांच्या दृष्टीनें

आजच्या शिक्षणानें मुलाला हे फायदे तरी कितपत होतात तें पाहिलें तर त्याहि बाजूनें त्यांची निराशा झाल्याशिवाय राहत नाहीं.

६. संस्कृति-संरक्षणाच्या बाबतींत आजच्या शिक्षणपद्धतींन पूर्वसंस्कृतीची ओळख होऊन ती कायम राहवी व तिचें संरक्षण व्हावें अशी कांहींच योजना नाहीं. इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यावर त्याचा परिणाम साहजिकच असा झाला कीं इंग्रजांची संस्कृति, इंग्रजांचे आचारविचार वगैरे सर्व कांहीं आदर्शवत् समजलें जाऊन प्रत्येक गोष्टींत त्यांचें अनुकरण करण्याचा उपक्रम सुरू झाला व आजहि तो तसाच चालू आहे. यामुळें सध्यांच्या शिक्षणक्रमांतून विद्यार्थी बाहेर पडतांना तो स्वतःची संस्कृति पार विसरून जवळजवळ परकी संस्कृतीचा दास बनूनच बाहेर पडतो. इंग्लंड देशावर नॉर्मन लोकांचें ज्या वेळीं राज्य होतें त्या वेळच्या परिस्थितीचें वर्णन लॉर्ड मेकॉलेनें आपल्या इंग्लंडच्या इतिहासांत पुढीलप्रमाणें केलें आहेः—

" Had the Plantagenets, as at one time seemed likely, succeeded in uniting all France under their government, it is probable that England would never have had an independent existence......The noble language of Milton and Burke would have remained a rustic dialect, without a literature, a fixed grammar, or a fixed orthography, and would have been contemptuously abandoned to the use of books. No man of English extraction would have risen to eminence, *except by becoming in speech and habits a Frenchman.*" (Mecaulay's History of England, vol. I, p. 15, ed. of 1850). (The italics are mine.)

[" एके काळीं वाटत होतें त्याप्रमाणें इंग्लंडच्या प्लँटाजिनेट ( फ्रेंच ) राजांना सर्व फ्रान्स देश आपल्या अधिराज्याखालीं आणण्यांत यश आलें असतें तर असा संभव होता कीं, इंग्लंड देशाला स्वतंत्र अस्तित्वच राहिलें नसतें. मिल्टन आणि बर्क यांची प्रभावशाली भाषा ही वाङ्मयव्याकरणव्युत्पत्ति-

विहीन अशी अडाणी माणसांची भाषा राहिली असती व रानटी लोकांची भाषा म्हणून तिचा तिरस्कार झाला असता. कोणीहि इंग्रज गृहस्थ वाचेनें व संवयीनें फ्रेंच बनल्याशिवाय श्रेष्ठत्वाला चढला नसता. " ]

वरील वर्णनाप्रमाणें सध्यांच्या शिक्षणपद्धतींतून बाहेर पडणारे आमचे विद्यार्थि स्वत्व गमावून जवळजवळ परकीय बनून बाहेर पडतात असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. स्वदेशाबद्दल, स्वभाषेबद्दल,पोषाखाबद्दल, आचारविचारांबद्दल, फार काय गुरुजनांबद्दल व वडीलमंडळींबद्दल त्यांच्यांत आदराचा जवळजवळ अभाव दिसून येतो. कांहीं विद्यार्थ्यांवर, याप्रमाणें शिक्षणाचा परिणाम होत नाहीं हें खरें, परंतु अशीं उदाहरणें फार थोडीं. राष्ट्राच्या उद्धाराला पूर्वसंस्कृतीचें महत्त्व किती आहे हें सांगण्याची जरूरच नाहीं. संस्कृति हा राष्ट्राच्या पाठीचा कणाच होय. राष्ट्राचा उद्धार पूर्वसंस्कृतीच्या बळावरच होत असतो. आपला पूर्वेतिहास अत्यंत उज्ज्वल आहे, व " **पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भावि काल।** "–ही **विनायक** कवींची उक्ति यथाकाल सार्थ झाल्याशिवाय राहणार नाहीं.

७. मनुष्य जन्माला आला कीं, तो देव, ऋषि व पितर यांचें ऋण घेऊन जन्माला येतो अशी भारतीय आर्यांची पूर्वापार समजूत आहे. " **जायमानो वै ब्राह्मणः त्रिभिऋणवान् जायते। यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः स्वाध्यायेन ऋषिभ्यः** " या तैत्तिरीय संहितेंतील वाक्यांत हीं तीन ऋणें व तीं फेडण्याचे मार्ग सांगितले आहेत. बदललेल्या काळाप्रमाणें आज या तीन ऋणांऐवजीं दोन ऋणें मानण्याचा प्रघात आहे. एक कौटुंबिक ऋण व दुसरें राष्ट्रऋण जन्मदात्या पित्याची कार्यपरंपरा पुढें चालविणें हें जितकें महत्त्वाचें कर्तव्य आहे तितकेंच राष्ट्राची संस्कृति व परंपरा कायम राखणें व स्वतःच्या उज्ज्वल कर्तृत्वानें यांत भर घालणें हेंहि महत्त्वाचें कर्तव्य आहे. शिक्षणानें मनुष्याला हीं दोन्ही कर्तव्यें यथाशक्ति पार पाडण्यास समर्थ केलें पाहिजे. शिक्षणापासून पालकांची हीच अपेक्षा असते, व ती पुरी करण्याची जबाबदारी शिक्षणाचें ध्येय व पद्धति ठरविणारांवर येऊन पडते.

८. ज्ञानार्जन हा जो शिक्षणाचा हेतु त्या बाबतींतसुद्धां सध्यांच्या शिक्षणानें विद्यार्थ्यांवर विशेषसा परिणाम झालेला दिसून येत नाहीं. आजच्या शिक्षण

क्रमांतून बाहेर पडणाऱ्या पदवीधरांचें ज्ञान अनेक दृष्टींनीं अपूर्ण असतें असा सार्वत्रिक अनुभव आहे. इंग्रजी शिकलेल्या विद्यार्थ्यांना मातृभाषेंतून विचार प्रदर्शित करतां येत नसल्यामुळें तिच्यांत योग्य शब्दच नाहींत असें म्हणून तिची उपेक्षा करण्यांत येते. तिच्यांत पावलेपावलीं अनेक इंग्रजी शब्द घुसडून देण्यांत येतात. आप्तस्वकीयांना पत्रें लिहावयाचीं तीं इंग्रजींत, सही करावयाची ती इंग्रजींत, जणूं काय इंग्रजी हीच मातृभाषा आहे अशीच समजूत व्हावी अशी सरसकट सर्व विद्यार्थ्यांची प्रवृत्ति दिसून येते. बरें, इतकें असून इंग्रजी भाषेचें ज्ञान तरी चांगलें असतें काय? एक तप इंग्रजी भाषेचें अध्ययन करून ती भाषा सफाईनें बोलण्याचें तर बाजूलाच राहिलें, परंतु ती शुद्ध लिहितांहि येत नाहीं. सर्वसामान्य ज्ञानासंबंधानें म्हटलें तर आंवळ्याएवढें पूज्य दिसून येतें. जगांतील घडामोडींचें आकलन होण्याइतकें सर्वसामान्य ज्ञान प्रत्येक विद्यार्थ्याला असणें आवश्यक आहे. व्यवहारज्ञानाच्या बाबतींतहि परमावधीची अनास्था दिसून येते.

**विद्या उदंड सिकला । प्रसंगमान चुकताचि गेला ।**
**तरी मग तये विद्येला । कोण पुसे ॥** –दासबोध १२–२–३०

ठराविक क्रमिक पुस्तकें कशीबशी वाचून व परीक्षेच्या दृष्टीनें संभवनीय प्रश्नांचीं उत्तरें तयार करून परीक्षा पास होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या विद्यार्थ्यांना पुरती ज्ञानलालसादेखील उत्पन्न झालेली दिसून येत नाहीं. कोणत्याहि गोष्टींत दीर्घसूत्रीपणा, निरुत्साह, संदेह, अनिश्चय, जिज्ञासेचा व चिकाटीचा अभाव व योग्य निर्णय करण्याची अपात्रता हे दोष जवळजवळ सार्वत्रिक आढळून येतात. विश्वविद्यालयीन शिक्षणक्रमांतून बाहेर पडलेल्या पदवीधरांची जेथें ही स्थिति तेथें केवळ प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण होऊन गृहस्थाश्रम पत्करून जबाबदार नागरिक बनलेल्या तरुणांच्या ज्ञानाचें भांडवल किती असेल याची कल्पनाच करणें बरें.

९. आजच्या शिक्षणांतील एक मोठी उणीव म्हणजे शारीरिक शिक्षणाकडे दुर्लक्ष ही होय. शिक्षणक्रम पुरा करून बाहेर पडलेल्या तरुणांकडे दृष्टि फेंकली असतां बहुतेकांच्या चेहऱ्यांवर तारुण्याचें तेज व धमक हीं दिसून येत नाहींत, व कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें पन्नाशीच्या आंतच आयुष्याचा ग्रंथ

आटोपतो. शारीरिक शिक्षणाच्या प्रश्नाकडे शिक्षणतज्ज्ञांचें व सरकारचें लक्ष अलीकडे जाऊं लागलें आहे ही सुदैवाची गोष्ट होय. मुंबई सरकारनें बोर्ड ऑफ फिझिकल एज्युकेशन नेमून शारीरिक शिक्षण देणार शिक्षक तयार करण्यासाठीं कांदिवली येथें वर्गहि काढला आहे. परंतु हे सर्व प्रयत्न पाहिले म्हणजे टिटवीनें चोंचींत थेंबथेंब पाणी घेऊन समुद्र आटविण्याच्या केलेल्या प्रयत्नाची आठवण होते. "**शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्**" वगैरे वचनें "वचने किं दरिद्रता" या न्यायानेंच विद्यार्थ्यांना शिकविण्यांत येतात. परंतु सामर्थ्यवान् शरीरसंपत्तीचें खरें महत्त्व विद्यार्थ्यांच्या मनावर पूर्णपणें बिंबलें आहे किंवा नाहीं इकडे मुळींच लक्ष दिलें जात नाहीं. दुर्बल शरीरांत बलवान् मन सहसा राहूं शकत नाहीं. "**शतं विज्ञानवतामेको बलवानाकम्पयते। तस्मात् बलमुपास्व**" हा उपनिषदांतील सिद्धांत त्रिकालबाधित आहे. कित्येक वेळां असामान्य बुद्धीचे पुरुष शरीरानें जरत्कारु असतात यावरून असामान्य बुद्धिमत्तेला शरीरसामर्थ्याची जरूर असतेच असें नाहीं अशी व्यर्थ समजूत करून घेण्यांत येते. परंतु अशीं उदाहरणें अपवादात्मक होत व अपवादांनी मूळ नियमच सिद्ध होतो. मनुष्य कितीहि विद्वान् झाला तरी शरीरसंपत्तीच्या अभावीं तो पंगु राहतो. वेळप्रसंगीं आत्मसंरक्षणासाठींहि त्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी येते. ज्या राष्ट्रांतील लोक विद्वान् परंतु शरीरानें व मनानें दुबळे व भेकड आहेत तीं राष्ट्रें पृथ्वीवर आपलें स्वतंत्र अस्तित्व फार काळ टिकवूं शकत नाहींत असा इतिहासाचा दाखला आहे. शारीरिक शिक्षणानें मूलतः भेकड वृत्तीच्या मनुष्याच्या अंगीं कदाचित् वीरवृत्ति निर्माण होणार नाहीं; परंतु शरीरानें बलवान् असलेल्या मनुष्याच्या अंगीं भेकडपणाचा सामान्यतः अभाव असतो हें म्हणणें सत्याला फारसें सोडून होणार नाहीं. भेकडपणा हा परिस्थितीनें निर्माण केला जातो. या परिस्थितीचा नायनाट करणें व वीरवृत्तीला सर्व प्रकारें उत्तेजन देणें हेंच शिक्षणाचें प्रमुख कार्य असलें पाहिजे.

१०. शारीरिक शिक्षणाची बाब ही ऐच्छिक ठेवून कधींहि चालणार नाहीं. पालक आपलीं मुलें शाळेंत पाठवितात तीं त्यांना केवळ बौद्धिक शिक्षण मिळावें म्हणून नव्हे तर त्यांची सर्वांगीण वाढ व्हावी म्हणून. शारीरिक सामर्थ्यावरच बुद्धीची कुशाग्रता बहुंशीं अवलंबून असते. एक वेळ बौद्धिक शिक्षण कमी दिलें तरी चालेल; परंतु सामर्थ्यवान् शरीर व मन यांचा योग्य मिलाफ

शिक्षणपद्धतींत व्हावयास पाहिजे. आयुष्य हा 'धकाधकीचा मामला' आहे व दिवसेंदिवस तो अधिकाधिक गुंतागुंतीचा होत आहे. अशा वेळीं केवळ शारीरिक शिक्षणानें अंगीं येणारे गुण म्हणजे धैर्य, खेळाडू वृत्ति, आत्म-संयमन, उपक्रम-सामर्थ्य वगैरे गुणांची वेळींच जोपासना करणें अवश्य आहे. प्रत्येक मुलाला आपल्या सामर्थ्याविषयीं आत्मविश्वास वाटला पाहिजे व कोणी विनाकारण आपला अपमान केला तर त्याची आपण योग्य भरपाई करूं अशी धमक त्याच्यामध्यें उत्पन्न झाली पाहिजे. पालकांच्या दृष्टीनें बौद्धिक शिक्षणाइतकें किंबहुना त्यापेक्षांहि अधिक महत्त्वाचें असें हें कार्य आहे. प्रत्येक विद्यार्थ्याला सकाळीं एक तास व संध्याकाळीं एक तास असें सक्तीचें शारीरिक शिक्षण देणें जरूर आहे. शाळेच्या चालकांना व प्रस्थापित सरकारला आपल्या-वरील ही जबाबदारी टाळून चालणार नाहीं. राष्ट्राच्या दृष्टीनें तो अक्षम्य अपराध होईल. शाळांतून सक्तीचें शारीरिक शिक्षण देण्याचा प्रयोग बडोदें संस्थानांत यशस्वी झाला आहे. इतर ठिकाणींहि सक्तीचें शारीरिक शिक्षण सुरू होणें अत्यंत आवश्यक आहे.

११. शारीरिक शिक्षणाची पुढील पायरी म्हणजे लष्करी शिक्षण. या बाबतींत अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषदेच्या दहाव्या अधि-वेशनाच्या प्रसंगीं सातारा येथें रविवार तारीख ३ डिसेंबर १९३९ रोजीं **बडोदानरेश हिज हायनेस श्रीमंत प्रतापसिंह महाराज गायकवाड** यांचें जें अध्यक्षीय भाषण झालें त्यांत महाराजांनीं पुढील मननीय विचार मांडले आहेतः—

"राष्ट्राचें शरीरबलसंवर्धन हें शारीरिक शिक्षणाचें अंतिम ध्येय आहे. तें साध्य करण्यासाठीं आपण राष्ट्रांतील तरुणांना शारीरिक शिक्षणा-बरोबरच लष्करी शिक्षणहि दिलें पाहिजे. तरुण म्हणजे राष्ट्राचे आधारस्तंभ असें तोंडानें नुसतें म्हणून भागणार नाहीं. त्यांना खरे आधारस्तंभ बनविण्याकरितां लष्करी शिक्षण देऊन प्रतिकारक्षम बनविणें जरूर आहे. साध्या व्यायामानें तरुणांचीं शरीरें सुदृढ, काटक व घाटदार होऊन त्यांना निरामय जीवन घालवितां येईल, व वेळप्रसंगीं ते स्वतःचा व आपल्या कुटुंबियांचा थोड्या फार प्रमाणांत बचाव पण करूं शकतील.

परंतु लष्करी शिक्षण घेतल्याशिवाय त्यांना परचक्रापासून आपल्या देशाचें संरक्षण करतां येणार नाहीं.

* * *

आपल्या देशास परचक्रापासून भीति नाहीं असा पूर्वी समज होता. पण नवीन तऱ्हेच्या युद्धसाधनांमुळें तो चुकीचा ठरूं पाहत आहे. या बदललेल्या परिस्थितीचा आपणांस विचार करावयास नको काय? ब्रिटिश सरकारनें आपलें युद्धविषयक धोरण जाहीर केलें असून हिंदी तरुणांसाठीं लष्कर, आरमार व वैमानिक दल यांचे दरवाजे त्यांनीं उघडे ठेविले आहेत. या संधीचा पूर्ण फायदा घेऊन आपण आपल्या देशाच्या संरक्षणाची जबाबदारी पत्करण्यास तयार झालें पाहिजे."

प्रचलित शिक्षणपद्धतींत बदल करण्याचा ज्या वेळीं सुयोग येईल, त्या वेळीं वरील विचारांच्या अनुरोधानें आजच्या शिक्षणपद्धतींत फरक करून सक्तीच्या शारीरिक व लष्करी अगर निमलष्करी शिक्षणास योग्य स्थान द्यावयास पाहिजे असें वाटतें.

१२. शिक्षणाच्या योगानें मनुष्य शीलसंपन्न होतो; परंतु याहि बाबतींत आजच्या शिक्षणानें पालकांची निराशाच होते. मुलगा शीलसंपन्न होऊन शिक्षण-क्रमांतून बाहेर पडला तर पालकाला केवढें तरी समाधान वाटेल; परंतु आजच्या शिक्षणांत मुलांचें शील बनण्यास मदत होईल अशा गोष्टींचा—विशेषतः धार्मिक व नैतिक शिक्षणाचा अभावच दिसून येतो. या दोन्ही गोष्टींचा परिपोष होईल अशी निदानची तरतूद सध्यांच्या शिक्षणांत नाहीं. ज्या राष्ट्रांतील एकूणएक व्यक्ति शीलसंपन्न आहे त्या राष्ट्राच्या पाठीशीं अवनत दशा हात धुऊन कधींहि लागणार नाहीं. राष्ट्रहितार्थ योग्य वेळीं स्वहित बाजूला ठेवण्याची वृत्ति राष्ट्रांतील घटकांत निर्माण झाली म्हणजे तें राष्ट्र कधींहि विपन्नावस्थेत राहणें शक्य नाहीं. करारीपणा, निश्चय, कर्तव्यनिष्ठुरता, इमानीपणा इत्यादि राष्ट्रोपयोगी सद्‌गुणांची जोपासना प्रयत्नपूर्वक केल्याशिवाय आमची तरुण पिढी शीलसंपन्न निपजणार नाहीं. देशांतील 'तरुण स्वाभिमानी, स्वदेशाभिमानी, स्वावलंबी व उद्योगप्रिय निपजले पाहिजेत हीच सध्यांची मोठी गरज आहे. हें कार्य सध्यांच्या शिक्षणपद्धतींत बदल

करूनच करावयास पाहिजे. ज्या शिक्षणपद्धतीच्या योगानें हें कार्य होत नाहीं तिच्यांत कितीहि चांगले गुण असले तरी ते मातीमोल होण्यास अवकाश लागणार नाहीं.

१३. शिक्षणानें व्यक्तिमत्वाचा विकास होतो; परंतु खऱ्या व्यक्तिमत्वा-ऐवजीं ज्या त्या बाबतींत स्वतःचीं स्वतंत्र अपरिपक्व मतें प्रतिपादण्याच्या व दुसऱ्याच्या मतांना तुच्छ लेखण्याच्या अनिष्ट प्रवृत्तीलाच व्यक्तिमत्वाचा विकास हें नांव देण्यांत येतें ! शिक्षणानें उदारमतवादित्व अंगीं येतें; परंतु आजच्या शिक्षणानें विद्यार्थ्यांचीं मनें इतकीं 'उदार' व 'विशाल' बनतात कीं, कशा-वरच तीं एकाग्र होऊं शकत नाहींत. कोणत्याहि झेंड्याखालीं एकत्र येऊन हौसेनें एकोप्यानें व सहकार्यानें काम करण्याची वृत्ति त्यांच्यामध्यें दिसून येत नाहीं. उदारमतवादित्व हें ध्येयसुद्धां आजच्या शिक्षणपद्धतींत बुद्धिपुरः-सर ठेवण्यांत आलेलें नाहीं. कोणतेंच ध्येय नसल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या क्रियाशून्यतेलाच दिलेलें हें गोंडस नांव आहे इतकेंच. राष्ट्राच्या व भावी पिढीच्या कल्याणाच्या दृष्टीनें आजच्या शिक्षणांतील 'उदार' दृष्टि तारतम्यानें थोडीशी संकुचित करून तिचें धोरण भावी पिढी कर्तबगार कशी निपजेल इकडे वळविलें पाहिजे. राष्ट्राची प्रगति होण्यास राष्ट्रांत कर्तबगार व्यक्ति निप-जाव्या लागतात. राष्ट्रीय ध्येय निश्चितपणें समजून घेऊन त्यासाठीं जिवापाड कष्ट करण्याचें सामर्थ्य मनावर प्रयत्नपूर्वक सुसंस्कार केल्यानेंच विद्यार्थ्यांच्या अंगीं येऊं शकेल. आपल्या शिक्षणांतील 'उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम्' ही वृत्ति मानवतेचें अंतिम ध्येय म्हणून कदाचित् योग्य असेल; परंतु या विश्वकुटुंबांतील इतर भाऊबंदांनीं आपल्या बरोबरीचा मान आम्हांस द्यावयास पाहिजे. हा मान फुकट कोणीच देत नाहींत. हा मान ज्याचा त्यानें मिळवावा लागतो व त्यासाठीं कष्ट करावे लागतात. " आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निष्फळ ॥ –दासबोध.

१४. भावी आयुष्याची पूर्वतयारी हा एक शिक्षणाचा मुख्य हेतु आहे. परंतु याहि दृष्टीनें पाहिलें असतां आज दिलें जाणारें शिक्षण अपुरेंच पडतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. भावी आयुष्याची पूर्वतयारी करण्यापूर्वी भावी आयुष्य कोणत्या प्रकारचें असणार याची प्रथम कल्पना असावयास पाहिजे.

आज जी पिढी शिक्षण घेत आहे तिला १०-२० वर्षांनीं प्राप्त होणाऱ्या परिस्थितीला तोंड द्यावें लागेल व अनेक प्रकारचे प्रहार सहन करावे लागतील. त्या वेळीं ती कोणत्याहि बाबतींत असमर्थ ठरूं नये अशीच पालकांची दृष्टि असणार. जग हें आज इतक्या झपाट्यानें बदलत आहे कीं, आणखी १०-२० वर्षांनीं त्या वेळच्या तरुण पिढीवर काय काय जबाबदाऱ्या येऊन पडणार आहेत याची कल्पना करणें जवळजवळ अशक्य आहे. तथापि देशांतील पुढाऱ्यांनीं व प्रस्थापित सरकारनें ही कल्पना करूनच त्याप्रमाणें शिक्षणाचें धोरण आंखावयास पाहिजे व कालमानाप्रमाणें त्यांत वेळोवेळीं बदल करावयास पाहिजे. त्या काळांतील जीवनकलहांत जिवंत राहण्याचें सामर्थ्य भावी नागरिकांच्या अंगीं प्रथम यावयास पाहिजे. सध्यांच्या शिक्षणानें सन्मानानें द्रव्यार्जन करण्याचा मार्ग आजच खुंटल्यासारखा झाला आहे. आणखी १०-२० वर्षांनीं विश्वविद्यालयीन शिक्षणानें द्रव्य मिळवूं पाहणारांना वेड्याच्याच कोटींत काढावें लागणार कीं काय अशी आज भीति वाटूं लागली आहे. यामुळें यापुढें सरकारनें सध्यांची शिक्षणपद्धति शक्य तितक्या लवकर बदलली तरच कांहीं तरणोपाय आहे असें पालकांना वाटल्याशिवाय राहत नाहीं.

१५. सध्यांच्या शिक्षणपद्धतीपासून मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत पालकांची सर्व बाजूंनीं कशी निराशा होतें याबद्दलचा वर थोडक्यांत विचार केला आहे. मुलींच्या शिक्षणाच्या बाबतींतसुद्धां पालकांची अशीच स्थिति होते. मुलींना शिक्षण द्यावयास पाहिजे अशी वैचारिक क्रांति झाल्यानंतर त्यांना शाळेंत व कॉलेजांत पाठविण्यांत येऊं लागलें. परंतु मुलांना जें शिक्षण देण्यांत येतें तेंच मुलींनाहि देणें कितपत बरोबर आहे या प्रश्नाकडे समाजाचें किंवा सरकारचें, कोणाचेंच जितकें लक्ष जावयास पाहिजे तितकें गेलेलें दिसत नाहीं. दरसाल अनेक मुली प्रवेश-परीक्षा पास होतात व पदवीधरहिं होतात. मुलां-प्रमाणेंच त्यांनाहि शारीरिक शिक्षण देण्याची आबाळ होत असल्यामुळें व बौद्धिक शिक्षण मुलांच्या बरोबरीनें दिलें गेल्यामुळें त्यांच्या मेंदूवर ताण पडून बहुतेक सुशिक्षित मुलींचें आरोग्य यथातथाच राहूं लागलें. यामुळें गृहिणी-पदाची व मातृत्वाची जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडण्यास त्या दिवसें-दिवस असमर्थ होत आहेत व भावी पिढीहि जन्मतःच अशक्त निपजत

आहे. महर्षि कर्वे यांनीं २० वर्षांपूर्वी भारतवर्षीय महिला-विद्यापीठाची स्थापना केली व सदर विद्यापीठाच्या परीक्षांच्या अभ्यासक्रमांत गृहजीवनोपयोगी विषय ठेविले आहेत. परंतु त्यांतहि मुख्य भर बौद्धिक विषयांवरच दिलेला आहे. शिवाय सदर विद्यापीठाच्या पदव्यांना आतांपर्यंत सरकारमान्यता न मिळाल्यामुळें त्यांना कमी लेखण्याची प्रवृत्ति उत्पन्न होऊन विद्यार्थिनींचा ओघ साहजिकच सरकारमान्य विद्यापीठांच्या परीक्षांकडे वळला व दिवसें-दिवस तो सारखा वाढत्या प्रमाणांत आहे; मुलांचा व मुलींचा शिक्षणक्रम वेगवेगळा असावयास पाहिजे याबद्दल मतभेद असण्याचें कारण नाहीं. शिक्षणाचा उपयोग भावी आयुष्यांत व्हावयाचा असतो. आणि मुलें व मुली यांचा आयुष्यक्रम निसर्गतःच भिन्न असतो. मुलींना मुख्यतः वैवाहिक आयुष्यांत हरघडी उपयोगी पडेल असेंच शिक्षण द्यावयास पाहिजे. मुलांच्या व मुलींच्या शिक्षणक्रमांत फरक पाहिजे ही गोष्ट जगांतील सुधारलेल्या राष्ट्रांनीं ओळखूनच त्याप्रमाणें त्यांनीं शिक्षणक्रम आंखले आहेत. जपानमध्यें प्राथमिक सहा वर्षांच्या शिक्षणानंतर मुलांमुलींचें शिक्षण निराळें होतें. मुलींसाठीं स्वतंत्र हायस्कुलें आहेत. हायस्कूलमधील शिक्षणानंतर मुलींना विवाह-योग्य होण्याकरितां जरूर तें शिक्षण देण्यांत येतें. हायस्कूलमध्यें निम्मा वेळ गृहशिक्षणात्मक विषयांना देण्यांत येतो. गृहशिक्षणाच्या उच्च शिक्षणासाठीं आधुनिक कॉलेजें आहेत; सारांश, जपानमध्यें स्त्रियांना स्त्रीविशिष्ट शिक्षणच देण्यांत येतें. अमेरिकेंतहि मुलींना वैवाहिक आयुष्यांत उपयोगी पडणारें शिक्षण मिळण्याची सोय करण्यांत आलेली आहे. 'मॅगेझिन डायजेस्ट' या अमेरिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या मासिकाच्या जून १९३९ च्या अंकांत Streamlining Education या नांवाचा लेख श्री. एफ्. जी. एन्फील्ड यांनीं लिहिला आहे. त्यांत त्यांनीं कोलंबियांतील मिसूरी येथील मुलींच्या स्टीफन्स ज्यूनिअर कॉलेज-मधील शिक्षणाची माहिती दिली आहे. त्यांत या कॉलेजांतील शिक्षणाच्या उद्देशासंबंधीं सदर लेखकानें पुढीलप्रमाणें लिहिलें आहेः--

"Its purpose is not to provide students with book-learning or to prepare them to pass examintions, but to develop their personalities and their cultural tastes, and to give them those skills and that knowledge which

will best prepare them to live their lives as wives, mothers, and citizens."

(" सदर कॉलेजांतील शिक्षणाचा उद्देश विद्यार्थिनींना केवळ पुस्तकी ज्ञान देण्याचा अगर परीक्षांची तयारी करण्याचा नसून, विद्यार्थिनींचें व्यक्तिवैशिष्ट्य व सुसंस्कृत अभिरुचि वाढविणें व उत्तम पत्नी, उत्तम माता व उत्तम नागरिक या नात्यांचीं कर्तव्यें पार पाडण्यासाठीं जरूर तें ज्ञान व कौशल्य त्यांना प्राप्त करून देणें हा आहे.")

हिंदुस्थानांतील सध्यांच्या शिक्षणपद्धतींत जितक्या झपाट्यानें बदल होईल तितकी राष्ट्राची प्रगति झपाट्यानें होईल. जगांतील कोणत्याहि सुसंस्कृत देशाकडे पाहिलें तरी शिक्षणाविषयीं जितकी अनास्था आपल्याकडे दिसून येते तितकी त्या देशांतून दिसून येत नाहीं, व म्हणूनच ते देश जगाच्या आघाडीवर आहेत. इतर देशांतील शिक्षणपद्धति व हिंदुस्थानांतील शिक्षणपद्धति यांची तुलना केली असतां एक नैसर्गिक व दुसरी अनैसर्गिक आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

१६. शिक्षणाच्या बाबतींत व इतर बाबतींतहि जपानचें उदाहरण अनुकरणीय आहे. जपान देश क्षेत्रफळानें हिंदुस्थानच्या सुमारें १/७ व लोकसंख्येनें सुमारें १/५ आहे. ७५ वर्षांपूर्वी जपानचें नांवहि कोणास माहीत नव्हतें. जपानला फारसा पूर्वेतिहास नव्हता. विशिष्ट संस्कृति नव्हती. लोक बुद्धधर्मानुयायी असून तो धर्म हिंदुस्थानपासूनच त्यांनीं घेतला. त्यांच्या वाङ्मयाची इतरांना फारशी माहिती नव्हती. त्यांची कला चीनच्या वळणावर होती. लोकांचा मुख्य धंदा शेतकी होता. परराष्ट्रांशीं फारसा व्यापार नव्हता. इतकें असूनहि केवळ दोन पिढ्यांच्या आंतच जपान हें आशिया खंडांतील प्रमुख राष्ट्र बनलें व जगांत पाश्चात्य राष्ट्रांच्या बरोबरीचें सन्माननीय स्थान त्यानें मिळविलें. जपानचा हा इतिहास अगदीं ताजा आहे. जपानच्या या उत्कर्षाचें मर्म कोणाला सांगावयाला नको. जपान परतंत्र राष्ट्र नव्हतें. पारतंत्र्यापासून सर्वांत मोठा होणारा तोटा जर कोणता असेल तर तो म्हणजे पारतंत्र्यानें मनुष्य अगतिक होऊन त्याबद्दल सवयीनें त्याला एक प्रकारची आवड उत्पन्न होते व तो प्राप्तपरिस्थितीचेंच समर्थन करूं लागतो. परंतु पारतंत्र्याची एवढी एक गोष्ट सोडली तर राष्ट्राच्या प्रगतीचें खरें बीज राष्ट्राच्या शिक्षणपद्धतींतच असतें.

जपाननें आपली उन्नति करून घेण्याचें ठरविल्यानंतर प्रथम शिक्षणांत प्रगति केली व लगेच सरकारच्या साहाय्यानें ज्ञानाच्या इतर शाखांत झपाट्यानें प्रगति करून ४०–५० वर्षांच्या अल्पावधींतच जगांतील प्रमुख राष्ट्रांत आपलें मानाचें स्थान पटकावलें. जपानला जें शक्य झालें तें हिंदुस्थानला कां शक्य होऊं नये इकडे आतां देशांतील विचारी लोकांनीं दृष्टि फेंकली पाहिजे.

१७. जपाननें आपल्या अनेक वर्षांच्या एकांतवासांतून बाहेर पडण्याचें ठरविल्यानंतर प्रथम जर कोणत्या गोष्टीकडे लक्ष दिलें असेल तर तें शिक्षणाकडे. सन १८६९ सालीं जपाननें शिक्षणासंबंधीं एक वटहुकूम काढला. त्यांत पुढील मजकूर आला आहे:—

" Education is essential for all persons; and whereas in the past learning has been looked upon as a means of securing official position, henceforth the whole population of the country regardless of classes must be educated; so that no village shall contain a person devoid of learning nor any house contain an illiterate inmate."

("देशांतील सर्व लोकांना शिक्षण असणें अत्यंत आवश्यक आहे. पूर्वी अधिकाराची जागा मिळविण्याचें साधन या दृष्टीनेंच शिक्षणाकडे पाहण्यांत येत होतें; त्याऐवजीं यापुढें देशांतील सर्व जनता, मग ती कोणत्याहि सामाजिक दर्जाची असो, सुशिक्षित झाली पाहिजे. यापुढें कोणत्याहि खेड्यांत अशिक्षित माणूस अगर कोणत्याहि घरांत निरक्षर माणूस असतां कामा नये.")

वरील उद्देशानुसार जपाननें भराभर शाळा, कॉलेजें व विद्यापीठें स्थापन केलीं व युरोप आणि अमेरिका या खंडांतील उत्तमोत्तम कॉलेजांतून व शेतीच्या व उद्योगधंद्यांच्या शिक्षणसंस्थांतून अगणित तरुण विद्यार्थि शिक्षणासाठीं पाठविले. त्यांनीं स्वदेशीं परत आल्यानंतर सर्व देश सर्व प्रकारें शिक्षणसंपन्न केला. जपानच्या यशाचें सर्व रहस्य त्याच्या शिक्षणपद्धतींत आहे. युरोप व अमेरिका खंडांतील सुधारलेल्या देशांच्या शिक्षणपद्धतींतून उत्तमोत्तम ग्राह्य तत्त्वें एकत्र करून त्यांवर जपानची शिक्षणपद्धति आधारलेली आहे.

१८. देशांतील शिक्षणपद्धति कशी असावी यासंबंधीं पालकांना कांहींच सांगतां येणार नाहीं. फार तर व्यक्ति, कुटुंब, समाज व राष्ट्र यांच्या त्या त्या वेळच्या गरजा लक्षांत घेऊन शिक्षणाची पद्धति ठरविण्यांत आली पाहिजे एवढेंच म्हणतां येईल. सध्यांच्या शिक्षणपद्धतींत जीवन व शिक्षण यांत मेळ नाहीं. भावी शिक्षणक्रमांत तो उत्कृष्टपणें राहिला पाहिजे. प्रचलित शिक्षण-पद्धतीपासून सध्यांच्या वैयक्तिक व राष्ट्रीय गरजा भागविल्या जात नाहींत. तिच्यांत शिक्षणपद्धतींत पुढें दिल्याप्रमाणें कांहीं प्रमुख उणीवा दिसून येत आहेत:—

( १ ) पूर्वपरंपरेशीं फारकत.

( २ ) बौद्धिक अभ्यासक्रमाशिवाय इतर व्यावहारिक अभ्यासक्रमाचा अभाव व त्यामुळें सुशिक्षितांमधील वाढती बेकारी आणि कर्तव्यपराङ्मुखता.

( ३ ) समाजांतील मोठ्या प्रमाणावरील निरक्षरता.

( ४ ) शारीरिक शिक्षणाची आबाळ.

( ५ ) मुलांचें व मुलींचें एकाच सांच्याचें शिक्षण.

सध्यांच्या राष्ट्रीय गरजांच्या दृष्टीनें नवीन शिक्षणपद्धतींत वरील दोष नाहींसे करण्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. नवीन शिक्षणपद्धतींत--

( १ ) भारतीय संस्कृतीचा ( तत्त्वज्ञान, धर्म, वाङ्मय, कला वगैरेंचा ) अभ्यास, व एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचा आणि प्रजासत्ताक मनो-वृत्तीचा पुरस्कार करणारें नागरिकत्वाचें शिक्षण,

( २ ) औद्योगिक ( विशेषतः कृषिप्रधान औद्योगिक ) शिक्षण,

( ३ ) समाजांतील प्रत्येक घटकाची साक्षरता,

( ४ ) सक्तीचें शारीरिक व लष्करी अगर निमलष्करी शिक्षण,

( ५ ) मुलांच्या व मुलींच्या आयुष्यक्रमाशीं जुळणारें असें निरनिराळें शिक्षण,

या सुधारणा झाल्यास पालकांच्या दृष्टीनें सध्यांच्या शिक्षणपद्धतींतील पुष्कळसे दोष जातील. वरील सुधारणांबरोबरच भाषावार प्रांतरचना होऊन भाषावार विद्यापीठेंहि स्थापन व्हावयास पाहिजेत. तसेंच उच्च शिक्षणापर्यंतचें सर्व शिक्षण मातृभाषेंतून द्यावयास पाहिजे. इंग्रजी भाषेचें ज्ञान जागतिक व्यवहारा-

साठीं आवश्यक आहे म्हणून, फार तर संस्कृतबरोबर इंग्रजी भाषेचें ज्ञान असणें आवश्यक ठेवावें. परंतु सध्यां इंग्रजी भाषेला जें अवास्तव महत्त्व दिलें गेलें आहे तें नवीन पद्धतींत देण्याचें कारण नाहीं.

१९. प्रचलित शिक्षणपद्धतींत परकीयांच्या धोरणाप्रमाणें प्रथम ठरविण्यांत आली व बदललेल्या काळाला ती आतां फारच अपुरी पडत आहे. बहुजन-समाजासाठीं नवीन शिक्षणपद्धति कशी असावी ती **वर्धा शिक्षण-योजनेनें देशापुढें** ठेविली आहे. वर्धा शिक्षण-योजनेंत मुख्य भर व्यवसायात्मक शिक्षण-पद्धतीवर दिला आहे. प्रत्यक्ष जीवन व शिक्षण या दोहोंमध्यें समवाय ( Co-relation ) घडवून आणण्याचा त्यांत प्रयत्न केला आहे. नुसतें पुस्तकी शिक्षण अगर नुसतें औद्योगिक शिक्षण या दोन्ही पद्धतींचा सुंदर मिलाफ मूलभूत उद्योगाच्या द्वारें शिक्षण देण्याच्या पद्धतीनें सदर योजनेंत साधलेला आहे. उद्योगाच्या द्वारेंच विद्यार्थ्यांच्या सर्व मानसिक शक्तींचा विकास करणें. त्यांना जीवनोपयोगी असें विविध प्रकारचें ज्ञान प्राप्त करून देणें व उपजीविकेचें प्रमुख साधन पुरविणें हे तीन मुख्य हेतू त्यांत साधले आहेत. "हात व इंद्रियें यांपासून मेंदू व हृदय यांजकडे आणि शाळेपासून समाज व ईश्वर यांकडे नेणारी" असें या शिक्षण-योजनेचें वर्णन करण्यांत आलें आहे. या योजनेंत तूर्त सूतकाम, विणकाम यांचाच समावेश केला असला तरी इतर मूलभूत धंद्यांचा समावेश त्यांत करण्यास तत्त्वाच्या दृष्टीनें कोणतीच हरकत नाहीं. व एकदां ही समवायपद्धति बहुजनसमाजाला शिक्षण देण्यास योग्य आहे असें अनुभवांतीं दिसून आलें म्हणजे निरनिराळ्या धंद्यांवर आधारलेले शिक्षणक्रम ठरवितां येतील. हिंदुस्थानांतील बहुजनसमाजाचा मुख्य धंदा शेती हा असल्यामुळें या धंद्यावर आधारलेला शिक्षणक्रमच देशाच्या उन्नतीला पोषक होईल असें वाटतें. असो. वर्धा शिक्षण-योजना ही परिपूर्ण आहे असें म्हणतां येणार नाहीं. तथापि गेलीं जवळ जवळ १०० वर्षें शिक्षणाची गाडी ज्या रुळावरून जात आहे तिच्यापेक्षां वर्धा शिक्षण-योजनेचा रस्ता नवा आहे व त्यापासून बहुजनसमाजाचा बराच फायदा होईल अशी आशा करण्यास पुष्कळच जागा आहे.

२०. या ठिकाणीं एक गोष्ट सुचवावीशी वाटते ती ही कीं, अखिल हिंदुस्थानचें एकराष्ट्रीयत्व हें ध्येय सर्वमान्य असलें तरी हिंदुस्थान हें एक खंड

असून त्यांतील प्रत्येक प्रांत हा एक स्वतंत्र देश आहे हें विसरून चालणार नाहीं. प्रत्येक प्रांतांची भाषा, संस्कृति,परंपरा, इतिहास, आचारविचार वेगवेगळीं आहेत. या दृष्टीनें प्रत्येक प्रांतानें स्वतःची सर्वांगीण उन्नति हें ध्येय प्रथम पुढें ठेविलें पाहिजे व आपला प्रांत सर्व दृष्टींनीं समर्थ व परिपूर्ण करण्यास झटलें पाहिजे. 'आधीं यत्न मग प्रारब्ध' हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हिंदुस्थानच्या सर्व भाषावार प्रांतांनीं याप्रमाणें स्वतःची उन्नति केली तर अखिल हिंदुस्थानची उन्नति होऊन जगाच्या राष्ट्रमालिकेंत मानाचें स्थान हिंदुस्थानला प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं. तरी प्रत्येक महाराष्ट्रीयानें महाराष्ट्राची संस्कृति, परंपरा, इतिहास, आचारविचार डोळ्यांपुढें ठेवून अखिल महाराष्ट्राच्या उन्नतीचें ध्येय प्रथम पुढें ठेवून 'महाराष्ट्रा'चें नांव हिंदुस्थानांत व जगांत अन्वर्थक करण्यास शरीरवाङ्मनानें स्वतःस वाहून घेतलें पाहिजे.

२१. शेवटीं इतकेंच सांगावयाचें कीं, ज्या शिक्षणाचें फळ पदरांत कांहींहि पडूं शकत नाहीं तेंच शिक्षण अंधश्रद्धेनें वर्षानुवर्षें पुढील पिढ्याला देत राहणें हें देशाचें दुर्दैव होय असें म्हणण्याची पाळी सध्यांच्या व पुढील पिढ्यांवर येऊं नये. एकदां रोगनिदान निश्चित झाल्यावर ज्याप्रमाणें उपाययोजना ताबडतोब केली पाहिजे, त्याप्रमाणेंच आजच्या शिक्षणक्रमाचें धोरण बदलणें अवश्य आहे हें एकदां निश्चितपणें ठरल्यानंतर त्यासंबंधीं जी उपाययोजना करावयाची ती प्रस्थापित सरकारनें एखाद्या हुकूमशहाच्या धडाडीनेंच करावयास पाहिजे व लोकांनींहि सरकारवर योग्य तें वजन आणून सरकारला आपलें कर्तव्य करण्यास भाग पाडलें पाहिजे. शेवटीं भावी पिढीच्या शिक्षणाचा प्रश्न योग्य मार्गानें सोडविण्याची सुबुद्धि देशांतील विचारी लोकांना व प्रस्थापित सरकारला होवो व त्याचें दृश्य फळ लवकरच पदरांत पडो अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना करून हा लांबलेला लेख पुरा करतों.

# प्राथमिक शिक्षणाच्या तीन पिढ्या



लेखक—नारायण महादेव पटवर्धन

प्राथमिक शिक्षण या विषयाची सशास्त्र व सांगोपांग चर्चा एका विवक्षित मर्यादेमध्यें करणें कठीण असल्यामुळें एक वृद्ध आजोबा आपल्या मराठी शाळेचें व आपल्या नातीच्या मराठी शाळेचें वर्णन करीत आहेत अशी कल्पना करून एकंदर प्राथमिक शिक्षणांत गेल्या तीन पिढ्यांत कसा बदल पडला आहे याचें सामान्य दिग्दर्शन मी करणार आहें. आजोबा सांगू लागले आहेत, ऐका हं.

माझ्या वडिलांचे वेळीं शाळेंत जाण्याची वगैरे भानगड फारशी नसावीसें दिसतें. ते जें कांहीं शिकले तें आमच्या घराण्यांतील पुराणिकाच्या वृत्तीला जरूर तेवढेंच शिकले. संध्या, ब्रह्मयज्ञ, पूजा, वैश्वदेव, पुरुषसूक्त, गणपति अथर्वशीर्ष, रुद्र वगैरे ब्राह्मणाला लागणारें नित्यकर्म, व रत्नावली, समास-चक्र, पंचकाव्यें वगैरे पुराणिकाला लागणारें संस्कृत येवढेंच आपल्या वडिलां-पाशीं ते शिकले होते. माझ्या थोरल्या बंधूंना व मला या सर्व गोष्टी त्यांनींच पहाटे चुलीपाशीं पाणी तापवितांना पोथी वगैरे कांहीं एक न घेतां नुसत्या तोंडानेंच शिकविल्या होत्या. आणि आम्हांला आमच्या वडिलांनीं जें व जसें शिकविलें तेंच व तसेंच बहुतेक बाप आपल्या मुलांना शिकवीत असत. वैदिक, पुराणिक, भिक्षुक वगैरे ब्राह्मण व शेतकरी, सुतार, सोनार, लोहार, वाणी-उदमी वगैरे ब्राह्मणेतर आपला जो धंदा असेल तोच आपल्या मुलांना स्वतःच घरच्या घरीं लहानपणापासूनच शिकवून त्याला पोटापाण्याला लावीत असत. त्यांना निराळ्या शाळा, निराळे शिक्षक, निराळे विषय वगैरेंची जरूरी वाटत नसे.

पण पुढें पुढें ही परिस्थिति बदलत चालली व लिहिणें-वाचणें, हिशेब करणें वगैरे शिकविण्याकरितां म्हणून तात्यापंतोजींच्या शाळा निघाल्या. माझें अगदी

सुरुवातीचें शिक्षण अश्याच एका शाळेंत झालें होतें. शाळेंत जाण्याचा पहिला दिवस व त्याचें कारण मला अजून आठवतें. आदल्या दिवशीं मीं आईबरोबर हळदीकुंकवाला जाण्याचा हट्ट धरला होता, व ती मला माझ्या वडिलांच्या पुढ्यांत जोरानें आदळून निघून गेली होती. 'कार्ट्यां'चा घरीं त्रास नको म्हणून वडिलांनीं मातुःश्रींच्या सल्ल्याप्रमाणें–सल्ला देण्याघेण्याचा मला वाटतें हा येवढाच प्रसंग असावा–मला दुसऱ्याच दिवशीं शाळेंत अडकवून टाकलें. मुलाला शाळेंत पाठविण्याचें जें कारण माझ्या बाबतींत घडलें तेंच कारण थोड्या-फार प्रमाणांत सर्वच मुलांच्या बाबतींत घडत असे. बालकामध्यें सुप्त असलेल्या सर्व शक्तींची सप्रमाण व मिलाफयुक्त वाढ करणें, मानवामध्यें स्फुलिंगवत् असलेल्या ईश्वरी अंशाचा विकास करून नराला नारायणाची पदवी प्राप्त करून देणें, मनुष्यामधील स्वार्थी भावनांना बंधन घालून व त्याच्या सामाजिक भावना वृद्धिंगत करून त्याला समाजोपयुक्त सुनागरिक करणें, त्याच्या मूळच्या पाशवी वृत्तींना मुरड घालून मनुष्यामध्येंच प्रामुख्यानें दिसून येणाऱ्या बुद्धीचा विकास करणें, त्याचें शील बनविणें वगैरे वगैरे शिक्षणाचीं जीं ध्येयें हल्लीं आपल्या कानांवरून जातात त्या ध्येयाची जाणीव त्यावेळीं फारशी कोणाला नसल्यामुळें मुलांचा घरचा त्रास कमी व्हावा, व फार तर त्याला पुढें पोटाला मिळवितां यावें एवढ्या एकाच ध्येयानें प्रेरित होऊन प्रेमळ माता-पितर आपल्या लाडक्या मुलांची बोळवण शाळेंत करीत असत. त्या वेळेचे विषयहि अगदीं साधेसुधे व बेतास बात असत. लिहितां-वाचतां येऊन हिशेब-ठिशेब करतां आले कीं काम झालें. इतिहास, भूगोल, सृष्टिनिरीक्षण, आरोग्यशास्त्र, हस्तव्यवसाय, गायन, चित्रकला वगैरे कांहींहि नसे. आणि खेळ? अब्रह्मण्यम्! चुकून माकून शाळेंत कोणी खेळेल अशी भीति वाटूनच कीं काय, "शाळेंत सोबत्यांनीं खेळायाचा विचार जरी केला—खेळुं नये आपण कीं व्यर्थचि खेळांत काळ जो गेला ॥" अशा प्रकारच्या कविता मुलांना शिकविण्यांत येत असत. शिक्षक कसाहि म्हातारा-कोतारा, घामट, तिरसट, मारकट असो, त्याच्याबद्दल आम्हां मुलांना नेहमीं आदरच वाटला पाहिजे अशी खबरदारी, 'गुरुर्ब्रह्मा, गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः' अशा प्रकारचे प्रासादिक श्लोक आम्हांकडून म्हणवून घेऊन, घेतली जात असे. 'इंग्लंद-लंदन थेम्स नदीवर' अशा प्रकारें तोंडपाठ करून घेऊन ब्रिटिश साम्राज्याच्या राजधानीचें नांव

कानांवरून वाळणें, 'शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावें हें व्याकरण शिकल्यानें समजतें' येथपासून सर्व व्याकरण व 'शंभर शंभर दहा हजार" येथपर्यंत सर्व उजळणी पाठ करून घेणें, हीच काय ती आमच्या वेळची अध्यापनपद्धति असे. टेबलावरचा अगडबंब काळा रूळ किंवा फार तर पेटीतलि नाजूक वेताची छडी हें एकच काय तें शिस्तीचें सर्वमान्य साधन असे. उघडच आहे; छडी 'छम् छम्' लागल्यानें जर विद्या 'घम् घम्' येत असे तर इतर साधनांची तमा ती काय! शाळेच्या जागेचीहि तीच स्थिति असे. बहुतेक शाळा मोडक्या तोडक्या, भाडोत्री घरांतून भरविल्या जात असत. माझी पहिली शाळा चावडी व धर्मशाळा यांच्या एका पाख्यांत सामावलेली असे; व मागच्या भिंतीला जोडूनच आणखी तीन लांड्या भिंती बांधून तेथें उडाणटप्पू गुरें डांबून ठेवण्याकरितां कोंडवाड्याची योजना केलेली असे! गांवच्या धबडग्यापासून दूर, सुंदर व प्रसन्न वातावरणांत, स्वतंत्र व सुखसोयींनीं सज्ज असलेली इमारत शाळेकरितां बांधणें हें चैनीचें व चोजल्याचें समजलें जाई. मुलांना बसण्याकरितां पाठीचीं बाकें, पुस्तकें ठेवण्याकरितां स्वतंत्र डेस्कें वगैरे गोष्टीहि थाटामाटाच्या मानल्या जात. प्रत्येकानें घरून येतांना एक गोणपाटाचा तुकडा आपल्याबरोबर घेऊन यावयाचा व जातांना परत न्यावयाचा असा सगळा सुटसुटीत कारभार असे.

वर निर्दिष्ट केलेला प्रकार फक्त खेडेगांवांतल्या लहान लहान शाळांतून असे असें नाहीं; तर पुण्यासारख्या मोठ्या शहरांत निघालेल्या डे. ए. सोसायटी, महाराष्ट्र ए. सोसायटी, शिक्षण-प्रसारक मंडळी इ. बड्या बड्या संस्थांनीं चालविलेल्या प्राथमिक शाळांतूनहि थोड्याफार प्रमाणांत तोच प्रकार दृष्टीस पडे. 'थोडाफार' म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, खेडेगांवांतील कोंडवाड्याजवळील चावडी जाऊन आतां मुलांच्या वांट्याला पेशवाई वाड्यांतील अंधेरी माडी आली; बस्करें जाऊन बिनपाठीचीं बांकें आलीं; व लिहिणें-वाचणें, गणित यांच्या जोडीला अधून मधून इतिहास, भूगोल आले. परंतु अध्यापनाच्या पद्धति, शिस्तीचीं साधनें, शिक्षणाचीं ध्येयें, शिक्षकासंबंधीची अपेक्षा, खेळाकडे पाहण्याची दृष्टि वगैरे बाबतींत या शाळांतहि फारसा फरक होता असेंहि नाहीं.

अर्थात् यासंबंधींचा दोष कोणालाच देतां येणार नाहीं. प्राथमिक शिक्षणा-संबंधींचें व विशेषतः मानसशास्त्रासंबंधींचें पाश्चात्य वाङ्मय हल्लीं जें आपण

वाचतों व ज्याचा थोडासा अवलंब हल्लींच्या शाळांतून केलेला आपणांस दिसतो—तें वाङ्मय इकडे फारसें उपलब्ध नव्हतें. शिक्षण म्हणजे कांहीं शास्त्र आहे व शिकविणें म्हणजे एकादी शास्त्राधारित कला आहे आणि शिक्षक व्हावयाचें किंवा शाळा चालवायची म्हणजे या शास्त्राचा आणि या कलेच्या अभ्यास नि व्यासंग केला पाहिजे याची जाणीवच नव्हती. ही जाणीव गेल्या २०–२५ वर्षांत विशेष उत्कटत्वानें होऊं लागली असून त्याचाच परिणाम प्राथमिक शिक्षणाच्या तिसऱ्या पिढींत थोडाथोडा दिसूं लागला आहे.

माझ्या वेळच्या शाळांचें हें जुनें दृश्य दृष्टीआड करून मी जेव्हां माझ्या नीलेच्या ( नात–माझ्या मुलीची मुलगी. ) शाळेकडे पाहतों, तेव्हां सर्वच बाबतींत किती तरी फरक पडलेला मला दिसूं लागतो. पूर्वीच्या व आतांच्या शाळांतील विरोध स्पष्ट रीतीनें दाखविणारी पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे माझ्या नीलेला तिच्या शाळेबद्दल वाटणारी आवड. मला माझ्या (माझ्या कसल्या ! ) शाळेची इतकी धास्ती वाटे कीं, शाळेंत जाण्याचा 'कठिण समय' आला कीं मी माळ्यावर किंवा अडगळीच्या खोलींत अगर प्रसंगीं गोठ्यांतील दावणींत लपून बसत असे व अशा रीतीनें आईला झुकांडी देत असे ! पण हा गनिमी कावा फार दिवस कसा टिकणार ! या बालशिवाजीचें पारिपत्य करण्याकरितां खुद्द गुरुमाऊलीच चार दांडगेश्वर मुलांना बरोबर घेऊन येई व माझी उचलबांगडी करून शाळेंत घेऊन जाई. उलट आतां माझ्या नीलेला केव्हां जेवण होईल व केव्हां एकदांची शाळेंत जाईन असें होऊन जातें. मग घरीं कांहीं हव्य-कव्य असो, पाहुणारावळा असो, स्वयंपाक झाला असो-नसो, तिची शाळेची वेळ कांहीं कधीं चुकत नाहीं. आणि मुलांना शाळेबद्दलची एकदां आवड लागली म्हणजे शिक्षणाचें अर्धेअधिक काम झालें आहे म्हणावयास हरकत नाहीं.

नीलेला शाळेचें इतकें वेड कसें लागलें हें पाहण्याकरितां म्हणून मी एकदां तिच्या शाळेंतच गेलों. जातांना वाटेंत मेहुणपुरा, गद्रेवाडा, होळकरवाडा वगैरे किती तरी प्रसिद्ध ( पण तिच्या मतें मला माहीत नसलेल्या ) गोष्टी तिनें मला दाखविल्या. तिचें तें ज्ञान व विशेषतः दाखवीत असतांनाचा तिचा तो दिमाख पाहून मला तिचें कौतुक वाटूं लागलें होतें. पण जेव्हां का तिनें (मला मोठ्या) भाबडेपणानें " हा पहा ओंकारेश्वराचा रस्ता " असें सांगितलें तेव्हां पोटांत

चर्रर्र झाल्यावांचून राहिलें नाहीं. झपाझप् पावलें टाकीत आम्हीं तिच्या शाळेचें फाकट गांठलें. शाळेची भव्य, साधी पण सुंदर इमारत; टुमदार नीटनेटकी बाग; खेळण्याकरितां ऐसपैस मोकळें, स्वच्छ पटांगण; झोपाळे, घसरगुंडी, सी–सॉ इत्यादि खेळण्याचीं साधनें वगैरे गोष्टी पाहून मला मोठा आनंद झाला. नीला आपल्या वर्गाजवळ जातांच तिच्याच वयाच्या किती तरी संवगड्यांनीं तिचें 'नीऽऽऽला, नीऽऽला' म्हणून प्रेमानें स्वागत केलें. "हे माझे अक्कलकोटचे अण्णाजोबा" अशी नीलेनें ओळख करून दिल्याबरोबर किती तरी मुलें माझ्या-भोंवतीं जमा झालीं. 'अण्णाजोबा, तुम्ही नीलाचे आजोबा का ? मग आजी कुठें आहे ?" असें एका मुलीनें विचारलें. तेव्हां 'आहे हां बाळ' असें म्हणत, हसत हसत, पण आवंढा गिळत तिचें समाधान केलें. एक मुलगा 'अक्कलकोट काळाकोट' 'अक्कलकोट, काळाकोट' असें तालासुरांत गुणगुणूं लागला ! तिसरे एक चिरंजीव फारच दिव्य ! डोक्यावरच्या पगडीखालून डोकावून पाहत असलेल्या माझ्या भुरभुरणाऱ्या पांढऱ्या बटीकडे आपल्या हातांतील काटकीचें टोंक करून 'ही पाहा आपल्या अण्णाजोबांची शेपटी' असें म्हणत स्वारीनें आपल्या संवगड्यांची करमणूक केली ! शिखानष्ट युगांत शेंडीची कल्पनाच नसल्यामुळें बिचाऱ्यानें शेपटीचा आधार घेतला यांत त्याचा तो काय दोष ! असला वाह्यातपणा सोडला तर एकंदर मुलें मोठीं प्रेमळ अन् मोकळ्या मनाचीं दिसलीं. अर्थातच त्यांचा तो मोकळेपणा व धीटपणा पाहून मला माझ्या लहानपणच्या ( लहानपणच्याच कां ? ) बुजकेपणाची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. आपली बॅगी वर्गांत जागचे जागीं ठेवून नीला आपल्या संवगड्यांबरोबर लंगडी खेळण्यांत दंग झाली. तें एकंदर प्रसन्न व आनंदाचें वातावरण पाहून मलाहि नीलेच्या शाळेंत येण्याबद्दलच्या धडपडीचा एकेक उलगडा होऊं लागला. थोड्याच वेळांत चलाख, चुणचुणीत, स्वच्छ, व्यवस्थित पोषाक केलेली एक तरुण पण भारदस्त स्त्री तेथें आली व नीला आणि तिचें सवंगडी 'बाई' 'बाई' अशी हाक मारीत तिला बिलगले. नीलेनें घरून खिशांत आणलेलें एक सोनचांफ्याचें फूल आपल्या बाईंना देऊन, "हे माझे अण्णाजोबा" असें म्हणत माझी ओळख करून दिली. बाईंच्या तोंडा-वरचें तें गोड स्मित, मुलांशीं बोलावयाचा तो घरगुती प्रेमळपणा वगैरे पाहून मला माझ्या म्हाताऱ्या व चिडक्या चेहऱ्याच्या मास्तरांची आठवण झाली.

शाळेबद्दल वाटणाऱ्या आकर्षणाचें व प्रेमाचें बरेंचसें श्रेय शाळेच्या वातावरणा-बरोबरच शिक्षकालाहि द्यावयास पाहिजे यांत शंका नाहीं. नीलेच्या बाईनीं मला हेडमास्तरांच्या कचेरींत नेलें आणि माझी व त्यांची ओळख करून देऊन त्या परत फिरल्या. हेडमास्तर व मी व्हरांड्यांतच उभ्या उभ्या बोलतों आहों तोंच एक मोठी घंटा झाली व सर्व बाजूंनीं मुलामुलींच्या रांगा जमा होऊन पटांगणांत मध्यभागींच एका चौकोनी चौथऱ्यावर रोंवलेल्या शाळेच्या भव्य झेंड्याभोंवतीं व्यवस्थितपणें व हात जोडून उभ्या राहिल्या. सर्व शिक्षक-शिक्षकिणींहि आपापल्या वर्गांबरोबर उपस्थित झाल्या. दुसऱ्या घंटेच्या टोल्या-बरोबर सर्वजण एकसुरांत मोठ्यानें, संथपणें व गंभीरतेनें शाळेचें गाणें म्हणूं लागले. तो देखावा खरोखरच मोठा रम्य व स्मृतिदायक होता. आपल्याहि वेळीं अशी प्रार्थना वगैरे असती तर आम्ही तरी शाळेंत जाण्याबद्दल इतकी खळखळ कां केली असती? प्रार्थना आटोपल्यावर सर्व मुलें अगदीं शांतपणें आपापल्या वर्गांकडे गेलीं, व तिसऱ्या घंटेच्या पहिल्या टोल्याबरोबर शिक्षकांनीं शिकविण्यास सुरुवात केली. सर्व शिक्षक आले आहेत, नाहींत वगैरे पाहिल्यावर हेडमास्तर मला घेऊन शाळा दाखविण्यास निघाले.

थोड्याच वेळांत आम्ही पुष्कळशा वर्गांतून गेलों. तरी येवढें सहज ध्यानांत आलें कीं, मागच्या व आतांच्या शिक्षणांत बराच बदल झाला आहे. माझ्या वेळचेप्रमाणें इकडे शिक्षक खुर्चीवर बसून व चंची सोडून पान चघळीत आहेत, व तिकडे मुलें परवाच्यासारखें कांहीं तरी मोठ्यादां घोकीत आहेत असें नसून मुलें व शिक्षक दोघेहि खेळीमेळीनें आपलें काम व्यवस्थितपणानें करीत असलेले दिसले. कोठें शिक्षक मुलांना प्रश्न विचारीत आहेत व मुलेंहि मोठ्या हुरूपानें त्यांचीं उत्तरें देत आहेत. कोठें इतिहासाच्या तासाला शिक्षक स्वतः सांगितलेली शिवाजीची गोष्ट मुलांकडून खेळवून घेत आहे, तर कोठें भूगोल-शिक्षक नुकत्याच पाहून आलेल्या खडकवासल्याच्या धरणाचा नमुना मातीच्या साह्यानें मुलांकरवीं करवून घेत आहे. एका वर्गांत एक शिक्षकीण स्वतः माळीण बनून खऱ्याखऱ्या पैशांनीं विविध कोष्टकांची व बेरीज वजाबाकीची कल्पना देत आहे, तर दुसऱ्या वर्गांत दुसरी एक शिक्षकीण मुलांमुलींचे दांत स्वतः धुऊन दाखवून त्यांस दंतधावनाचें प्रात्यक्षिक देत आहे. कोठें अगदीं लहान मुलें लांकडी ठोकळ्यांशीं किंवा मेकॅनोशीं खेळून नवीन आकृति

निर्माण करीत आहेत, तर कोठें मुलें मास्तरांचें चित्र–बूट, छत्री, टोपी यांसह काढीत आहेत. या सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहून व हेडमास्तर मधून मधून सांगत होते त्यावरून, शिक्षण व प्रत्यक्ष जीवन यांचा संबंध शक्यतों आणणें, कठीण कठीण कामेंहि खेळाच्या मिषानें व खेळाच्या वृत्तीनें करवून घेऊन त्यांत आनंद उत्पन्न करणें, शिक्षण नुसतें ऐकवूनच न देतां शक्य तों दाखवून व करवून देणें, पठणापेक्षां ग्रहणावर जास्त जोर देणें वगैरे किती तरी चांगलीं चांगलीं तत्त्वें शाळेंत आचरणांत आणलेलीं दिसून आलीं. हेड-मास्तरांच्या बोलण्यांतलें एक तत्त्व मला फारच पटलें, व तें म्हणजे मुलांना जें जें हवेंसें किंवा करावेंसें वाटतें तें तें लक्षांत घेऊन त्याच्याच साह्यानें आपणांस त्यांच्यांत जो बदल घडवून आणावासा वाटतो तो आणावयाचा.

शेवटच्या वर्गांतील बाईंनीं एका रुसक्या व एकलकोंड्या मुलाची आदलेच दिवशीं घडलेली एक गोष्ट सांगितली. तो रुसका मुलगा किती तरी वेळ भिंती-पाशीं जाऊन एकटाच बसला होता. बाकीचीं मुलें आपआपल्या व्यवसायांत इतकीं गुंग होऊन गेलीं होतीं कीं तें चित्ताकर्षक दृश्य पाहून तोहि हसत हसत मुलांत आला, व त्यांच्यामध्यें सामील झाला. शिक्षकिणीला उरसफोड करून जें करतां आलें नसतें तें तिच्या बिलकुल लक्ष न देण्यानें आपोआप साधलें.

इतकें पाहीतों मधल्या सुटीची वेळ आली. मोठी घंटा झाल्याबरोबर सर्व मुलें आपआपले लहान लहान डबे घेऊन एका मोठ्या प्रशस्त फराळघराकडे धांवलीं. जिकडे तिकडे पाण्याचे नळ, त्यांनाच खालीं हात व तोंड धुण्याकरितां चिनीमातीचें केलेलें एक पसरट भांडें जोडलेलें, वरील बाजूस खुंटीला अडक-विलेले, पांढरे शुभ्र रुमाल, मधून मधून आरसे, वगैरे सोयी पाहून लहानपणीं आम्हांपैकीं कांहीं वर्गांतच खाऊन पानें, कागद वगैरे बाकांखालींच टाकून मुतारीवरच्या नळावरच पाणी पीत असूं त्याची आठवण झाली! खाणें, पाणी पिणें वगैरे झाल्यावर कांहीं मोठीं मुलें शेजारच्याच हॉलच्या एका बाजूस लावलेल्या रेडिओवरील गाणीं वगैरे ऐकावयास गेलीं, तर कांहीं लहान मुलें त्याच हॉलच्या दुसऱ्या टोकाला ठेवलेल्या ग्रामोफोनवरील नाचाचीं गाणीं ऐकून स्वतः त्याप्रमाणें नाचूं लागलीं. कांहीं मुलें खेळावयास गेलीं. खेळण्याच्या जागेशेजारींच एका खोलींत एक शिक्षक आयोडिन, कापूस, पट्ट्या वगैरे वैद्यकीय

सामान घेऊन खरचटणें, ठेंचाळणें, मुरगाळणें वगैरे दुखापतींची विल्हेवाट लावीत होते, तर पलीकडल्या खोलींतील एक बाई मुलांकडून त्यांच्या कोटा-पोलक्यांच्या गुंड्या शिववून घेत होत्या.

हें सर्व पाहून झाल्याबरोबर हेडमास्तर मला शिक्षकांच्या चहाच्या खोलींत घेऊन गेले व मी नको नको म्हणत असतांहि त्यांनीं मला चहा देवविला. सुटी संपल्याबरोबर दुसरे एक शिक्षक मला दुसऱ्या गोष्टी पाहण्यास घेऊन गेले. आतां बहुतेक वर्गांचें काम वर्गाबाहेर चाललेलें दिसलें. एके ठिकाणीं कांहीं मुलें नुकत्याच लावलेल्या रोपट्यांना पाणी घालीत होतीं तर कांहीं वाफे करीत होतीं. कांहीं मुलें एका झाडाखालीं ड्रिल करीत होतीं तर कांहीं लंगडी, हुतूतू, खो खो वगैरे खेळ खेळत होतीं. एक वर्ग 'उद्योगभवनां'त पेपरमिंट तयार करीत होता, तर दुसरा वर्ग 'सुतारकाम' वर्गांत आपल्या भावलाभावलीं-करितां टेबलें, खुर्च्या, बाजा, पाळणे वगैरे करीत होता. एक वर्ग तर पदार्थ-संग्रहालयांत जाऊन शिक्षक दाखवीत असलेल्या गोष्टी (हातांतल्या जाड) भिंगांतून पाहत होता.

येवढा वेळ इतकीं निरनिराळीं ठिकाणें पाहिलीं पण नीला कोठेंच दिसली नव्हती. शेवटीं वाचनालयांत आम्ही गेलों तों तेथें ती व तिचा वर्ग मोठ-मोठालीं पुस्तकें चाळतांना व त्यांतील चित्रें पाहतांना आढळली. तिचा निरोप घेऊन मी निघालों तों तीच म्हणते, 'अण्णाजोबा, जरा थांबा ना! येवढा तास झाला म्हणजे आम्हांला सिनेमा दाखविणार आहेत. अन् हो, मला तुम्हांला आमची बाग दाखवावयाची आहे ना!' पण कांहीं तरी सबब सांगून मीं तिची, हेडमास्तरांची व शाळेची रजा घेतली. परत येतांना सर्व विचार अर्थात् तिच्या शाळेसंबंधीं (व विरोधानें माझ्या वेळच्या शाळेसंबंधींहि!) चालले होते. आतां जशी शाळा पाहिली तशाच शाळा दुसरीकडेहि निघतील काय व माझ्या नीलेप्रमाणेंच इतर खेड्यांपाड्यांतील मुलेंहि हुशार व आनंदी बनतील काय? देव करो अन् तसें होवो!"

आजोबांचें भाषण संपलें आहे. त्यांची त्या वेळचीं इच्छितें आतां—थोड्या प्रमाणांत कां होईना—प्रत्यक्षांत उतरलेलीं आपणांस दिसत आहेत. आणि याचें श्रेय आजोबांच्या नीलेच्या काल्पनिक शाळेला जसें आहे तसेंच पुण्यांतील **'नवीन मराठी शाळे'**सारख्या आदर्श शाळांनाहि आहे.

# सरकार व शिक्षण

लेखकः—श्रीनिवास माधव दातार

प्रजाजनांना शिक्षण देण्यासंबंधींची जबाबदारी सरकारावर केवढी, कशा प्रकारची व किती प्रमाणांत आहे आणि खाजगी रीतीनें शिक्षणप्रसाराचे जे प्रयत्न चाललेले असतात त्यांस प्रोत्साहन देणें, त्यांचें नियंत्रण करणें वगैरे बाबतींत सरकारास काय व किती मर्यादेपर्यंत अधिकार असावेत या बाबी-विषयीं वारंवार मतभिन्नता होत असते. म्हणून या विषयास मूलभूत अशीं जीं कांहीं सर्वसामान्य राजकीय ( Political ) व वैधिक ( Legal ) तत्त्वें आहेत त्यांचें स्पष्टीकरण वरचेवर बदलणाऱ्या पारिस्थितीस अनुरूप असें पुनः पुन्हा करावें लागतें.

प्रजाजनांच्या शिक्षणासंबंधांत सरकारचे अधिकार व कर्तव्यें काय याविषयीं मतभिन्नता उत्पन्न होण्यास मुख्यतः दोन कारणें संभवतात. पहिलें कारण म्हणजे राष्ट्राची ( State ) राजकीय स्थिति ( Political Status ) हें होय. राज्याधिकार धारण करणारी सत्ता परदेशीय ( Foreign ) असली तर तिचें शैक्षणिक धोरण बऱ्याच अंशीं तिचा राजकीय स्वार्थ व तीस संमत असलेल्या संस्कृति-विषयक कल्पना या दोन गोष्टींस पोषक होईल अशा रीतीनें निश्चित केलें जातें. हें धोरण प्रजाजनांच्या सर्वांगीण व स्वनिर्णित अशा शैक्षणिक विकासास बाधक होऊं लागते व त्यामुळें राष्ट्रीय प्रगति कुंठित होते. इतकेंच नव्हे तर कधीं कधीं तीस अत्यंत अनिष्ट असें वळण लागतें. राजकीय सत्ता स्वदेशीय (Indigene) असून ती जर निरंकुश ( Absolute ) असली तरीसुद्धां बहुतांशीं अनिष्ट असें शैक्षणिक धोरण अवलंबिलें जाण्याचा संभव असतो. कारण आपला विशिष्ट स्वार्थ व आपली विशिष्ट संस्कृति ( ही जरी बहुजनसमाजाच्या हितास बाधक होत असली तरी ) प्रजाजनांवर शिक्षणद्वारा लादण्याचा मोह अशा सत्तेस आवरतां येत नाहीं. राजकीय सत्ता जर लोकमतनियंत्रित ( democratic ) असली तर लोकांचीं ध्येयें, सर्वसाधारण गरजा, सर्वसाधारण संस्कृति, राष्ट्रीय

आकांक्षा वगैरेस पोषक होईल अशा प्रकारचें धोरण आंखलें जाण्याची व तें कायम राहण्याची शक्यता असते; परंतु राजसत्ता व जनता यांच्यामध्यें शैक्षणिक बाबतींत सुव्यवस्था होण्यास लोकतंत्रराज्यपद्धति एवढेंच कारण असून चालत नाहीं. लोकतंत्र-राज्यपद्धति याचा व्यावहारिक अर्थ म्हणजे जनतेंतील बहुमतानुसार राज्यकारभार चालविणें व राज्याधिकारी जनतेस जबाबदार असणें असा होतो. जनतेमध्यें अनेक राजकीय पक्ष व उपपक्ष असूं शकतात. या राजकीय पक्षापैकीं ज्या पक्षाचे अनुयायी इतर सर्व पक्षांपेक्षां संख्येनें जास्त असतात त्या पक्षाकडे राज्यकारभाराचीं सूत्रें लोकशाही राज्यामध्यें असतात. असा पक्ष आपलें राजकीय क्षेत्र सोडून इतर बाबतींतहि आपलीं स्वतंत्र मतें अट्टाहासपूर्वक बनवूं लागला व तीं मतें राजकीय सत्तेच्या जोरावर सर्व जनतेवर लादूं लागला म्हणजे त्या पक्षाच्या धोरणास इतर अल्पसंख्याक पक्षांकडून तीव्र विरोध होऊं लागतो. राष्ट्रीय हितास आपलींच मतें पोषक आहेत व इतर लोकांचीं मतें मारक आहेत; इतकेंच नव्हे तर तीं देशद्रोहीपणाचीं द्योतक आहेत असा अभिनिवेश बहुमतधारी पक्षांत उत्पन्न होतो व आपणच तेवढे देशाचे उद्धारक व इतर सर्व देशद्रोही अशी भावना प्रभावी होते. ह्या प्रकारच्या भावनेनें भारून जाऊन प्रत्येक बाबतींत विरोधी पक्ष व त्यांची मतप्रणालि राजसत्तेच्या जोरावर नामशेष करण्यास बहुमतवाला पक्ष बद्धपरिकर होतो. देशामध्यें या विचारसरणीचे बहुमतवाले जेव्हां राज्यकारभार चालवूं लागतात तेव्हां शिक्षणाच्या क्षेत्रांतहि ते आपलीं विशिष्ट मतें राजसत्तेच्या जोरावर अंमलांत आणण्याकरितां शिक्षणसंस्थांचें स्वातंत्र्य हरप्रकारें नष्ट करण्याच्या उद्योगास लागतात. म्हणून परकी राजसत्ता जशी शिक्षणस्वातंत्र्यास जाचक होत असते तशीच स्वदेशीय राजसत्ताहि बहुमतवाल्या राजकीय पक्षांच्या एककल्ली व सर्वंकष मतप्रणालीमुळें शिक्षणाच्या प्रगतीस अनेक दृष्टींनीं मारक होऊं लागते व तिचा जाच परकीय सत्तेच्या नियंत्रणापेक्षांहि कांहीं कांहीं वेळां जास्त व्यापक स्वरूपाचा होऊं लागतो. कारण प्रजाजनांनीं आपली सत्ता झुगारून देऊं नये या दृष्टीनें जेवढीं शैक्षणिक नियंत्रणें जरूर तेवढींच लादण्याचा प्रयत्न परकीय सत्ता करते; परंतु स्वदेशीय बहुमतवाली सत्ता आपल्या शैक्षणिक मतांखेरीज दुसरीं कोणतींहि मतें राष्ट्रास घातक आहेत असें मानून त्यांचा मागमूसहि राहूं नये असें धोरण अंमलांत आणते. म्हणून राजसत्ता जरी स्वदेशीय व बहुमत-नियंत्रित अशी असली तरी

जनतेस व जनतेंतील शिक्षणतज्ज्ञांस शिक्षणाविषयीं जागरूक राहणें अवश्य असतें व कांहीं मूलभूत बाबींखेरीज करून इतर कोणत्याहि बाबतींत जनतेच्या शिक्षणस्वातंत्र्यास धोका पोंचणार नाहीं अशी शैक्षणिक व्यवस्था अधिकाधिक प्रमाणांत अंमलांत आणण्याची व ती अबाधित ठवण्याची पराकाष्ठा करावी लागते.

या देशांत इंग्रजी राजसत्ता बद्धमूल झाल्यापासून तों सन १९३५ चा हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधींचा ब्रिटिश पार्लमेंटाचा कायदा अंमलांत येईपर्यंत म्हणजे सन १९३७ एप्रिलपर्यंत या देशाचें शैक्षणिक धोरण बहुतांशीं ब्रिटिश सरकारच्या नियंत्रणाखालीं आंखलें जात होतें. या काळांत भारतीय जनता व ब्रिटिश राज्यकर्ते यांजमध्यें शैक्षणिक स्वातंत्र्याकरितां जो तीव्र स्वरूपाचा झगडा झाला त्याची माहिती सर्वत्रांस आहेच. या काळांत हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या बाबतींत ब्रिटिश सरकारचा दृष्टिकोन जसजसा जास्त उदार होऊं लागला तसतसें लोकांस शैक्षणिक स्वातंत्र्य अधिकाधिक प्रमाणांत अनुभवावयास मिळूं लागलें. सन १९०५ सालापासून "स्वदेशी"च्या चळवळीस अतिशय जोर चढूं लागला व या चळवळीची व्याप्तीहि अधिकाधिक विस्तृत होऊन कोणतीहि परकीय गोष्ट नको; सर्वच्या सर्वच स्वदेशी असली पाहिजे अशी भावना ( Swadeshi all round ) राष्ट्रामध्यें प्रभावी होऊं लागली. यामुळें शिक्षणाच्या बाबतींतहि "स्वदेशी"चा प्रादुर्भाव होऊन "राष्ट्रीय शिक्षण" या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या शिक्षणपद्धतीकरितां चळवळ सुरू झाली व त्याकरितां अनेक संस्थाहि सर्वत्र निघाल्या. शिक्षणासंबंधींचीं मतें, पद्धति व संस्था ब्रिटिश राज्यकर्त्यांस अनिष्ट वाटूं लागलीं व हीं सर्व राजसत्तेच्या जोरावर दडपून टाकण्याचा त्यांनीं चंग बांधला. शिक्षणसंस्था व तीमध्यें चालू असलेले अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तकें यांची कसून तपासणी होऊन त्यांत हरतऱ्हेनें फेरबदल करण्यांत आले. या सर्वांसंबंधी नवे नियम होऊन त्यांची अंमलबजावणी सक्त रीतीनें होऊं लागली. सन १९०५ ते सन १९१४ सालांतील पहिलें युरोपीय महयुद्ध सुरू झालें तोंपर्यंत शिक्षणसंस्थांस आपलें स्वातंत्र्य राखणें अतिशय कठीण झालें होतें. युरोपीय महायुद्ध सन १९१८ च्या अखेरीस खलास झालें. या काळांत ब्रिटिश राज्यकर्त्यांचा हिंदुस्थानविषयक दृष्टिकोन बराच बदलला. इतकेंच नव्हे तर ब्रिटिश

साम्राज्याच्या घटकांत हिंदुस्थानास समान दर्जा देणें हें हिंदुस्थानचें अंतिम राजकीय ध्येय असल्याबद्दल हिंदुस्थानास ग्वाही देण्यांत आली. म्हणून सन १९१९ पासूनच्या पुढील काळांत शिक्षणसंस्थांवरील नियंत्रणें बरींच शिथिल करण्यांत आलीं; व द्विदल "राज्यपद्धति" या नांवानें जी नवी राज्यपद्धति प्रांतांमधून अंमलांत आली त्यामुळें शिक्षणक्षेत्रांत जें स्वातंत्र्य जनतेस मिळालें होतें त्यापासूनहि शिक्षणसंस्थांना आपापल्या कारभारांत बरीच स्वतंत्रता मिळूं लागली.

सन १९३७ एप्रिलपासून हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत बऱ्याच व्यापक स्वरूपाचे फेरबदल करण्यांत आलेले आहेत. कांहीं विशिष्ट बाबींखेरीज करून प्रांताचा सर्व कारभार लोकांस जबाबदार असा केला आहे. यामुळें शैक्षणिक बाबतींत लोकांना पसंत असें धोरण अंमलांत आणण्यास फारशी अडचण आतां उरलेली नाहीं ही गोष्ट आतांपर्यंतच्या राज्यकारभारावरूनहि सिद्ध झालेली आहे. "राष्ट्रीय शिक्षण" या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या शिक्षणपद्धतींत जे विशिष्ट हेतु होते ते साधण्याच्या बाबतींत चालू शिक्षणसंस्थांस तशी इच्छा असल्यास कांहींच अडचणी राहिलेल्या नाहींत. याकरितां नवीन शिक्षण-संस्था काढण्यास कोणतीच हरकत येणार नाहीं, इतकेंच नव्हे तर अशा संस्थांस सरकार मदतहि करूं शकेल.

राज्यकारभारांत हल्लीं जें स्वातंत्र्य हिंदुस्थानच्या प्रजाजनांस मिळालें आहे तें शैक्षणिक स्वातंत्र्यास व पुनर्घटनेस इतकें अनुकूल असूनसुद्धां शिक्षणसंस्थांस व शिक्षणाचे कार्यार्थ झटणाऱ्या व्यक्तींस शैक्षणिक स्वातंत्र्याविषयीं व शिक्षण-कार्यास सरकारची सहानुभूति व मदत मिळवण्याच्या संबंधांत धास्ती व निराशा कां वाटूं लागावी असा प्रश्न साहजिकपणें उत्पन्न होतो. या प्रश्नाचें उत्तर हल्लीं आपल्या देशांत जो अत्यंत बलाढ्य व म्हणून राज्यकारभार चालविण्याचे बाबतींत लोकशाहीच्या तत्त्वानुसार अग्रहक्कधारी असा राजकीय पक्ष आहे त्याच्या मनोवृत्तींत, मतप्रणालींत, आचरणांतल्या व प्रत्यक्ष केलेल्या राज्यकारभारांत सांपडणार आहे. देशांतील बहुमत अतिशय मोठ्या प्रमाणांत या पक्षाच्या पाठीमागें आहे. त्यामुळें लोकांस आज जेवढी राजकीय सत्ता ब्रिटिश राज्यकर्त्यांकडून मिळवतां आली आहे ती सत्ता वापरून आपले विशिष्ट कार्यक्रम लोकांमध्यें अंमलांत आणण्याचें साधन या पक्षाचे हातीं आलेलें आहे. राजकीय

बाबीप्रमाणेंच शैक्षणिक बाबींतहि या पक्षाचीं विशिष्ट मतें व मतप्रणालि तयार झालेली आहे व हीच देशांत सर्वत्र रूढ व्हावी अशी या पक्षाची, निदान त्या पक्षाचे सर्वमान्य पुढारी महात्मा गांधी यांची इच्छा आहे. महात्मा गांधी यांचीं राजकीय, आर्थिक व सामाजिक मतें कॉंग्रेसनें जशीं मान्य केलीं व कॉंग्रेसच्या कारभारांत व तदनंतर देशाचा राज्यकारभार जेथें हातीं आला त्या त्या ठिकाणीं स्वीकारून अंमलात आणलीं तशींच त्यांचीं शैक्षणिक मतेंहि कॉंग्रेस अमलांत आणण्याच्या तयारींत आहे याबद्दल वाद नाहीं.

आपल्या शैक्षणिक मतप्रणालीस धरून देशाच्या शिक्षणपद्धतींत आमूलाग्र फरक करण्याचें कॉंग्रेसनें जर धोरण अंगिकारलें तर त्यांत गैर तें काय झालें असा प्रश्न साहजिकपणें कोणीहि विचारील. या प्रश्नास उत्तर द्यावयाचें म्हणजे कोणत्याहि राजकीय पक्षाचीं ध्येयें काय असावीं व राज्यकारभाराचे प्रधान हेतु कोणते असतात या गोष्टीचा विचार करणें जरूर आहे. देशांत शांतता राखणें, प्रजाजनांकडून कायद्याचें परिपालन करविणें, प्रजाजनांस न्याय देणें, नवे कायदे-कानू करणें, परकीय हल्ल्यापासून राष्ट्राचें संरक्षण करणें, राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें जरूर तर परराष्ट्राविरुद्ध युद्ध पुकारणें व तह करणें वगैरे बाबी या राज्यकार-भारामध्यें प्रमुखतः येतात. या बाबींखेरीज हल्लीं बऱ्याच प्रकारचीं कार्यें सरकार आपल्या अंगावर घेऊन तीं पार पाडण्याचा प्रयत्न करीत असतें. हीं सर्व कार्यें गौण प्रकारचीं आहेत. शिक्षणाचें कार्य हें सरकारच्या प्रधान कर्तव्यांपैकीं नसून त्याचा समावेश गौण कर्तव्यांत केला जातो. या गौण कर्तव्यांत शिक्षणास फार महत्त्वाचें स्थान आहे यांत शंका नाहीं; परंतु या बाबतींत अधिकारारूढ अशा बहुमतवाल्या राजकीय पक्षाची आपली स्वतंत्र अशी मतप्रणालि कोणतीच नसलेली बरी. राष्ट्राचे एकंदर हितास बाधक होणार नाहीं अशी कोणतीहि शिक्षणपद्धति अगर मतें राष्ट्रामध्यें अमलांत आणण्यास व प्रसृत करण्यास प्रजाजनांस स्वातंत्र्य असावें. कोणतेंहि शिक्षणविषयक धोरण राजसत्तेच्या जोरावर अमलांत आणणें झाल्यास त्या धोरणास जवळ जवळ सर्व पक्षांचा पाठिंबा असावा. या बाबतींत केवळ बहुमताच्या जोरावर अधिकारारूढ पक्षानें आपला हेका न चालविणें यांतच राष्ट्राचें खरें हित आहे. शिक्षण हा विषयच असा आहे कीं त्याची वाढ व विकास हीं कार्यें मतस्वातंत्र्य व कार्यस्वातंत्र्य या योगानें जितकीं होतील तितकीं एकच मत व

एकच कार्यपद्धति या योगानें होणें शक्य नाहीं. शिक्षणाचा संबंध संस्कृति-संवर्धन व संगोपनाशीं अत्यंत निकट असा आहे. म्हणून शिक्षणाचें मुख्य उद्दिष्ट व्यक्तीमध्यें असलेल्या उत्तमोत्तम गुणांचे पायाशुद्ध, पद्धतशीर व सर्वांगीण पद्धतीनें विकसन करणें हें आहे. जगामध्यें उत्तमोत्तम असे जे गुण व पद्धति आहेत त्या सर्व एकाच व्यक्तीजवळ अगर एकाच बहुमतवाल्या पक्षा-जवळ असूं शकत नाहींत. तसेंच आपल्यास जें चांगलें आहे असें वाटतें तें वस्तुतः व सदासर्वकाळ तसेंच राहील कीं नाहीं हें कालांतरानें व प्रयोगानें ठरावयाचें असतें. म्हणून निदान शिक्षणासारख्या बाबतींत तरी मतस्वातंत्र्य व कार्यस्वातंत्र्य राष्ट्राच्या एकंदर हिताच्या दृष्टीनें अत्यंत जरूर असतें व तें हितावहहि होतें.

आपलींच मतें हीं सदा सर्वकाळ खरीं व राष्ट्राचे हितास पोषक व तद्विरुद्ध अशीं सर्व मतें खोटीं व राष्ट्रविघातक अशा तत्त्वावर संघटित झालेले राजकीय पक्ष अलीकडे उत्पन्न झालेले आहेत. वस्तुतः हे पक्ष नसून एक प्रकारचे संप्रदायच आहेत. या पक्षाचीं ठळक उदाहरणें म्हणजे रशियाचा बोल्शेव्हिक पक्ष, जर्मनीचा नाझी पक्ष व इटलीचा फॅसिस्ट पक्ष हीं होत. देशांतील बहुजनसमाज प्रथमतः आपल्या बाजूस भल्याबुऱ्या अशा अनेक मार्गांनीं वळवून घेऊन प्रथम राजकीय सत्ता हस्तगत करून घेणें व त्या सत्तेच्या जोरावर सर्व विरोधी पक्षांस नामोहरम करून आपला विशिष्ट सांप्रदाय जनतेमध्यें दृढमूल करणें अशी या पक्षांची कार्यपद्धति बनून राहिली आहे. संप्रदायाचें दृढीकरण करण्याच्या कामांत शिक्षण हें एक अमोघ शस्त्र आहे. सर्व नागरिकांची मनोभूमिका एकाच सांच्याची करून राजकीय, आर्थिक, धार्मिक व सामाजिक वगैरे सर्वच बाबतींत एकाच मतप्रणालीनें व ध्येयवादानें नागरिकांस प्रेरित करणें हें कार्य या संप्रदायांच्या दृढीकरणाच्या दृष्टीनें होणे जरूर असतें. म्हणून रूढ शिक्षण-पद्धतिमार्ग व मतें हीं सर्व रद्द करून आपल्या संप्रदायाचे संवर्धनास पोषक अशी नवी व्यवस्था केली जाते. जर्मनी, रशिया, इटली या देशांमध्यें शिक्षणसंस्था व शिक्षणक्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्ति या सर्वांना सरकारी नियंत्रणाखालीं काम करावें लागत असून त्यांस फारच थोड्या बाबतींत स्वातंत्र्य राहिलें आहे.

कॉँग्रेसच्या पुरस्कारानें "वर्धा शिक्षण-योजना" या नांवानें ओळखली जाणारी शिक्षणपद्धति आपल्या देशांत येऊं घातली आहे. कॉंग्रेसमध्यें हल्लीं जो अत्यंत प्रभावी असा पक्ष आहे तो महात्मा गांधी यांच्या मताचा असून त्या पक्षानें केवळ राजकीय अशा गोष्टींखेरीज इतर अनेक बाबी आपल्या कार्यक्रमांत समाविष्ट केलेल्या आहेत व हाच कार्यक्रम देशाचा उद्धार करण्यास समर्थ आहे अशी या पक्षाच्या सर्व अनुयायांची दृढ भावना आहे. म्हणून इतर बाबींप्रमाणें शिक्षणाच्या बाबतींतहि कॉँग्रेसमधल्या गांधीपंथास संमत असाच शिक्षणक्रम देशांत रूढ व्हावा व इतर शिक्षणपद्धति व मतप्रणालि यांस राजदरबारीं थारा मिळूं नये असें कॉँग्रेस सरकारचें धोरण होऊं घातलें आहे. या शिक्षणपद्धतीची विस्तरशः चर्चा या ठिकाणीं करणें शक्य नाहीं व जरूरहि नाहीं. स्थूलमानानें या पद्धतींत व मतप्रणालींत कोणते मुख्य मुद्दे आहेत व सरकारकडून अट्टाहासपूर्वक सक्तीनें अंमलांत आणण्यापासून राष्ट्राचा खरोखर फायदा होणार आहे कीं नाहीं या गोष्टींचा विचार तात्त्विकदृष्टया होणें जरूर आहे.

वर्धा शिक्षण-योजनेंत मुख्य मुद्दे असे आहेत कीं, (१) ज्यास हल्लीं उच्च शिक्षण म्हटलें जातें त्या शिक्षणाची सोय करणें हें सरकारच्या कार्यक्षेत्रांत येत नाहीं. उच्च शिक्षणानें ज्या कांहीं गोष्टी साधावयाच्या असतात त्यांपैकीं कांहीं आरंभींच्या शिक्षणांतूनहि साध्य करून घेतां येतील. (२) शिक्षणाची पद्धत अशी पाहिजे कीं त्याकरितां लागणारा खर्च सरकारच्या खजिन्यावर न पडतां शिक्षणसंस्थांकडूनच उत्पन्नाच्या रूपानें त्यास मिळावा. (३) प्रत्येक विद्यार्थ्यास निदान एका मूलभूत हस्तव्यवसायाचें (Basic craft) समग्र ज्ञान असावें. हा व्यवसाय शक्यतोंवर सूत काढणें व कापड विणणें हा असावा; व शिक्षणक्रम संपल्यावर जरूर पडल्यास या व्यवसायाचा आश्रय करून विद्यार्थ्यास आपली उपजीविका चालवितां येईल इतकें त्या व्यवसायाचें ज्ञान असावें. (४) सहकार्याच्या पद्धतीनें कार्य करण्याची आवड, धंद्यासंबंधांत कोणत्याहि प्रकारचा उच्चनीच भाव मनांत न बाळगतां जरूर पडेल त्या प्रकारचे परिश्रम करण्याची तयारी, नागरिकांच्या आद्य कर्तव्यांची जाणीव, धार्मिक मतासंबंधीं सहिष्णुता, भरतखंडाचें वैभव व त्याचें उज्ज्वल भवितव्य याविषयीं दृढ विश्वास व प्रीति, वगैरे बाबी विद्यार्थ्यांच्या

मनावर बिंबवणें. ( ५ ) हिंदी भाषा ही अखिल हिंदुस्थानची दळणवळणाची भाषा या नात्यानें शिकवणें. ( ६ ) सत्य व अहिंसा यांचें महत्त्व पटवून देणें. या सर्व मुद्द्यांवरून एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेस येते ती ही कीं, ज्यास "गांधीवाद" असें नांव पडलें आहे असा एकमेव संप्रदाय शिक्षणासारख्या अमोघ साधनानें राजसत्तेच्या जोरावर राष्ट्रांत कायमचा रूढ करणें हा या शिक्षणयोजनेचा प्रधान हेतु आहे.

वर्धा शिक्षण-योजना ही सर्वस्वीं अनिष्ट आहे असें कोणीहि म्हणणार नाहीं; परंतु ही योजना जेथपर्यंत सर्वसंमत अशी झालेली नाहीं तेथपर्यंत सरकारी धोरणाचा एक भाग म्हणून केवळ बहुमताच्या जोरावर ती जनतेवर लादणें म्हणजे शिक्षणाच्या बाबतींत सरकारची जी निःपक्षपाती भूमिका असावयास पाहिजे ती सोडून देण्यासारखें आहे. राष्ट्रविघातक अशा अनिष्ट प्रवृत्ति ज्या शिक्षणपद्धतींत नाहींत अशा प्रत्येक पद्धतीस देशांत वाव असणें जरूर आहे. वर्धा-योजनेसारख्या ज्या नावीन्यपूर्ण योजना पुढें येतील त्यांस उत्तेजनार्थ म्हणून सरकारनें अवश्य मदत करावी. परंतु स्वतंत्र रीतीनें प्रयोग होऊन त्यांची उपयुक्तता व व्यवहार्यता सिद्ध होईपर्यंत व त्या सर्वमान्य होईपर्यंत सरकारच्या धोरणाचा एक भाग म्हणून त्यांचा केव्हांहि स्वीकार केला जाऊं नये.

शिक्षणाच्या बाबतींत सरकारी धोरणाचा भाग म्हणून ज्या गोष्टी अमलांत आणणें कोणत्याहि सरकारचें कर्तव्य ठरतें त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे. नागरिक या नात्यानें प्रत्येक व्यक्तीस किमानपक्षीं जेवढ्या शिक्षणाची जरूरी आहे तेवढें शिक्षण देणें व त्याकरितां सक्तीसुद्धां करणें हें सरकारचें कर्तव्य ठरतें. या शिक्षणाकरितां जो खर्च येईल त्याची तरतूद सरकारी खजिन्यांतून अवश्य व्हावयास पाहिजे. या शिक्षणास प्राथमिक शिक्षण अगर साक्षरता प्रसार असें म्हणण्याचा प्रघात आहे. या कामीं सरकारनें स्वतः होऊन शक्य ती सर्व तजवीज केली पाहिजे व खाजगी प्रयत्नास भरपूर प्रोत्साहन दिलें पाहिजे. या शिक्षणाबरोबरच हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्षांस मान्य अशीं जीं राष्ट्रीय ध्येयें व कर्तव्यें आहेत तीं शिक्षण घेणाऱ्या अल्पवयी मुलांचे मनांवर ठसविण्याचा प्रयत्न अवश्य केला जावा. दुय्यम शिक्षण व विश्वविद्यालयीन शिक्षण हें सर्वत्रांच्या आटोक्यांत येण्यासारखें नाहीं;

परंतु प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत केलें व त्यासंबंधींचे कार्यक्रम राष्ट्रीय दृष्टीनें आंखण्यांत आले म्हणजे बहुजनसमाजास स्वतःच्या प्रयत्नानें आपलें ज्ञान वाढविण्याचे मार्ग खुले होतील व त्यांचेमध्यें राष्ट्रीय बाणाहि उत्पन्न होऊं लागेल.

दुय्यम शिक्षण, औद्योगिक शिक्षण व विश्वविद्यालयीन अगर उच्च शिक्षण यासंबधांत सरकारचें कर्तव्य कांहींच नाहीं असें म्हणणें चूक होईल. या सर्वांकरितां स्वतःच्या संस्था चालविणें जरी सरकारास शक्य नसलें तरी अल्पस्वल्प प्रमाणांत या प्रकारच्या शिक्षणाकरितां जे खासगी प्रयत्न चालले असतील त्यांस मदतीदाखल देणग्या देणें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अत्यंत जरूर असतें. औद्योगिक शिक्षणाचा पुरस्कार करणें हें हिंदुस्थानसारख्या देशांतील कोणत्याहि सरकारचें अत्यंत महत्त्वाचें असें कर्तव्य आहे. व याचें महत्त्व प्राथमिक शिक्षणाच्या खालोखाल आहे. शेतकी व विणकाम हें हिंदुस्थानांत फार महत्त्वाचे उद्योगधंदे आहेत. अशा प्रकारें शिक्षणाकरितां निदान प्राथमिक स्वरूपाच्या अशा शाळा ठिकठिकाणीं असणें जरूर आहे.

शिक्षणाच्या बाबतींत सरकारी नियंत्रण किती प्रमाणांत असावें हा अत्यंत महत्त्वाचा मुद्दा आहे. कोणत्याहि एकाच पद्धतीचा अट्टाहासपूर्वक अवलंब करून खाजगी शिक्षणसंस्थांच्या कार्यांत सरकारनें ढवळाढवळ करूं नये. शिक्षणसंस्थांच्या मार्गदर्शनार्थ सरकारनें फार तर शिफारसवजा असे सर्वसाधारण नियम करावे. प्रशंसनीय असे जे खाजगी प्रयत्न असतील त्यांस उत्तेजन द्यावें. शिक्षणाचे जे निरनिराळे प्रकार आहेत त्यांची वाढ स्वतंत्रपणें होऊं द्यावी. वर्धा शिक्षण-योजनेंत जशी निरनिराळ्या प्रकारांची गल्लत करण्यांत आली आहे तसा प्रकार सरकारी शिक्षणसंस्थांमध्यें करण्यांत येऊं नये. भरतखंडाच्या राष्ट्रीय संघटनेस विघातक होईल, ज्ञातीज्ञातींत वैमनस्य उत्पन्न होईल, एकमेकांविषयीं असहिष्णु वृत्ति वाढेल वगैरे प्रकारच्या अनिष्ट मतास व पद्धतीस कोणत्याहि शिक्षणसंस्थेंत अगर शैक्षणिक अभ्यासक्रमांत थारा मिळणार नाहीं अशी दक्षता घेणें सरकारचें कर्तव्य आहे; व याकरितां जरूर तें सर्व नियंत्रण करण्याचे अधिकार सरकारास असणें अवश्य आहे. या बाबी खेरीज करून शिक्षणाच्या पद्धति, शिक्षणाचें कार्य, शैक्षणिक मतप्रचार, पाठ्य-

पुस्तकांची निवड वगैरे सर्व बाबतींत जनतेस पूर्ण स्वातंत्र्य देणें सरकारचें कर्तव्य आहे. या मर्यादांचें उल्लंघन न होईल असें सरकारचें शैक्षणिक धोरण असलें पाहिजे व असें धोरण सरकारकडून संभाळलें जाईल याकरितां जरूर ती खबरदारी जनतेनें घेतली पाहिजे. जनता जर या बाबतींत उदासीन व निष्काळजी राहील तर तिचें शैक्षणिक स्वातंत्र्य संपुष्टांत आल्यावांचून राहणार नाहीं.

---

# ग्रामीण शिक्षण

लेखकः— श्रीपाद दत्तात्रय नागपूरकर

प्राथमिक शिक्षणक्रम खेड्यांत व शहरांत सारखाच राहील; परंतु खेड्यांतील प्रौढ बहुतेक अंशीं शेतकीवर जगत असल्यानें तेथें शेतकी हा विषय हळुहळू वाढविला जाईल व शहरांत शेतकीस जागा नसल्यानें त्या ठिकाणीं कारखाने व व्यापार या विषयाला महत्त्व दिलें जावें एवढाच काय तो फरक ठेवावा लागेल.

खेड्यांमध्यें उच्च शिक्षण सध्यां तरी देणें परवडणार नाहीं. खेड्यांतील चलाख व बुद्धिवान् मुलांना शहरांत नेऊन शहरांतील चलाख व बुद्धिमान मुलांबरोबरच उच्च शिक्षण, निरनिराळीं शास्त्रें व यंत्रें, उच्च वाङ्मय, कायदा, राजकारण, वगैरे शिक्षण दिलें जाईल. तथापि त्याची औपचारिक माहिती ग्रामीण शिक्षणांत दिली जाईल, अशी दक्षता ठेवावी लागेल.

प्रथमतः शिक्षणाची व्याख्या करावी लागेल कीं मुलामुलींचें शरीर, मन, बुद्धि व आत्मा, यांचा सर्वतोपरी विकास होऊन त्या विकासाचे जिवावर देशांतील संपत्तीचा पूर्ण उपयोग करतां यावा व त्या साधनसंपत्तीच्या साहाय्यानें आपला व आपल्या कुटुंबाचा, गांवाचा व राष्ट्राचा संसार योग्य प्रकारें चालवितां यावा, याची पूर्वतयारी करणें म्हणजेच शिक्षण. त्याचा आरंभ बालवयांत झाला म्हणजे त्यालाच प्राथमिक शिक्षण म्हणतात. त्याची वाढ पुढें मध्यम शिक्षणांत व त्याची पूर्णावस्था उच्च शिक्षणांत होत जाते. शिक्षणाचें स्थान खेड्यांत असलें म्हणजे त्याला म्हणावें ग्रामीण शिक्षण व त्याचें स्थान शहरांत असलें म्हणजे तें शहरी शिक्षण होय. परंतु लक्षांत ठेवावयास पाहिजे कीं, शिक्षणाच्या विचारसरणींत स्थानपरत्वें भेद करून चालणार नाहीं. भेद काय तो साधनसामुग्रीचा. व सर्व शिक्षणाचा अंतरात्मा कीं, आमचें राष्ट्र पारतंत्र्यांत आहे. आम्ही या राष्ट्राचे नागरिक आहोंत. आम्हांस आमचें राष्ट्र स्वतंत्र करावयाचें आहे.

बलाढ्य, राजकारणनिपुण व साधनसामुग्रीमध्यें भरपूर पारंगत अशा लोकांपासून हें स्वातंत्र्य आम्हांस मिळवावयाचें आहे. आम्हीहि राजकारणांत सवाई निपुण व साधनसामुग्रींत सवाईपारंगत होणार.

हा नवीन काळ प्रजातंत्री राज्याचा आहे. त्या काळाला योग्य असे आम्हीं नागरिक बनणार. हाच शिक्षणाचा शेवट; मग तें ग्रामीण असो अगर शहरी असो. ही गोष्ट खरी आहे कीं पोट भरण्यासाठीं प्रत्येकाला कोणता ना कोणता तरी धंदा शिकावाच लागतो. तो धंदा स्थलपरत्वें व कालपरत्वें ठरवावा लागेल व त्याचीं साधनेंहि त्या त्या ठिकाणाप्रमाणें भिन्न भिन्न ठरवावीं लागतील. परंतु विसरून चालणार नाहीं कीं हा नवाकाळ आहे; व या काळाला पुस्तकाचा काळ म्हणतात; शास्त्राचा काळ म्हणतात; व यंत्राचा काळ म्हणतात. करितां आपलें पोट भरण्याच्या धंद्यास हीं नवीन नवीन पुस्तकें, नवीन नवीन शास्त्रें नवीन नवीन यंत्रें यांची जोड देणें भाग पडेल.

१. प्रत्येक ग्रामीण शिक्षणाचा आराखडा करणें, हें मी विद्वान शिक्षकांवरच सोंपवितों, परंतु माझे अनुभवाप्रमाणें मला वाटतें कीं, प्रत्येक स्त्री-पुरुषास व मुला-मुलीस पुस्तक-वाचन, लेखन व व्यवहारी हिशोब आलेच पाहिजेत.

२. वाचन-पुस्तकें राष्ट्रप्रेम उत्पन्न करणारीं, नागरिकत्व अंगीं बाणविणारीं व पोटाचे धंद्यावर प्रकाश पाडणारीं असावींत. परंतु पुस्तकांची भाषा शक्यतों सोपी व टाइप शक्यतों मोठा असून तीं सचित्र असावींत.

३. यंत्र-शिक्षण म्हणून—मेक्यानो वापरण्यास शिकवावें व त्यालाच जोडून थोडेंसें ड्रॉइंग, सुतारकी वगैरे असावी.

४. शेतांत काम करणें, बॉयस्काउट व ड्रिल, संघ-खेळ वगैरेमधून आरोग्य शिकवावें हाच व्यायाम. राष्ट्रगीतें, गाणें, वाजविणें, नाचणें, लुटपुटीच्या लढाया वगैरे हेच खेळ.

५. गुरुजींनीं व्याख्यानें, नाटकें, प्रहसनें, मॅजिक लॅंटर्न, फिरते सिनेमा, रेडिओ वगैरे साधनांचा भरपूर उपयोग करून शिक्षणांत दररोज भर घालीत असावें. मुलें व खेड्यांतील प्रौढ लोक स्वतः पुस्तकें वाचून आपले ज्ञानांत भर घालूं शकत नाहींत, तर कोणीं त्यांना गोष्टी सांगाव्या अगर वाचून दाखविल्या तर त्यांच्या ज्ञानांत भर फार लवकर होते असा अनुभव येतो.

त्याचप्रमाणें नाटकें, प्रहसनें, मॅजिक लॅटर्न, सिनेमा वगैरेंचा परिणाम तर लहान मुलामुलींवर व खेड्यांतील साक्षर-निरक्षर प्रौढांवर फारच चांगला होतो. म्हणून हीं सर्व साधनें ग्रामीण शिक्षणांत अवश्य पाहिजेत.

६. ग्रामीण शिक्षणाचा आरंभ वयाच्या ६ व्या वर्षी होऊन वयाच्या १४ वर्षांच्या आंत प्राथमिक शिक्षण संपविलें जावें आणि तें मोफत व सक्तीचें होईल असें असावें.

या काळांत मुलांना शाळेमध्यें सारखें डांबून ठेवणें शारीरिकदृष्ट्या फारच हानिकारक असतें. एवढेंच नव्हे तर मुलांच्या मनाचीहि फार कुचंबणा होते. करितां या वयांत मुलांना बौद्धिक शिक्षणासाठीं म्हणून फार तर दररोज दोनच तास शाळेंत बसवावें व संध्याकाळीं तासभर संघव्यायाम, ड्रिल वगैरे कामासाठीं पुन्हा शाळेच्या मैदानावर बोलवावें. बाकीचा वेळ त्यांना मनसोक्त खेळ खेळण्यास किंवा आपले आईबापाबरोबर किंवा भावंडांबरोबर आपआपले शेतांत अगर जातधंद्यांत काम करणेस मोकळें सोडावें. मात्र शाळेच्या अधिकाऱ्यांनीं खालील बाबींमध्यें मुलें कोठेंहि असलीं तरी त्यांच्यावर देखरेख ठेवावी; स्वच्छता, नीटनेटकेपणा, शिस्त, खऱ्याची व न्यायाची चाड, खोटें व अन्यायाची चीड, वगैरे गुण लहानपणींच वाढवावयास पाहिजेत.

७. त्याचप्रमाणें प्रत्येक शाळेस स्काउटचें शिक्षण दिलें जाईल अशी सक्ती असावी.

स्काउटचा मुख्य गुण हा कीं—प्रसंगविशेषीं सर्वस्वाचें अर्पण करूनहि आपल्या लोकांची सेवा करणें.

८. या शाळेची वेळ पावसाळ्यांत सकाळीं ७ ते ९ अशी असावी. ९ वाजतां मुलांना गुरें-राखोळीसाठीं मोकळें सोडावें. त्याचप्रमाणें शेत-राखणीचे दिवसांत शाळा ११ ते २ पर्यंत असावी. शाळेच्या सुट्याहि शहरी सोईच्या न ठेवतां त्या खेड्यांतील उद्योगधंदे व सण, उरूस, उत्सव वगैरेस जुळवून घ्याव्यात; म्हणजे शाळेंत मुलें पाठविलीं असतां, आमचीं गुरें कोण संभाळील, किंवा शिक्षणक्रम संपतांच, शेतकीचे कामास किंवा आपले जातधंद्यास आपलीं मुलें पारखीं होऊन पोट भरणें व आपली संसारयात्रा चालविणेसहि निकामी होतील अशी जी खेडवळ जनतेची सध्यांचे शिक्षणाविरुद्ध ओरड आहे तीहि कमी होऊन

पालक आपआपलीं मुलें व मुली शाळेंत आनंदानें पाठवूं लागतील. शाळेची शिक्षणपद्धति, मास्तरलोकांचें वर्तन व शाळेची शिस्त व इमारत अशी असावी कीं, मुलांना शाळा हा एक कोंडवाडा आहे असें न वाटतां शाळा ही आनंदानें खेळण्या-बागडण्याची जागा आहे असेंच त्यांना वाटून मुलें स्वेच्छेनें शाळेंत नियमानें येऊं लागतील व जास्त जास्त तास तेथें नांदूं लागतील.

९. या ग्रामीण शिक्षणांत अनुभवानें वारंवार सुधारणा करावी लागेल. अनुभवी शिक्षक त्या त्या प्रकारची सुधारणा करतीलच अशी आशा धरून मी माझा लेख पुरा करीत आहें.*

---

टीपः—याच विषयावर प्रा. रा. प. सबनीस यांचा लेख अगोदर छापला गेल्यामुळें श्री. नागपूरकर यांच्या लेखांतील फक्त महत्त्वाचा भागच छापणें भाग पडलें. —संपादक.

# सरकारी शाळांचा इतिहास



लेखकः—विनायक पांडुरंग बोकील

इ. स. १८१८ त पेशवाईची अखेर झाल्यावर कर्तबगार मुत्सद्दी मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा मुंबईचा गव्हर्नर झाला. त्यानें मुंबईत शिक्षणासंबंधीं विचार करण्यासाठीं व योजना आंखण्यासाठीं एक पुढाऱ्यांची कमिटी नेमली. मुख्य दोन अडचणींतून त्याला मार्ग काढावयाचा होता. ( १ ) युरोपियन अधिकाऱ्यांच्या मुलांचें शिक्षण व ( २ ) प्रांताचा कारभार करण्यासाठीं इंग्रजी जाणणारे हिंदी अधिकारी यांसाठीं इंग्रजी शिकविणाऱ्या शाळा उघडणें फार जरूर होतें. शिवाय त्या दूरदर्शी राजपुरुषाच्या मनांत असेंहि होतेंच कीं ( १ ) पेशवे दरसाल जो दक्षिणा फंड खर्च करीत होते तो पैसा जनतेच्या शिक्षणासाठींच खर्ची पडावा, आणि ( २ ) एकंदर समाजास कांहीं तरी नवीन प्रकारचें शिक्षण मिळून त्यानें नवीन सरकारी सत्ता संतोषानें मानावी व शांतपणें आपला जीवनक्रम चालवावा. वरील कमिटीच्या व एल्फिन्स्टनच्या परिश्रमामुळें एल्फिन्स्टन हायस्कूल हें इ. स. १८२४ सालीं सुरू झालें. त्याचा पहिला हेड मास्तर रॉबर्ट मर्फी तोफखान्या-वरील एक हलकासा लष्करी अधिकारी होता. तो फार लायक, विचारी, सुशिक्षित व आचारसंपन्न म्हणून त्याची नेमणूक झाली. डब्लिनच्या एका व्यापाऱ्याचा हा मुलगा असून एका जेझुइट कॉलेजांत शिकलेला होता. मिशनरी लोकांनीं प्रथम आपलें धार्मिक शिक्षण जेथें तेथें घुसडून देण्याचा प्रयत्न केला; पण या व अशा सरकारी शाळांतून एल्फिन्स्टननें त्यांची डाळ शिजूं दिली नाहीं. उलट ( १ ) एतद्देशीय लोकांच्या भावना दुखवतां कामा नये व ( २ ) शुद्ध शास्त्रीय शिक्षण दिलें पाहिजे आणि ( ३ ) त्यांत कोणत्याहि धर्मतत्त्वांचा उल्लेख नसावा—असा त्यानें आग्रह धरला. या शाळेंत कोणतीं मुलें घ्यावींत असा प्रश्न प्रथमच उद्भवला. त्यासंबंधीं असा ठराव झाला कीं, " समाजांतील भिन्नवर्णीय वर्गांचा संकर होऊं नये म्हणून श्रीमंत घराण्यांतील

व विशेषतः बुद्धिमान् मुलांना प्रवेश द्यावा; नाहीं तर उच्चवर्णीय लोक शाळेकडे साशंक नजरेनें पाहतील." या शाळेला व गव्हर्नरच्या शिक्षणासंबंधींच्या धोरणाला इंग्लंडांतील डायरेक्टर लोकांनीं आपली संमति दिली ( ऑक्टोबर १८२५ ). आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे या शाळेला फी नसे. बहुतेक सर्व मुलें श्रीमंतांचीं व शिक्षण मोफत ! इ. स. १८४० पर्यंत असेंच चाललें. नंतर शाळेंतील प्रत्येक मुलानें आठ आणे फी द्यावी असें ठरलें; पण प्रथम प्रथम तीसुद्धां निम्मीअधिक मुलें देण्याचें टाळीत !

या शाळेंत इंग्रजी, मराठी, गुजराथी, संस्कृत, पर्शियन, अंकगणित, बीजगणित, भूमिति, इतिहास, भूगोल व शास्त्रीय विषय शिकविले जात. मराठी-गुजराथी खेरीज करून बाकीचे विषय इंग्रजींतून शिकविण्याची प्रथा पडली आहे. प्रथम प्रथम एकच शिक्षक होता व तोच 'हेड मास्तर'! तो इंग्रज—म्हणजे अर्थात् सर्व काम इंग्रजींतून चालावयाचें. इ. स. १८२५ त मुलांची संख्या ५५ होती. ती पुढें वाढली व सोसायटीचे सेक्रेटरी सदाशिव काशीनाथ छत्रे व त्यांचे मदतनीस बाळ गंगाधरशास्त्री हे शाळेंत थोडें थोडें शिकविण्याचें काम करूं लागले. इ. स. १८४० नंतर भाऊ दाजी यांचें नांव मदत-शिक्षक म्हणून दिसूं लागलें. दरसाल शाळेच्या परीक्षा होत व हुशार मुलांना सर्टिफिकेट दिलें जाई. मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना १८५७ त झाल्यानंतर पहिली मॅट्रिक्युलेशन परीक्षा १८५९ च्या ऑक्टोबरांत झाली. तिला एल्फिन्स्टन हाय-स्कूलमधून ११८ विद्यार्थी बसले व त्यांपैकीं फक्त २१ पास झाले. बसलेल्या विद्यार्थ्यांपैकीं बरेच पार्शी होते व ते सर्वजण नापास झाले.

अशा रीतीनें हिंदी लोकांना इंग्रजीचें व शास्त्रीय विषयांचें ज्ञान देण्याचें जें धोरण मेकॉले-बेंटिंकनीं आंखलें तें कंपनीच्या इंग्लंडांतील डायरेक्टरांनीं मान्य केलें. त्याला अनुसरून जिल्हानिहाय इंग्रजी शाळा सुरू कराव्यात अशी शिफारस प्रांतिक गव्हर्नरांना लिहून गेली व त्यांनींहि जिल्ह्याच्या कलेक्टरांमार्फत माहिती मागविण्याचा क्रम सुरू केला. ज्या ठिकाणीं इंग्रजी शाळा लोकांना पाहिजे असेल तेथें इमारत व सामानसुमान याबद्दलचा खर्च जनतेनें थोडा-बहुत सोसण्याची तयारी दाखविली पाहिजे. या धोरणानें सातारा, धुळें, अहमदनगर, सोलापूर इत्यादि ठिकाणीं इ. स. १८५० ते १८५२ च्या दरम्यान चळवळ सुरू झाली. पुण्यास इ. स. १८२१ मध्येंच एल्फिन्स्टननें संस्कृत कॉलेज

स्थापिलें होतें. तेथें पुढें इंग्रजीचा वर्ग सुरू झाला. या संस्थेचीं कालान्तरानें तीन रूपान्तरें झालीं —(१) मराठी शिक्षकांचें ट्रेनिंग कॉलेज, (२) इंग्रजी शिक्षणासाठीं हायस्कूल व (३) उच्च शिक्षणाचें डेक्कन कॉलेज. या सर्व जिल्ह्यांच्या शहरीं अनुकूल वातावरण उत्पन्न होऊन स्थानिक सधन पुढाऱ्यांच्या मदतीनें द्रव्यनिधि निर्माण झाले व इंग्रजी शिक्षणास आरंभ झाला. सातारा येथें महाराजांचा जुना वाडा हायस्कूलसाठीं मिळाला; पुण्यास पहिल्या बाजीरावांचा विश्रामबागवाडा, नाशिकास पेशव्यांचा नदीकांठचा वाडा अशा चांगल्या चांगल्या इमारती हायस्कूलसाठीं मिळाल्या. प्रथम प्रथम बऱ्याच ठिकाणीं इंग्रज हेडमास्तर नेमले जात; पण नंतर हिंदी लोक मुंबई विश्वविद्यालयाचे पदवीधर होऊं लागले व त्यांच्या नेमणुका हायस्कुलांवर होऊं लागल्या. पुण्याच्या हायस्कुलावर कुंटे, साताऱ्च्या हायस्कुलावर रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी, धुळ्याच्या हायस्कुलावर श्री. गणेश जनार्दन आगाशे, रत्नागिरीच्या हायस्कुलावर डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, ठाण्याच्या हायस्कुलावर रा. ब. काशिनाथपंत साने असे नामांकित हेडमास्तर होऊन गेले. त्यांचीं नांवें लेखक, इतिहाससंशोधक, समाजकार्यकर्ते इत्यादि निरनिराळ्या नात्यानें आपल्या समाजास आजतागायत माहीत आहेत.

इ. स. १८५४ व १८५९ त इंग्लंडांतील डायरेक्टरांचा सेक्रेटरी व पुढें महाराणीचा पहिला भारतमंत्री सर चार्लस वूड (किंवा लॉर्ड हॅलिफॅक्स) यानें दोन महत्त्वाचे खलिते हिंदी शिक्षणासंबंधीं इकडे पाठविले. त्यांत मुख्यतः जनतेच्या प्राथमिक शिक्षणावर सरकारनें पुष्कळ पैसा खर्च करावा, –नवीन शाळा उघडाव्यात व असतील त्या खासगी शाळांना मदत द्यावी,– आणि इंग्रजी शिक्षण शक्य तितकें खासगी संस्थांकडे सोपवावें अशा शिफारशी केल्या. त्याला अनुसरून पुढें प्राथमिक शाळा पुष्कळ निघाल्या व खाजगी इंग्रजी शाळाहि निघाल्या, पण पूर्वींच स्थापलेल्या सरकारी इंग्रजी शाळा बंद झाल्या नाहींत. प्रांतानिहाय शाळाखातें इ. स. १८५७ त स्थापन झालें. मुंबई शाळाखात्याचा पहिला डायरेक्टर मे. हॉवर्डसाहेब हा होय. खाजगी इंग्रजी शाळा बऱ्याच निघूं लागल्या. त्यांच्यासमोर कांहीं तरी नमुनेदार संस्था असावी म्हणून प्रत्येक जिल्ह्याच्या शहरीं एक सरकारी हायस्कूल पाहिजे अशा धोरणानें सर्व सरकारी इंग्रजी शाळा चालू राहिल्या. या इंग्रजी शिक्षणाचा

जनतेवर कांहीं कांहीं ठिकाणीं वाईट परिणाम झाला अशी शंका दुसऱ्या (इ. स. १८५९ च्या) खलित्यांत भारतमंत्र्यानें प्रगट केली. इ. स. १८५७ च्या बंडाच्या मुळाशीं जो असंतोष होता, त्यापैकीं कितीसा भाग नव्या इंग्रजी शिक्षणामुळें उद्भवला हें प्रत्येक प्रांताच्या गव्हर्नरला खात्रीपूर्वक सांगतां येईना. बंगाल व पंजाब या प्रांतांच्या अधिकाऱ्यांनीं तसे उल्लेख आपापल्या अहवालांत केले होते. तेव्हां या खलित्याच्या शेवटीं प्रांताधिकाऱ्यांना त्या भारतमंत्र्यानें गंभीर स्वरूपाच्या सूचना दिल्या कीं, "लोकांच्या हिताच्या दृष्टीनें आपण नवीन प्रकारचें शिक्षण त्यांना देत आहों; तथापि त्यासंबंधीं धार्मिक व सामाजिक दृष्टीनें जर त्यांच्या कांहीं शंका असतील, जर त्यांना कांहीं भीति वाटत असेल, जर त्यांच्या नाजूक भावना दुखवल्या जात असतील, तर त्याची बारीक रीतीनें चौकशी करावी, आणि जनतेचा विश्वास संपादन करण्याच्या हेतूनें शिक्षणक्रमांत योग्य ते फेरफार करावेत."

इ. स. १८८२ मध्यें सरकारनें हंटर कमिशन नेमलें व त्याकडून शिक्षणखात्याची सविस्तरपणें तपासणी करून घेतली. माध्यमिक शाळांच्या अभ्यासक्रमांत या कमिशननें बरेच फेरफार सुचविलेः—(१) सृष्टिनिरीक्षण किंवा पदार्थविज्ञान व (२) शारीरिक शिक्षण—खेळ, कवाईत वगैरे. या शिफारशींचा परिणाम पुढें लवकरच हायस्कुलांतून दिसूं लागला. शिवाय या कमिशननें असें सुचविलें कीं, इंग्रजी शाळेच्या पांचव्या इयत्तेपासून दोन निरनिराळे अभ्यासक्रम चालू ठेवावेत. एकांत धंदेशिक्षणाचा थोडाबहुत समावेश करावा व दुसऱ्यांत विश्वविद्यालयाच्या प्रवेश-परीक्षेचा अभ्यास. खरें पाहिलें तर त्या वेळीं हिंदी सुशिक्षितांत बेकारी दिसत नव्हती. मॅट्रिकची परीक्षा झाल्याबरोबर बहुतेकांना सरकारी नोकऱ्या मिळत होत्या. पण कांहीं मुलांना थोडें माध्यमिक शिक्षण व थोडें औद्योगिक शिक्षण जरूर आहे हें त्या कमिशननें नमूद करून ठेवलें. कमिशनच्या या शिफारशींची अंमलबजावणी सरकारनें आजपर्यंत केली नाहीं. या कमिशनच्या शिफारशीवरून इंग्रजी पांचवी इयत्तेपासून विद्यार्थी 'पब्लिक सर्व्हिस' परीक्षेसाठीं तयारी करूं लागले. विश्वविद्यालयाची प्रवेश-परीक्षा फार अवघड; व तिचे विषय पुष्कळ. त्यांची सरकारी नोकरीला जरूरी नाहीं असें वाटून ही हलकी परीक्षा सुरू केली; आणि ती सुमारें वीस वर्षें तशीच चालू राहिली. मध्यंतरीं अशी चमत्कारिक परिस्थिति झाली कीं,

विश्वविद्यालयाची प्रवेश-परीक्षा झाली तरी सरकारी नोकरी मिळत नसे; पण ती पांचव्या इयत्तेची 'पब्लिक सर्व्हिस' झाली कीं सरकारी नोकरी मिळे. इतकेंच नव्हे तर एकादा मॅट्रिक किंवा इंटरमीजिएट झालेला मनुष्य सरकारी नोकरींत लागला तर त्यास कायम होण्यास 'पब्लिक सर्व्हिस' परीक्षा द्यावी लागे! पुढें ही 'पब्लिक सर्व्हिस' बंद झाली व सरकारी 'स्कूल फायनल' सुरू झाली. या 'स्कूल फायनलला' इंग्रजी सातवीमधून बसावें लागे, व मॅट्रिकपेक्षां संस्कृत, बीजगणित हे विषय कमी असत, पण जमाखर्च, टाइपराइटिंग असा एकादा विषय ऐच्छिक म्हणून घ्यावयाचा असे. इ. स. १९२५-२६ नंतर ही 'स्कूल फायनल'सुद्धां बंद झाली. कारण "तिच्यांत विशेष कांहीं नाहीं आणि मॅट्रिक हीच परीक्षा उच्च शिक्षणासाठीं प्रवेश म्हणून व सरकारी नोकरीसाठीं लायकी म्हणून मानणें योग्य आहे" असा विचार अधिकारीवर्गास पटला.

अद्यापि मुलींच्या माध्यमिक शिक्षणाची स्वतंत्र व्यवस्था सरकारी खात्यानें कांहीं केली नव्हती. मिशनरी व इतर कांहीं खाजगी शाळा मुलींसाठीं सुरू झाल्या होत्या; यांपैकीं पुण्यांतील हुजुरपागेमधील "हिंदी मुलींचें हायस्कूल" ही शाळा सुप्रसिद्ध होय. इ. स. १८५४ पासून वेळोवेळीं विलायतेंतील अधिकारी व शैक्षणिक समित्या याबद्दल स्पष्ट शिफारशी व सूचना करीत होत्याच. त्यांचा परिणाम इ. स. १९२४ च्या सुमारास झाला व नाशिक, ठाणें, अहमदनगर, विजापूर इत्यादि शहरीं मुलींच्या सरकारी इंग्रजी शाळा निघाल्या. त्यांची फारच जरूरी होती. चार-दोन वर्षांतच वर्ग मुलींनीं भरून गेले व जागा अपुरी पडूं लागली. तेथें ज्या मुलींना प्रवेश मिळेना त्यांना मुलांच्या शाळेंत जावें लागे. या मुलींच्या शाळांपैकीं नाशिक व ठाणें येथील शाळा मॅट्रिकपर्यंतचे वर्ग आतां शिकवूं लागल्या आहेत. मुलींच्या शिक्षणक्रमांत गायन, शिवण, गृहव्यवस्था, आरोग्य इत्यादि विषय साहजिकपणें निराळे म्हणून आहेत. कवाईत व खेळ यांमध्येंहि मुली मोकळेपणानें आतां भाग घेतात. या मुलींच्या शिक्षणाचे परिणाम समाजांत आतां स्पष्टपणें दिसूं लागले आहेत. केशभूषा, कपालतिलक, कपडे, पादत्राणें, अलंकार इत्यादि बाबतींतल्या नवीन कल्पना या शाळांमधून निघाल्या व समाजांत मान्य झाल्या. मुलींच्या वागणुकींत अलीकडे दिसणारें स्वातंत्र्य, व्यवहारधैर्य व शास्त्रीय विचार यांचेंहि श्रेय त्यांनाच आहे.

मुसलमानांसाठीं निराळ्या माध्यमिक शाळा काढाव्यात अशा सूचना अनेक वेळां अनेकांनीं केल्या. पण त्यांची अमलबजावणी होण्यास बराच काळ लोटला. पुण्याचें अँग्लो-उर्दू हायस्कूल अलीकडे भरभराटीस आलें आहे. ही फार जुनी संस्था असून तिचा संबंध मोगल बादशहांच्या कालापर्यंत जाऊन पोंहोचतो. मुसलमानी भाषाज्ञान व धर्मज्ञान देण्यासाठीं लष्करांत मशिदीमध्यें मौलवी एक वर्ग चालवीत असत. त्यांचें काम पेशवाईतसुद्धां अव्याहतपणें चालू राहिलें. पुढें इंग्रजी अमलांत या वर्गास मदत मिळून अधिक उत्तेजन दिलें गेलें. इ. स. १८५१ त हा उर्दू वर्ग पुण्याच्या हायस्कुलास जोडला गेला. त्यामुळें त्याला पूर्णपणें सरकारी स्वरूप मिळालें; पण तें हायस्कूल गांवांत असल्यामुळें लष्करांतील लोकांची गैरसोय झाली म्हणून इ. स. १८५६ त पुन्हा तो उर्दू वर्ग लष्करांत नेला व गुजराथीच्या शिक्षणाचीहि त्यांत सोय केली. याचा फायदा मुख्यतः पारशी लोकांना होऊं लागला. इ. स. १८७३ मध्यें लॉर्ड मेयोच्या कारकीर्दींत या शाळेंतील सर्व शिक्षण उर्दूतून द्यावें असें ठरलें व लवकरच तिची भरभराट होऊं लागली. इ. स. १९०४ पर्यंत तेथें पहिल्या तीनच इयत्ता होत्या; पुढें चौथी व पांचवी इयत्ता सुरू झाली; आणि १९२० सालीं या शाळेला पूर्ण परिणत स्वरूप प्राप्त होऊन मॅट्रिकच्या अभ्यासाची सोय तिच्यांत झाली. तथापि या संस्थेचे सर्व वर्ग भाड्याच्या इमारतीमध्येंच होते. तिला त्याच सुमारास एक छोटेंसें वसतिगृह जोडलें. तेंहि भाड्याच्या इमारतींतच. इ. स. १९३७ मध्यें मौलवी सर रफिउद्दिन अहमद (मुंबईचे माजी शिक्षण-खात्याचे दिवाण) व खानबहादूर हिदायतुल्ला (या शाळेचे हेडमास्तर) यांच्या परिश्रमानें या संस्थेला स्वतंत्र इमारत, वसतिगृह व क्रीडांगण लाभलें. आतां ही एक आदर्शसंस्था होऊन राहिली आहे. याप्रमाणेंच स्वतंत्र सरकारी माध्यमिक उर्दू वर्ग सोलापूर, नाशिक, जळगांव इत्यादि ठिकाणीं निघाले आहेत; त्यांचा योग्य तऱ्हेनें फायदा घेणें मुसलमान समाजाच्या हातीं आहे.

शिक्षकांना शिक्षणशास्त्राचें शास्त्रीय ज्ञान झालें पाहिजे व प्रत्यक्ष अध्यापनकला अवगत असली पाहिजे— ही कल्पना इ. स. १८५४ च्या सर चार्ल्स वूडच्या खलित्यांत स्पष्ट केली आहे. त्याप्रमाणें प्राथमिक शिक्षकांसाठीं कांहीं अध्यापनसंस्था (ट्रेनिंग स्कूल) निघाल्या; तथापि माध्यमिक शिक्षकांसाठीं तसली

( ट्रेनिंग ) संस्था लवकर निघाली नाहीं. इ. स. १८८२ व १९०२ च्या शिक्षणसमित्यांनीं ( Education Commissions ) ट्रेनिंग संस्थांची अत्यंत जरूरी आहे असें सरकारला कळविलें. नंतर १९०५–०६ मध्यें माध्यमिक शिक्षकांसाठीं मुंबईचें ट्रेनिंग कॉलेज सुरू झालें. त्यांत प्रथम सरकारी शाळांतील शिक्षक बरेच घेतले जात व कांहीं खाजगी शाळांतील थोड्याच वर्षांत सरकारी हायस्कुलांतील सर्व शिक्षक अध्यापनकलाविशारद (ट्रेन्ड) झाले. खाजगी संस्थांची संख्या जास्त असल्यामुळें त्यांतील शिक्षक थोडेसेच ट्रेन्ड असावयाचे. विश्वविद्यालयाचे पदवीधर जरूर तितके मिळूं लागल्यापासून सरकारी शाळांत सर्वच शिक्षक बी. ए., एम्. ए. असे नेमले गेले. खाजगी व सरकारी शाळा यांमध्यें हा मोठा फरक त्या वेळीं दिसे (व अजूनहि दिसतो), कीं पहिल्या प्रकारच्या शाळांतील शिक्षक बरेच कमी शिकलेले व बेताचे तज्ज्ञ (अन्ट्रेन्ड) आणि दुसऱ्या प्रकारच्या शाळांतील शिक्षक बहुतेक सर्व पदवीधर व अध्यापनज्ञ असावयाचे. शिवाय सरकारी शिक्षकांचे पगार जास्त असून त्यांच्या नोकरींत कायमपणा या रजेच्या सवलती व्यवस्थितपणें मिळावयाच्या. या सर्व गोष्टींचा परिणाम जनतेच्या मनावर व विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर साहजिकपणें होई. उलट पक्षीं कांहीं कांहीं खाजगी संस्थांमध्यें चांगले विद्याविभूषित, ध्येयनिष्ठ, अल्पसंतुष्ट असे नामवंत शिक्षक, उदा० सातारचे सितारामपंत देवधर, त्यांच्या व्यक्तिगत आकर्षणानें आणि खाजगी शाळेंत फी कमी असल्यामुळें बरींच मुलें तिकडे धाव घेत. अशा तऱ्हेनें या दोन प्रकारच्या शाळांमध्यें मौजेचे फरक दिसून येत. पुढें पुढें अशी परंपराच पडूं लागली की, सरकारी शाळांतील विद्यार्थी मॅट्रिक पास झाले कीं सरकारी कॉलेजांत आणि खाजगी शाळांतील विद्यार्थी खाजगी कॉलेजांत (त्या त्या संस्थेच्या) जावयाचे. शिवाय कांहीं कांहीं स्थायिक घराण्यांतील मुलें अमुक एका शाळेंतच जावयाचीं अशीहि प्रथा पडूं लागली. (उ० धुळयाचें गरूड हायस्कूल व गरूड घराणें), आणि त्याबद्दल त्यांना एक प्रकारचा आपलेपणा व अभिमान वाटूं लागला. ही भावना सात्त्विकपणाच्या मर्यादेमध्यें जोंपर्यंत असते, तोंपर्यंत ती कौतुकास्पद वाटते; पण त्या मर्यादेबाहेर ती जाऊं लागली, म्हणजे मग तिच्या उपयुक्ततेबद्दल बरीच शंका वाटूं लागते. इ. स. १९२३–२४ नंतर सरकारी शाळांमध्यें प्रवेश मिळण्यासंबंधीं जातिगत निर्बंध घालून कांहीं प्रमाण ठरविण्यांत आलें. त्यामुळें

वरील परंपरा बऱ्याच ठिकाणीं मोडली गेली व ती भावनाहि दुखविली गेली. तेव्हांपासून पुढारलेल्या वर्गातील मुलांचा ओघ बऱ्याच प्रमाणांत खाजगी शाळांकडे वळला, आणि मध्यम, मागसलेल्या व मुसलमान वर्गातील मुलांना सरकारी शाळांमध्यें जास्त सवलती मिळूं लागल्या. सरकारी शाळांच्या धोरणांत व स्वरूपांत यामुळें पुष्कळ फरक पडला.

कांहीं सरकारी शाळांना वसतिगृहें जोडण्यांत आलीं. त्यांपैकीं धुळ्याच्या गरुड हायस्कूलचें 'लक्ष्मीबाई देव वसतिगृह' हें इ. स. १९०४ सालीं बांधण्यांत आलें. धुळ्यांत जीं प्रसिद्ध घराणीं आहेत, त्यांमध्यें गरुडांचें एक, वाडेकरांचें दुसरें, उपासनींचें तिसरें, देवांचें चौथें इत्यादींनीं सरकारी शाळेस नानाप्रकारें मदत केली आहे. हायस्कूलचें शाळागृह इ. स. १८९३-९५ मध्यें बांधलें गेलें व त्या कामीं गरुडघराण्यानें अप्रतिम मदत आणि अव्याहत श्रम केले, अर्थात् ती शाळाच त्यांच्या नांवानें संबोधिली जाते. वाडेकर व उपासनी यांनीं त्या शाळेंतील विद्यार्थ्यांसाठीं बक्षिसें व शिष्यवृत्त्या ठेविल्या आहेत. रणसिंगांनीं या शाळेसंबंधीं प्रारंभींचें चिटणिसाचें काम उत्तम तऱ्हेनें केलें. देवांनीं वसतिगृह बांधण्यास भरपूर मदत दिली. सातारा, सोलापूर, रत्नागिरी, अहमदाबाद, बेळगांव, धारवाड इत्यादि शहरीं वसतिगृहें स्थापलीं गेलीं. आरंभीं आरंभीं त्यांमध्यें राहण्यास बरींच मुलें येत. बहुतेक सर्व ठिकाणीं शाळेचे हेडमास्तर वसतिगृहाच्या आवारांत सरकारी बंगल्यांत राहून त्यांवर देखरेख करीत. कालांतरानें तालुक्याच्या ठिकाणीं इंग्रजी शाळा निघाल्या व जातिनिष्ठ वसतिगृहें स्थापलीं गेलीं; या कारणांनीं सरकारी हायस्कुलांच्या वसतिगृहांतील मुलांची संख्या बरीच कमी होत गेली. तथापि अजूनहि कांहीं वसतिगृहांसंबंधींच्या परंपरा चालू आहेत व कांहीं सुखवस्तु घराण्यांतील मुलें तेथें राहण्यास जातात.

सरकारी शाळांमध्यें जो अभ्यासक्रम सुरू झाला, तोच पुढें खाजगी शाळांत शिकविला जाऊं लागला. त्यामध्यें प्रयोगादाखल फेरफार करण्यासाठीं खात्याची परवानगी घ्यावी असा एक नियम सर्वश्रुत होता. त्याचा उपयोग फारच थोड्या शाळांनीं केला. बहुतेक सर्वत्र सरकारी अभ्यासक्रमच चालू झाला. आरंभीं इंग्रजी, संस्कृत, पर्शियन, इतिहास, भूगोल, जन्मभाषा आणि अंक-

गणित असे विषय असत. पुढें त्यांत शास्त्रीय विषयांची, चित्रकलेची, शारीरिक शिक्षणाची व आरोग्य-विज्ञानाची भर क्रमाक्रमानें पडली. अशा प्रकारें इ. स. १९१४ मध्यें जो सरकारी अभ्यासक्रम छापून प्रसिद्ध झाला, तो अजून चालू आहे. अलीकडे काँग्रेस सरकारनें त्यांत हिंदुस्थानीचा समावेश केला आहे. येणेंप्रमाणें शाळेच्या वेळापत्रकांत पुष्कळ विषयांची भरती झालेली दिसते. शिवाय कांहीं ठिकाणीं खालच्या वर्गांत लहान मुलांना गायनहि शिकविलें जातें. यापासून विद्यार्थ्यांच्या ज्ञानांत विविधता आली आहे; पण त्याबरोबरच उथळपणाहि दिसतो; कारण तोच वेळ आतां इतक्या विषयांवर वांटला जातो. वर्गपाठ, गृहपाठ, लेखीकाम, तोंडीकाम अशीं निरनिराळीं कृत्यें विद्यार्थ्यांना करावीं लागतात. सरकारी शाळांत ज्या धर्तीवर हा सर्व अभ्यास करून घेतला जातो, तो नमुना मानून शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांनीं खाजगी शाळांना दिशा दाखववावयाची असा प्रघात पडला. कालांतरानें शाळेच्या वेळाबाहेरहि मुलांकडून कांहीं कांहीं उपयुक्त कामें करून घ्यावींत अशी कल्पना निघाली; आणि जादा वाचनासाठीं सोपीं सोपीं पुस्तकें शाळांतून ठेवण्यांत आलीं; जवळपासच्या प्रेक्षणीय ठिकाणीं मुलांना नेऊन त्यांसंबंधींची मनोरंजक माहिती देण्यांत येऊं लागली. त्यांच्या अंगीं सभाधीटपणा यावा म्हणून चर्चामंडळें स्थापन झालीं. लेखनसाहित्य, पुस्तकें वगैरे शाळेंतल्या शाळेंत मिळावींत यासाठी सहकारी संस्था अस्तित्वांत आल्या. लेखनाची संवय विद्यार्थ्यांना व्हावी या उद्देशानें शाळांचीं मासिकें, त्रैमासिकें किंवा षण्मासिकें हस्तलिखित किंवा छापील अशीं निघूं लागलीं. सामाजिक कार्यांत भाग घेण्याची संवय मुलांना लागावी म्हणून त्यांना प्रोत्साहन मिळूं लागलें. वेळापत्रकाबाहेरचीं व अभ्यासक्रमाव्यतिरिक्त हीं कामें करण्यांत बऱ्याच शाळांनीं पुढाकार घेतला. मुंबईचें एल्फिन्स्टन हायस्कूल या बाबतींत अग्रेसर मानण्यांत येतें. पुण्याचें हायस्कूल इ. स. १९२१–२२ मध्यें बंद झाल्यामुळें त्याबद्दल या दृष्टीनें कांहीं लिहिण्यासारखें नाहीं. तसेंच अहमदनगरचें हायस्कूल एकोणिसाव्या शतकांतच स्थानिक कार्यकर्त्यांच्या ताब्यांत दिलें गेलें; तेव्हां त्याविषयींची पुढील माहिती कांहीं नाहीं. खानदेशचे दोन भाग इ. स. १९१४–१५ मध्यें झाले व जळगांवीं सरकारी हायस्कूल स्थापण्यांत आलें. या हायस्कूलचा पंचविसाव्या वर्षाचा रौप्य-

महोत्सव नुकताच साजरा झाला. त्याचा इतिहास अगदीं अलीकडचा आहे. तेथेंहि वरील प्रकारच्या सर्व चळवळी चालू आहेत. 'बालवीर' चळवळ इ. स. १९१०-११ च्या सुमारास सुरू झाली. त्यांत सरकारी शाळांनीं उत्साहानें भाग घेतला; तेव्हांपासून सामान्य जनतेचें लक्ष शाळेकडे, विद्यार्थ्यांकडे वेधूं लागलें. या चळवळींत सर्व लहान-मोठ्या लोकांनीं भाग घ्यावा असें होतें, तथापि फारसे शाळेबाहेरचे लोक बालवीरांत सामील झाल्याचें दिसत नाहीं. या चळवळीचे जनक जे लॉर्ड बेडन पॉवेल त्यांचें नेतृत्व इ. स. १९३६-३७ पर्यंत सर्व हिंदी लोकांनीं मानलें तितक्या मुदतींत हिंदुस्थानांत, इंग्लंडांत व इतरत्रहि जे अनेक जंगी 'बालवीरांचे संघ' एकत्र जमले, त्यांमध्यें हिंदी बालवीरांनीं – विशेषतः सरकारी शाळांतील बालवीरांनीं – उत्साहानें भाग घेतला; परंतु इ. स. १९३६–३७ च्या सुमारास एका भाषणांत त्या लॉर्ड साहेबांनीं हिंदी लोकांविषयीं व हिंदी भाषेविषयी कांहीं अनुदार शब्द उच्चारल्याचें प्रसिद्ध झाल्यामुळें सर्वत्र मोठी गडबड झाली. याच वेळीं राष्ट्रीय पक्ष राजकारणांत पुढारी बनल्यामुळें लोकांचा स्वाभिमान जागृत झाला होता. त्याला मोठा धक्का बसला आणि लॉर्ड बेडन पावेल यांचें नेतृत्व मानावयाचें नाहीं असें हिंदी बालवीरांनीं ठरविलें. तें व्यक्तिगत महत्त्व किंवा आकर्षण जरी कमी झालें, तरी त्या बालवीर संघटनेची उपयुक्तता सर्वांना पटली म्हणून ती संघटना पुढें 'हिंदुस्थान स्काउट असोसिएशन' या नांवानें चालवी व तिचा ब्रिटिश साम्राज्य संघाशीं प्रत्यक्ष संबंध न राहतां जागतिक बालवीर समुच्चयाशीं रहावा असें ठरविण्यांत आलें. या भानगडीच्या दोन-तीन सालांत बालवीर चळवळ थंड पडली होती. पण पुढें मुंबईच्या कॉंग्रेस सरकारनें हिंदुस्थान स्काउट ॲसोसिएशनला मान्यता व मदत देण्याबद्दल फर्मान काढलें. त्यामुळें ठिकठिकाणीं बालवीर पथकें पुन्हा उभारलीं जात आहेत; व त्यामध्यें सरकारी शाळा अहमहमिकेनें भाग घेत आहेत. धुळ्याच्या गरूड हायस्कूलमध्यें वरील सरकारी फर्मान निघाल्यापासून एकदम पाऊणशें विद्यार्थि बालवीर पथकांत दाखल झाले. फावल्या वेळीं व जरूर तेव्हां सामाजिक कार्यांत मुलांनीं भाग घ्यावा असा नियम बालवीर पथकांतहि असतोच. त्याप्रमाणें यथावकाश व यथामति ठिकठिकाणचीं बालवीरपथकें कार्य करीत आहेत. एक उदाहरण म्हणून धुळ्याच्या गरूड हायस्कूलच्या समाज-

कार्य-संघानें इ. स. १९३८–३९ मध्यें जी कामगिरी केली, तिचा थोडक्यांत उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. प्रथम एका रविवारीं त्या संघांतील मुलें आपल्या शाळेच्या आवारांत व पटांगणांवर हिंडलीं व तेथें पडलेले खिळे, कांचा, काटे, कुजके-नासके कीटक, इत्यादि त्रासदायक पदार्थ त्यांनीं गोळा केले. त्यांत एक-दोन ठिकाणीं कांहीं विंचूहि त्यांना दिसले. अर्थात् त्यांचा चक्काचूर त्या वीरांनीं तात्काळ केलाच. नंतर सुटीच्या दिवशीं ठरविलें कीं आपल्या शाळेंतील सोबत्यांपैकींच जे आजारी होते, त्यांच्या घरीं गटा-गटांनीं जाऊन चौकशी करावयाची व त्यांना जरूर ती मदत करावयाची. त्यामुळें परस्परांच्या अंतःकरणांत उत्कृष्ट स्नेहसंबंध उत्पन्न झाले. कांहीं कांहीं पालकांना तर त्या वेळीं गहिंवरून आलें व त्यांच्या डोळ्यांत आनंदाश्रु चमकले. हे प्रसंग ज्यांनीं अनुभविले व पाहिले, त्यांना कृष्ण-सुदामा यांच्या स्नेहाची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. या मुलांच्या विद्यार्थि-दशेंत तो दिवस अगदीं संस्मरणीय असा होऊन गेला. दुसऱ्या एका प्रसंगीं या समाजकार्यकर्त्यांनीं धुळ्यांतील निरक्षरांची खानेसुमारी केली. प्रत्येक आळींत दोन दोन मुलें फिरलीं व छापील कागदांत कोष्टकाप्रमाणें जरूर ती माहिती त्यांनीं मिळवून नोंदली. या कामांतहि त्यांना निरनिराळे अनुभव आले; कोणी जाणत्या माणसांनीं त्यांची पाठ थोपटली, तर कोणी अडाणी लोकांनीं त्यांना शिवीगाळ केली; कोणी नांवें सांगेनात, तर कोणी त्यांच्यासमोर दारें लावींत; कोणी सरळपणें माहिती देऊन कौतुक करीत, तर कोणी हातांत काठी घेऊन अंगावर धांवत. अशा प्रकारच्या परिस्थितींत दोन दिवस चार-चार पांच-पांच तास हिंडून त्या विद्यार्थ्यांनीं सुमारें दीड-दोन हजार निरक्षरांचीं (फक्त पुरुषांचीं) नांवें नोंदलीं. त्या यादीवरून आतां ठिकठिकाणीं धुळें शहरांत प्रौढ शिक्षणाचे वर्ग सुरू झाले आहेत. शाळेंतील प्रत्यक्ष पुस्तकी शिक्षणापेक्षां हें समाज कार्यगत शिक्षण अगदीं निराळें व व्यावहारिक—अर्थात् अधिक उपयुक्त होय.

शाळाखात्याचे डायरेक्टरसाहेब मे. शार्प जेव्हां कामावर होते, तेव्हां त्यांनीं सदीप व्याख्यानें शाळांमधून देण्यास सुरुवात केली. निरनिराळ्या विषयांवर—प्रवास, इतिहास, भूगोल, इंग्रजी वाङ्मय, समाजचित्रें, आरोग्य—कांच-चित्रें (Slides) तयार करून त्यांचा उपयोग त्यांनीं केला. पुढें असें ठरलें कीं, एक

निराळा अधिकारी ( Deputy Educational Inspector for Visual Instruction ) नेमून त्याजकडून हें कांच-चित्रें बनविण्याचें काम चालवावें, मग प्रत्येक सरकारी शाळेला एक एक चित्रदर्शक दिवा (Magic Lantern) आणि कांच-चित्रांच्या विषयवार पेट्या पुरविण्यांत आल्या. प्रथम प्रथम त्यांचा उपयोग शाळेच्या वेळापत्रकाबाहेर संध्याकाळीं करण्यांत येई. पुढें असें ठरलें कीं शाळेच्या वेळांतच अभ्यासक्रमांतील विषयाला धरून असतील तीं कांच चित्रें दाखवावींत. दिवसाच्या वेळीं एक अंधारी खोली करण्यासारखी तयार असे. असा कार्यक्रम अजूनहि चालू आहे. शिक्षकानें केवळ व्याख्यान न देतां पडद्यावरील चित्रें मुलांना नीट पाहावयाला लावावें, त्यावर प्रश्न विचारावेत व जास्त माहिती मग पुरवावी असें वळण त्याला आतां लागलें आहे. सरकारी शाळांप्रमाणें कांहीं खाजगी शाळांमध्येंहि असे चित्रदर्शक दिवे आहेत, व त्यांनाहि कांचचित्रांच्या पेट्या मधून मधून देण्यांत येतात. शाळाखात्याच्या रिपोर्टी-वरून असें दिसतें कीं, सरकारी शाळांतील प्रत्येक चित्रदर्शक दिव्यामागें ४४ पाठ अगर व्याख्यानें दिलीं जातात, तर तेंच प्रमाण खाजगी शाळांच्या दृष्टीनें १५ पडतें. मनुष्याला डोळ्याच्या साहाय्यानें जें ज्ञान मिळतें त्याचें प्रमाण त्याच्या एकंदर ज्ञानाच्या ¾ इतकें असतें. म्हणून चित्रदर्शक दिव्यांचा उपयोग जितका करावा तितकें चांगलें. चित्रपट शाळांतून दाखविण्याची सोय झाली तर द्रव्याभावीं प्रत्येक शाळेस चित्रपट-दर्शक यंत्र देणें शक्य नाहीं. या अधिकाऱ्यांनीं ( Deputy & Educational Inspcetor for Visual Instruction ) एक तसलें यंत्र गेल्या सालीं घेतलें आहे, व त्यानें निरनिराळे चित्रपट ते फिरतीवर असतांना शाळांतून दाखवितात.

इंग्रजी शाळेंत सर्व विषय इंग्रजींतून शिकवावयाचे अशी प्रथा मेकॉलेच्या खलित्यापासून पडली. ती लॉर्ड ऑकलंड व लॉर्ड हॅलिफॅक्स यांनीं चालू ठेवली. मुंबईच्या कांहीं पुढाऱ्यांनीं त्यासंबंधीं पुढें तक्रारी केल्या. त्यांत जगन्नाथ शंकरशेठ यांचा कोटिक्रम बराच शास्त्रशुद्ध होता. इ. स. १८४७ त या विषयावर त्यांनीं आपलें मत स्पष्टपणें मुंबई सरकारला कळविलें कीं, "जन्मभाषेंतून कोणताहि विषय शिकणें मुलांना फार सोपें जातें. आधीं इंग्रजी भाषा परकी व समज-ण्यास कठीण; तिच्या द्वारें इतिहास, भूगोल, शास्त्रीय विषय, संस्कृत व गणित हें मुलांना कसें समजावयाचें ?" कर्नल जर्व्हिस यांनींहि त्यांच्या मतास पुष्टि दिली.

युरोपांत ग्रीक-लॅटिनच्या द्वारें शिक्षण देण्याची कल्पना कशी फोल ठरली त्याची त्यानें सरकारला आठवण दिली व हिंदी लोकांना खरें शिक्षण हिंदी भाषेच्या द्वारेंच दिलें पाहिजे असें बजाविलें. इ. स. १८४८ त मुंबई सरकारच्या खलित्यांतसुद्धां त्या मतास मान्यता मिळाली; पण बड्या सरकारच्या बेथूनसाहेबास तें पटलें नाहीं. इ. स. १८५१ त त्यानें एक खलिता पाठविला व त्यांत कळविलें कीं, "इंग्रजीवर जास्त भर दिला पाहिजे व इंग्रजीमधूनच शिक्षण दिलें पाहिजे." याप्रमाणें सरकारी व खाजगी शाळांतून शिक्षण सुरू झालें. अर्थात् मधून मधून विचारी शिक्षकांना वाटे कीं, हें सर्व काम आपलें निसर्गाविरुद्ध चालू आहे. मुलांना त्यापासून खरा फायदा होत नाहीं, त्यांचें ज्ञान वाढत नाहीं व बुद्धि विकसित होत नाहीं. इ. स. १९१५ च्या सुमारास माध्यमिक शाळांत शिक्षणाचें माध्यम काय असावें याबद्दल बरीच चर्चा झाली. पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलचे विद्वान् सुपरिंटेंडंट प्रो. वि. ब. नाईक यांनीं या बाबतींत पुढाकार घेतला व हिंदुस्थान सरकारनें बोलाविलेल्या परिषदेंत जाऊन स्पष्टपणें प्रतिपादिलें कीं 'हिंदी भाषा—म्हणजे मुलाची जन्मभाषा—हीच हायस्कुलांत शिक्षणाचें माध्यम झाली पाहिजे, पुढें मुंबई विश्वविद्यालयानेंहि मॅट्रिकच्या परीक्षेंत इतिहास, संस्कृत इत्यादि विषयांचीं उत्तरें स्वभाषेंत लिहिण्यास विद्यार्थ्यांना परवानगी दिली. या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं पुढें बहुतेक शाळांतून जन्मभाषेंतून शिक्षण सुरू झालें. या बाबतींत सरकारी शाळांना पुढाकार घेतां आला नाहीं. कांहीं सरकारी शाळांत अशी अडचण मात्र पडते कीं हिंदु मुलांना मराठींतून व मुसलमान मुलांना उर्दूतून शिक्षण देण्याची जरूरी भासते. एकाच वर्गांत कांहीं हिंदु व बाकीचीं मुसलमान मुलें असलीं म्हणजे मोठा घोटाळा होण्याचा संभव असतो; आणि त्या वर्गांत—मुख्यतः वरच्या वर्गांत—इंग्रजींतूनच शिक्षण द्यावें लागतें. शिक्षणाचें माध्यम जन्मभाषाच असावें या तत्त्वाला कांहींजणांनीं विरोध केला; व त्यांत मुंबईच्या भर्डा हायस्कूलचे प्रिन्सिपल मि. मझवीन हे अग्रणी होते. त्यांचें म्हणणें असें कीं, 'इंग्रजी माध्यमानें सर्व जातींचीं मुलें एकत्र शिकूं शकतात व त्यामुळें जातीजातींचें ऐक्य साधतें. प्रत्येक जातीची जन्मभाषा निराळी; अशा किती भाषा माध्यम म्हणून चालवावयाच्या; व किती भाषांतून परीक्षा घ्यावयाची ? यांपैकीं पहिलें कितपत

खरें आहे तें जगाला दिसून आलेंच; सुमारें शंभर वर्षे हिंदुस्थानांत सर्वत्र इंग्रजींतून शिक्षण झालें; त्यामुळें जातीजातींमध्यें ऐक्य कितपत साधलें? दुसरी गोष्ट विश्वविद्यालयांत आज प्रत्यक्ष व्यवहारांत येऊन राहिली आहे. मुंबई प्रांतांत मराठी, गुजराथी, कानडी हिंदुस्थानी व उर्दू या भाषांची सोय केली कीं सर्व व्यवस्थित जमलें. शिवाय सर्व भाषांतून परीक्षा एकाच विद्यालयानें घ्यावी हा तरी निर्बंध कां असावा. भाषावार विश्वविद्यालयें काढलीं कीं ती अडचण आपोआप दूर होते. या बाबतींत सरकारी शाळांतील शिक्षकांनीं पुढाकारहि घेतला नाहीं व विरोधहि केला नाहीं. वरिष्ठ अधिकारी जो मार्ग दाखवितील त्याप्रमाणें शिस्तीनें जावयाचें हें त्यांचें धोरण.

शिक्षणाच्या पद्धतीबद्दल शाळा-खात्यानें सरकारी पत्रकांतून शिक्षकांस सूचना वेळोवेळीं दिल्या. त्याला धरून निरनिराळ्या विषयांचे पाठ चालू होते. पुढें मुंबईचें सेकंडरी ट्रेनिंग कॉलेज निघाल्यापासून अध्यापनपद्धतीचें केंद्र तेंच बनलें. त्या कॉलेजचे पहिले प्रिन्सिपल फ्रेझरसाहेब यांनीं इंग्रजी भाषा शिकविण्याची 'प्रत्यक्ष पद्धति' ( Direct Method ) तेथील शिक्षकांना शिकविली. तिचा प्रवेश प्रथम सरकारी हायस्कुलांत झाला. या पद्धतीनें शिकलेलीं मुलें इंग्रजी लवकर बोलूं लागतात असें लोकांना दिसून आलें. शिवाय सरकारी शाळांतील बहुतेक सर्व शिक्षक बी. ए., एम्. ए. झालेले असल्यामुळें इंग्रजीचें शिक्षण अधिक आकर्षक व परिणामकारक वठूं लागलें. खाजगी शाळांमध्येंहि ही पद्धति हळूहळू अमलांत येऊं लागली. इतिहास, भूगोल, गणित व शास्त्रीय विषय यासंबंधीं नवीं उपकरणें व नवी योजना प्रथम सरकारी हायस्कुलांत दिसूं लागली. इतिहासाच्या पाठांत चित्रें, नकाशे, आराखडे, आलेख, जुनें लिखाण इत्यादींचा उपयोग होऊं लागला, तसेंच भूगोलाच्या पाठांत निरनिराळे नकाशे आराखडे, चित्रें, गोल, इत्यादि. गणिताच्या पाठांत व्यवहारांतील उदाहरणें, वस्तुनिदर्शन, कृतियोजना, इत्यादि शास्त्रीय विषयांच्या पाठांत प्रत्यक्ष पदार्थ, प्रयोग, परीक्षण, प्रमेय प्रतिपादन, इत्यादि. या पद्धतीमुळें मुलांची विचारशक्ति, स्वतंत्र व संगतवार तर्क, वस्तुसंचालनकला इत्यादि विकास पावूं लागली. केवळ ज्ञान ग्रहण करण्याची जुनी रीत जाऊन या नवीन पद्धतीमुळें मुलें स्वतःच्या ज्ञानेंद्रियांचा, अनुभवाचा, अभिरुचीचा व अंतःशक्तीचा उपयोग करूं लागलीं. या कारणानें माध्यमिक शिक्षणांत एक प्रकारची क्रांति घडून आली. इ. स.

१९०५-०६ पासून पंधरा-वीस वर्षांत वरील प्रकारचें नवजीवन प्रथम सरकारी शाळांना (व मग खाजगी शाळांनाहि) मिळालें. इतकें झालें तरी संस्कृत भाषेच्या अध्यापनांत कांहीं फरक दिसला नव्हता. त्यासंबंधीं सेकंडरी ट्रेनिंग कॉलेजमध्यें इ. स. १९२५-२६ सालीं प्रयोग सुरू झाले. तेव्हांपासून संस्कृत शिकविण्याची प्रत्यक्ष पद्धति, वस्तुनिदर्शन, उद्गामी अनुमान, इत्यादि कल्पना सरकारी व खाजगी शाळांमध्यें पसरूं लागल्या. संस्कृतमध्यें संभाषण, वाचन, निबंधलेखन, व्याकरणपठण चालू लागलें व त्यांत विद्यार्थ्यांना अभिनव अभिरुचि वाटूं लागली. या धर्तीवर नवीं पाठ्यपुस्तकें निघालीं व त्यामुळें त्या 'मृतभाषेंत' कांहींसें नवचैतन्य प्राप्त झालें. नवीन अध्यापनपद्धतींचा उपयोग करणाऱ्या शिक्षकास पाठाची पूर्वतयारी व्यवस्थितपणें करावी लागते. त्या विषयाची आवश्यक अशी माहिती मिळविणें व ती संगतवार जुळविणें; पाठांत योग्य त्या साहित्याची जमवाजमव करणें; त्यांत मुलांना उपयुक्त अशा कृति करण्याचें ठरविणें, इत्यादि. ट्रेनिंग कॉलेजांत प्राध्यापक ( Professors ) शिक्षकांचे पाठ पाहूं लागले; तसेंच शाळाखात्याचे तपासनीस ( Inspectors ) वर्गाध्यापकांचें काम अधिक कसून तपासूं लागले. अध्यापनकलेच्या परीक्षा देण्यासाठीं उमेदवार शिक्षकांचे पाठ परीक्षक परीक्षूं लागले. या सर्व गोष्टी शाळाखात्यांत प्रथम प्रथम चमत्कारिक वाटूं लागल्या— विशेषतः विद्यार्थ्यांना व कांहींशा शिक्षकांना. त्यावरून अशी समजूत रूढ होऊं लागली कीं शिक्षणाच्या कामांत शिक्षकाची मेहनत खरी आणि मुलांनीं ऐकण्यासाठीं वर्गांत नुसतें बसावयाचें. याचा परिणाम पुढें पुढें असा होऊं लागला कीं मुलांनीं कांहीं श्रम करूं नयेत,—पठण, लेखन वगैरे शक्य तितकें टाळावें. सरकारी शाळांत हा प्रकार अधिक ठळकपणें दिसूं लागला; कारण तेथें कामाची शिस्त कडक व हेडमास्तरांची देखरेख नियमित असावयाची. शाळाधिकाऱ्यांच्या लक्षांत हें जेव्हां आलें, तेव्हां गृहपाठावर अधिक भर द्यावा अशा सूचना देण्यांत आल्या. पुढें अमेरिकेंतील 'डाल्टन प्लॅन' संबंधींची माहिती जेव्हां हातीं आली, तेव्हां त्या विचारास जोराची चालना मिळाली; आणि 'पाठ नेमणें व ते मुलांकडून करून घेणें' हा कार्यक्रम अमलांत येऊं लागला. अर्थात् भारतीय पाठशालपद्धतींत त्याच दिशेनें काम चालत असे; आणि शिवाय प्रत्येक मुलाकडे व्यक्तिशः गुरु लक्ष देत. ही परंपरा मध्यंतरीं मागें पडली होती

व आतां पुन्हा चक्रनेमिक्रमानें तीच शिक्षकवर्गास उपयुक्त वाटूं लागली. विद्यार्थ्यांना जरूर तें ज्ञान मिळणें, सदाचाराची शिस्त लागणें, तर्कशुद्ध विचाराचें वळण लाभणें, निरलसपणें व कळकळीनें परिश्रम करण्याची संवय अंगीं बाणणें इत्यादि गुणांचा विकास होणें जितकें अध्यापनपद्धतीवर तितकेंच शिक्षकाच्या परिणामकारक व्यक्तिमत्वावर, तयारीवर, कळकळीवर, ध्येयनिष्ठे-वर अवलंबून असतें. तेव्हां सरकारी शाळांमध्यें कामाची शिस्त जरी उत्तम असली, तरी प्रत्येक शिक्षकाच्या व्यक्तिगत वैशिष्ट्याच्या मानानें विद्यार्थ्यांची तयारी व्हावयाची. शाळांची तपासणी दरसाल एकदां होते. कांहीं शिक्षक तपासणीच्या वेळेपुरते 'लेणकढी' तयारी करण्यांत तरबेज असतात व ते त्यावरून इन्स्पेक्टरकडून उत्तम शेरा मिळवून बढती मिळवितात; पण वर्षभर अध्या-पनाचें काम यथातथाच करतात. दुसऱ्या प्रकारचे शिक्षक वर्षभर अत्यंत आपलेपणानें झटून आपल्या वर्गाची तयारी करून घेतात व मुलांना चांगलें वळण लावतात; पण इन्स्पेक्टरपुढें तितकेसे चमकूं शकत नाहींत. तिसऱ्या प्रकारचे थोडे शिक्षक दोन्ही बाबतींत आपलें प्रावीण्य दाखवून नांवारूपास चढतात. चौथ्या प्रकारचे जे असतात, ते कधींच अंग मोडून श्रम करावयाचे नाहींत व कसे तरी आपला पगारगाडा हाकीत राहावयाचे. शिक्षकांचे हे प्रकार सरकारी शाळांत जसे दिसतात, तसे ते खाजगी शाळांत फारसे दिसत नाहींत; कारण इन्स्पेक्टरपासून कांहीं विशेष त्यांना मिळावयाचें नसतें. शाळेबाहेरच्या कामांत—मुख्यतः बालवीर चळवळ किंवा ग्रामसुधारणा किंवा प्रौढशिक्षण किंवा साक्षरताप्रसार—बराच वेळ घालविणारा, शाळाखात्याच्या बाहेरील अधिकाऱ्यांच्या—न्यायाधीश, पोलिस सुपरिंटेंडेंट यांच्या भेटी वरचेवर घेणारा, त्यांच्याकडून शिफारसपत्रें मिळवून शाळाखात्याच्या अधिकाऱ्यावर वजन पाडूं इच्छिणारा, आपलें स्वतःचें शाळेंतील मुलांना शिक्षण देण्याचें व वळण लावण्याचें कार्य नीटपणें, मन लावून कधीं न करणारा एखादा शिक्षक सरकारी शाळेंत सांपडतो. त्याचा तो बाह्य भपका व उसना उठाव फार दिवस टिकतच नाहीं; तथापि, त्याची ती फुकटची फडफड व धाकदावी धडपड अव्यवस्थितपणें चालूच असते. खाजगी शाळें-तहि अशी एकादी व्यक्ति सांपडते. पण तिचा उद्योग मुख्यतः पैसा मिळ-विण्यासाठीं असतो. अर्थात् हे दोघेहि शिक्षणाच्या उदात्त कार्यास नालायक.

देशांतील राजकीय चळवळीचा परिणाम सरकारी शाळांवर फारसा कधीं झाला नाहीं; कारण तेथील शिस्त कडक असावयाची व त्यांचा पुढाऱ्यांशीं फारसा संबंध नसावयाचा. शिक्षक राजकारणापासून अगदीं अलिप्त असत. मवाळ व जहाल हे पक्ष जेव्हां राजकीय वातावरणांत प्रमुख होते, तेव्हां क्वचित् कांहीं मुलें अभिमानास पेटून एकमेकांशीं बोलत. पुढें लो. टिळकांच्या मृत्यूनंतर जी असहकारितेची लाट उसळली, तिचे थोडेसे शिंतोडे सरकारी शाळांवर उडाले; व कांहीं मुलांनीं शाळा सोडल्या. तथापि त्या राजकीय आंदोलनाचा परिणाम खाजगी शाळांवर जास्त झाला. त्यांपैकीं कित्येक शाळा महिनेच्या महिने ओसाड पडल्या. नंतर तो सर्व ओघ ओसरला व शाळाखात्यानं दूरदर्शीपणानें सर्व मुलांना परत घेतले. त्या चळवळीचे अप्रत्यक्ष परिणाम अजूनहि सर्व शाळांत दिसतात. मुलांची वृत्ति जास्त खुली झालेली आहे. ते सहसा कोणास वचकत नाहींत. निर्भीडपणा व निर्भयपणा त्यांच्या अंगांत चांगलाच मुरला आहे. ते फार चौकस झाले आहेत. राष्ट्रीय भावना, राजकारण, राजकीय पुढारी— इत्यादीबद्दल त्यांना माहिती मिळवावीशी वाटते. स्नेह्यांबरोबर त्यांच्या त्यांविषयीं वाटाघाटी सारख्या चाललेल्या असतात. शाळेंत जरा कांहीं मुलांच्या मनाविरुद्ध झालें कीं एकदम त्यांची जूट होते व शाळाधिकाऱ्यां-विरुद्ध असहकार, सत्याग्रह सुरू होतो. बड्या पुढाऱ्यांनीं जे उपाय इंग्रज-सरकाराविरुद्ध योजिले तेच मुलें आतां शिक्षकांविरुद्ध कदाचित् पालकांविरुद्ध सुद्धां योजूं पाहतात. अपरिपक्व बुद्धि व अपरिमित उत्साह यामुळें विद्यार्थी लगेच भावनावश होतात. आपले हक्क बजावण्याची त्यांची तत्परता नेहमीं उत्कट असते; पण आपलीं कांहीं कर्तव्येंहि असतात याची त्यांना जाणीव नसते. कर्तव्यें उत्तम रीतीनें बजावल्यावांचून हक्कांचा उपभोग घेणें कोणासहि समाजांत शक्य नाहीं. मोठमोठ्या पुढाऱ्यांच्या नांवानें जयजयकार करणें त्यांच्या मिरवणुकांत पुढाकार घेणें. त्यांच्या तसबिरींना माळा घालणें—इत्यादि कामांत त्यांना मोठा उत्साह वाटतो; पण त्या विभूतींचे गुण समजून घेण्याची व त्यांपैकीं कांहीं गुण आपल्या अंगीं वाढविण्याची कल्पनाहि त्यांच्या मनास कधीं शिवत नाहीं. विद्यार्थ्यांच्या या उत्साहास व मोकळेपणास योग्य वळण लावणें शिक्षकांच्या हातीं आहे—शाळाखात्याच्या हातीं आहे. तें जर चांगलें साधलें, तर ही एक मोठी शक्ति समाजाच्या— देशाच्या उपयोगीं पडूं शकेल.

समाज व सरकार यांचीं तत्त्वें व तंत्रें जोंपर्यंत निरनिराळीं होतीं, तोंपर्यंत शिक्षकांचे मोठे हाल होत असत. सरकारच्या नियमाप्रमाणें वागणें तर आवश्यक, पण समाजनेत्यांचीं मतें मनाला पटणारीं असावयाचीं. विद्यार्थ्यांचा सर्व ओढा देशांतील पुढाऱ्यांकडे असावयाचा; तथापि बाह्यतः शाळेची शिस्त व शिक्षकांचें शासन पाळावयाचें. अशा या आंदोलनांत सरकारी शाळांचें कार्य केवळ यांत्रिक पद्धतीनें चाललें. त्यांत ध्येयवाद हें तत्त्व मुळींच नव्हतें. काँग्रेस पक्ष अधिकारारूढ इ. स. १९३७ त झाला व तेव्हांपासून तो दुटप्पी व्यवहार थांबला ती अंतर्बाह्य विरोधी ओढाताण आपोआप बंद पडली. कारण जे समाजाचे अग्रणी, तेच सरकारचे मंत्री बनले. मग मनाचा कल एकीकडे व शरीराचा दुसरीकडे, असला अनवस्था प्रसंग एकदम विरला. कामांत व वागणुकींत खुलेपणा उत्पन्न झाला. मनास पटलेल्या तत्त्वानुसार शिक्षणाचें कार्य करण्यास मोकळीक मिळाली. त्यांत ध्येयवाद सहजच चमकूं लागला. नुसतें पुस्तकी ज्ञान मिळविणें, परीक्षांत पास होणें हेंच कांहीं शिक्षणाचें सर्वस्व नव्हे; तर समाज-हितासाठीं, देशसेवेकरितां स्वतःची सर्व बाजूंनीं—शारीरिक, मानसिक, नैतिक—तयारी साधणें हें त्याचें खरें ध्येय होय. याला अनुसरून उघडपणें आतां शिक्षक व विद्यार्थी आपला व्यवसाय चालवूं लागले. याचें प्रत्यंतर सरकारी शाळांमध्यें ठळकपणें पाहावयास मिळालें. काँग्रेस मंत्रिमंडळानें शिक्षणांत कांहीं महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणल्या व त्या मुख्यतः राष्ट्रीय दृष्टीनें. राष्ट्रभाषा सर्व मुलांना आली पाहिजे; म्हणून इंग्रजी शाळांत पहिल्या तीन इयत्तांच्या अभ्यासक्रमा-मध्यें तिचा समावेश करण्यांत आला. भाषा व भावना— भाषा व जीवन यांचा अत्यंत निकट संबंध आहे; आणि त्यामुळें राष्ट्रीय भाषा– हिंदुस्थानी– आल्यावांचून समाजांत राष्ट्रीय भावना जागृत होणार नाहीं. हिंदुस्थान हा देश फार अफाट. तेथील लोकांच्या जन्मभाषा अनेक. यामुळें एकराष्ट्रीयत्वाची कल्पना त्यांच्या मनांत आपोआप उत्पन्न होणें नाहीं. म्हणून एक राष्ट्रभाषा सर्वांना आली पाहिजे– निदान थोडीशी समजण्यापुरती आली पाहिजे. हा फारच महत्त्वाचा फरक सरकारी शाळांमध्यें घडून आला आहे. शिवाय सक्तीचें शारीरिक शिक्षण व सर्व मुलांना एक गणवेश काँग्रेस मंत्रिमंडळानें ठरवून दिला. यांचीहि राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें फार उपयुक्तता आहे. सर्व जातीच्या मुलांनीं—सर्व दर्जाच्या मुलांनीं एकाच प्रकारचा पोषाख घातला असतां भेदभाव

विसरण्यास मदत होईल व ऐक्यभाव जागृत होईल हे उदात्त हेतु या सुधारणेच्या मुळाशीं आहेत. त्यांत केवळ कवाईत, खेळ, तालमीचा व्यायाम व आसनें– इतकेंच नसून मुलांच्या शरीराची, कपड्यांची स्वच्छता, खाणेंपिणें व घरची राहणी व वागणूक यांचाहि समावेश होतो. सर्व मुलांची शारीरिक तपासणी एखाद्या वैद्याकडून दर वर्षी एकदां तरी करून घेतली पाहिजे असाहि सक्त हुकूम काँग्रेस मंत्र्यांनीं काढला आहे. सरकारी शाळेची तपासणी सरकारी डॉक्टरच करतात व तें काम अगदीं नियमित व व्यवस्थित होतें. या तपासणींत जीं मुलें अशक्त व रोगट दिसतात त्यांना योग्य तऱ्हेचे उपचार मिळण्याची व्यवस्थाहि सरकारी शाळामार्फत सरकारी दवाखान्यांतून होते. अर्थात् या बाबतींत पालकांचें सहकार्य पाहिजे असतें. हंटर कमिशननें इ. स. १८८२ मध्यें सूचना केली होती कीं, हायस्कूलच्या पांचव्या इयत्तेमध्यें ( व पुढें दोन वर्षांत ) कांहीं धंदे शिक्षणाची सोय केली पाहिजे. तिला अनुसरून लोकमताच्या धोरणानें व समाजाच्या गरजा लक्षांत घेऊन काँग्रेस शिक्षण-मंत्री ना. बाळासाहेब खेर यांनीं असें ठरविले कीं, सरकारी हायस्कुलांना धंदे-शाळांचें स्वरूप द्यावयाचें. त्याचप्रमाणें इ. स. १९३९ च्या जूनपासून सातारा, गोध्रा व विजापूर येथील हायस्कुलांत चौथ्या इयत्तेपासून शेतकी शिक्षणाची सोय केली. सोलापूर हायस्कुलांत सुतारकी, धातुकाम, यांत्रिक कला, विद्युद्विद्या, इत्यादि धंदेशिक्षणाची सोय केली; आणि अहमदाबाद येथील हायस्कुलांत व्यापारी शिक्षणाची सोय केली. पहिल्या तीन इयत्तांमध्यें कांहींच फरक तूर्त केला नाहीं. चौथ्या इयत्तेपासून हा नवीन अभ्यासक्रम सुरू झाला आहे. एकंदर चार वर्षांचा अभ्यासक्रम आंखला आहे. या वर्षी फक्त चौथ्या इयत्तेंत त्याची सुरुवात झाली. पुढच्या वर्षी हींच मुलें पांचवींत गेलीं म्हणजे त्यांना पुढल्या वर्षाची योजना लागू पडेल; नंतर सहावींत व शेवटीं सातवींत. या चार वर्षांत हें शिक्षण घेऊन मुलें बाहेर पडलीं कीं, त्यांना लगेच आपल्या उद्योगधंद्यांत शिरतां येईल किंवा त्यासंबंधीं उच्च शिक्षण मिळविण्याची जर कोणाची इच्छा असेल तर त्यास शेतकी कॉलेज, टेक्निकल इन्स्टिटयूट व कॉमर्स कॉलेज इकडे प्रवेश मिळूं शकेल. ही योजना अत्यंत धिटाइनें व दूरदर्शीपणानें सुरू करण्यांत आली आहे. ती यशस्वी करून दाखविणें जितकें शाळाखात्याच्या तितकेंच जनतेच्या हातीं आहे. सामान्यतः मॅट्रिकपर्यंतचें इंग्रजी शिक्षण देणें पुष्कळ

सोपें व कमी खर्चाचें असतें म्हणून तें काम खाजगी शाळांनीं करीत राहावें. परंतु धंदेशिक्षण देणें बरेंच अवघड व पुष्कळ खर्चाचें आहे; म्हणून तें सरकारी शाळांतून झालें पाहिजे. ही विचारसरणी एकंदर बरोबर आहे व तिला अनुसरून कॉंग्रेस सरकारनें मोठ्या धडाडीनें वरील अभिनव योजना चाकावर चढवून दिली आहे. बऱ्याच सरकारी शाळांचें स्वरूप त्यामुळें अजीबात बदलून जाणार आहे—बदललेंच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुरत, रत्नागिरी, इत्यादि हायस्कूलमध्यें प्राथमिक शिक्षकांच्या (ट्रेनिंगची) शिक्षणशास्त्राध्ययनाची व्यवस्था करण्यांत आली आहे. राहिलेल्या कांहीं हायस्कुलांनाहि अशींच निरनिराळीं स्वरूपें सवडीप्रमाणें व जरूरीप्रमाणें पुढें देण्यांत यावयाचीं असें ठरलें आहे.

---

# दुय्यम शाळांतील नीतिशिक्षण आणि धर्मशिक्षण



लेखकः—**वामन मल्हार जोशी**

— १ —

"मुलांना खेळूं द्या म्हणजे तीं अभ्यास करतील; त्यांच्या आवडीनिवडी पुरवा म्हणजे त्यांच्या नीति-अनीतीकडे दुर्लक्ष केलें तरी चालेल; त्यांच्या 'स्वभावा'कडे लक्ष द्या म्हणजे तीं सुस्वभावीं बनतील; त्यांचें शरीर निकोप असूं द्या म्हणजे त्यांचें मन निकोप राहील; नीति-अनीतीचा विचारच त्यांच्या मनांत येऊं देऊं नका म्हणजे तीं नीतिमान् होतील; त्यांना पाहिजे तें वाचूं द्या म्हणजे चांगलें वाङ्मय तीं वाचतील; शाळेंतील अभ्यासा-शिवाय इतर नाद त्यांना पुष्कळ असूं द्या म्हणजे त्यांचा अभ्यास उत्तम होईल." असें मीं सांगितलें तर तें अर्थात् अतिशयोक्तीचें होईल. पण हीं पूर्ण सत्यें नसलीं तरी सत्यार्धें खचित आहेत, किंबहुना अर्ध्याहून अधिक सत्य त्यांत आहे. प्रत्यक्ष नीतिशिक्षण किंवा धर्मशिक्षण देण्यासंबंधीं माझें मत अनुकूल आहे, पण तें कोणी कसें द्यावयाचें याविषयीं विवेचन करण्यापूर्वी या सत्यार्धांवर मी थोडासा भर देणार आहे.

चिखलांत पाय बुडवायचा आणि मग तो धुऊन टाकायचा यापेक्षां चिखलांत न गेलेलेंच बरें; **प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरात्स्पर्शनं वरम्** किंवा 'Prevention is better than cure' या न्यायानें मुलांच्या स्वभावांत किंवा शीलांत जे दोष किंवा ज्या उणीवा उत्पन्न होतात त्यांचीं कारणें प्रथम दूर करणें इष्ट आहे.

मुलांचे दांत दुखत असले किंवा त्याला अर्धशिशी असली, किंवा त्याच्या डोळ्यांत कांहीं दोष असला तर ही केवळ शरीरविकृति आहे असें समजूं नये, त्या योगें मानसिक विकृतिहि उत्पन्न होत असते हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

मुलें अभ्यासाकडे लक्ष देत नाहींत, खोड्या करतात याचें कारण पुष्कळ वेळां शारीरिक विकृति हें असतें. याकरितां प्रत्येक शाळेंत इतर शिक्षकांच्या नेमणुकां-बरोबर वैद्य किंवा डॉक्टर यांचीहि नेमणूक आवश्यक करण्यांत यावी असें माझें मत आहे. मन सुसंस्कृत करण्याकरितां संस्कृत शिकवण्यापेक्षां शारीरशास्त्र शिकवावें. स्वभावांत शिस्त येण्याकरितां ड्रिल शिकवावें, समतोलपणा येण्याकरितां डबल बार शिकवावा, त्याची नैतिक दृष्टि निर्दोष असावी म्हणून नेत्रवैद्याकडे त्याला मधून मधून न्यावें इत्यादि विरोधाभासात्मक वाक्यें माझ्या एका मित्राच्या तोंडीं असतात त्यांत निश्चित सत्यांश आहे. शरीरांतील प्लीहा, यकृत्, विविध ग्रंथी, इत्यादिकांच्या विकृतां-मुळें स्वभावांत विकृति झालेल्यांचीं अनेक उदाहरणें आहेत. तुरुंगांतल्या कैद्यांची तपासणी केली असतां असें आढळून येतें कीं त्यांतील पुष्कळांमध्यें शारीरिक दोष असतात. त्यांपैकीं कांहीं जन्मजात आणि असाध्यप्राय असतात; पण त्यांतील बऱ्याच व्यक्तींच्या शारीरिक आरोग्याकडे वेळींच लक्ष देण्यांत आलें असतें तर त्यांपैकीं कांहींचा तरी तुरुंगवास टळला असता असें तज्ज्ञांचें मत आहे.

अलीकडे मनोगाहन शास्त्रज्ञांनीं ( Psycho-analysts यांनीं ) असें निदर्शनास आणून दिलें आहे कीं, मुलांमध्यें कांहीं उणीवा असल्यास त्यांच्या-मध्यें न्यूनगंड उत्पन्न होतो आणि आपल्या उणीवा लपविण्याकरितां किंवा त्यांची भरपाई(Compensation)करण्याकरितां तीं अनिष्ट मार्गाचा अवलंब करितात. तेव्हां या बाबतींतहि लक्ष पुरविणें जरूर आहे. घरांत आईबापांचीं भांडणें असलीं, वडिलांनीं दुसरें लग्न केलें असलें आणि सावत्र आई छळ करीत असली, किंवा असे मनाला धक्का देणारे कांहीं अनुभव मुलांना आले असले तर, तीं चमत्कारिक रीतीनें वागूं लागतात. अशा वेळी शाळेंतील शिक्षकांनीं त्यांच्याशीं सहानुभूतिपूर्वक वागून मानसिक पेचप्रसंगांतून सुरक्षितपणें पार पडण्यास त्यांना साहाय्य करावें, निदान कुचकें बोलून किंवा मारहाण करून त्यांच्या मानसिक क्षतांत क्षार टाकण्याचें पाप करूं नये !

मुलें खोड्या किंवा उनाडक्या करतात याचें एक कारण असें कीं, त्यांच्या आवडीनिवडींकडे पुरेसें लक्ष देण्यांत येत नाहीं. कांहीं मुलें अभ्यासांत कच्चीं असतील, त्यांची बुद्धि गणितादि विषयांत विशेष चालत नसेल, पण त्यांच्या-

मध्यें एखादें कलानैपुण्य असतें. या कलानैपुण्याला उत्तेजन दिलें तर त्यांच्या त्या गुणाचें तर चीज होतेंच, पण यापेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यामुळें त्यांचा स्वाभिमान परिपुष्ट होतो. केवळ पुस्तकी ज्ञानावर भर देण्यांत आल्यास पुष्कळ मुलांना आपण नालायक, आपल्याला शाळेंत काय, घरीं काय, दारीं काय, कमी लेखण्यांत येतें, या जाणीवेमुळें दुःख होतें. त्यांना कशामध्यें उत्साह वाटत नाहीं, आणि मग त्यांपैकीं कांहींजण आपण कोणी तरी आहोंत हें दाखविण्याकरितां खोड्या, वात्रटपणा वगैरे करतात. असा मोह होऊं नये म्हणून प्रत्येक शाळेमध्यें मुलांच्या हौसांना, विशिष्ट कर्तबगारींना, कौशल्यांना वगैरे वाव मिळेल अशी व्यवस्था असावी. कांहीं मुलें अभ्यासांत चांगलीं नसतील; पण अभिनय, खेळ, चित्रकला, गायनकला, संमेलन-व्यवस्था, वर्गव्यवस्था, इत्यादि एक ना दोन, शेकडों बाबी अशा आहेत कीं, त्यांत त्यांचें नैपुण्य चांगलें दिसून येतें आणि त्यांच्या त्या नैपुण्याला पूर्ण वाव मिळाला म्हणजे तीं आनंदांत असतात, त्यांना उत्साह वाटत असतो, मान ताठ करून आणि छाती वर काढून तीं चालूं शकतात आणि भलत्या मार्गाचें अवलंबन करण्याचा त्यांना मोह होत नाहीं.

शिक्षक व मुख्याध्यापक यांच्याविषयीं आदरभाव असल्यास त्यांच्या शीलाचा सुपरिणाम मुलांवर होऊं शकतो. याविषयीं मी पुढें लिहिणार आहे. येथें मला हें सांगावयाचें आहे कीं, शिक्षक आणि मुख्याध्यापक यांविषयीं मुलांना आदर-भाव तर पाहिजेच, पण त्यांविषयीं विश्वासच नव्हे तर आपलेपणाहि वाटणें इष्ट आहे. म्हणजे मला असें सांगावयाचें आहे कीं, मुलांना कोठल्याहि बाबतींत कांहीं विचारावेंसें वाटलें तर त्यांना गुरूंची भीति वाटूं नये. त्यांना असें वाटावें कीं, आपण विचारलें तर गुरु रागावणार नाहींत, तर उलट त्यांना बरें वाटेल. मुलांच्या मनांत शाळेंतील अभ्यासासंबंधानेंच नव्हे, तर इतर विषयां-संबंधींहि पुष्कळ प्रश्न उत्पन्न होत असतात, अनेक शंकाकुशंका असतात, हर-तऱ्हेची जिज्ञासा असते. गुरूंची जर त्यांना भीति वाटत असली किंवा त्यांच्या-बद्दल तेवढा आपलेपणा नसला तर मुलें स्वाभाविकपणेंच जिज्ञासा दाबतात, किंवा भलत्या गुरूंकडून (म्हणजे त्यांच्या वयाचींच इतर मुलें किंवा घरांतील अडाणी माणसें, जनतेंतील लुच्चे लोक यांचेकडून) आपली जिज्ञासा पूर्ण करून घेण्याचा प्रयत्न करतात आणि मग फशीं पडतात! तीं वाईट मार्गाला लागलीं

तर तो त्यांचा दोष म्हणण्यापेक्षां त्यांच्या गुरूंचाच तो दोष म्हणणें अधिक योग्य होईल.

शिकणें म्हणजे मुलांना शिक्षा वाटावी, अशा प्रकारचे शिक्षक कांहीं असतात. अशा प्रकारचे रूक्ष, तापट, तामसी शिक्षक नेमणें म्हणजे मुलांना अप्रत्यक्ष रीतीनें अनीतिमान् करणें होय, हें ध्यानांत धरून असल्या शिक्षकांच्या नेमणुका करणें टाळलें पाहिजे. अभ्यासाव्यतिरिक्त आपणांला कांहीं हौशी-आवडी आहेत हें शिक्षकांना न कळलें तर चांगलें, असें जेथें मुलांना वाटतें त्या शाळा पालकांनीं अनीतिपोषक, अतएव वर्ज्य समजाव्या. उत्साह दाखविणें, हसणें, खेळणें हें ज्या शाळेंत पाप समजलें जातें त्याहि वर्ज्यच होत. शाळेचें वातावरण असें असावें कीं, शिकतांना मुलांना आनंद व्हावा; खेळतांना संकोच वाटूं नये; शिक्षकांशीं बोलतांना भीति वाटूं नये. शाळा ही घरापेक्षांहि मुलांना प्रिय व्हावी. आपल्याला येथें ज्ञान मिळतें; हरतऱ्हेचीं पुस्तकें वाचण्यास मिळतात; संवगड्यांशीं चांगले खेळ खेळण्यास मिळतात; हरतऱ्हेचें कौशल्य संपादन करतां येतें; स्वाभिमान पुष्ट होतो; संवगड्यांशीं थट्टामस्करी करतां येते आणि वेळप्रसंगीं साहाय्यहि करतां येतें; गुरु आपल्याशीं मोकळेपणानीं बोलतात-चालतात; इतकेंच नव्हे तर आपलें कौतुकहि करतात; क्वचित्प्रसंगीं हंसतात–हसवितातहि. अशा शाळांतील मुलांचा स्वभाव आणि त्यांचें शील वाईट होण्याचें फारसें कारण नाहीं. होणारच नाहीं असें नव्हे, पण संभव कमी.

या सर्व विवेचनाचा असा अर्थ नव्हे कीं, प्रत्यक्ष नीतिशिक्षणाची किंवा धर्मशिक्षणाची जरूर नाहीं. वरील विवेचनाचें तात्पर्य एवढेंच कीं, मुलें अनीतिप्रवृत्त होण्याचीं जीं कारणें आहेत त्यांपैकीं कांहींचा अशा रीतीनें परिहार होऊं शकेल.

— २ —

धर्मशिक्षणाचा प्रश्न भानगडीचा आहे. कारण शाळेंत निरनिराळ्या धर्मांचीं मुलें असलीं तर त्यांच्याकरितां स्वतंत्र व्यवस्था करणें अत्यंत खर्चाचें होईल. 'सर्वसाधारण धर्म' जो आहे त्याचें शिक्षण द्यावें असें यावर उत्तर देतां येईल, पण असा हा 'सर्वसाधारण धर्म' आणि नीति यामध्यें फरक फारसा नाहीं, तेव्हां नीतिशिक्षणाचाच आपण विचार करूं या.

प्रत्यक्ष नीतिशिक्षणाचा विचार करण्यापूर्वी एक गैरसमज दूर करणें आवश्यक आहे. मुलांना खूप खेळूं द्यावें, मोकळेपणानें हसूं द्यावें, त्यांच्या कलाप्रमाणें वागूं द्यावें, त्यांच्या आवडीनिवडी पाहाव्या, त्यांना आवडतील तीं पुस्तकें वाचूं द्यावींत, इत्यादि गोष्टी ज्या वर सांगितल्या त्यांचा अर्थ असा नाहीं, कीं शाळेंत शिस्त नसावी, बंधनें कांहीं असूं नयेत, मुलांना 'मनसोक्त' वागूं द्यावें! वरील अतिशयोक्तिपूर्ण लिखाणाचा रोख कृत्रिम आणि अनावश्यक बंधनाविरुद्धच होता. मुलांची प्रकृति नीट नसली, दांत व डोळे वगैरे दुखत असले आणि तिकडे लक्ष दिलें गेलें नाहीं तर मुलांचें अभ्यासाकडे लक्ष लागत नाहीं; अभ्यासाकडे लक्ष नसलें म्हणजे विषय समजत नाहीं, विषय समजला नाहीं म्हणजे परीक्षेंत नापास होतो; नापास झाला म्हणजे धरींदारीं त्याला मान खालीं घालावी लागते. असें झालें म्हणजे तो चमत्कारिक तऱ्हेनें वागूं लागतो आणि अखेर त्याचें पाऊल या नाहीं त्या रीतीनें वाईट मार्गावर पडूं लागतें; एवढ्याकरितां मुलांच्या प्रकृतीकडे आणि कलाकडे लक्ष द्यावें असें म्हटलें होतें. त्याचप्रमाणें शिकविणारे शिक्षक जर रूक्ष असतील तरीहि मुलांचें लक्ष अभ्यासाकडे लागणार नाहीं आणि शिक्षकाच्या नालायकीचें आणि पापाचें प्रायश्चित्त शिष्यांना भोगावें लागेल असें सूचित केलें होतें. मुलें उनाडक्या करतात आणि अखेर असन्मार्गाचा अवलंब करतात याचीं अनेक कारणें आहेत, त्यांपैकीं कांहीं देऊन हीं कारणें दूर करावींत एवढाच रोख. बाकी शाळेंत शिस्त, बंधनें पाहिजेत यांत मला तरी शंकाच नाहीं. कांहीं मुलें कारण नसतां आळस करतात, मुद्दाम खोड्या करतात, कित्येक वेळां त्यांचा वात्रटपणा किंवा व्रात्यपणा मर्यादेबाहेर जातो आणि अशा वेळीं त्यांना चांगलें शासन केलें पाहिजे असें माझें मत आहे. शिक्षा करण्यापूर्वी आपलें कांहीं चुकलें नाहीं ना एवढें मात्र गुरूनें पहावें, एवढी सूचना येथें केली पाहिजे.

शिस्तीचा उल्लेख केला तेव्हां येथें हें सांगितलें पाहिजे कीं मुलांमध्यें अभ्यासाची गोडी उत्पन्न केली, त्यांच्या साहजिक प्रवृत्तींकडे लक्ष पुरविलें, त्यांचें मन रमेल असें अभ्यासाव्यतिरिक्त व्यवसाय पुरविले, गुरूशीं आदरपूर्वकच पण मोकळेपणानें बोलतांचालतां येईल असें गुरूंचें वागणें असलें, आणि शाळेची एकंदर परंपरा आणि तेथील वातावरण जर शिस्तीला अनुकूल असेल, तर

कृत्रिम बंधनांची, नियमांची आणि शिक्षेची जरूर भासणार नाहीं आणि मुलें स्वाभाविकपणें सन्मार्गानेंच जाण्याचा संभव आहे.

सन्मार्गाकडे त्यांची प्रवृत्ति व्हावी एवढ्याकरितां दुसऱ्या दिशांनीं प्रयत्न करण्याची जरूर केव्हांहि राहणारच. सांघिक खेळांच्या द्वारें नीतिशिक्षण अप्रत्यक्षपणें मिळतें असें म्हणतात आणि Waterloo was won on the fields of Eton इत्यादि वचनेंहि आपण ऐकतों. यांत तथ्यांश आहे पण बेताचाच. खेळण्यांत 'खिलाडूपणा' दाखविला म्हणजे व्यवहारांतील वर्तनांत दाखविला जाईल, असा कार्यकारणभाव सिद्ध नाहीं. टेनिस खेळतांना खरें बोलणारा नेहमींच खरें बोलेल, किंवा क्रिकेट खेळतांना प्रतिपक्षाचें Well-played म्हणून कौतुक करणारा व्यवहाराच्या क्षेत्रांत अशी उदार वृत्ति दाखवील याला पुरावा नाहीं आणि उपपत्तीच्या दृष्टीनेंहि त्याला प्रमाणें फारशीं नाहींत. एवढी गोष्ट खरी कीं सांघिक खेळ खेळण्यानें प्रकृति चांगली राहते, आनंदांत वेळ गेल्यामुळें वृत्ति प्रफुल्लित राहते आणि सर्वांनीं मिळून एकोप्यानें आणि एकदिलानें खेळ खेळलें तर जय मिळण्याचा संभव असतो —आपलेंच घोडें दामटूं पाहिल्यास संघाचा डाव बिघडतो–हें तत्त्व पटतें आणि अशाच रीतीनें असल्या खेळांचा स्वभावावर सुपरिणाम होण्याचा संभव आहे. पण या बाबतींत अतिशयोक्तिपूर्वक भाषा जी वापरण्यांत येते ती मला पसंत नाहीं. क्रीडाक्षेत्रांतलें नैपुण्य जसें रणक्षेत्रांत उपयोगी पडेलच अशी खात्री नाहीं त्याचप्रमाणें तेथला 'खिलाडूपणा' व्यवहारांत उतरेल याबद्दल खात्री सांगतां येत नाहीं. एका क्षेत्रांतले गुण पाण्यांत पडलेल्या तैलबिंदूप्रमाणें जीवनाच्या सगळ्या क्षेत्रांत पसरतात असें मानसशास्त्र सांगत नाहीं. गायनांतला ताल उत्तम समजूं लागला तरी मनुष्य 'बेताल' वागूं शकतो, शुद्धलेखन लिहितां आलें तरी वर्तन अशुद्ध असूं शकतें, गणितांतले हिशेब चांगले करतां आले तरी वागणें हिशेबी असेलच असें नाहीं. पोषाख नीटनेटका करणाऱ्यांचा संसार नेटका असेलच अशी ग्वाही देतां येत नाहीं. इत्यादि गोष्टी ध्यानांत आणल्या म्हणजे मला जें सांगावयाचें आहे तें ध्यानांत येईल.

शाळेंत व्यवस्थितपणाच्या, नीटनेटकेपणाच्या, स्वच्छतेच्या वगैरे संवयी लावाव्यात म्हणजे त्या अंगीं बाणतील आणि जन्मभर टिकतील असें सांगण्यांत

येतें तें अगदीं खरें आहे आणि त्यांचें महत्त्व शिक्षकांच्या नजरेला आणणें आवश्यक आहे; पण या बाबतींत देखील अतिशयोक्ति करण्यांत तात्पर्य नाहीं. शाळेंत लागलेल्या या संवयी त्या त्या क्षेत्रांत उपयोगी पडतात, इतर क्षेत्रांत त्यांचा फारसा परिणाम होत नाहीं असें मला वाटतें. यासंबंधीं एका शाळेंत मुद्दाम केलेला एक प्रयोग वाचण्यांत आला तो येथें सांगावासा वाटतो. गणिताच्या एका शिक्षकानें मुलांनीं वह्या व्यवस्थितपणें लिहाव्यात असा आग्रह धरून आपल्या विषयापुरत्या तरी वह्या उत्तम रीतीनें लिहिण्याची मुलांना संवय लावली. पण त्या व्यवस्थितपणाच्या संवयीचा परिणाम इतर विषयांतल्या वह्यांवर दिसून आला नाहीं. एवढा हा प्रपंच करण्याचें कारण एवढेंच कीं शाळेंतल्या व्यवस्थितपणाच्या वगैरे संवयींचा पुढील आयुष्यांतील सांसारिक व्यवहारांत फार उपयोग होईल अशी भलतीच आशा बाळगूं नये. या गुणाकडे शाळेंत दुर्लक्ष करावें असा कोणी याचा अर्थ केल्यास तो मात्र माझ्या म्हणण्याचा विपर्यास होईल.

मग व्यवस्थितपणा वगैरे गुण अंगीं बाणतील आणि जीवनांतील सर्व व्यवहारांत ते उपयोगी पडतील असें शिक्षकांना आणि शाळाधिकाऱ्यांना कांहींच करतां येणार नाहीं का ? नाहीं असें मुळींच नाहीं. पुष्कळच करतां येईल. तें करण्याचे मार्ग असे आहेत. मुलांना या गुणांचें महत्त्व पटवून दिलें पाहिजे, मारून झोडपून नव्हे, तर त्यांच्या विचारांना आणि भावनांना त्यांतील रहस्य समजावून देऊन. याकरितां शाळेंतील शिक्षकवर्गाचें वर्तन आदर्शभूत असलें पाहिजे आणि दुसरी गोष्ट म्हणजे मुलांच्या मनांत चांगलीं ध्येयें बिंबलीं पाहिजेत, तीं ध्येयें त्यांचीं—त्यांनीं बनविलेलीं, त्यांना पटलेलीं, त्यांना आपलीं अशीं झालेलीं—पाहिजेत. प्रत्यक्ष नीतिशिक्षण जें येतें तें येथें.

प्रत्यक्ष नीतिशिक्षणाकडे वळण्यापूर्वी शिक्षकांच्या वर्तनासंबंधीं आणि जीवनासंबंधीं दोन शब्द लिहितों. त्यांत नवीन असें कांहीं सांगावयाचें नाहीं. गुरुजनांच्या वर्तनाचा आणि शीलाचा परिणाम मुलांवर फार होत असतो हें सर्वांना ठाऊकच आहे. शिक्षकांच्या— विशेषतः आवडत्या शिक्षकांच्या— बोलण्याच्या ढबीचें, पोषाखाचें वगैरे अनुकरण मुलें करीत असतात हें सर्वांना ठाऊक आहे. शिक्षकानें शिक्षकाचा पेशा जीवित कार्य म्हणून हौसेनें आणि उत्साहानें पत्करावा. तो धंदा म्हणून समजूं नये, असें सांगण्यांत येतें तें

अत्यन्त खरें पण आहे. पण शिक्षक देखील माणसेंच असतात; त्यांना शरीर असतें, त्यांना बायका-मुलें असतात, त्यांना स्वाभिमान असतो, त्यांना व्याकरण खाऊन पोटाची खळगी भरतां येत नाहीं आणि काव्यरस पिऊन दुपारची तहान भागवतां येत नाहीं. उदाहरणें सोडवून सावकाराचा हिशेब पुरता करतां येत नाहीं आणि इतिहासांतल्या गोष्टी सांगून धरणें धरून बसलेल्या वाण्याला वाटेस लावतां येत नाहीं, इत्यादि गोष्टी पुष्कळ लोक विसरतात. मुलांच्या वर्तनावर शिक्षकांच्या नीतिमत्तेचा परिणाम होतो. अर्थात् शिक्षक हे सच्चारित्र्यशील असावेत असा शिष्टसंमत उपदेश शिष्टपणानें सांगणारे संभावित लोक शिक्षकांना अब्रूनें राहतां येईल इतका पगार देण्यांत येतो किंवा नाहीं याबद्दल बेफिकीर असतात ही शोचनीय गोष्ट आहे. मुलें नीतिमान् व्हावींत अशी इच्छा असेल तर तीं ज्यांचें अनुकरण करतात ते शिक्षक शीलवान् असले पाहिजेत आणि असे शिक्षक मिळवावयाचे असतील तर शील सोडण्याचे प्रसंग अनिवार्यपणें त्यांचे-वर येणार नाहींत याबद्दल थोडी तरी दक्षता ठेवली पाहिजे. पगाराची विशेष अपेक्षा न करणारे अठरा विश्वे दारिद्र्यांतहि शीलसंपन्न असलेले शिक्षक आहेत— अनेक आहेत; पण सर्व शिक्षकांकडून इतक्या उच्चतम ध्येयनिष्ठेची अपेक्षा करणें व्यव-हाराला सोडून होईल.

शिक्षकाच्या वर्तनाप्रमाणेंच घरच्या मंडळींच्या आणि सर्वसाधारण समाजाच्या वर्तनाचा मुलांच्या स्वभावावर आणि शीलावर बरावाईट परिणाम होत असतो; तेव्हां मुलांच्या नीति-शिक्षणाबद्दल लिहितांना या गोष्टीचाहि उल्लेख केला पाहिजे. पण याचा विस्तार न करतां उपदेशाच्या द्वारें साक्षात् नीतिशिक्षण आणि धर्मशिक्षण देण्यासंबंधाचे विचार थोडक्यांत सांगतों.

मुलें निरोगी असलीं, त्यांच्या सहजप्रवृत्तींना योग्य तो वाव मिळाला, त्यांना चांगल्या संवयी लावल्या, त्यांच्यापुढें चांगल्या शिक्षकांचे आदर्श असले म्हणजे मुलें अनीतिप्रवृत्त होण्याचीं जीं अनेक कारणें आहेत त्यांपैकीं कांहींचा परिहार होत असला तर त्यांचा स्वभाव कायमचा चांगला व्हावा आणि त्यांचें चारित्र्य पक्क्या पायावर आधारलेलें असावें एवढ्याकरितां अमुक चांगलें आणि अमुक वाईट एवढेंच त्यांना समजून चालावयाचें नाहीं; तर अमुक चांगलें कां आणि तमुक वाईट कां हेंहि त्यांना थोडेसें समजलें पाहिजे; इतकेंच नव्हे तर तें त्यांना पटलें पाहिजे; एवढेंच नव्हे तर तें त्यांच्या अंगीं बाणलें

पाहिजे; एवढ्यानेंहि भागत नाहीं. कारण विशिष्ट प्रकारचें वर्तन चांगलें, तें कां चांगलें हें जरी बुद्धीला कळलें आणि पटलें आणि चांगल्या संवयी जरी लागलेल्या असल्या तरी वाईट गोष्टींकडे मनुष्याच्या मनाची थोडीशी ओढ राहतेच. मन हें ओढाळ गुराप्रमाणें भलतीकडेच जाऊं लागलें असतां उच्च ध्येयें डोळ्यांपुढें असून भागत नाहीं, तर तीं ध्येयें दुसऱ्या कोणी लादलेलीं नाहींत तर तीं आपलीं आहेत, आपल्या पूर्ण पसंतीचीं आहेत असें त्यांना पटलें पाहिजे; आणि आपण जें व्हावयाचें ठरविलें आहे त्याच्या आड येणाऱ्या गोष्टी, लोकांकरितां नव्हे, जनलज्जेकरितां नव्हे, तर आपल्यालाच अहितकारक दिसतात म्हणून त्या टाळण्याची त्यांना साहजिकच इच्छा झाली पाहिजे, निश्चय करतां आला पाहिजे; आणि तो निश्चय अमलांत आणण्याचें सामर्थ्य आणि श्रेष्ठ धारिष्ट्य त्यांच्यामध्यें असलें पाहिजे. या गोष्टी साध्य करणें सोपें नाहीं; पण त्या साध्य करून घेण्यास अनुकूल परिस्थिति निर्माण करण्याविषयीं कांहीं सूचना करणें शक्य आहे.

आईबापांचें, कुटुंबांतील मंडळींचें, गुरुजनांचें वर्तन जर चांगलें असलें तर मुलांना इष्ट वळण लागतें हें उघडच आहे. गुरुजनांपैकीं किंवा आतेष्टांपैकीं एखादी व्यक्ति विशेष गुणी असेल तर त्या व्यक्तीची छाप मुलांवर विशेष पडते. दुय्यम शाळेंतलीं मुलें– विशेषतः खालच्या वर्गांतील मुलें– सामान्यतः विभूतिपूजक असतात. त्या त्या वयांत डोळ्यांसमोर जी व्यक्ति असामान्य, अलौकिक वाटते, त्या व्यक्तीचीं तीं भक्त बनतात. या वयांत कुटुंबांतील मंडळी आणि गुरुजन यापेक्षांहि अधिक सद्‍गुणी, सामर्थ्यवान्, तेजस्वी व्यक्ति त्यांच्याशीं परिचित झालीं तर सोन्याहून पिवळें. अशा व्यक्ति जागोजाग पडलेल्या नसतात; परंतु ही उणीव वाङ्मयांत, भूगोल-रसायनादि शास्त्रांच्या संशोधकांच्या चरित्रांत, इतिहासांत मुलांना वाचावयास मिळतात आणि योग्य वेळीं शिक्षकानें या अलौकिक व्यक्तींच्या सामर्थ्याबरोबर आणि कीर्तीबरोबर त्यांच्या अलौकिक सद्‍गुणांची, चिकाटीची, निश्चयाच्या बळाची, आत्मसंयमनाची वगैरे थोरवी वक्तृत्वपूर्वक आणि मनावर ठसेल अशा रीतीनें गायिली तर त्याचा सुपरिणाम दिसून येतो. अशी थोरवी गाणाऱ्या व्यक्तींमध्यें मुलाच्या मनावर आपल्या वर्तनानें आणि बोलण्याच्या ढबीमुळें छाप बसविण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे. नाहीं तर त्या व्यक्तीचा उपदेश हास्यास्पद होऊन

उलट परिणाम होण्याचा संभव असतो ! एवढ्याकरितां सामान्य दर्जाच्या शिक्षकानें नैतिक प्रवचनाच्या फंदांत फारसें पडूं नये आणि त्यांना त्या फंदांत प्रमुखाध्यापकानें पडूं देऊं नये. सामान्य शिक्षकानें फार तर वर्गांत शिकविण्याच्या विषयाला अनुलक्षून ओघानें येणारा नित्युपदेश करावा—"लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण" अशा प्रकारचे विचार विद्यार्थ्यांच्या मनांत डोकावतील, असे प्रसंग फारसे येऊंच देऊं नयेत. मुलांच्या मनावर छाप बसवूं शकतील अशाच शिक्षकांनीं प्रत्यक्ष नीतिशिक्षणाचें काम करावें आणि तेंहि विषयानुरोधानें आलेल्या प्रसंगांचा फायदा घेऊन. उत्सव, थोरांच्या पुण्यतिथि, इत्यादि प्रसंगीं शाळेंतील विशेष आदरणीय आणि वक्तृत्वकुशल शिक्षकानें किंवा निमंत्रित अशा थोर व्यक्तीनें केलेल्या भाषणांनीं कांहीं मुलांवर तरी सुपरिणाम केल्याचीं आणि उच्च ध्येयें निर्माण केल्याचीं उदाहरणें आहेत. शाळा पाहण्याकरितां सहजगत्या आलेल्या थोर व्यक्तींचीं प्रवचनें ऐकविण्याकरितां शाळेंतील रोजच्या अभ्यासक्रमांत थोडा व्यत्यय आला तरी अशीं प्रवचनें करवावीत; कारण थोर विभूति पाहण्यांतहि नीतिशिक्षण आहे, मग त्यांच्या तोंडचे चार शब्द ऐकण्यास मिळाले तर त्या योगें थोडाबहुत फायदा व्हावयाचाच. विशेष आदर्शभूत नसलेल्या व्यक्तींनीं मात्र उपदेशाच्या फंदांत पडणें हितावह नाहीं असें शेवटीं पुनः सांगावेंसें वाटतें, आणि एवढ्याकरितांच प्रत्येक वर्गाला 'नीतिशिक्षणा'करितां म्हणून आठवड्यांतला एक तास राखून ठेवण्याच्या मी विरुद्ध आहे. प्रत्येक वर्गाला असे शिक्षक मिळणें कठीण. मिळूं शकले तर मात्र अवश्य तास ठेवावेत हीहि गोष्ट तितकीच खरी. त्याचें कारण असें—कांहीं नैतिक आणि धार्मिक बंधनें कां निर्माण करण्यांत आलीं ? तीं नसतीं तर काय बिघडलें असतें, इत्यादि प्रश्न मुलांच्या मनांत किती केलें तरी डोकावणारच. असे प्रश्न मनांतल्या मनांत दाबून दडपून टाकण्याचे प्रसंग ज्या शाळेंत मुलांवर येतात, त्या शाळेंत कांहीं तरी उणीव आहे असें म्हटलें पाहिजे. प्रसंगानुरोधानें हे प्रश्न विचारण्यास मुलांना भीति किंवा लाज वाटणार नाहीं. अशा प्रकारचें वर्गाचें वातावरण असलें पाहिजे आणि शिक्षकानें सहानुभूतीनें शंकेचें निवारण केलें पाहिजे.

अनीतीचे म्हणून जे प्रकार आपण मानतों ते अनीतीचे कां हें त्या शिक्षकानें उदाहरणें वगैरे देऊन मुलांना पटवून द्यावें. 'असल्या

शंका विचारूं नयेत ’ वगैरे दुरुत्तरें मुलांना करूं नयेत. (अर्थात् हें विधान खऱ्याखुऱ्या शंकांबद्दल आहे, वात्रटपणानें विचारणाऱ्या मुलांना दाबलें–दटावलेंच पाहिजे.) वर्गशिक्षकाकडून शंकेचें निवारण न झाल्यास किंवा त्याला शंका विचारण्याचा प्रसंगच विषयानुरोधानें नच आल्यास किंवा त्या शिक्षकाला विचारण्यास संकोच किंवा भीति वाटत असल्यास, दुसऱ्या एखाद्या शिक्षकाला किंवा प्रमुखाध्यापकालाहि खाजगी रीतीनें विचारण्यास मुलांना संकोच वाटूं नये आणि अशी संधि कोठें तरी मिळूं शकेल असें शाळेचें वातावरण असणें इष्ट; इतकेंच नव्हे तर आवश्यक आहे. एखादा नीतिनियम मुलाला पटलाच नसला तर तो नीतिमान् होईल कसा ?

नीतिनियम केवळ पटण्यानें भागत नाहीं, ते आत्मसात् झाले पाहिजेत. म्हणजे आपणच ते ठरविले आहेत असें मुलाला वाटलें पाहिजे. आपणांला अमुक व्हावयाचें आहे तर अर्थात् अशा तऱ्हेनें वागलेंच पाहिजे. तें दुसऱ्याकरितां नव्हे तर आपल्याकरितां आपण बंधन घालून घेतलें आहे, असें मुलाला वाटलें पाहिजे. एवढ्याकरितां त्याचें कांहीं तरी ध्येय ठरलें असलें पाहिजे. पण मोठ्या माणसांचीं ध्येयें पन्नाशी-साठीपर्यंत आले तरी ठरत नाहींत. अनुभवानुसार आणि परिस्थितीनुसार तीं बदलावीं लागतात, तर लहान मुलांचीं ध्येयें लहान वयांतच, अनुभवांच्या अभावीं, भविष्यकालांत काय लिहिलें आहे याचा पुसटहि अंदाज नसतां, कशीं ठरणार? मुलांनीं आपलें ध्येय ठरवावें, अशी भाषा ऐकली म्हणजे मला पुष्कळ वेळां हसूं येतें; आणि अशी भाषा बोलणाऱ्याला कांहीं समजत नाहीं असा विचार क्षणभर मनांत डोकावतो. मग मीच ही भाषा कशी वापरतों? याचें कारण असें कीं, मुलांनीं मी वकील होणार का डॉक्टर होणार का सामाजिक कार्य करणार, अशा प्रकारचीं ध्येयें प्रथमपासून ठरविणें अशक्यप्राय आहे हें मला मान्य असलें तरी मी होतां होईतों आईबापांकडून आणि गुरुजनांकडून चांगलें म्हणवून घेईन, त्यांना माझ्यापासून दुःख होईल असें करणार नाहीं, त्यांना माझ्या वर्तनामुळें मान खालीं घालावी लागणार नाहीं असें कांहीं करणार नाहीं, होतां होईतों ‘सद्वर्तनी मुलगा’ म्हणवून घेईन, अशा प्रकारचें ध्येय मुलांनीं लोकांपुढें स्पष्टपणें उच्चारून दाखविलें नसलें, किंवा स्वतःशींहि शब्दरूपानें उच्चारलें नसलें तरी तें त्याच्या मनांत वावरणें, किंबहुना तें तेथें कायमचें

ठाणें देऊन राहणें शक्य आहे आणि असें ध्येयच मला विवक्षित आहे. मॅट्रिकची परीक्षा पास व्हायच्या आधीं आपल्या वडिलांची आर्थिक स्थिति कॉलेजशिक्षणाला अनुकूल असेल का प्रतिकूल होणार याबद्दल कांहीं कल्पना नसतांना, आपल्या बौद्धिक आवडी-निवडी निश्चित स्वरूप पावल्या नसतां, आपल्या बौद्धिक सामर्थ्याचा आपणांस चांगला अंदाज लागला नसतां, भविष्यकाळ धुक्यांत गडप झाला असतां, आपण वकील, डॉक्टर का इंजिनीअर होणार हें मुलांनीं ठरविणें अशक्य असलें तरी मी लोकांकडून 'चांगला मुलगा आहे हा' असें म्हणवून घेणार, चोरी-चहाडी वगैरे कधींहि करणार नाहीं, आळसांत वेळ न दवडतां विद्याभ्यास करीन, इत्यादि प्रकारचें त्याचें ध्येय असूं शकेल आणि अशा प्रकारचें ध्येय मनावर बिंबविणें हेंच घरांतल्या मंडळींचें आणि शिक्षकवर्गाचें काम आहे.

असलें हें ध्येय नुसतें ठरून भागत नाहीं; तर तें आपणांस झेपेल आणि झेपत आहे असा मुलांमध्यें आत्मप्रत्यय उत्पन्न होणें आवश्यक आहे. प्रौढ स्त्री-पुरुषहि चुकतात–घसरतात, तर लहान मुलें क्वचित्प्रसंगीं चुकतील–घसरतील हें सरळच आहे. अशा वेळीं त्यांना बोलूं नये असें नाहीं, पण बेतानें बोलावें. तीं अगदीं खजील होतील, त्यांना स्वतःचीच फार लाज वाटूं लागेल, तीं संवगड्यांना आणि गुरुजनांना तोंड दाखविण्याचें टाळूं लागतील, असें केल्यानें नुकसान होण्याचा संभव आहे. अशा प्रसंगीं सहानुभूति दाखवून धीर द्यावा आणि आत्मतुच्छता त्यांच्यामध्यें प्रबल होणार नाहीं असें वागावें. त्यांना शिक्षा करणें प्राप्त झाल्यास शिक्षा केल्यावर तीं आपल्या वाऱ्याला उभीं राहत नाहींत असें दिसून आल्यास आपण होऊन शिक्षकानें कांहीं तरी निमित्त काढून त्यांच्याशीं बोलावें-चालावें आणि त्यांच्या मनांतील शल्य काढून टाकावें.

हें झालें आत्मप्रत्यय नष्ट होऊं नये याबद्दल. आतां आत्मप्रत्यय उत्पन्न होऊन तो प्रबल होईल अशाकरितां विशेष आत्मप्रत्यय असलेल्या लोकांचीं इतिहासांतील वगैरे चरित्रें त्यांच्या नजरेसमोर वारंवार आणावींत हा एक मार्ग. दुसरा मार्ग असा कीं बौद्धिक क्षेत्रांत ज्याप्रमाणें त्यांना कठीण तर वाटावींत पण त्यांना स्वतःच्या बुद्धीनें प्रयत्नपूर्वक सोडायला येतील अशीं

उदाहरणें वगैरे आपण घालतों आणि त्यांचा बौद्धिक आत्मप्रत्यय आपण प्रबल करूं पाहतों, त्याप्रमाणेंच नैतिक क्षेत्रांतहि आत्मसंयमाचे, स्वार्थत्यागाचे वगैरे धडे उचित प्रसंगांच्या निमित्तानें देतां येण्यासारखे आहेत. परंतु या बाबतींत समयज्ञता आणि सावधगिरीची फार जरूर आहे. ज्यांच्याबद्दल विद्यार्थ्यांच्या मनांत विशेष प्रेम आणि पूज्यभाव आहे अशाच शिक्षकाला, त्याच्यामध्यें समयज्ञता आणि धोरण असेल, तरच या गोष्टी साधूं शकतील.

मुलांना एकमेकांना साहाय्य करणें, वर्गाकरितां किंवा शाळेकरितां कामें करणें वगैरे गोष्टी शिक्षकांच्या उदाहरणांवरून तर समजतीलच; परंतु अशा प्रकारें साहाय्य करण्याची, परार्थ परिश्रम करण्याची वगैरे संधि मुलांना पुष्कळदां साहजिकच येते; तिचा फायदा मुलें कितपत घेतात इकडे शिक्षकांचें लक्ष असावें आणि प्रसंगानुसार सूचनाहि द्याव्यात. इतकेंच नव्हे तर सहकारितेची आणि समाजहितार्थ परिश्रम करण्याची संधि त्यांना बऱ्याच वेळां मिळेल अशा हेतूनें संमेलनें, सहली, चढाओढी, प्रदर्शनें, हस्तलिखित मासिकें, शास्त्रोपयोगी सामानांचीं दुकानें वगैरेंचा उचित प्रसंगीं आणि उचित रीतीनें उपयोग करून घ्यावा. हरतऱ्हेच्या सभांचो चिटणिशी आणि अध्यक्षपद, खेळांची देखरेख, इतकेंच नव्हे तर 'शाळेंतील स्वराज्य' स्थापून किरकोळ व्यवस्थेचें आणि शिस्तीचें काम त्यांचेकडे सोंपविणें, यांचाहि सामाजिक सद्गुण अंगीं बाणण्याच्या कामीं आणि समाजहितार्थ आपण परिश्रम आणि त्याग आनंदानें करूं शकतों याबद्दल आत्मप्रत्यय उत्पन्न करण्याच्या कामीं फार उपयोग होण्यासारखा आहे.

मुलांच्या स्वभावांत सुसंबद्धता, एकधोरणीपणा उत्पन्न होण्याच्या बाबतींत एखादा उत्तम नाद लागणें, एखाद्या गोष्टीबद्दल विशेष आस्था असणें हें फार उपयुक्त असतें. 'स्वदेशी'सारख्या विषयाबद्दल श्रद्धा आणि उत्साह उत्पन्न करतां आल्यास मुलांच्या वर्तनांत इतर स्पृहणीय सद्गुणाहि दिसूं लागतात. अशा प्रकारची श्रद्धा कशी उत्पन्न करावयाची हा मोठा प्रश्न आहे. शिक्षकांपैकीं बऱ्याचजणांत किंवा निदान कांहींजणांत अशी श्रद्धा प्रबळ आणि कार्यप्रवण करणारी असेल तर ती मुलांमध्यें साहजिकच उत्पन्न होण्याचा संभव आहे; पण या बाबतींत बळजबरी नसावी. वर्तनांत शुद्धता, उच्चता, औदार्य,

सुसंबद्धता आणि शान्तता आणण्यास धर्माबद्दल श्रद्धा फार उपयुक्त होते. पण अशी श्रद्धा आधीं शिक्षकांत पाहिजे; ती किती शिक्षकांत आढळेल? त्याचप्रमाणें धर्मामधील श्रद्धेंत कांहीं अंधश्रद्धात्मक भाग असण्याचा संभव असतो तो मुलांमध्यें उतरणें कितपत इष्ट आहे? 'If there be no God, we must create one' असें नेपोलिअन म्हणाला. नेपोलिअनचें हें म्हणणें कितपत मान्य करण्यासारखें आहे? निरनिराळ्या धर्मांचीं मुलें शाळेंत असलीं तर त्या त्या धर्मांतील श्रद्धाविषयांमध्यें कांहीं भेद किंवा विरोध असणारच; अशा वेळीं शिक्षकानें कोणतें धोरण स्वीकारावें? मुलांना स्वतंत्र विचार करण्यास शिकविणें हें ध्येय, का स्वतःची बुद्धि न चालवितां धर्म-तत्त्वांवर श्रद्धा ठेवण्यास सांगणें हें ध्येय, वगैरे वादात्मक, गुंतागुंतीचे आणि भानगडीचे प्रश्न आहेत. लेखाचा आधींच बराच विस्तार झाला असल्यामुळें या धर्मारण्यांत न शिरतां नैतिक उद्यानांतील कांहीं रम्य विषयांचा केलेला ऊहापोह येथेंच संपविलेला बरा.

---

# प्रौढ शिक्षण आणि साक्षरता-प्रसार

लेखकः— विनायक विष्णु साठये

बहुजन समाजांत शिक्षण-प्रसार झाल्याखेरीज देशाचा तरणोपाय नाहीं हें जाणून नामदार गोखले यांनीं सन १९२१ सालीं वरिष्ठ कायदेमंडळांत सक्तीचें प्राथमिक शिक्षणाचे बिल आणलें व पुढें बारा वर्षांनीं रँग्लर परांजपे शिक्षणमंत्री झाल्यावर त्यांनीं सक्तीच्या शिक्षणाचा कायदा मुंबई प्रांतांत पास करून घेतला व प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था जिल्हानिहाय स्कूल बोर्डाकडे सोंपविली. शाळांची व शाळेंत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढली; परंतु मुख्यतः पैशाच्या टंचाईमुळें सरकारास आपली जबाबदारी पार पाडतां आली नाहीं व त्यामुळें व्हावा तितका झपाट्यानें शिक्षण-प्रसार झाला नाहीं. सन १९३५ सालच्या कायद्यानें प्रांतिक स्वायत्तता आली त्या वेळीं अखिल भारतांतील त्याचप्रमाणें मुंबई प्रांतांतील साक्षरतेचें प्रमाण शेंकडा १० च्या वर गेलेलें नव्हतें व स्त्रियांचे बाबतींत तर तें शेंकडा २ चे आंतच होतें.

२. लोकशाहीचे काळांत बहुजनसमाज साक्षर असणें अत्यंत आवश्यक आहे याबद्दल दुमत असण्याचें कारण नाहीं. साक्षरता प्राप्त झाली म्हणजे खेडुतांच्या सांप्रतच्या आर्थिक परिस्थितींत तत्काळ सुधारणा होईल अशी कोणाचीहि अपेक्षा नाहीं; परंतु किती तरी मोठा समंजस पण अशिक्षित, निरक्षर समाज साक्षरतेच्या अभावीं अनेक प्रसंगीं गांवांतील प्रतिष्ठित स्वार्थसाधूंचे आहारीं जातो व असहाय होतो याचा कटु अनुभव खेड्यांतून कार्य करणारांस पदोपदीं येतो. अज्ञानामुळें निरक्षर प्रौढ पालक मुलांस शाळेंत पाठविण्याचे बाबतींत उदासीन व विरोधी असतात हेंहि निदर्शनास येतें. यावरून पालक व शाळेंत जाण्याचें वय असलेलीं मुलें या दोघांचेहि हिताचे दृष्टीनें पालक साक्षर असणें अतिशय जरूरीचें आहे हें सहज लक्षांत येईल.

३. सन १९३७ सालीं कॉंग्रेसनें मंत्रिमंडळें बनविल्यापासून प्रौढांस साक्षर करण्याचे कार्यास विशेष चालना मिळाली; तत्पूर्वी या कार्याचें विस्तृत क्षेत्र

व त्यास लागणारा जबर खर्च यामुळें या प्रश्नाचा आस्थेनें व पद्धतशीरपणें विचार झाला नव्हता. कॉंग्रेस मंत्रिमंडळानें प्रौढ शिक्षणाचा सांगोपांग विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमिली व तिच्या शिफारशीप्रमाणें एक प्रांतिक प्रौढ शिक्षण बोर्ड नेमून त्यांचेकडे प्रचार करण्याचें व सरकारास सल्ला देण्याचें काम सोंपविलें.

४. प्रौढशिक्षण म्हणजे केवळ निरक्षर प्रौढांस साक्षरता प्राप्त करून देणारे प्राथमिक शिक्षण नव्हे. साक्षर झालेल्या प्रौढांस इंग्रजी शिक्षण देणाऱ्या रात्रीच्या शाळा; मुंबई, पुणें, अहमदाबाद वगैरे ठिकाणीं कामकरी लोकांस त्यांच्या रोजच्या व्यवसायाव्यातिरिक्त उपयुक्त औद्योगिक शिक्षण देणारे वर्ग, सेवासदन, डिप्रेस्ड क्लासेस् मिशन व इतर मिशनसंस्था यांचेकडून प्रौढ स्त्री-पुरुषास कांहीं धंद्यांचें शिक्षण देण्यासाठीं चालविलेले वर्ग यांचा प्रौढशिक्षण-संस्थांत समावेश होतो. मुंबई प्रांताच्या गेल्या पंचवार्षिक अहवालाप्रमाणें सन १९३७ च्या मार्चअखेर या प्रौढ शिक्षणसंस्थांची व त्यांतून शिकणारांची संख्या अनुक्रमें १८० व ६२९९ होती. या संस्थांपैकीं प्रौढांच्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळा १६६ असून त्यांत ५४८० लोक शिकत होते. आपल्या प्रांताच्या पावणेदोन कोट लोकसंख्येंत १५ वर्षांवरील वयाचे निरक्षर प्रौढांची संख्या शेंकडा ८५ आहे. अशा स्थितींत सुमारें ५५०० निरक्षर प्रौढ साक्षरता प्राप्तीसाठीं रात्रीच्या शाळांतून लहान मुलांचीं पुस्तकें, त्यांचा ठराविक अभ्यास-क्रम वर्षास एक इयत्तेचा ( इन्फंट वर्गासह ! ) कंटाळवाण्या प्रगतीचा मार्ग आक्रमीत होते हें दृश्य प्रांताच्या साक्षरतेच्या दृष्टीनें उद्वेगजनकच म्हटलें पाहिजे. १९३७-३८ सालांत प्रौढ-शिक्षणाबाबत थोडी जागृति झाल्यामुळें या सालच्या अहवालांत १९३८ मार्चअखेर प्रौढांच्या प्राथमिक शाळांची संख्या १८० ची २४० झाली व त्यांतून ८०७३ लोक शिकत होते.

५. वर वर्णिलेल्या परिस्थितींत बदल होऊन प्रौढांचे निरक्षरतेचा प्रश्न धसास लागावा व त्यांस शक्य तितक्या अल्प काळांत साक्षर करण्याची परि-णामकारक योजना व्हावी या हेतूनें गेल्या तीन-चार वर्षांत निरक्षर प्रौढांस साक्षर करण्याचे कामीं प्रयत्न करणाऱ्या कांहीं संस्था महाराष्ट्रांत व बाहेर अस्तित्वांत आल्या. कॉंग्रेस मंत्रिमंडळें अस्तित्वांत आल्यावर सरकारनें प्रौढ

शिक्षणासाठीं कांहीं रकमेची तरतूद केली व महाराष्ट्र, कर्नाटक व गुजराथ या विभागांतून प्रयोगासाठीं म्हणून साक्षरतेचे वर्ग सुरू केले त्यांपैकीं मराठी विभागांतील कांहीं वर्ग पुण्याचे साक्षरताप्रसारक मंडळानें वर्षभर चालविले. या सर्व वर्गातून सुमारें २५०० लोक शिक्षण घेत होते. वर्षाचा अनुभव घेतल्यावर सरकारनें प्रांतिक प्रौढ शिक्षण बोर्डाचे विचारानें प्रौढ शिक्षणाच्या शाळांस मदत देण्याचे नियम तयार केले व त्यांचा अंमल जानेवारी १९३९ पासून सुरू झाला. या नवीन योजनेप्रमाणें प्रांताच्या सर्व विभागांतून हजारावर मदतीच्या शाळा किंवा साक्षरतेचे वर्ग अस्तित्वांत आले व त्यांतून मार्च १९३९ अखेर २५ ते ३० हजार निरक्षर प्रौढ शिक्षण घेत होते. या वर्गातून प्राथमिक साक्षरता प्राप्त झालेल्या लोकांची साक्षरता टिकविण्याचे प्रयत्न न झाल्यास केलेले श्रम व खर्च झालेला पैसा व्यर्थ जाण्याचा संभव आहे. ज्या नियमांनीं हे वर्ग अस्तित्वांत आले त्या नियमांतहि सरकारचे सध्यांचे सांपत्तिक स्थितीमुळें बदल केला जात आहे. यामुळें बरीच गति मिळालेलें हें कार्य मंदावण्याचा संभव दिसतो.

६. निरक्षर प्रौढांचे साक्षरतेबद्दल योजना करितांना भिन्न परिस्थितींत समाजाचा विचार करणें प्राप्त आहे. खेडेगांवांतून प्रौढ निरक्षर स्त्री-पुरुषांचा समाज असा आहे कीं, त्यांना साक्षर व्हावें असें मुळीं वाटतच नाहीं. तसें त्यांस वाटावें म्हणून कांहीं तरी उपाय योजिले पाहिजेत. दोन उपाय संभवतात. एक उपाय म्हणजे साक्षर होणें निकडीचें आहे असें त्यास जाणवेल अशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. साक्षर होण्याची निकड वाटावयाची म्हणजे सरकारशीं होणाऱ्या व्यवहारांत किंवा परस्परांकडे होणाऱ्या दैनिक व्यवहारांत साक्षरतेस विशेष महत्व मिळालें पाहिजे. देवघेवीची पावती होतांना, प्रवास करतांना, बाजारांत खरेदी करतांना, निरक्षरतेची अडचण भासली पाहिजे. अशी परिस्थिति निर्माण करणें बहुंशीं सरकारी पुरस्कारावर अवलंबून राहील. दुसरा उपाय म्हणजे कार्यकर्त्यांचे प्रयत्न गांवांतील चावडी, धर्मशाळा अगर देऊळ या ठिकाणीं दिवसाचें काम झाल्यावर मोकळेपणानें विसांवा घेत बसलेल्या लोकांशीं समरस होऊन त्यांच्या कलानें साक्षरतेचे धडे देणारे उत्साही व कुशल कार्यकर्ते गांवांत असले पाहिजेत. हा उपाय सर्वच ठिकाणीं साध्य नाहीं. तरी अशा मनमिळाऊ कार्यकर्त्यांनीं केलेल्या कामाची नोंद होऊन त्यांची प्रसिद्धि झाल्यास त्यांस प्रोत्साहन मिळून इतरांस मार्गदर्शक होईल.

७. खेडेगांवाप्रमाणें अगदींच उदासीन नाहीं तरी शहरीं वातावरणांत वावरणारा अगर गिरण्या, कारखाने यांतून काम करणारा मोठा कामकरीवर्ग आहे. या निरक्षर लोकांस शिकलेल्यांचे सान्निध्यामुळें चार अक्षरें यावीं असें वाटत असतें. कारखान्याचे मालकांकडून अशा लोकांस पगाराचें नुकसान न होतां कामाचे वेळांतच शिकण्याच्या सवलती मिळाल्यास त्याचा फायदा घेण्यास ते तयार असतात. पुण्याजवळील रे पेपर मिलमध्यें असा अनुभव आलेला आहे. याशिवाय सरकारी ऑफिसांतून काम करणाऱ्या शिपाई वगैरे नोकरांचा वर्गहि त्यांस आस्थेनें शिकविणारे शिक्षक भेटल्यास उत्साहानें शिकतो. खेडेगांवांत काय अगर शहरांत काय, स्थानिक संस्थांकडून अगर खाजगी प्रयत्नानें चालू असलेल्या साक्षरतेचे वर्गांत शिकणाऱ्या प्रौढांस त्यांनीं दाखविलेल्या प्रगतीबद्दल कांहीं तरी प्रोत्साहन मिळणें आवश्यक आहे हें नमूद केलें पाहिजे.

८. प्रौढ निरक्षर कोणत्या परिस्थितींत असतात याचें विवेचन वर केलें आहे. त्यांस शिकविणाऱ्या शिक्षकांस मग तो वयानें लहान असो वा मोठा असो शिकणाऱ्या प्रौढांच्या मनोवृत्तीची कल्पना पाहिजे. वयानें मोठे असलेले लोक वर्गांत शिकतांना अगर वेडेवांकडे अडखळत वाचतांना तिऱ्हाइतासमोर बुजतात. अरेरावीनें, रागानें अगर तुच्छतेनें त्यांचेशीं वागणारा शिक्षक त्यांस मुळींच पटत नाहीं. शिक्षक हा त्यांचा मित्र व मदतनीस आहे, अडीअडचणींत मार्ग दाखवणारा आहे अशी भावना निर्माण करणाऱ्या शिक्षकांस पुष्कळच यश मिळेल. मुलांप्रमाणें प्रौढांस दटावणें अगर चुकल्यास खरडपट्टी काढणें असे प्रकार शिक्षकानें सर्वस्वी टाळले पाहिजेत.

९. प्रौढांचे वर्ग बहुधा रात्रीचे वेळीं तास दोन तास भरविले जातात. या वर्गावर पूर्ण वेतनी ( full time ) शिक्षक नेमणें परवडत नाहीं. गांवांतील दिवसाच्या शाळेवर काम करणाऱ्या शिक्षकांस रात्रीच्या वर्गाचें काम थोडेंसें वेतन देऊन करावयास सांगणें अधिक सोयीचें असतें. केवळ वेतनाचा मोबदला म्हणून हें काम करणारा शिक्षक फारसा यशस्वी होत नाहीं. अल्पशी कां होईना पण ही गांवाची सेवा आहे अशा बुद्धीनें काम करणाऱ्या शिक्षकाची प्रौढ निरक्षरांवर लवकर छाप पडते व मग हजेरी टिकविण्यास फारसे श्रम पडत नाहींत.

मात्र गांवच्या जत्रा, हंगामाचे दिवस किंवा लग्नसराई या वेळीं शिकणारांचे कला-प्रमाणें सोयीचे वेळीं शिकविण्याची शिक्षकाची तयारी पाहिजे, म्हणजे कामांत फार मोठा खंड पडणार नाहीं.

१०. प्रौढांच्या साक्षरतेची मर्यादा कोणती याबद्दल थोडेंसें विवेचन करणें जरूर आहे. नुसती अक्षरओळख होणें, एका अक्षरानंतर अडखळत दुसऱ्या अक्षराचा उच्चार करणें म्हणजे साक्षरता नव्हे. सबंध शब्द अगर सोपें वाक्य न अडखळतां वाचणें व नंतर क्रमिक पहिल्या पुस्तकाचे दर्जाचें पुस्तक समजुतीनें वाचणें, दोन ओळींचा मजकूर लिहितां येऊं लागणें व थोडीशी हिशेबाची ओळख होणें इतकी तयारी झाली म्हणजे प्राथमिक साक्षरता प्राप्त झाली असें समजावें. ही प्राप्त झालेली साक्षरता टिकाऊ नसते. ती टिकाऊ होण्यास निदान क्रमिक तिसरे पुस्तकाचे दर्जाचे पुस्तकाचें समजुतीनें वाचन, वर्तमानपत्रांतील ठळक बातम्या वाचून दुसऱ्यास सांगतां येणें, लहानसें पत्र लिहिणें व वाचून दाखविणें; नेहमींच्या जीवनक्रमास पोषक होईल अशा तऱ्हेचें सामान्य ज्ञान देणारीं व मनरंजन करणारीं पुस्तकें वाचण्याची पालता येणें इतकें शिक्षण मिळणें आवश्यक आहे. हें ध्येय ठेवून शिक्षणाचें साहित्य पुरविण्याची योजना झाली पाहिजे. शिक्षणांत होणारा खंड लक्षांत घेऊन प्राथमिक साक्षरता प्राप्त होण्यास सहा महिने व ती टिकाऊ होण्यास पुढें दीड वर्षाचा काल आवश्यक आहे.

११. निरक्षरांस अक्षर ओळख करून देण्यास विशेष शिक्षणसाहित्य लागत नाहीं. एक फळा, खडूच्या कांड्या व मोठ्या अक्षरांचे तक्ते, एवढी सामुग्री पुरेशी होते. कोणत्याहि पद्धतीनें शिकविलें, तरी दीड दोन महिन्यांत मूळाक्षरांची चांगली ओळख होऊन सोपे शब्द व वाक्यें वाचतां येऊं लागतात. मूळाक्षरें शिकवितांना वस्तूंचे नांवाचें अद्याक्षर व वस्तूचें चित्र यांत साम्य असेल तर अक्षरें ध्यानांत राहण्यास मदत होते; म्हणून पुण्याचे साक्षरता-प्रसारक मंडळानें चित्ररूप अक्षरांच्या स्लाइड्स तयार केल्या आहेत व इतर जरूरीचें साहित्याहि आतां तयार होत आहे. नवीन वाचन पुस्तकांचा जितका भरणा होईल तितका प्रौढांत शिक्षणप्रसार होण्याचे दृष्टीनें इष्ट व आवश्यक आहे. गांवांत ठळक ठिकाणीं मोठ्या अक्षरांत गांवाची सामान्य माहिती

लिहून ठेवणें, झाडांस नांवांच्या पाट्या लावणें, शेतांच्या नांवांच्या पाट्या तयार करून घेणें, वगैरे प्रौढांचें लक्ष वेधणाऱ्या किती तरी गोष्टी योजक शिक्षकास करून घेतां येतील. सदीप व्याख्यानें, भजनी व सोप्या गाण्यांचीं ग्रामोफोन रेकॉर्ड्स यांचा उपयोग झाल्यास शिकणारांस फार उपयोग होतो.

१२. साक्षरताप्रसाराचे कार्याचा दुसरा प्रयोग येरवडा येथील तुरुंगामध्यें सुरू केला होता; तो साक्षरता-प्रसारक मंडळाच्या साहाय्यानें अत्यंत यशस्वी झाला. त्यामुळें इतर तुरुंगांतील निरक्षर कैद्यांनाहि साक्षरतेचें शिक्षण देण्याची योजना सरकारनें आतां सुरू केली आहे.

१३. निरक्षर प्रौढांची शिकण्याबद्दलची उदासीनता व प्रौढ शिक्षणाचे कामास लागणारा अवाढव्य खर्च या साक्षरताप्रसाराचे मार्गांत मोठ्या अडचणी आहेत. पगारी शिक्षकांवर अवलंबून हें कार्य तडीस जाईल हें शक्य दिसत नाहीं. उत्साही स्वयंसेवकांनीं विशेषतः विद्यार्थ्यांनीं आपल्या सुटीचे दिवसांचा या कामीं उपयोग करण्याचें ठरविल्यास मोठेंच काम होईल. तसेंच शाळांतील विद्यार्थ्यांनीं आपल्या घरांतील निरक्षर प्रौढांस साक्षर करण्याचें मनावर घेतल्यास हें काम प्रेमळपणानें व सुलभतेनें ते करूं शकतील असा अनुभव डॉ. लेबक यांचे पुस्तकांत* नमूद केलेला आहे.

या बाबतींत शिकविणारे विद्यार्थ्यांस योग्य मार्गदर्शन व प्रोत्साहन मिळण्याची आवश्यकता आहे. हा अभिनव प्रयोग आहे हें लक्षांत ठेवून त्यांत

* याबाबत लिहितांना डॉ. फ्रंक लेबॉक यांनीं केलेल्या प्रयत्नांचा उल्लेख करणें अगदीं आवश्यक आहे. त्यांनीं जगभर प्रवास करून निरनिराळ्या देशांत साक्षरताप्रसाराची काय प्रगति झालेली आहे याचा आढावा आपल्या Towards a literate world या पुस्तकांत घेतलेला आहे. फिलिपाइन्स-मधील मूर लोकांसाठीं नवीन लिपी तयार करून त्यांच्यांत साक्षरतेचा प्रसार कसा केला ही हकीकत व प्रौढांस साक्षर करण्याचे मार्गांतील अडचणी व त्या निवारण्याचे उपाय यांची उद्बोधक माहिती या पुस्तकांत दिलेली आहे. जगांतील प्रचलित लिपींची माहिती एकत्र करून प्रौढांस सुलभतेनें साक्षर करण्याचे दृष्टीनें तयार केलेले निरनिराळ्या लिपींतील मूळाक्षरांचे तक्तेहि या पुस्तकांत उद्धृत केले आहेत.

जरूर ती सुधारणा परिस्थितीप्रमाणें करण्याचें धोरण ठेवणें जरूर आहे. या प्रयोगाचे अनुभव प्रादेशिक विभागांत घेण्याची योजना होत असल्याचें कळतें. शिक्षकांच्या पगाराच्या खर्चाची बचत, प्रेमळ नातलगांकडून मिळणारी घरगुती शिक्षणाची सोय, स्वतंत्र जागा, दिवाबत्ती व खर्चाचें शिक्षणसाहित्य यांवर होणाऱ्या खर्चाची काटकसर वगैरे या योजनेंतील कांहीं फायदे निवळ काटकसरीचे दृष्टीनें इष्ट वाटतील असे आहेत हें सांगणें नकोच. या योजनेचा टिकाऊपणा व फलनिष्पत्ति याबाबत येणारे अनुभव शिक्षणप्रेमी लोकांस महत्त्वाचे व मार्गदर्शक होतील. ध्येयवादी मार्गदर्शक व श्रद्धेनें काम करणारे उत्साही अनुयायी यांचा जम बसून हा प्रयोग यशस्वी व अनुकरणीय ठरल्यास सर्वांसच आनंद होईल.

---

# शिक्षणक्रम आणि अभियुक्त भाषा

लेखक—श्रीकृष्ण नीलकंठ चाफेकर

'अभियुक्त' –अथवा सामान्यतः प्राचीन–भाषा म्हणजे संस्कृत, लॅटिन, ग्रीक आरबी, फारसी इत्यादि भाषा होत, हें केवळ मराठी जाणणाऱ्या वाचकांपैकीं बहुतेकांना ऐकून ठाऊक असेलच. कालदृष्टया प्राचीन असलेल्या या भाषांसंबंधीं केवळ 'प्राचीन' असा शब्द नेहमीं न वापरतां, त्यांचा जेव्हां 'अभियुक्त' ऊर्फ 'क्लासिकल' भाषा असा उल्लेख करण्यांत येतो, तेव्हां त्या शब्दानें– अर्वाचीन अथवा प्रचलित भाषांपेक्षां, या भाषांच्या अध्ययनांत, सर्वांगीण शिक्षण आणि व्यापक मनोविकास यांच्या दृष्टीनें असलेले कांहीं विशिष्ट गुण गर्भित रीतीनें सूचित करण्याचा उद्देश असतो. साधारण वरवर विचार करणाऱ्या माणसांस या भाषांच्या अध्ययनापासून भावी जीवनक्रमांत म्हणण्यासारखा व्यावहारिक फायदा होत असल्याचें ठळकपणें दिसून येत नाहीं; म्हणून लहानपणच्या—म्हणजे हायस्कूल दर्जाच्या—शिक्षणसंस्थांच्या आणि कॉलेज वगैरेसारख्या उच्च शिक्षणाच्या संस्थांच्या अभ्यासक्रमांतहि या 'प्राचीन' भाषांच्या अध्ययनाचा थोड्या मर्यादेपर्यंत तरी सक्तीचा समावेश करणें म्हणजे विद्यार्थ्यांवर निष्कारण व केवळ गतानुगतिकपणाचा द्योतक असा जुलूमच होय असें वाटतें. या भाषांच्या निदान प्राचीनत्वाच्या महत्त्वाकडे तरी लक्ष न देतां सरसहा 'मृतभाषा' या संज्ञेने त्यांची बोळवण करण्यांत येते. विशेषतः मौजेची गोष्ट ही कीं, सर्व प्राचीन-अर्वाचीन भाषांची आदि जननी म्हणून जरी सर्वांस कबूल नसली तरी निदान ज्येष्ठ भगिनी म्हणून मान्य असलेल्या आणि जिच्या अपूर्व व विशाल वाङ्मयाचे व तज्जन्य संस्कृतीचे संस्कार या क्षणापर्यंत देखील केवळ आमच्याच नव्हे तर जगांतील सुधारलेल्या देशांच्याहि विचारशक्तीवर आपला प्रभाव दाखवीत आहेत अशा संस्कृत भाषेसंबंधींच प्रथमपासून या संज्ञेचा विशेष कटाक्ष दिसून येतो. केवळ सध्यां जी भाषा बोलणारांची संख्या फारशी मोठी

नाहीं ती 'मृत' भाषा होय, असें 'मृत' भाषेचें सरसहा लक्षण करणें केव्हांहि सयुक्तिक ठरणार नाहीं. कारण 'संस्कृत' भाषा प्रत्यक्ष नेहमींच्या व्यवहारांत बोलण्या-चालण्याची भाषा ज्यांची आहे अशा लोकांची संख्या, आपल्या समाजाच्या संख्येच्या मानानें अशी फार अल्प दिसली तरी संस्कृत भाषेची आमच्या सर्वसाधारण समाजांतहि अजून पांडित्याच्या दृष्टीनें असाधारण प्रतिष्ठा आहे. शिवाय अजूनहि आमच्या सामाजिक, धार्मिक व आध्यात्मिक आचारविचारांच्या बाबतींत कोणत्याहि लौकिक गोष्टीची अथवा बौद्धिक तत्त्वाची कायदेशीर सयुक्तिकता संस्कृत भाषेतील 'वेदान्त व धर्मशास्त्र' विषयक वाङ्मयाच्याच अनुरोधानें निश्चित करण्यांत येते. या दोन्ही कारणांस्तव संस्कृत भाषेला तात्त्विकदृष्टया 'मृत' भाषा केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. उलट तिच्या व्यापक संस्काराच्या दृष्टीनें तिला 'जीवन्ततम'च भाषा असें म्हणणेंच वस्तुस्थितीला अनुरूप होईल. सुदैवानें पाश्चात्य धर्तीच्या संशोधन-क्षेत्रांत आणि भाषाशास्त्र व व्युत्पत्तिशास्त्र यांच्या संबंधाच्या चर्चेत पूर्वी 'मृत' भाषा या शब्दानें पूर्वी जो एकंदर 'अभियुक्त' भाषांविषयीं– मुख्यतः संस्कृत-विषयीं एक प्रकारचा प्रत्यक्ष अनादरसूचकच नसला तरी, प्रतिकूलतेचा अभिनिवेश दर्शविणारा भाव प्रचलित होता तो अलीकडे बराच कमी झाला आहे. जी भाषा कोणत्याहि समाजाची सरसहा बोलण्याची भाषा म्हणून सांप्रत काळापर्यंत अखंडितपणें प्रचलित असल्यानें तिच्यांत नवीन शब्दसंग्रह, नवीन वाक्प्रचार, वगैरेंची भर पडून तिचें प्रगमनशील स्वरूप प्रत्ययास येतें तशा तऱ्हेची प्रगमनशीलता 'संस्कृता'दि भाषांच्यासंबंधीं सध्यां दिसून येत नाहीं. संस्कृत भाषेचा शब्दसंग्रह, तिचें व्याकरण, विचाराविष्करणाची शैली इत्यादि गोष्टी स्थिर– निश्चल स्वरूपाच्या झाल्या आहेत. इतकाच आशय 'मृत' भाषा शब्दानें सूचित होतो, असें प्रतिपादण्याकडे आधुनिक व्युत्पत्ति व भाषाशास्त्रकोविदांचा कल दिसतो ही अभिनंदनीय गोष्ट आहे. 'मृत' भाषा हा शब्द संस्कृतादि भाषांसंबधानें विद्वान् भाषाशास्त्रज्ञांनीं आरंभीं कांहीं विशिष्ट व पारिभाषिक अर्थ दर्शविण्याच्या हेतूनें योजिला असला तरी, साधारण जनसमाजांत त्या शब्दानें, या श्रेष्ठ भाषेविषयीं एक प्रकारचा अनादरप्राय विरोधीभाव, उदासीनतेची व उपेक्षेची वृत्ति दृढमूल झाली यांत शंका नाहीं. त्यामुळें संस्कृतादि प्राचीन भाषांच्या थोड्याशा तरी प्राथमिक परिचयानें

ज्ञानाच्या खऱ्या व व्यापक स्वरूपाची जी कल्पना मनावर ठसावयास पाहिजे ती ठसली जात नाहीं. तसेंच बुद्धीला उत्तम चालना देणारा, विचारांत सुबुद्ध तार्किकपणा उत्पन्न करणारा व सूक्ष्मभेददर्शनाच्या शक्तिविकासानें शब्दयोजनेंत व भाषाशैलींत असंदिग्धार्थता, रम्यतापोषक विविधता व रसपूर्णता हे गुण उत्पन्न करणारा या दृष्टीनें जगांतील इतर भाषांपेक्षां संकृत भाषेचा जो अपूर्व व विस्मयोत्पादक बुद्धिकौशल्यदर्शक विशेष गुण म्हणून समजला जातो त्या संस्कृत व्याकरणाविषयींच नेमका असद्भाव व शिसारी जशी कांहीं परंपरागत वतनदारीच्या हक्कानें अथवा एकाद्या आनुवंशिक दुर्धर व्याधीच्या सूक्ष्म पण प्राणघातक जंतूंप्रमाणें पिढ्यानुपिढीच्या विद्यार्थिवर्गांत जन्मतः म्हणजे शिक्षणक्रमाच्या प्रारंभींच सूक्ष्म पण दृढ विरोधी संस्कार रूपानें निर्माण होतात! संस्कृतादि भाषांसंबंधीं 'मृत'भाषा हा शब्दप्रयोग वारंवार योजण्यांत आल्यामुळें अप्रत्यक्षतः आपल्या शिक्षणक्रमावर त्याचा किती अनिष्टकारक परिणाम झाला त्याचें थोडें दिग्दर्शन केलें.

या स्थितीमुळें, कोणत्याहि देशांतील अथवा राष्ट्रांतील खऱ्या शिक्षणाचें जें प्रमुख अंग अथवा ध्येय, म्हणजे त्या राष्ट्राचा स्वाभिमान व त्याची उज्ज्वल बौद्धिक व कर्तृत्वप्रधान परंपरा यांचा परिपोष व विकास करणारें असें असलें पाहिजे. या अर्धांगाला एक प्रकारें पक्षाघातच झाल्यासारखा आहे. त्याच्या परिहारार्थ व्यावहारिक उपाययोजना सुचविण्यापूर्वी, कांहीं एकदोन महत्त्वाच्या मुद्द्यांचें थोडेंसें सामान्य विवेचन करणें अवश्य आहे तें करतों. 'मृतभाषा' या शब्द-प्रयोगाची मीमांसा जशी वर केली तशीच 'क्लॅसिक' व क्लॅसिकल' ऊर्फ 'अभियुक्त' व 'शिष्ट' भाषा व ग्रंथ या संज्ञेचेंहि थोडक्यांत ऐतिहासिक समालोचन करणें इष्ट आहे. हे शब्दप्रयोग रोमन लोकांच्या राज्यकारभारविषयक संज्ञांवरून प्रथम अस्तित्वांत आले. रोमचा सहावा राजा सर्व्हियस टुलियस याच्या अमदानींत राज्यांतील एकंदर प्रजाजनांचे त्यांच्या जमिनी वगैरेच्या उत्पन्नानुसार पांच वर्ग (क्लास) करण्यांत आले. त्यांपैकीं पहिल्या प्रतीच्या उत्पन्नदारांच्या वर्गास 'क्लॅसिक्स'-सर्वश्रेष्ठवर्गीय असें नांव व अगदीं कनिष्ठ अथवा पांचव्या प्रतीच्या उत्पन्न-दारांच्या वर्गाचें नांव 'क्लॅसिकस्'. या संज्ञांचा पुढें वाङ्मयासंबंधीं लाक्षणिक उपयोग करण्याची पद्धत रूढ होऊन साधारण खिस्ती शकाच्या दुसऱ्या

शतकापासून म्हणजे ऑलिअयस गेलियस या ग्रंथकाराच्या वेळेपासून 'क्लॅसिक' म्हणजे 'प्रथम वर्गीय अथवा श्रेष्ठतम अत्युच्च प्रतीचा ग्रंथ' हा शब्द विशेष प्रचारांत आला व पुढें युरोपांतील इंग्रजी वगैरे अर्वाचीन वाङ्मयांत, 'क्लॅसिक्स' व 'क्लॅसिकल' हे शब्द विशेषतः लॅटिन-ग्रीक भाषेतील वाङ्मयासंबंधीं आणि त्यांतील श्रेष्ठतम प्रतीचे व शाश्वत महत्त्वाचे ग्रंथांसंबंधीं योजण्यांत येऊं लागले. व अजूनहि योजण्यांत येतात; परंतु पुढें 'क्लॅसिक' या शब्दाच्या लाक्षणिक अर्थाची व्याप्ति वाढत जाऊन हल्लीं 'क्लॅसिक' हा शब्द भाषाशैली, सुबोध व सोपपत्तिक विवेचन वगैरे वाङ्मयविषयक गुणांच्या दृष्टीनें अपूर्व वैशिष्टययुक्त, आकर्षक व शाश्वत महत्त्वाचा असा, कोणत्याहि विषयासंबंधीचा लहानमोठा ग्रंथ, अशा विशाल अर्थी वापरला जातो. याप्रमाणें 'क्लॅसिक', 'क्लॅसिकल' शब्दांचा थोडक्यांत इतिहास आहे.

यानंतर १८ व्या शतकाच्या अखेरीस व एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासून राज्यकारभाराच्या व इतर निमित्तांनीं हिंदुस्थानांत असलेल्या कित्येक ( सर वुइलियम जोन्स, कोलब्रुक इ० ) इंग्रज लोकांनीं संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें करण्याचा व तन्निमित्त संस्कृत भाषेचें सूक्ष्म व चिकित्सायुक्त अध्ययन करण्याचा उपक्रम केल्यामुळें, युरोपांतील विद्वान् लोकांना संस्कृत भाषेचा परिचय झाला व त्या योगानें तिकडील शब्दव्युत्पत्तिशास्त्र, भाषाशास्त्र वगैरे तुलनात्मक शास्त्रांस अपूर्व चालना मिळून त्याची झपाट्यानें प्रगति होऊं लागली. संस्कृत भाषेतील वेद, व्याकरण, षड्दर्शनें, काव्य, नाटकें व इतर विषयांवरील ग्रंथांचा मोठ्या आदरानें व आस्थेनें व्यासंग करणारे, किंबहुना संस्कृताचें अध्ययन हेंच जीवनकार्य समजून तत्प्रीत्यर्थ आपल्या सर्व आयुष्याचा त्या कामीं विनियोग करणारे मोक्षमुल्लर, पॉल डयूसन, मोनियर वुइलियम्सप्रभृति अनेक युरोपांतील जर्मन, इंग्रज, फ्रेंच, स्वीडिश वगैरे भाषा बोलणारे पंडित निर्माण होऊन ती परंपरा आजतागायत अखंडपणें व वाढत्या प्रमाणावर तिकडे चालू आहे. अशा प्रकारें पाश्चिमात्य देशांत संस्कृत भाषेचें अध्ययन जारीनें व सूक्ष्म चिकित्सापद्धतीनें सुरू झाल्यामुळें तिकडील शब्दव्युत्पत्तिशास्त्र व तुलनात्मक भाषाध्ययन शास्त्र वगैरे आधुनिक शास्त्रांतील कित्येक महत्त्वाच्या मूलभूत सिद्धांतांत व अनुमानांत वगैरे मोठीच आणि आमूलाग्र क्रांतिवजा स्थित्यंतरें व मतांतरें घडून आलीं. संस्कृत भाषेच्या प्राचीनत्वाविषयीं व तिच्यांतील गाढ

व्यासंग व असाधारण बुद्धिमत्तादर्शक, विशाल व विविध विषयात्मक वाङ्मय-संपत्तीविषयीं पाश्चात्य देशांतील मोक्षमुल्लरादि कित्येक प्रांजल व अभिनिवेश-रहित विद्वानांच्या मनांत निरतिशय व सकौतुक आदर उत्पन्न होऊन तद्द्वारा हिंदुस्थानवासीय लोकांविषयींहि निरपेक्ष आदर व सहानुभूति जास्त वाढत जाऊन कित्येक वेळां या सहानुभूतीचें सक्रिय प्रत्यंतर, हिंदुस्थानांतील राजकारणात्मक प्रकरणासंबंधीं क्वचित्प्रसंगीं ठळकपणानें दृग्गोचर होऊं लागलें. याचें सध्यांच्या हीरकमहोत्सवाशीं निकटपणें संबंध येऊन भिडणारें सर्व श्रुत उदाहरण म्हटलें म्हणजे, न्यू इंग्लिश स्कूलच्या आद्यस्थापकांपैकीं एक जे लोकमान्य टिळक त्यांची राजकीय बंदिवासांतून मुक्तता होण्याच्या बाबतींत व बंदिवासांतहि जास्त सुखकर रीतीनें वागविण्या वगैरेच्या बाबतींत मोक्ष-मुल्लरसारख्या संस्कृतज्ञ पंडितानें स्वयंस्फूर्तीनें केलेले प्रयत्न व खर्चिलेलें स्वतःचें वजन हें होय. असो !

तेव्हां ' अभियुक्त ' भाषा या शब्दप्रयोगांत कोणतें वैशिष्ट्य आहे व त्या वैशिष्ट्याचे कोणते दोन मुख्य घटक आहेत– ते म्हणजे कोणत्याहि विषयाचा व्यापक व सर्वांगीण आणि तुलनात्मक विचार करण्याची क्षमता अंगीं येणें, आणि एकंदरीनें मनाचा विकास होऊन तें उदार, सुसंस्कृत व समताबुद्धीनें सर्व-संग्राहक व सहिष्णु बनणें–या मुद्द्यांचा येथवर थोडक्यांत व जुजबी स्वरूपाचा विचार केला.

यापुढें नेहमींच्या रूढ शिक्षणक्रमांत या भाषांचा समावेश करावा कीं नाहीं व करावयाचा झाल्यास किती मर्यादेपर्यंत करावयाचा इत्यादि व्यावहा-रिक तपशिलाच्या गोष्टींचा विचार करूं व तत्संबंधाचे कांहीं उपायहि सुचवूं.

तत्पूर्वी रूढ शिक्षणक्रमांत 'अभियुक्त' भाषांचा समावेश करण्याचा प्रश्न मूळारंभीं कसा उत्पन्न झाला व शिक्षणक्रमांत कोठें तरी व कांहीं मर्यादेपर्यंत तरी समावेश अवश्य केलाच पाहिजे असें मत असणाऱ्यांची किंबहुना असा आग्रह धरणाऱ्यांची मनोभूमिका काय आहे तें नीट समजण्यासाठीं ऐतिहा-सिक समालोचन दृष्ट्या कांहीं लिहिणें अवश्य आहे. इंग्रजी अमलापूर्वी आपल्या देशांत, सर्वसाधारण व व्यक्तिशः 'शिक्षण' अशी कल्पनाच अस्तित्वांत नव्हती असें म्हटलें तरी चालेल. त्या वेळीं 'शिक्षण' म्हणजे 'ज्ञानार्जन' या अर्थाच्या

दृष्टीनें देशांतील सर्व जनतेचे दोन ठोकळ वर्ग कायमचेच पडलेले असत; व 'शिक्षण' अथवा 'ज्ञानार्जना'ची प्रथा ऊर्फ पद्धति ( System ) एकजिनसी स्वरूपाची असे. ही प्रथा ऊर्फ पद्धति म्हणजे **'पांडित्यांची'** होय. 'पांडित्य' याचा अर्थ कोणत्याहि विषयाचें अर्थात् 'ज्ञाना'च्या विभागाचें किंवा 'विद्येच्या' शाखेचें दीर्घावधियुक्त (ज्यालाच आपण नेहमींच्या भाषेंत १२ वर्षें किंवा एक 'तप' असें म्हणतों.) व प्रगाढ अध्ययन करून त्यांत निःसंदिग्ध नैपुण्य संपादन करणें. अर्थात् या पांडित्यांचा उपयोग देखील इतर व्यावहारिक व्यवसायांप्रमाणेंच अखेर द्रव्यार्जनाच्या व लौकिक योग-क्षेमाकडेच करावयाचा हें जरी खरें असलें, तरी त्यांत व्यावहारिक चातुर्यापेक्षां, बुद्धिप्राधान्याचा म्हणजे बुद्धीच्या उत्कर्षाचा व त्या उत्कर्षाचा प्रसंगोचित उपयोग करण्याच्या चातुर्याचाच मुख्य अंश असे. हा इतर व्यावहारिक व्यव-साय व पांडित्याची प्रथा यांत महत्त्वाचा फरक असे. त्यामुळें जनतेपैकीं जो वर्ग आनुवंशिक संस्कारानें बुद्धिप्रधान म्हणून गणला जात असे, तोच वर्ग ( म्हणजे अर्थात् ब्राह्मणजाति ) आणि त्यांतहि विशेषतः ज्या वर्गांतील ज्या विशिष्ट व्यक्तींना पूर्वागत आनुवंशिक क्रमाबरोबर स्वतःच्या बुद्धिमत्तेविषयीं आमविश्वास व बुद्धिप्रकर्ष ( अर्थात् 'पांडित्य' ) दाखवूनच, जगांत प्रतिष्ठा व तदनुषंगानें द्रव्यलाभ संपादन करण्याची सात्त्विक ईर्षा असे– त्याच व्यक्ति 'पांडित्याच्या' प्रथेकडे वळत. त्या वर्गांतील बाकीच्या व्यक्ति बुद्धिमत्तेचा साधा-रण प्रकार व पेशा जो 'गृहस्थाई–किंवा कारकुनी सरकारदरबारीं हुद्दयाची नोकरी करणें वगैरे–त्याचा अवलंब करून इतर जातींच्या व्यवसायी लोकांप्रमाणें आपला चरितार्थ चालवीत; व इतर व्यवसायी लोकांप्रमाणेंच आणि चरितार्थाच्या व्यवहाराला उपयोगी अशी जी ज्ञानसामग्री तीच पण कमीअधिक मानानें किंचित् निराळी व थोड्या उच्च दर्जाची संपादन करीत. म्हणजे लिहिणें, वाचणें, हिशोबठिशोब ठेवणें याखेरीज रामायण, महाभारत वगैरेसारखे पौराणिक व मनोरंजक असून शिवाय व्यवहारचातुर्य व लौकिक नीति यांच्या दृष्टीनेंहि उद्बोधक असणारे व मनावर उदात्त संस्कार उत्पन्न करणारे ग्रंथ आणि सर्वथा आध्यात्मिक व धार्मिक स्वरूपाचे इतर ग्रंथ यांचें अवलोकन, इतके सगळे भाग त्या वेळच्या सर्वसामान्य शिक्षणांत समाविष्ट होत असत. मात्र 'पांडित्य' हीच त्या वेळची एकमेव व खरी विद्येची प्रथा असल्यामुळें या

गोष्टींना 'शिक्षण' असें स्वतंत्र नांव देण्यांत येत नसे व या गोष्टींचा केवळ व्यावहारिक ज्ञानाच्या सर्वसामान्य सदरांत समावेश होत असे.

सारांश, इंग्रजी अंमलापूर्वी विद्याध्ययनाच्या दृष्टीनें 'पंडित' व 'विद्वान्' अर्थात् बुद्धिप्रधान ( व तदनुषंगानें 'बुद्ध्युपजीवी' ) वर्ग आणि इतर सर्वसामान्य लौकिकव्यवसायप्रवण लोक असल्यामुळें 'शिक्षणाच्या' बाबतींत त्यांच्यांत परस्पर ईर्षा-मत्सराचा संभवच नसे; किंवा बुद्धिमत्ता आणि आनुवंशिक संस्कार यांच्या कमीअधिकपणामुळें होणाऱ्या अपरिहार्य फरकामुळें, निरनिराळ्या दर्जाच्या बुद्धिमत्तेच्या लोकांना सर्वसामान्य असा एकजिनसी शिक्षणक्रम आंखण्याचीहि अडचण त्या काळीं उद्भवणें शक्य नव्हतें. या कारणामुळें सध्यांच्या काळीं व सध्यांच्या राजकीय व्यवस्थेच्या व सामाजिक जीवनाच्या दृष्टीनें, 'शिक्षणा'चा प्रश्न जसा सरसहा प्रत्येक व्यक्तीचा त्याप्रमाणेंच देशाचा, एकंदर राज्यकारभार तत्संबंधाचाहि असा व्यापक स्वरूपाचा व जिव्हाळ्याचा आणि म्हणूनच जास्त गुंतागुंतीचा प्रश्न होऊन बसला आहे, तसा तो पूर्वीच्या काळीं मुळींच नव्हता. आपल्या देशांत हा शिक्षणाचा प्रश्न दुहेरी बिकट झाला आहे. एक तर इंग्रजी अमलापूर्वी आपल्या देशाच्या स्थितीची सध्यां जशीं आहेत तशीं– राजकीय व सामाजिक अशीं दोन भिन्न अंगें नव्हतीं. किंबहुना खऱ्या स्वतंत्र देशांत त्या देशाचें राजकारण अथवा राजकीय स्थिति म्हणजे त्या देशांतील समाजाचेंच व्यापक दृष्टीनें सामाजिक कल्याण-अकल्याण अशाच स्वरूपाचें असल्यामुळें म्हणजे दोन्ही एकरूपच असल्यामुळें तेथें अशी दुहेरी भिन्नता उत्पन्नच होऊं शकत नाहीं. या दृष्टीनें इंग्रजांपूर्वी व पेशवाईपूर्वीहि मोगलादिकांची सत्ता ही केवळ, जेते या नात्यानें वर्चस्वलालसा व ऐश्वर्योपभोगप्रियता अशाच स्वरूपाची असल्यामुळें बाह्यात्कारी देश परसत्तेखालीं असूनहि त्या वेळच्या सर्वसाधारण जनतेच्या जीवनदशेंत राजकीय हितानहित व सामाजिक हितानहित अशी द्विविधता उत्पन्न झालेली नव्हती.

परंतु इंग्रजी अमलाच्या अनुषंगानें मात्र ही द्विविधता हिंदुस्थानांतील सर्व लोकांच्या सामुदायिक जीवनांत उत्पन्न झाली; व देशस्थितीच्या इतर बाबतींपेक्षां 'शिक्षण पद्धती'च्या बाबतींत ती प्रथमतः शिरली व जास्त जाणवूं लागली. याचें कारण उघड आहे. इंग्रजांच्या पूर्वीच्या अमदानींत 'शिक्षणा'च्या

कल्पनेच्या दृष्टीनें, सर्वसाधारण जनतेचा बहुंश एकीकडे व त्यांतीलच 'पांडित्य'-प्रथानुसारी ऊर्फ विद्याव्यासंगी यांचा लहान व निवडक वर्ग निराळा एकीकडे, अशी स्थिति होती हें दर्शविलेंच आहे. परंतु इंग्रजी अमलांत रूढ झालेल्या शिक्षणपद्धतीनें एकीकडे 'ज्ञानार्जन' ही सरसहा प्रत्येक व्यक्तीच्या हक्काची बाब मानण्यांत येऊं लागली. ही गोष्ट कांहीं अंशीं स्तुत्य व योग्य आहे यांत शंका नाहीं. मात्र या एकदेशीय स्तुत्य गोष्टीबरोबरच दुसरी अनिष्ट गोष्ट ही उद्भवली कीं, त्या हक्काच्या कल्पनेचा विचार करतांना खऱ्या ज्ञानार्जनाचें किंवा विद्याव्यासंगाचें जें उच्च व द्विविधरूप ध्येय म्हणजे ( १ ) सर्वांगीण अध्ययन अथवा शिक्षण व ( २ ) **व्यापक मनोविकास**, त्याची आणि बुद्धिप्राधान्याच्या किंवा ईश्वरदत्त बुद्धीच्या कमीअधिक अनुकूलतेच्या दृष्टीनें हें ध्येय साधण्याइतकें शिक्षण घेण्याचा प्रत्येक व्यक्तीचा आवांका अथवा वकूब–सामर्थ्य–यांची संगति कशी लावावयाची अथवा लावतां येईल, या गोष्टीकडे जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. किंबहुना त्या गोष्टीकडे दुर्लक्षच झालें; आणि तसें होणें अगदीं साहजिक होतें. कारण इंग्रजी भाषेच्या द्वारें आणि त्या वेळीं पाश्चात्य देशांतील विश्वविद्यालयांत व दुय्यम शिक्षणाच्या शाळांत रूढ असलेल्या धर्तीवरच इकडचा शिक्षणक्रम सुरू करणें एवढाच हेतु आधुनिक अर्थात् पाश्चात्य धर्तीच्या शिक्षणकोविदांच्या डोळ्यां-समोर होता. तेव्हां तिकडची मातृभाषा इंग्रजी हीच या देशांतील मातृभाषांच्या ऐवजीं इकडील शिक्षणक्रमांतील सरसहा एकच मातृभाषा समजली गेली ( जरी इंग्रजी-मराठी किंवा दुसरी एतद्देशीय भाषा, अशा जोडशिक्षणक्रमाच्या शाळांत देशी मातृभाषांचें आणि आरंभीच्या कांहीं काळापर्यंत विश्वविद्या-लयाच्याहि एम्. ए., बी. ए., परीक्षांत मराठी भाषेचें अस्तित्व व तिचा प्रवेश होता. परंतु विश्वविद्यालयाच्या अभ्यास-क्रमांत मातृभाषांचा सरसहा प्रवेश होण्याचा इतिहास स्वतंत्रच विषय असल्यामुळें त्याचा प्रस्तुत लेखांत ओझरताहि परामर्श घेणें शक्य नाहीं. ); आणि तिकडच्या शिक्षणक्रमांत ज्याप्रमाणें लॅटिन व ग्रीक वगैरेसारख्या 'अभियुक्त' भाषांचा समावेश दुसरी भाषा या नात्यानें करण्यांत येत असे, त्याचप्रमाणें इकडच्याहि दुय्यम शाळां-च्या व विश्वविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत लॅटिन व ग्रीक भाषांच्याबरोबर साहजिकच संस्कृत भाषेस स्थान देण्यांत आलें. त्यामुळें इकडील इंग्रजी शिक्षण-क्रमाच्या पहिल्या २५–३० वर्षांच्या काळांत संस्कृत भाषेच्या कठिणपणाचा

विचार घेण्यापेक्षां, इंग्रजी अमदानींत व्यावहारिक प्रतिष्ठा आणि तज्जन्य भावी अर्थलाभ किंवा केवळ मनुष्यस्वभावानुरूप नुसती नावीन्याची आवड अशा कोणत्या तरी भावनेनें तत्कालीन पदवीधरांत लॅटिन ही दुसरी भाषा (ग्रीक भाषा घेणारेहि क्वचित् असत) घेतलेल्या लोकांची संख्या पुष्कळच मोठी असे. त्या वेळच्या सरकारी शाळेंतील पदवीधर शिक्षकवर्गापैकीं किती तरी लोकांची व इतरहि कॉलेज शिक्षणपर्यंत गेलेल्या दुसऱ्या पुष्कळ लोकांची दुसरी भाषा लॅटिन व क्वचित् ग्रीक वगैरेहि असल्याचें मला स्वतःला माहीत आहे. अशी जरी स्थिति होती तरी संस्कृत भाषेचें सर्वश्रेष्ठत्व या देशांत तर, पहिल्यापासून मान्य होतें तें तसेंच अबाधित राहिलें. किंबहुना मागें एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें १९ व्या शतकाचे आरंभीं संस्कृत भाषेच्या अध्ययनाला पाश्चिमात्य देशांतहि प्रतिष्ठा व चालना मिळालेली असल्यामुळें, साहजिकच इकडच्या विश्वविद्यालयांतहि संस्कृत भाषेचें स्थान प्रथमपासूनच मानाचें, अग्रपंक्तीचें व लोभनीय शिष्यवृत्त्या-पारितोषिकें वगैरे-मुळेंहि सर्व प्रसिद्धीकारक व आर्थिक लाभप्रद असें राहिलेलें आहे. या आनुषंगिक कारणांखेरीज संस्कृत भाषेविषयीं साधारण जनतेंत स्वाभिमानाची व आपले-पणाची निरतिशय व निरपेक्ष अशी भावना पहिल्यापासून प्रबल असल्यामुळें व पुढें तिला नवीन धर्तीच्या राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें पुष्टि मिळत गेल्यामुळें 'दुसरी भाषा' या नात्यानें लॅटिन, ग्रीक इत्यादि भाषांचें प्रस्थ अल्प काळांत आपोआप कमी होत गेलें आणि संस्कृत भाषेचें स्वयंसिद्ध, एकमेव व श्रेष्ठतमतेचें स्थान कायमचें कायम राहिलें. सारांश,आधुनिक शिक्षणक्रमाच्या पहिल्या ३०।४० वर्षांत तरी दुय्यम शाळांतील व विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रमांत संस्कृतादि अभियुक्त भाषांचा अवघडपणा किंवा दुसरी भाषा या नात्यानें त्यांची आवश्यकता वगैरेसारखे प्रश्न साधारण विद्यार्थिवर्गाच्या, शिक्षणप्रेमी व शिक्षणकोविदांच्या ध्यानीं, मनीं, स्वप्नींहि नव्हते असें म्हटलें तरी चालेल. उलट 'अभियुक्त भाषां'च्या-विशेषतः संस्कृत भाषेच्या अध्ययनापासून होणाऱ्या विशिष्ट, अनन्यसाधारण व व्यापक स्वरूपाच्या शाश्वत सुपरिणामांच्या दृष्टीनें 'अभियुक्त भाषांचें' अध्ययन हें खऱ्या उदार (लिबरल) शिक्षणाचें एक महत्त्वाचें व अवश्य अंग होय: हीच समजूत सर्वसाधारण दृढमूल असे; त्यामुळें मॅट्रिकचे व प्रीव्हियसपासून बी. ए. च्या परीक्षांचें अभ्यासक्रम जे एकदां पहिल्यानें

निश्चित करण्यांत आले ते मोठ्या सुज्ञपणानें व दूरवर दृष्टीनें जसेच्या तसे किती तरी वर्षे-- पदवीधरांच्या निदान ३।४ पिढ्यापर्यंत तरी— अबाधितपणें चालू होते. आणि सर्वसाधारण मनुष्यस्वभावाच्या कुरकुरेपणाच्या वृत्तीस, वरवर विचार करणारांकडून या अभ्यासक्रमाविषयींहि जरी मधूनमधून तक्रारी ऐकूं येत, तरी त्या अभ्यासक्रमाचें ज्यांनीं सूक्ष्म व तुलनात्मक निरीक्षण केलें होतें व ज्यांच्या त्या अभ्यासक्रमाचे स्वतःच्या अनुभवानें सुपरिणाम झाल्याचें प्रत्ययास येत गेलें अशा लोकांचे त्या वेळच्या अभ्यासक्रमाच्या व्यापक व सर्वांगीण स्वरूपाबद्दल व व्यावहारिक उपयुक्ततेबद्दल अजून तरी चांगलेंच मत असल्याचें दिसून येतें. अर्थात् अशी ही बाह्यात्कारी स्थिरतेची स्थिति अनादिकाला-पर्यंत अबाधित चालू राहणें शक्य नव्हते. कारण खुद्द या देशांतीलच विश्व-विद्यालयें व शिक्षणसंस्था किंवा सर्वसामान्य शिक्षणाचीं ध्येयें यांची गोष्ट कशाला ? विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकापासून—आणि १९१४ ते १९१९ च्या महायुद्धाच्या कालानंतर तर विशेषच—जगांतील सर्वसामान्य मानव-जातीच्या बौद्धिक विचारांच्या क्षेत्रांत, त्याचप्रमाणें जगांतील सर्व राष्ट्रें व राजकीय शासनसंस्था आणि पाश्चिमात्य देशांतील सुसंघटित, सुधारलेले, प्रगमनशील म्हणविणारे निरनिराळे बहुसंख्याक समाज यांच्या जीवन-प्रवाहांत, व्यावहारिक कार्यक्रमांत व अंतिम ध्येयदृष्टींत इतकीं कांहीं लागो-पाठ मतपरंपरा, अकल्पित व विलक्षण स्थित्यंतरें घडून आलीं व अजूनहि प्रतिक्षणीं घडत आहेत, कीं त्यांचा नुसता संगतवार चित्रपट डोळ्यांपुढें आणणें हें मोठ्या विचारी मनुष्याच्या आकलनशक्तीस देखील फारच दुर्घट काम आहे. तेव्हां सध्यां सर्व जगभर अहोरात्र दुमदुमत व अखंड झडत असलेल्या विश्वव्यापी घडामोडींच्या नगाऱ्यापुढें शिक्षणाचीं ध्येयें व शिक्षण-क्रमांतील फेरफार वगैरे उदात्त पण मृदुमंजुळ वाद्यांचे नाद तात्पुरते लुप्त झाल्यासारखे व्हावेत यांत मुळींच आश्चर्य नाहीं.

तथापि, अनेकविध व लहान मोठ्या कानठळ्या बसविणाऱ्या कर्कश नाद-ध्वनींनीं व गिरण्यादिकांच्या सतत थरथरणाऱ्या यांत्रिक रचनापूर्ण स्थानांतील कोलाहलानें मुंबईसारखें अफाट वस्तीचें शहर अहोरात्र अस्वस्थ व गजबज-लेलें असलें तरी, निरनिराळीं ऑफिसें, बँका, चाळी, चाळींतील खुराडेवजा

खोल्यांतून खचून भरलेलीं बिऱ्हाडें इत्यादि ठिकाणच्या व्यक्ति आपापलीं कामें पूर्ण एकाग्रतेनें व निर्वेधपणें करीतच असतात हें आपण प्रत्यक्ष पाहतोंच.

याच न्यायास अनुसरून आपल्या इलाख्याच्या शिक्षणविषयक इतिहासाचें समालोचन आपण या कालापर्यंत म्हणजे २०व्या शतकाच्या प्रथम दशकापर्यंत, किंबहुना प्रथम पादापर्यंत आणून ठेवलें आहे. त्याच्या पुढील काळांत शिक्षण-क्रमाचें स्थान कोणत्या स्वरूपाचें होत गेलें व त्यास बाह्य अथवा परिस्थिति-विषयक कोणकोणतीं कारणें निमित्तरूप झालीं यांचा थोडक्यांत आढावा घेऊं. तसेंच 'अभियुक्त भाषां'च्या–विशेषतः संस्कृत भाषेच्या– अध्ययनासंबंधीं कोणते कमी-अधिक ठरीव ठशाच्या स्वरूपाचे आक्षेप घेण्यांत येतात त्यांचा ओझरता निर्देश व स्थलावकाशानुरूप संक्षेपयुक्त निरसन करूं व शेवटीं संस्कृत भाषेचा समावेश दुय्यम शाळांतील अभ्यासक्रमांत सध्यांपेक्षां जास्त क्रमशः व योग्य प्रमाणांत करून त्याची व्यावहारिक उपयुक्तता कशी वाढवितां येईल यासंबंधीं कांहीं व्यावहारिक सूचना सादर करून या लेखाची परिसमाप्ति करूं.

इंग्रजी धर्तीचें शिक्षण दुय्यम शाळांत व विश्वविद्यालयांत सुरू झाल्यापासून जवळजवळ ३०।४० वर्षेपर्यंत अभियुक्त भाषांच्या– विशेषतः संस्कृताच्या कठिण-पणाबद्दल विशेषशी कुरकूर अथवा तिच्याविरुद्ध प्रतिक्रियात्मक चळवळ दृग्गो-चर होत नव्हती हें नुकतेंच वर सांगितलेंच आहे. परंतु त्यानंतर विश्वविद्या-लयाच्या अभ्यासक्रमांत विषयांचें वर्गीकरण, (उदाहरणार्थ, इंग्रजी इतिहास स्टुअर्ट घराण्यानंतरच्या कालापासून सुरू करणें; हिंदुस्थानचा इतिहास मोग-लांच्या सत्तारंभापासून सुरू करणें; भूगोलाचें अधिकाधिक माहात्म्य व कार्यक्षेत्र वाढविणें इत्यादि) निरनिराळ्या परीक्षांच्या–विशेषतः बी. ए., एम्. ए. व दोन्ही एल्एल्. बी. यांच्या प्रश्नपत्रिकांच्या व अभ्यासांच्या पुस्तकांची संख्या कमीअधिक करणें– सारांश, विश्वविद्यालयाच्या एकंदर कारभारांत व अभ्यास-क्रमासंबंधाच्या दृष्टिकोणांत फारच प्रतिक्रियात्मक स्थित्यंतरें होऊन सरकारपक्ष व लोकपक्ष यांच्यांतील तीव्र मतभेददर्शक झगडे व खडाजंगी वादविवाद, क्रिया-प्रतिक्रिया यांची कांहीं काळपावेतों एकच दंगल माजून राहिली. याचीं ठोकळ उदाहरणें म्हटलीं म्हणजे लॉर्ड कर्झन यांच्या अमदानींत झालेल्या विश्वविद्यालयाच्या कायद्यासंबंधीं माजलेलीं रणें. आपल्या इलाख्याचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क, लॉर्ड सिडनहॅम प्रभृति यांच्या कारकीर्दींतील युनि-

व्हॉर्सिटयांच्या कारभारविषयक झालेल्या खळबळी, व तत्संबंधीं मरहूम सर फेरोजशहा मेहेता, कै. नामदार गोखले, कलकत्त्याचे व्हाइस चॅन्सेलर सर अशुतोष मुकर्जी इत्यादि लोकपक्षीय पुढाऱ्यांनीं बजाविलेल्या स्वाभिमानपूर्ण, बाणेदार व तेजस्वी प्रतिकाराची अपूर्व मौल्यवान् कामगिरीबद्दल गोष्टींच्या रूपानें भारतीय विश्वविद्यालयांच्या व्यापक इतिहासांतील अनेक संस्मरणीय प्रसंगांच्या हकीकती विपुलपणें मिळण्यास रख्या आहेत. परंतु त्यांचा संबंध प्रस्तुत लेखांतील विषयाशीं येत नाहीं म्हणून संगतवार समालोचनाच्या दृष्टीनें या भागाचा नुसता निर्देश करून पुढील विवेचनाकडे दृष्टि फिरविणें इष्ट आहे. असो.

या अवधींत संस्कृत भाषेच्या तुलनात्मक अध्ययनाची, निरनिराळ्या भाषाविषयक संशोधनाची आणि एकंदरपणें प्राचीन समाज व त्यांच्या भाषा, संस्कृति इत्यादिसंबंधीं ऐतिहासिक चिकित्सात्मक निरीक्षणाची दृष्टि व्यापक होत चालल्यामुळें संस्कृतच्या धाकट्या भगिनी शोभणाऱ्या अशा पाली, अर्धमागधी वगैरे दुय्यम भाषांना संस्कृत भाषेइतकेंच स्वतंत्र महत्त्व व पृथक् अस्तित्व प्राप्त होऊन त्यांचाहि समावेश विश्वविद्यालयाच्या भाषाविषयक अभ्यासक्रमांत तुल्य योग्यतेनें करण्यांत आला; व शिवाय जैन वाङ्मय, भारतीय संस्कृति इत्यादि अंशरूप व समग्ररूप नवे नवे विषय अस्तित्वांत आले. त्यामुळें आदिजननी या नात्यानें संस्कृत भाषेचा मानार्ह वडीलपणा व तिच्या सर्वोपयोगी कार्यक्षमतेबद्दलचा आदर अविचलित राहूनहि धाकट्या भगिनींच्याच बाललीलांचें कोडकौतुक करण्याची व त्यांचे लाड पुरविण्याची आणि शिवाय जोडीला जर्मन व फ्रेंच या परकीय देशांतील चुलत बहिणींनाहि अवसर देण्याची वृत्ति आधुनिक विद्वद्वर्गामध्यें जास्त वाढत्या प्रमाणावर दिसून आली व 'यद्यदाचरति श्रेष्ठः' या श्रीगीतावचनाप्रमाणें विद्वद्वर्गांतील प्रवृत्तीचा आनुषंगिक परिणाम म्हणून साधारण विद्यार्थिवर्गाचीहि संस्कृतापेक्षां पाली, अर्धमागधी, जर्मन, फ्रेंच इ० भाषा घेण्याचीच प्रवृत्ति अलीकडे थोडीबहुत जास्त वाढत असल्याचें दिसून येतें.

अर्थात् हें विवेचन कोणत्याहि प्रकारें वरील स्थित्यंतराबद्दल नापसंती, अथवा निषेध दर्शविण्याच्या हेतूनें लिहिलेलें नसून केवळ ऐतिहासिक समालोचनाच्या ओघानें व ओघापुरतेंच तें विवेचन आहे ही गोष्ट येथें मुद्दाम नमूद करणें आम्हांस

इष्ट दिसतें. म्हणजे भलताच व निष्कारण गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव उरणार नाहीं. उलट कोणत्याहि बुद्धिप्रधान समाजाच्या विद्याविषयक इतिहासांत प्रगतीचा विकास दर्शविणाऱ्या व साहजिक क्रमानें घडून येणाऱ्या स्थित्यंतराविषयीं कोणाहि समंजस माणसाच्या मनास केव्हांहि विषाद न वाटतां उलट आनंदच वाटेल व वाटला पाहिजे असें आमचें प्रांजळ व ठाम मत आहे.

संस्कृत भाषेच्या झालेल्या स्थित्यंतराच्या इतिहासांत वरील भाषांच्या प्रवेशाखेरीज दुसरें, विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांतील महत्त्वाच्या स्थानाच्या दृष्टीनें व्यापक व महत्त्वाचें स्थित्यंतर म्हटलें म्हणजे विश्वविद्यालयाच्या ( व तदनुषंगानें दुय्यम शाळांतील वरच्या वर्गांत—म्हणजे ६।७ व्या यत्तांत ) सर्व परीक्षांच्या अभ्यासक्रमांत देशी अथवा मातृभाषांचा सरसहा व समयोग्यतेचा प्रवेश होण्यासंबंधीं १९ व्या शतकाच्या शेवटच्या दशका दोन दशकांपासून २० व्या शतकाच्या ३।४ दशकांपर्यंत एकसारखा नेटानें व निकरानें लढविण्यांत आलेला प्रदीर्घकालीन झगडा होय. या बाबतींतील एकंदर समरप्रसंगाच्या महत्त्वाच्या दृष्टीनें आणि त्यासंबंधीं कै. न्या. रानडे यांच्यासारख्या महाधोरणी, महागंभीर, अखंडोत्साही व स्वतः अविश्रांत परिश्रम करणाऱ्या सेनापतींच्या धुरंधरत्वाखालीं मुंबई विश्वविद्यालयाच्या सभागृहरूपी रणक्षेत्रावर—धर्मक्षेत्रावर — झालेल्या अनेक निकराच्या चकमकींत त्यांच्या दिसून आलेल्या अभंग, धीमेपणाच्या व अविचल ध्येयनिष्ठादर्शक कार्यास शौर्याच्याहि दृष्टीनें या सर्व युद्धप्रसंगांस इंग्रजी इतिहासांतील 'सप्तवार्षिक युद्ध' किंवा 'त्रिंशद्वार्षिक युद्ध' किंबहुना 'शताब्दीय युद्ध' सुद्धां अथवा आपल्या मराठेशाहीच्या इतिहासांतील 'संग्रामचतुष्टय' असें कांहीं भव्य व उज्ज्वल नांव दिल्यास कोणत्याहि प्रकारें अतिशयोक्ति होणार नाहीं; किंबहुना भारतीय इतिहासाशीं -- विशेषतः मराठेशाहींतील इतिहासाशीं— या सगळ्या वृत्तांताचें सहजसादृश्यहि कल्पिण्यास हरकत नाहीं. भारतीय युद्धांत इतर सर्व मोठमोठ्या सम्राटांचा, मांडलिकांचा पराभव केल्यावर अखेर ज्याप्रमाणें खुद्द चक्रवर्ति कौरवकुळांतील चुलतभावांतच परस्परयुद्ध जुंपलें, त्याप्रमाणें विश्वविद्यालयांच्या कारभारांतील पुष्कळ इतर बाबतींविषयीं सरकारशीं दोन हात करून त्यांत बरेंच यश संपादन केल्यावर मातृभाषांसंबंधाच्या

ळ्यांत मात्र इंग्रजी भाषाभिमानी ( इंग्रज सभासदांप्रमाणें कांहीं देशी सभासद) आणि संस्कृत भाषाभिमान्यांपैकीं कांहीं अंश एकीकडे आणि बिचारे केवळ एकटे असहाय सत्पक्षीय मराठीप्रभृति देशी भाषाभिमानी दुसरीकडे असे गट कांहीं काळ पडले होते !

संस्कृत भाषेची मातृतुल्य श्रेष्ठ योग्यता आणि देशी भाषांच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें, संस्कृत भाषेची निर्विवाद व स्वयंसिद्ध असलेली उपयुक्तता मातृभाषाभिमानी लोकांसहि सर्वथा मान्य असून व ही गोष्ट त्यांपैकीं बहुतेकांनीं अनेकदां जाहीर रीतीनें व चर्चाप्रसंगीं उद्घोषित केली असतांहि मराठेशाहींतील शूर वीर, उदारहृदयी पण नाना फडणीसप्रभृति शहाण्या व पेशवाइनिष्ठ निरपेक्ष मुत्सद्द्यांसंबंधीं 'संशयाच्या कल्लोला'स किंवा मनांत थारा देणाऱ्या किंवा शत्रूवरील मोहिमांच्या भराऱ्यांप्रमाणें स्वजनांबद्दलच्याच भेदबुद्धीच्या भराऱ्यांत गुंग होणाऱ्या भोळ्या वीराग्रणी राघोबादादाप्रमाणें कित्येक संस्कृताभिमानी लोकांच्या मनांत अशी दहशत वागत असल्याचें त्या वेळीं दिसून येत होतें कीं, विश्वविद्यालयांत देशी भाषांचा सरसहा समान योग्यतेचा प्रवेश झाल्यास संस्कृत भाषेचें महत्त्व व तिची प्रतिष्ठा कमी होईल. परंतु सुदैवानें ही दहशत संस्कृत वाङ्मयांतील सुप्रसिद्ध 'रज्जुसर्प'न्यायानें सर्वथा निराधार व स्वतःच्याच घाबरटपणानें उत्पन्न झालेली होती, असें आतां स्वानुभवानेंच सर्व समंजस संस्कृताभिमानी लोकांच्या प्रत्ययास आलें आहे व त्यांच्याच सक्रिय सहानुभूतीनें सर्व मातृभाषांना पोक्त मातेच्या, प्रौढ व स्वतंत्र संसार थाटलेल्या प्रेमळ कन्यांप्रमाणें समान योग्यता प्राप्त होऊन, त्यांचा उत्तरोत्तर उत्कर्षच होत आहे. तेव्हां यासंबंधीं 'अंतिं गोड तें सारें गोडाचि' या उद्गारांखेरीज अधिक तें काय लिहावयाचें ?

येथपर्यंत केलेलें विवेचन ऐतिहासिक समालोचनाच्या दृष्टीनें व केवळ तात्त्विक विधानांच्या रूपानें केलें. आतां प्रस्तुत विषयाच्या 'सांगतासिद्ध्यर्थ' कांहीं व्यावहारिक विवेचन करणें आहे त्याकडे वळतों.

वर जसा केवळ अभ्यासक्रमाचे विषय म्हणून संस्कृत, मराठीप्रभृति भाषांचा विचार केला तसाच आतां, हल्लींच्या जगांतील एकंदर परिस्थितीच्या दृष्टीनेंहि त्यांच्याकडे पाहूं. वर एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें, वेळोवेळीं अभ्यासक्रमांत योग्य ते फेरफार करणें, इतकेंच 'शिक्षणा'चें स्वरूप सध्या

राहिलेलें नाहीं. स्वाभाविक ईश्वरदत्त बुद्धीची थोडीफार अनुकूलता असलेल्या कांहीं विशिष्ट व्यक्तींनींच, भावी योगक्षेमाच्या दृष्टीनें असला तरी, मुख्यतः मनाच्या सुसंस्कृततेसाठींच—मन 'उदार' होण्यासाठीं व निरपेक्ष ज्ञानार्जनाचें उदात्त ध्येय मनांत स्वीकारावयाची 'बुद्धिप्रधान अध्ययनाची प्रथा' हा शिक्षणाचा पूर्वापार—अनादि कालापासून चालत असलेला अर्थ, हल्लींच्या तीव्र व उग्र जीवनकलहाच्या व केवळ व्यावहारिक उन्नतीचें ध्येय असलेल्या काळांत बहुतेक जुनापुराणा, मागें पडल्यासारखा किंबहुना, नामशेष झाल्यासारखा झाला आहे. ही गोष्ट हल्लींच्या काळीं कोणाच्या मुद्दाम ध्यानांत आणून द्याव-वास हवी असें नाहीं. तसेंच, केवळ बुद्धिप्रधान व्यासंगानें अथवा व्यवसायानें किंवा उच्चतर, उदार व निरपेक्ष ज्ञानार्जनानेंच, समाजांतील कोणतीहि व्यक्ति जास्त "शिष्ट, विशिष्ट" होते. अथवा तिलाच तशा तऱ्हेचा श्रेष्ठ मान दिला पाहिजे, ही कल्पनाहि सरकारकडून जप्त होणाऱ्या पुस्तकांप्रमाणें, आतां साम्य-वादी, समाजवादी, औद्योगिक जीवनवादी, इत्यादि 'नानावादी' लोकांच्या दृष्टीनें भूतकालीन इतिहासजमा केव्हांच झाली आहे! तेव्हां शिक्षणाविषयींची जी कल्पना कांहीं काळापूर्वी केवळ प्राथमिक अथवा निर्वाहसाधनरूपच अशी व कनिष्ठ प्रतीची मानण्यांत येत असे त्या 'र' कारात्मक कल्पनेला—दि थ्री 'आर्' सना (लेखन, वाचन व सामान्य अंकगणित या त्रयीस) भिकाऱ्याला अकल्पित श्रीमंती प्राप्त व्हावी त्याप्रमाणें हल्लींच्या जगाच्या सामुदायिक किंवा समाजसंघटनात्मक (यांत राजकीय दृष्ट्याहि समाजसंघटनेचा—प्रतिनिधि, मतदार-संघ वगैरे कल्पनांचा समावेश होतो), विचारक्षेत्रांत अपूर्व महत्त्व व प्राधान्य प्राप्त झालेलें दृग्गोचर होतें. अर्थात् कालचक्राच्या नेमिक्रमरूपी फेऱ्यांत ज्या गोष्टी वर येणें अपरिहार्य असतील, त्या आल्या तर त्याबद्दल—वर एके-ठिकाणीं (संस्कृत व इतर तज्जन्य भाषा यांच्या संबंधाच्या तुलनात्मक विवेचना-च्या अनुषंगानें) म्हटल्याप्रमाणें त्यांत विषाद करण्याचें कारण नसून एका जुन्या स्तोत्रांत मागणें मागितल्याप्रमाणें जर प्रसंगविशेषीं एकादा 'दरिद्री' परमेश्वराच्या कृपाप्रसादानें अकल्पित रीतीनें 'भाग्यवंत' झाला तरी ती आनंदाची व अभिनंदनीयच गोष्ट होय.

सहेतुकपणें घेतलेला हा दृष्टान्त आणखी थोडा पुढें वाढविला कीं, त्यांतच प्रस्तुत लेखांतील विषयाचें सारसर्वस्व आपोआप व्यक्त होतें तें असें—

भिकाऱ्याला श्रीमंती प्राप्त झाली कीं, श्रीमंतीच्या सहजोत्पन्न आविर्भावामुळें बोलण्याचालण्यांत, पोषाखांत, आचारविचारांत, संभाषणाची सभ्यता, प्रौढता, सुसंस्कृतता, वर्तनाची गंभीरता इत्यादि बाबतींत खऱ्या खानदानी व पिढीजाद श्रीमंताच्या तोडीचें व्हावें अशी त्याच्या ठिकाणीं आपोआप उत्कंठा व आतुरता उत्पन्न होते व तो तिच्या पूर्ततेच्या प्रयत्नास लागतो व थोड्याबहुत प्रयासानें व बरेच दिवसांच्या काळजीपूर्वक दीर्घाभ्यासानें अखेरीस त्याच्या अंगीं—विशेषतः त्याच्या मुलाबाळांच्या ठिकाणीं—खऱ्या श्रीमंतीचें तेज व वर्तनांतील औदार्य व्यक्त होऊं लागतें. अकल्पित भाग्य प्राप्त झालेल्या भिकारी म्हणा, गांवढळ म्हणा, माणसाची आपल्या नूतन पदवीला साजेशी योग्यता व पात्रता संपादन करण्यासाठीं कशी सारखी धडपड चालू असते व त्याची कशी सारखी तारांबळ उडत असते, हें सुप्रसिद्ध फ्रेंच प्रहसनकार मोलियर यानें आपल्या एका प्रहसनांत (ज्याचा रा. ह. आ. तालचेरकर कृत मराठी अनुवाद 'रावबहादुर पर्वत्या' या नांवानें प्रसिद्ध आहे) मोठ्या विनोदपूर्ण मार्मिकतेनें चित्रित केलें आहे. त्याची कांहीं वाचकांना येथें कदाचित् सहज आठवण होईल.

या दृष्टान्ताच्या विवेचनांत मुख्य गोष्ट मला सुचवावयाची ती ही कीं, नित्योपयोगी व सर्वसाधारण व्यवहारांत कोणचीहि भाषा असली तरी तिनें सर्व लोकव्यवहार सुरळीतपणें व अबाधितपणें चालूं शकतो. फक्त या भाषेमध्यें आपले विचार किंवा आपल्या इच्छा लोकांस व्यक्त करण्याचें सामर्थ्य असलें म्हणजे झालें; पण जेव्हां व्यवहाराव्यतिरिक्त किंबहुना व्यवहारांत देखील आपल्या अंगचा सभ्यपणा, उदार वृत्ति, मनाची सुसंस्कृतता, विद्यासुसंपन्नता इत्यादि विशिष्ट गुण दुसऱ्याच्या निदर्शनास यावेत अशी मनुष्याची इच्छा असते, तेव्हां तेव्हां तो निराळ्याच व प्रौढ भाषेचा अंगीकार अथवा अवलंब करूं लागतो. किंबहुना खरें उदार शिक्षण घेतलेल्या माणसाच्या बोलण्याचालण्याची स्वाभाविक धाटणी तशी असते, ही आपल्या नित्य अवलोकनांतील गोष्ट आहे. हे जे कांहीं सहजगत्या निदर्शनास येणारे व्यापक, सुसंस्कृततेचे प्रत्येक वेळीं अप्रयत्नपूर्ण विचारशीलतेचे व विवेकपूर्ण मधुर वर्तनाचे सुसंस्कार हे मुख्यतः संस्कृत, 'लॅटिन', 'ग्रीक' प्रभृति प्राचीन अथवा ब्रिटिश 'अभियुक्त' भाषा व त्यांतील श्रेष्ठतम वाङ्मयाच्या अध्ययनाचेच सहजोत्पन्न सुपरिणाम होत. म्हणूनच अर्वाचीन अथवा प्रचलित व प्राकृत—देशी

—मातृभाषादिकांपासून या प्राचीन अथवा 'अभियुक्त' भाषा आपल्या स्वयंसिद्ध गुणसंस्कारामुळें निराळ्या व श्रेष्ठतर योग्यतेच्या मानण्याची सर्वसंमत प्रथा रूढ झालेली आहे व ती यथार्थाहि आहे.

म्हणून बदलत्या कालमानानें हस्तचापल्य व यांत्रिक कौशल्योत्तेजक व यांत्रिक योजनेस साहाय्यभूत होणारें—म्हणजे औद्योगिक ध्येयप्रधानदृष्टीनें सर्वसामान्य 'शिक्षणा'ची कल्पना व 'शिक्षणा'चे प्रयत्न—व्यवहारनुसारी ध्येय कितीहि साधेंसुधें ऊर्फ संकुचित व मर्यादित झालें किंवा अधिकाधिक तसें होत गेलें तरी प्रत्यक्ष अभ्यासक्रमांत अध्ययनाच्या कोणत्या तरी अवस्थेत 'अभियुक्त' भाषांच्या अध्ययनापासून होणारे थोडे तरी इष्ट व शाश्वत सुसंस्कार विद्यार्थ्यांच्या मनावर होण्यासाठी 'अभियुक्त' भाषांचा समावेश केव्हां झाला तरी अवश्य करावाच लागेल आणि मनुष्यजातीच्या बुद्धिप्रधान विचारक्षेत्रांत 'अभियुक्त' भाषांचें हें अग्रस्थान व स्वयंसिद्ध श्रेष्ठत्व अनादि-कालपर्यंत निर्विवाद व अबाधितच राहणार ही गोष्ट पाश्चात्य देशांतील विश्व-विद्यालयांत व विशेषतः तिकडील 'सार्वजनिक' ऊर्फ शिष्टजनोपयोगी दुय्यम पाठशालांत लॅटिन, ग्रीक या 'अभियुक्त' भाषांच्या समावेशासंबंधीं व त्या भाषांच्या अध्ययनापासून होणाऱ्या व्यावहारिक उपयुक्ततेविषयीं जे फार पूर्वीच्या कालापासून तों आजतागायत मतभेद व वादविवाद चालू आहेत त्यांच्या निष्कर्षावरून व प्रत्यक्ष सध्यांच्या तिकडील शालाविषयक अनुभवा-वरून सिद्ध होत असल्याची ग्वाही या विषयाच्या ऐतिहासिक समालोचनाच्या आधारें एडिंबरो विश्वविद्यालयांतील ग्रीक भाषेचे माजी प्राध्यापक व लंडन विश्वविद्यालयांतील 'अभियुक्त' भाषाविषयाचे परीक्षक डॉ. ए. डब्ल्यू. मेअर, डी. लिट्., या विद्वानानें साभिमान आनंदसूचक वृत्तीनें पुढीलप्रमाणें थोडक्यांत नमूद केली आहे.

Western Europe realizes the measure of its debt to Greek and the nature of the legacy it has received from Imperial Rome. The precision of classical literature leads to a sense of proportion, a standard of values, a respect for the truth of words and accuracy of thought.

The Public schools conserve the best traditions of classical scholarship.

Although the classics no longer enjoy their old monopoly in education the study of the Greek and Latin writers seems to flourish as vigorously as it has done at any time, and at the present moment, so far as the evidence goes, the prospects of classical scholarship as an indispensable force in education appear to be singularly, bright.

- A. W. Mair, Litt. D. Late Prof. of Greeks. Edinb. University : Classical Examiner to London University, 1919–23.

[ *Encycl. Britt.* V : p. 69–77. ]

लॅटिन व ग्रीक भाषेसंबंधीं जर तिकडील देशांतील ही स्थिति तर आपल्या देशांत संस्कृत भाषेच्या स्वतःसिद्ध श्रेष्ठतेविषयीं व व्यावहारिक उपयुक्ततेविषयीं किती तरी जास्त पटींनीं आपण आपली आदराची व स्वाभिमानाची वृत्ति आपण आपल्या शिक्षणपद्धतीच्या द्वारें सदा जागृत ठेवून राष्ट्रहिताचे भावी आधारस्तंभरूप जी सध्यांची विद्यार्थ्यांची पिढी तिच्याहि मनांत संस्कृताच्या अध्ययनास योग्य रीतीनें पोषक व प्रोत्साहक होईल अशा अभ्यासक्रमविषयक योजनांच्या द्वारा, या वृत्तीचें श्रेयस्कर बीजारोपण करण्याचें कार्यहि अखंड उत्साहानें व मनःपूर्वक निष्ठेनें न्यू इंग्लिशसारख्या शिक्षणक्षेत्रांतील अग्रेसर व प्रगतितत्पर संस्थेनें करीत राहिलें पाहिजे.

संस्कृत भाषेच्या अध्ययनाचे योग्य संस्कारोत्पादक प्रयत्न इंग्रजी चौथ्या यत्तेपासून सातवीपर्यंत क्रमशः योजण्यांत आले पाहिजेत. त्यांतील सर्वांत मुख्यतः महत्त्वाचा म्हटला म्हणजे सुलभ असूनहि दृढ ज्ञानकारक व रसिकता-पोषक अशा समंजस पाठांतराच्या पद्धतीचें पुनरुज्जीवन करणें हा होय. असमंजसपणाची व मुलाच्या मनांत परावलंबीपणा व दुर्बलता उत्पन्न करणारी घोकंपट्टी निराळी; आणि मुलाच्या कोमल बाल्यावस्थेंतील असामान्य असा

जो गुण– शब्दग्रहणविषयक त्वरित व वज्रलेप धारणाशक्ति म्हणजेच स्मरणशक्ति तिच्या भावी अध्ययनाच्या दृढ पायारूप अशा कित्येक ज्ञानविषयक गोष्टींचा मुलांच्या मनांत अल्पावकाशांत योग्य व सुलभ रीतीनें कायमचा संग्रह करण्याकडे विनियोग व्हावा या दूरदर्शी दृष्टीनें रचण्यांत आलेलीं व दीर्घानुभवानें अपूर्व सिद्धिकारक ठरलेलीं अशीं कांहीं साररूप कारिकाबद्ध किंवा सूत्रप्राय पुस्तकें बालवर्णांच मुखोद्‌गत अथवा कंठगत करून घेण्याच्या सर्व जगांतील शिक्षणपद्धतींपेक्षांहि अपूर्व व मालेच्या वळशाप्रमाणें हजरजबाबी व त्वरित महाकार्यसाधक अशी **पाठांतराची पद्धत** यांत काळी माती, कोळशाची पूड व जातिवंत कस्तुरीइतकें महदंतर आहे हें केव्हांहि विसरतां कामा नये. समंजसपणानें केलेलें पाठांतर हा एकंदर शिक्षणपद्धतीचा व स्थिररूप ज्ञानसंग्रहाचा एक महत्त्वाचा, किंबहुना जिव्हाळ्याचा भाग आहे. या गोष्टीकडे अलीकडे पूर्ण दुर्लक्ष झालेलें दिसतें ही मोठी शोचनीय व महत्‌हानिप्रद गोष्ट आहे. अनेक विविध रमणीय, अर्थपूर्ण व प्रसंगोचित रसोत्पत्ति अथवा अर्थोद्दीपन करणारीं व सहजगत्या मुखोद्गत होऊं शकणारीं, मनांत कोमल भावना व उदात्त संस्कार उत्पन्न करणारीं सुभाषितरत्नें हा संस्कृत भाषेचा अनन्यसाधारण विशेष आहे, ही गोष्ट सर्वमान्य आहे. म्हणून खऱ्या व विवेकयुक्त पाठांतराविषयीं विद्यार्थ्यांच्या शीघ्रसंस्कारग्राही मनांत रसिकतापूर्ण आवड विशेषतः अशा पाठांतराचा भावी आयुष्यांत पदोपदीं होणारा अमोल व अमोघ उपयोग याची जाणीव करून देण्याची व तद्द्वारा मुलांची स्मरणशक्ति योग्य दिशेनें जास्त उत्तेजित करून ती अधिक कणखर व संग्रहणक्षम करण्याची अत्यंत आवश्यकता आहे असें माझें मत आहे. मात्र कोणतींहि सर्वसाधारण श्लोक, सुभाषितें किंवा अमरकोष, शब्दरूपावलि, समासचक्र, लघुकौमुदी निरनिराळीं रामरक्षा, महिम्न, विष्णुसहस्रनाम, गंगालहरी अशांसारखीं व इतर लहान-मोठीं स्तोत्रें मुखोद्गत करून घेण्यापूर्वी शिक्षकानें अवश्य करावयाची गोष्ट म्हटली म्हणजे जें कांहीं पाठ करावयाचें त्याच्या महत्त्वाची किंवा त्यांतील रम्यार्थाची कल्पना साररूपानें व उठावदार रीतीनें विद्यार्थ्यांच्या मनावर कायमची उठविली पाहिजे. अशा तऱ्हेचा प्रास्ताविक उपक्रम प्रायः करण्यांत येत नसल्यामुळेंच भावी संस्कृत भाषेचें अध्ययन सुलभ होण्याच्या व त्या भाषेंतील अफाट ज्ञानसंग्रह थोड्याशा श्रमानें कायमचा आत्मसात् होण्याच्या दृष्टीनें किंवा संस्कृत वाङ्मयांतील

अपूर्व रससंपत्ति लीलेनें हस्तगत होण्याच्या दृष्टीनें शब्दरूपावलि, समासचक्र, विशेषतः अमरकोष व लघुकौमुदी इत्यादि प्राथमिकवजा लघुग्रंथाचें दूरपरिणामकारक महत्त्व काय आहे तें पुष्कळ होतकरू विद्यार्थ्यांच्या मनांत बालपणीं उतरतच नाहीं व पुढें महत्त्व कळून येतें तेव्हां पाठांतरशक्ति हातची राहत नाहीं.

केवळ रूक्ष व क्लेशपूर्ण घोकंपट्टीच्या भट्टींत घालून ते ग्रंथ विद्यार्थ्यांकडून भाजून काढण्याचें घातुक धोरण जुन्या प्रथेंतील बहुतेक गुरुजींनीं व शास्त्र्यांनीं स्वीकारल्यामुळें असा ज्या ग्रंथाविषयीं व एकंदर पाठांतर करण्याच्या पद्धतीविषयींच जुन्या वळणाच्या संस्कृताध्ययनी वर्गांत तिरस्कार व असद्भाव उत्पन्न झालेला दिसून येतो त्याचप्रमाणें नवीन किंवा आधुनिक शिक्षणप्रथेंतहि बऱ्याच शिक्षकांचा व कित्येक मोठमोठ्या पदवीधर संस्कृत विद्वानांचा कल व भर उठल्यासुटल्या संस्कृत व्याकरणाच्या क्लिष्टत्वाविषयीं व बिकटपणाविषयीं सदा कुरकुरीचे तिरस्कारवर्धक उपहासाचे उद्गार काढण्याकडेच झुकत असल्यामुळें संस्कृत भाषेच्या व्याकरणाच्या अपूर्व योग्यतेची किंवा संस्कृत वाङ्मयाच्या अफाटपणाची व विविध रसपूर्णतेची, व्यावहारिक चातुर्यपोषक अपूर्व मार्मिकतेची पुसटपुसट किंवा अंधुक जाणीवहि होणें विद्यार्थ्यांस अशक्य होतें व त्यामुळें त्या भाषेचें पुढें कितीहि अध्ययन केलें तरी व संस्कृत भाषेविषयीं स्वाभिमानाची, आपलेपणाची व यथार्थ आदराची भावना फारच थोड्या विद्यार्थ्यांच्या मनांत उत्पन्न झालेली दिसते. ही अनिष्ट स्थिति नाहींशी करण्याच्या प्रयत्नांचा उपक्रम इंग्रजी हायस्कुलादि शाळांतून क्रमशः झाला पाहिजे. त्या उपक्रमाचें एक मुख्य अंग म्हणजे संस्कृत भाषेच्या मुख्य अध्ययनाबरोबरच त्याचें पूरक उपांग म्हणून यथाशक्य संस्कृत भाषेसंबंधीं आदर व रसिकता वाढविण्याच्याच विशिष्ट दृष्टीनें विद्यार्थ्यांस स्फुटप्राय सुभाषितें, काव्यनाटकांतील रम्य प्रसंगांचा व तदनुषंगिक मार्मिक श्लोकादि अवतरणें यांचा परिचय करून देण्याचें— गेल्या दोनतीन पिढ्यांच्या शिक्षणप्रथेंत सर्वसाधारणतः रूढ असलेलें जें श्रेयस्कर धोरण— त्याचेंच आतांहि व्यापक प्रमाणावर पुन्हा संजीवन झालें पाहिजे. हाच एक उपाय अगदीं स्थूल व मोघम स्वरूपानें येथें सुचविण्यापलीकडे स्थलसंकोचामुळें जास्त सविस्तर व सोदाहरण करतां येत नाहीं याबद्दल निरुपाय आहे.

इंग्रजी अध्ययनाच्या प्रवाहाप्रमाणें संस्कृत भाषेच्या अध्ययनाचेहि सुपरिणाम कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर, आगरकर, लोकमान्य टिळक यांच्या मनोभूमींत खोल व दृढमूल रुजले होते. म्हणूनच त्यांना मातृभाषेच्या द्वारें लोकजागृति करण्याची स्फूर्ति व सामर्थ्य प्राप्त झालें आणि तदनुषंगानेंच मातृभाषेविषयींहि निरतिशय अभिमान स्वतःच्या मनांत सदैव जागृत ठेवून आपल्या महाराष्ट्रीय बांधवांच्याहि मनांत मातृभाषेविषयीं उत्कृष्ट प्रीति व अभिमान उत्पन्न करतां आला. खुद्द मराठी भाषेला आपापल्या परी अनुपमेय, आकर्षक व ओजपूर्ण प्रौढ व अलंकृत स्वरूप देण्याचें महत्कार्यहि त्या वंदनीय त्रिमूर्तीला—शारीरिक आरोग्य व बल वाढविण्यासाठीं व्यायाम करतांना आपोआप लोभनीय अंग-सौष्ठव प्राप्त होतें, त्याप्रमाणें—लीलेनें करतां आलें. हेंच उदात्त ध्येय सतत मनामध्यें वागवून संस्कृत भाषेच्या यथार्थ गौरवाची अखंड अभिवृद्धि व तिच्या अनुषंगानें पण देशकालवर्तमानानुरूप प्रिय मातृभाषेचा—मराठी भाषेचाहि उत्तरोत्तर व्यापक, राष्ट्रहितपोषक असा इष्ट व उज्ज्वल उत्कर्ष—या द्विविध पण समांतर रेषांसदृश धोरणाच्या मार्गावर आपले सर्व वाङ्मयविषयक प्रयत्न चालू ठेवण्याच्या व्रताचा पुनर्घोष करणें व व्रताविषयक उद्घोषाला यथाशक्य प्रत्यक्ष कृतीचें रूप देण्याची प्रतिज्ञाहि गंभीर, निश्चयपूर्वक सर्वांस विदित करणें हेंच या हीरक महोत्सवासारख्या स्फूर्तिदायक व मंगलकारक प्रसंगींचें न्यू इंग्लिश स्कूलच्या व डे. ए. सो.च्या प्रत्येक अभिमान्याचें समयोचित कर्तव्य होय. संस्थेचें अभीष्टचिंतन करण्याचा हाच उक्त विधि व हीच प्रतिज्ञा या उत्सवाची खरी सांगता व खरी फलश्रुति होय.

# आमचें प्राचीन शिक्षण

लेखकः—**विनायक विष्णु देशपांडे**

ज्या पुस्तकांत विशेषेंकरून समाजाचें उद्यांचें शिक्षण कोणत्या स्वरूपाचें असावें यासंबंधीं अधिकारी मंडळींच्याकडून उहापोह होत आहे, त्या पुस्तकांत 'प्राचीन शिक्षण' या विषयावरील लेख अस्थानीं वाटण्याचा संभव आहे. परंतु कोणतेंहि पाऊल पुढें टाकतांना पूर्वानुभवाचा "**मागोवा घेत**" जाण्याची पद्धत आहे व कोणत्याहि वस्तूची प्रगत स्थिति ही ज्याप्रमाणें त्या वस्तूच्या परंपरागत इतिहासावरच आधारलेली असूं शकते, त्याच सामान्य सरणीस अनुसरून "उद्यांच्या शिक्षणा"चें स्वरूप ठरवितांना आजचें शिक्षण काय आहे, कालचें शिक्षण काय होतें, या गोष्टींचा मनाशीं आढावा काढावा लागणारच. अर्थात् आढावा घेतांना मुख्य सूत्र हें "उद्यांचें शिक्षण" ठरविणें हें दृढपणें मनाशीं बाळगलें म्हणजे झालें.

"प्राचीन शिक्षण" या शब्द-संघावरून जो विषय मनामध्यें येतो त्याचें स्वरूप अमर्याद आहे. मनुष्यत्वाची मर्यादाहि सुटून मनुष्येतर सचेतन प्राण्यांमधील शिक्षणापर्यंत देखील पल्ला पोंहोचूं शकतो. त्याचप्रमाणें भौगोलिक व कालिक मर्यादांचाहि अमर्याद विस्तार होतो. आमचें उद्याचें शिक्षण ठरवितांना आम्हांला ज्या प्राचीन शिक्षणाच्या आढाव्याचा मुख्यत्वेंकरून उपयोग होण्याचा संभव आहे तेवढ्यापुरतें विषयाचें क्षेत्र मर्यादित करून घेण्यासाठीं "आमचें प्राचीन शिक्षण" इतकाच विषयसंकोच करावा लागला. "आमचें प्राचीन शिक्षण" म्हणजे मुख्यत्वेंकरून वैदिक हिंदूंचें प्राचीन शिक्षण. हिंदुस्थानांत प्राचीन कालापासून वैदिक, बौद्ध, जैन, मुसल्मान, खिस्ती, पारशी इत्यादि धार्मिक संस्कृति आणि आर्यन, द्राविडिअन, सिथिअन, सेमेटिक इत्यादि वांशिक संस्कृति नांदल्या व अद्याप नांदत आहेत. ह्या सर्वांत प्राचीन आणि आपल्या या आर्यावर्तामध्यें सर्वांत अधिक महत्त्वाची, आणि आपणांपैकीं बहुतेकांची पारंपरिक असल्यामुळें ज्या संस्कृतीमधील

शिक्षणाचा विचार आपलें उद्यांचें शिक्षण ठरविण्याच्या कामीं सर्वांत अधिक उपयोगी, त्या संस्कृतीनें पुरस्कृत असें जें शिक्षण, त्यासंबंधीं स्थूल विचार ह्या लेखांत करण्याचें योजिलें आहे.

वैदिक हिंदूंचे वेदग्रंथ हे घटनाग्रंथ होत. त्या ग्रंथांतून हिंदूंचें जगतीतलावरील ध्येयरूप कार्य व त्याच्या सिद्धयर्थ जरूर असणारा आचार यांचें ज्ञान हिंदूंस होतें. प्रथम एकच अविनाशी, वस्तु सत्यस्वरूपानें सर्व ठिकाणीं नांदत आहे ह्याची तात्त्विक दृष्टीनें सिद्धि; मनुष्यास त्या वस्तूचें सम्यग् ज्ञान प्राप्त व्हावें एतदर्थ (आत्मौपम्य बुद्धीनें जगतामध्यें भासमान होणाऱ्या द्वंद्वाचा नाश मनुष्याकडून व्हावा म्हणून) नीतिनियमांचें विवेचन व विषम भासणाऱ्या समाजामध्यें शांतता आणि समाधान नांदून नंतर मनुष्याची प्रवृत्ति सत्यशोधनाकडे सहज व्हावी याकरतां समाजधारणेचे शाश्वत नियम ह्या वेदग्रंथांतून ग्रथित केले गेले आहेत. व म्हणूनच प्रत्येक वैदिक हिंदूचें जीवनरहस्य त्यांत सांगितलेलें असून अखिल हिंदु समाजाची घटना त्या ग्रंथांनी बद्ध केलेली आहे. प्रत्येक वैदिक हिंदूस वैयक्तिक रीत्या व संघटित स्वरूपानें सर्व समाजास आपलें ध्येय साध्य व्हावें म्हणून त्रैवर्णिकास वेदाध्ययन हें अत्यंत आवश्यक असें सांगितलें आहे. "**स्वाध्यायो अध्येतव्यः**" असा नित्य विधि प्रत्यक्ष वेदामध्येंच आहे. जीवनवृत्ति मिळविण्याच्या अगोदरच जीवनरहस्याचें चांगलें शिक्षण मिळून तें हिंदूच्या रोमारोमांत भिनलें म्हणजे त्याच्याशीं विसंगत व विरोधी अशी जीवनवृत्ति स्वीकारण्यास तो कचेरल, व आर्थिक परिस्थिति कठीण झाली तरी शक्यतोंवर त्याचें मन ज्या वृत्तिस्वीकारापासून परमश्रेष्ठ ध्येयाची सिद्धि दुरावेल अशा वृत्तीपासून निवृत्त होईल, अशी परिस्थिति निर्माण करण्याकरितां प्रत्येक त्रैवर्णिकास वेदाचें अध्ययन आवश्यक करण्यांत आलें. याज्ञवल्क्यस्मृतीमध्यें वेदाध्ययनाचें आणि वेदग्रहणाचें फल पुढील श्लोकांत वर्णन केलेलें आहे.

**यज्ञानां तपसां चैव शुभानां चैव कर्मणाम् ।**
**वेद एव द्विजातीनां निःश्रेयसकरः परः ॥**

किंवा मनुस्मृतीमध्यें देखील—

**तपोविशेषैर्विविधैर्व्रतैश्च विधिचोदितैः ।**
**वेदः कृत्स्नोधिगन्तव्यः सरहस्यो द्विजन्मना ॥**

अशांसारखे आणखी शेंकडों श्लोक द्विजातीयांच्या शिक्षणाबद्दल विचार करतांना आमच्या शास्त्रग्रंथांतून आलेले आहेत.

वेदाचें अध्ययन अशा रीतीनें अत्यंत आवश्यक ठरविल्यावर वेदाज्ञांचें यथाशास्त्र अनुष्ठान व्हावें म्हणून त्यांचें सम्यग् ज्ञान झालें पाहिजे व सम्यग् ज्ञान होण्यास शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष ह्या वेदांगांचेंहि ज्ञान असणें आवश्यक आहे. वेदवचनांचें बलाबलत्व ठरविण्यास न्याय–मीमांसादि शास्त्रांचेंहि अध्ययन अत्यंत जरूर आहे. तेव्हां वेदाध्ययनाबरोबरच त्रैवर्णिकांच्या शिक्षणामध्यें ह्या वेदांगांचा व शास्त्रांचा समावेश सहज झाला. समाजाची ऐहिक धारणा ज्या जीवनवृत्तींनीं होते, त्यांचाहि संग्रह बटूंच्या शिक्षणांत करण्यांत आला. आयुर्वेद, धनुर्वेद, गंधर्ववेद, इतिहास, पुराणें इत्यादि ज्या समाजोपयोगी जीविका त्यांना उपवेदांत गणलें गेलें, व उपवेदांत त्यांची गणना झाल्यामुळें वेदांचें जें प्रधान धोरण त्याला अविरोधी रीतीनें या शास्त्रांचा विकास झाला. आयुर्वेदामध्यें सर्व तऱ्हेच्या सामाजिक आणि वैयक्तिक आरोग्याच्या प्रश्नांचा सांगोपांग विचार होऊन हिंदूंच्या ध्येयास अनुरूप व परिणामीं दीर्घायुष्य देणारी दिनचर्या मनुष्यानें कशी ठेवावी याबद्दलचे निसर्गसिद्ध नियम ठरवून दिले गेले. धनुर्वेदामध्यें समाजसंरक्षणासंबंधीं सर्व बाबींचा विचार केला गेला; त्याचप्रमाणें गंधर्ववेदामध्यें सर्व तऱ्हेच्या ललितकलांचीं सोपपत्तिक शास्त्रें रचलीं गेलीं.

वैदिक हिंदूंमध्यें त्रैवर्णिकांखेरीजहि इतर गटांचा समावेश होतो. समाजधारणेस आवश्यक अशीं जीं इतर कर्में त्यांचें शिक्षण पिढ्यानुपिढ्या निरनिराळ्या गटांना त्या त्या गटांतील श्रेष्ठींच्याकडून किंवा बापाकडून मुलास मिळण्याची व्यवस्था असे. धंद्यांचा स्वीकार गटपद्धतीनें करविला गेल्यामुळें बेकारी आणि अनावश्यक स्पर्धा यांना आळा बसत असे व धंद्यामध्यें पिढीजात सौकर्य आणि कौशल्य उत्पन्न होण्यास मदत होत असे. मनुष्याच्या इंद्रिय-शक्तींचा भरपूर उपयोग होऊन त्याच्या कर्मेंद्रियांना मदत व्हावी म्हणून–मनुष्याच्या इंद्रियशक्तीची गरज लागूच नये म्हणून नव्हे– जीं यंत्रें आणि हत्यारें आमच्या समाजांतील कारूनारूंच्या हातांत प्राचीन काळापासून दिसतात तीं त्यांनींच आपल्या बुद्धीनें निर्माण केलेलीं आहेत. त्यामुळें सर्व समाजांत सुव्यवस्था

आणि शांतता नांदून समाज पारलौकिक ध्येय गांठण्यास सहज प्रवृत्त होण्याच्या मार्गावर लागला.

येथपर्यंत आमच्या प्राचीन शिक्षणामध्यें कोणत्या विषयांचा अंतर्भाव कसा व कोणत्या पद्धतीनें केला गेला होता याचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें. आतां कोणत्या पद्धतीनें नवीन नवीन पिढीस हें शिक्षण संक्रांत केलें जात असे इकडे लक्ष देऊं. त्रैवर्णिकांचा विद्यारंभकाल म्हणजे उपनयनकाल होय. हा सामान्यतः आठव्या वर्षी सुरू होई. परंतु मनुस्मृतीमधील

**ब्रह्मवर्चसकामस्य कार्यं विप्रस्य पञ्चमे ।**
**राज्ञो बलार्थिनः षष्ठे वैश्यस्येहार्थिनोऽष्टमे ॥**

ह्या श्लोकावरून पांचव्या वर्षीहि विद्यारंभास सुरुवात होत असे असें दिसतें. विद्यार्थ्यास गुरुगृहींच विद्याध्ययनासाठीं राहणें आवश्यक होतें. विद्याध्ययन म्हणजे केवळ विषयांचें शाब्दिक ज्ञान होण्यापुरतें अध्ययन नसून प्रत्येक हिंदूनें पुढें घालविण्याच्या सर्व चारित्र्यासंबंधींचें शिक्षण होय. हिंदुकल्पनेप्रमाणें सबंध आयुष्य हें आमरण शास्त्रपूत कर्तव्याचें आचरण करण्यांत व्यतीत करण्याचें असल्यामुळें उपनयनानंतर त्याच्या तपश्चर्येस सुरुवात होत असे. मिताक्षराकार विज्ञानेश्वरयोगी लिहितातः—

**प्रागुपणयनात् कामचारकामवादकामभक्षाः । उर्ध्वमुपनयनात्प्राग्वेदाध्ययनोपक्रमाद्धर्मशास्त्राध्ययनं ततो धर्मशास्त्रविहितयमानियमोपेतस्य वेदाध्ययनं ततस्तदर्थाजिज्ञासा ततस्यदनुष्ठानामिति** । वेदांचें अध्ययन विहित जरी असलें तरी त्यांचें अध्ययन संपूर्णपणें करण्यास आयुष्याचा काळ पुरावयाचा नाहीं व न्याय-व्याकरणादि शास्त्रेंहि इतकीं विशाल आहेत कीं, एकएका शास्त्राच्या अध्ययनास देखील एकएक तप पुरत नाहीं. तेव्हां शिक्षणाच्या निरनिराळ्या शाखा उत्पन्न होणें क्रमप्राप्तच होतें; व त्यास अनुसरून वेदाध्ययन करणारांना वैदिक व शास्त्राध्ययन करणारांना शास्त्री-पंडित अशा संज्ञा प्राप्त झाल्या. वैदिकांतहि यज्ञकर्मास आवश्यक असें श्रौतयाज्ञिक जाणणाऱ्यांना याज्ञिक असें संबोधूं लागले. व त्यांतहि पुढें श्रौतयाज्ञिक आणि गृह्ययाज्ञिक असे पोटविभाग पडले. शिक्षणक्रमाचा काळ हा वयाच्या आठव्या वर्षापासून ते समावर्तनापर्यंत म्हणजे सुमारें चोविसाव्या वर्षापर्यंत असे. ह्या काळांत त्याला खडतर तपश्चर्या करून गुरुसेवा करावी लागत असे.

अग्नीन्धनं भैक्षचर्यामधःशय्यां गुरोर्हितम् ।
आसमावर्तनात्कुर्यात्कृतोपनयनो द्विजः ॥

प्रत्येक वर्षात उपाकर्म आणि उत्सर्जन या दोन वैदिक क्रियांमधील शिक्षणाचा काल ठरविलेला असे. या कालखंडामध्यें विद्यार्थ्यांची दिनचर्या पुढील-प्रमाणें असे. सूर्योदयापूर्वी एक प्रहर उठून विद्यार्थ्यांस आपल्या कार्यक्रमास लागावें लागत असे व सूर्यास्तानंतर एक प्रहरपर्यंत हा कार्यक्रम अविरतपणें सुरू असे. आदल्यादिवशीं जो विषय शिकविला त्याची पुनरावृत्ति पहाटेच्या वेळीं करून पुढें गुरूच्या आह्निकानंतर नवीन पाठ घेण्यास त्याला तयार राहवें लागत असे. दुपारीं भिक्षा मागून आणलेल्या अन्नावर भोजन झालें म्हणजे ग्रहण केलेल्या विषयाची चिंतनिका सुरू होई. जरूरीप्रमाणें पुन्हा तिसऱ्या प्रहरीं पाठ, संथा वगैरे घेतली जाई व सायंकाळचें अग्निकर्म, गुरुसेवा इत्यादि झाल्यानंतर विद्यार्थ्यांस विश्रांति घेण्यास मोकळीक असे. हा क्रम अगदी अलीकडील पाठशाळांमधून देखील चालू होता व आहे. वेदाध्ययनाच्या व शास्त्राध्यायनाच्या कांहीं पाठशाळा अद्याप कोठें कोठें चालू आहेत; त्यांमधील विद्याक्रम असाः–शास्त्रपाठशाळेमध्यें सुरुवातीस समासचक्र, रूपावलि, अमरकोश इत्यादि ग्रंथ पाठ करून घेत असतात. त्यानंतर साहित्य-व्युत्पत्ति सामान्यपणें होण्यासाठीं महाकाव्याचे २-२ सर्ग तयार करून घेतात. नंतर भाषा-प्रवेश अधिक चांगला होण्यासाठीं नाटक, भाण, चंपू इत्यादि प्रकारांपैकीं कांहींचें अध्ययन. इतक्या गोष्टींस ३ वर्षे सहज लागावयाचीं. त्यानंतर शास्त्रप्रवेश होत असे. शास्त्रांमध्यें परिनिष्ठित पंडित होण्यास १२-१३ वर्षे सहज लागत असत. वेदाध्ययनाच्या क्रमांतहि इतकींच वर्षे जात असत. कारण संपूर्ण दशग्रंथांचें अध्ययन, व पद, क्रम, जटा, घन इत्यादि विकृतींचें ग्रहण हे १५-२० वर्षांपेक्षां अधिक लवकर होणेंच शक्य नाहीं. आयुर्वेद, धनुर्वेद, गंधर्ववेद इत्यादि उपवेदांच्या एकएका शाखेच्या ग्रहणासहि ह्याच-प्रमाणें तितकीं वर्षे लागणें अगदीं स्वाभाविक होतें. अशा रीतीनें त्रैवर्णिक बटूच्या वयास २० पासून २४ वर्षे झालीं म्हणजे तो समावर्तनास व गृहस्थाश्रम स्वीकारण्यास योग्य असा समजला जाई. तोंपर्यंत त्यानें ब्रह्मचारी राहूनच गुरुसेवा, विद्याग्रहण आणि पुढील सर्व आयुष्यक्रमांत उपयोगी पडणारे व्रत-

यमनियम यांचें ज्ञान आणि पालन केलें पाहिजे असा वैदिक हिंदूंच्या शास्त्रांचा कटाक्ष आहे.

अशा रीतीनें उदार शिक्षणाचें आज तत्त्वज्ञान आणि धर्मविषयक, शास्त्रीय व साहित्यविषयक असे जे तीन विभाग पाडले जातात त्यांना अनुसरून त्रैवर्णिक हिंदूंना शिक्षणाची सोय आहे. यांखेरीज जीवनवृत्तीस अनुकूल असे जे इतर व्यापार त्यांचेंहि शिक्षण मिळत असे. मात्र त्या पद्धतींत विशेष हा असे कीं, जीवनवृत्तीस जरूर अशा शिक्षणाबरोबरच सांस्कृतिक आणि खरें जीवनरहस्य शिक्षण घेणाऱ्या व्यक्तीच्या हाडीमांसीं खिळविणारें असें शिक्षण विद्यार्थ्यांस देण्यांत येत असे. त्यामुळें प्रत्येक हिंदु व्यक्ति ही समाधानी वृत्तीची, जीवन-कलहामध्यें वणवण न करणारी आणि परलोकप्राप्तीवर निष्ठा ठेवून संसारांत वागणारी अशी तयार होण्याची सोय असे. ही गोष्ट त्रैवर्णिक हिंदूंची. त्रैवर्णिकां-खेरीज जे इतर वैदिक हिंदु आहेत त्यांच्या शिक्षणाच्या बाबतीत विशेष भर त्यांच्या जीवनवृत्तीस अनुकूल असें जें शिक्षण त्याच्यावरच दिला जात असे. ह्याचा अर्थ इतकाच कीं, हिंदूंचें धर्मरहस्य शिकविण्याच्या प्रत्यक्ष शाळांची सोय त्यांच्याबाबत करण्यांत आली नव्हती. परंतु भजन, कीर्तन, पुराण, प्रवचन इत्यादिकांच्या द्वारा त्यांच्या मनावर हें धर्मरहस्य बिंबविण्याचा उपक्रम सारखा सुरूच होता व आहे; आणि त्यामुळें आजमितीस देखील प्रत्येक हिंदु, मग तो त्रैवर्णिक असो, किंवा इतर असो, जगामध्यें वागतांना तो परलोकाची चिंता बाळगूनच पुढें पाऊल टाकीत असतो. ही श्रेष्ठ नीतिधर्मकल्पना आमच्या समाजाच्या अगदीं शेवटच्या थरापर्यंतहि कशी पोंहोचली आहे याचें एक उत्कृष्ट गमक कै. सर नारायणराव चंदावरकर यांनीं एका प्रसंगीं सांगितलेल्या गोष्टी-वरून प्रतीत होईल. सरसाहेबांचा मुक्काम महाबळेश्वरीं असतांना ते सकाळीं फिरावयास जात असत. एके दिवशीं त्यांना लाकडाची मोळी विकणारी एक कातवड्याची बाई जंगलांतून येत असतांना भेटली. सर नारायणरावांनीं बाईच्या डोक्यावरील मोळीची किंमत विचारली आणि सौदा ठरवून तिला आपल्या बंगल्यामध्यें मोळीसह नेलें. लांकडें टाकल्यानंतर तिला पैसे देऊन रवाना केल्यावर सुमारें अर्ध्या तासानें ती बाई त्यांच्याकडे पुन्हा परत आली. कां आलीस म्हणून विचारतां तिनें एक पैसा सरसाहेबांच्या हातावर परत ठेवला आणि हा 'चुकून जास्ती आला म्हणून परत द्यावयास आलें' असें

सांगितलें. तेव्हां ते सहज उद्गारले कीं, "बाई, जास्ती पैसा गेल्याचें माझ्या तर लक्षांतहि आलें नाहीं, आणि एक पैशाकरितां तूं परत इतक्या लांब आली नसतीस तर चाललें नसतें का?" तेव्हां त्या बाईनें अशासारखें उत्तर दिलें. "मला कोणाचें आक्रीत घेऊन काय करायचं आहे? मागच्या जन्मीं कोणतं पाप केलं होतं म्हणून हा जन्म आला; आतां या जन्मीं पुन्हा पापाची धनीण होऊन पुढल्या जन्माची काय सोय लावूं?" हें उत्तर ऐकल्याबरोबर सरसाहेब तर चकितच झाले. ऐहिकलाभनिरपेक्ष अशीं श्रेष्ठ नीतितत्त्वें आमच्या समाजामध्यें किती खालच्या थरापर्यंत भिनलीं आहेत याचा त्यांना प्रत्यय आला. आमच्या प्राचीन शिक्षणानें जर कांहीं साध्य केलें असेल तर तें हें आहे.

प्राचीन शिक्षण-पद्धतीवर घेतल्या जाणाऱ्या अनेक आक्षेपांपैकीं स्मरणशक्तीवर त्या पद्धतीनें फार ताण पडत असे व त्यामुळें मुलांच्या स्वाभाविक प्रवृत्तींचा विकास होण्याच्या कामीं अडथळा होत असे, हा एक होय. या बाबतींत एक तर असें म्हणतां येईल कीं, शास्त्रापैकीं प्रत्येक ग्रंथ विद्यार्थ्यास पाठ येत असला पाहिजे असा आग्रह बिलकूल नव्हता. वयाच्या १५-१६ वर्षांपर्यंत स्मरणशक्ति फार तीव्र असते. त्या कालांत ज्या शाखांत प्रवेश करावयाचा त्या शास्त्रांतील प्रवेश-ग्रंथ समजावून सांगतांनाच पाठ करून घेण्याची काळजी घेतली जाई. ह्यामुळें जो विषय विद्यार्थ्यास गुरूनें समजावून दिला तो त्याच्या हृत्पटलावर कायमचा खोदून ठेवल्यासारखा पक्का होत असे. पूर्वी कोणत्याहि विषयाच्या ज्ञानाची खोली वाढविण्याकडे कटाक्ष होता व आजहि विशेषज्ञांच्या युगांत तीच पद्धति अवलंबिली जात आहे. ज्यांचें शिक्षण हें ज्ञानार्जनाकरतां नसून केवळ सरकारी नोकरी मिळवण्याकरतां असे त्यांस विषयाच्या संपूर्ण ज्ञानापेक्षां पुष्कळ विषयांचें त्रोटक ज्ञान पाहिजे म्हणून त्यांच्या दृष्टीनें या आक्षेपास कांहीं तरी किंमत होती. बुद्धीचा विकास होत नाहीं असें म्हणणाऱ्यांनीं विद्वान् हिंदूंनीं न्याय, मीमांसा, व्याकरणादि शास्त्रांत स्वतंत्र प्रतिभेचे किती ग्रंथ लिहिले आहेत यांकडे लक्ष पुरविल्यास बरें होईल. वेदाध्ययन मात्र सर्व पाठान्तरावरच अवलंबून असे. वेद हे वर म्हटल्याप्रमाणें हिंदूंचे घटना-ग्रंथ असल्यामुळें त्यांच्या रक्षणाची विशेष काळजी ब्राह्मणांनाच वाहावी लागली व ती जबाबदारी त्यांनीं उत्तम रीतीनें पाळली. परंतु केवळ रक्षणाकरतांच ब्राह्मणांनीं वेद मुखोद्गत केले असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. वेद-ग्रंथ हें आमचें जीवन-

रहस्य प्रतिपादतात. कोणत्याहि विषयाचें संपूर्ण ज्ञान होण्यास त्या विषयाचें नुसतें शाब्दिक ज्ञान होऊन उपयोग नाहीं; तर त्या विषयाचें सतत श्रवण, मनन निदिध्यास व्हावयास पाहिजे; म्हणजे तो विषय अंगीं पूर्णपणें भिनतो. फक्त मबंध दिवसांतून अभ्यासाच्या वेळीं २-३ तास त्या विषयासंबंधीं विचार डोक्यांत येऊन उपयोगी नाहींत; तर सतत २४ तास तो विषय डोक्यांत घोळला पाहिजे; तरच विषयामध्यें विद्यार्थी तज्ञ होण्याचा संभव असतो. आणि त्यांतून वेद हे तर त्यांमध्यें केवळ तज्ञत्व प्राप्त करून घेण्यासाठीं नसून त्यांचें अनुष्ठानहि प्रत्येक हिंदूमात्राच्या हातून व्हावयास हवें. तेव्हां त्यांचा सतत निदिध्यास लागावयास ते मुखोद्गत करणें ह्यापेक्षां दुसरा अधिक श्रेयस्कर मार्ग तो कोणता? तेव्हां आज मुद्रणालयें जरी झालीं असलीं तरी देखील हिंदूचें जीवनरहस्य प्रतिपादन करणारे वेद-ग्रंथ हे त्रैवर्णिकांनीं अगर ब्राह्मणांनीं मुखोद्गतच ठेवावयास पाहिजेत.

आमच्या शिक्षणाचा भार राजसत्तेपेक्षां समाजानेंच पुष्कळसा उचलला होता. त्रैवर्णिकेतर हिंदूंना शिक्षण ज्या त्या जाती-जमाती देत असत. त्रैवर्णिक हिंदूस भिक्षा मागूनच ब्रह्मचर्याश्रमाचें पालन करावें लागत असे. ज्या ठिकाणीं पाठशाळा असेल त्या ठिकाणच्या नजीकचे ग्रामिक गुरूच्या व विद्यार्थ्यांच्या सोयीसाठीं आपल्या उत्पन्नांतील भाग किंवा प्रत्यक्ष जमिनीदेखील देत असत. राजसत्ता कर माफ करीत असे. कारण, **धर्मषष्ठांशभागेन तेऽपि संविभजन्ति तम्।** या उक्तीस अनुसरून राजास अशा विद्यादात्या गुरूपासून त्याच्या धर्मफलाचा षष्ठांश मिळत असे. ज्या ठिकाणीं फार मोठी पाठशाळा असे (कीं ज्यांचें स्वरूप विद्यापीठाप्रमाणें असे) त्या ठिकाणीं राजा हा प्रत्यक्ष देणगीच्या रूपानें मदत देई. अशीं विद्यापीठें ऐतिहासिक कालीं ताक्षिला, नालंदा, पाटणा वगैरे ठिकाणीं नांदत होतीं. पुणें, काशी, कुम्भकोणम् इत्यादि अनेक ठिकाणीं अद्याप मोठमोठ्या पाठशाळा प्राचीन पद्धतीनें सुरू आहेत, आणि त्या समाजाच्या मदतीवरच चालल्या आहेत.

आमच्या प्राचीन शिक्षणानें प्रत्येक व्यक्तीस कर्तव्यदक्ष, परहिततत्पर, समाधानी आणि ऐहिक लोभापासून अलिप्त म्हणजे ऐहिक कठीण परिस्थितीविषयीं निर्भय बनविण्याची व्यवस्था केली. प्रणवोपासना आणि सूर्योपासना

यांच्या निर्बंधांमुळें व्यक्तीस निरोगीपणा आणि दीर्घायुष्य प्राप्त होण्याची सोय झाली. व्रतें व यमनियमांनीं शरीर आणि मन वाटेल त्या परिस्थितींत संयमित ठेवतां येऊं लागलें आणि गटपद्धतीनें जीवनवृत्ति लावून दिल्यामुळें कठोर जीवन-कलह टाळण्याचा यशस्वी प्रयत्न झाला. मनुष्याच्या वांट्यास शरीरगुण आणि मनोगुण अशा तऱ्हेचे आले आहेत कीं, त्यांना जन्मापासून नीट वळण लावण्याचा प्रयत्न जर केला नाहीं तर स्वार्थ, सुखलोलुपता व त्यामुळें कलह आणि नाश हे परिणाम अवश्यमेव व्हायचेच. परंतु मानवास तर त्यांच्याच साहाय्याचा अवलंब करून समाजधारणा, शांति आणि समाधान हीं प्राप्त करून घेऊन सत्यप्राप्तीकरतां उद्युक्त व्हावयाचें आहे. तेव्हां या गोष्टी ज्या मार्गांनीं जास्तींत जास्त साध्य होतील ते मार्ग आमच्या शिक्षणव्यवस्थेमध्यें ग्रथित केले गेले आहेत हेंच शेवटीं सांगावयाचें आहे.

या "आमच्या प्राचीन शिक्षणा"च्या त्रोटक आढाव्यावरून उद्यांचें शिक्षण ठरवितांना यांतील पुष्कळ भाग ग्राह्य आहे असें लक्षांत येईल व नवीन शिक्षण-पद्धतीची आंखणी करतांना हिंदूमात्राचेंच काय; परंतु मनुष्यमात्राचें जीवन सुखमय आणि मोक्षप्रवण कसें होईल ह्याची काळजी समाज-नेते बाळगतील ह्याबद्दल प्राचीन शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांना खात्री वाटते.

---

# दुय्यम शिक्षणाची नवी दिशा

लेखकः--नारायण गणेश नारळकर

न्यू इंग्लिश स्कूल कै. विष्णुशास्त्र्यांनी स्थापिलें तर आमचें नूतन मराठी विद्यालय त्यांचे स्मरणार्थ त्यांचे पहिले पुण्यतिथीस स्थापन झालें. तेव्हां उभय संस्थांचे सेवक हे विष्णुशास्त्र्यांचेंच पाईक !

साठ वर्षांपूर्वी प्रचलित दुय्यम शिक्षणाचा मोठा दोष म्हणजे सर्वसाधारण विद्यार्थी स्वदेश, स्वभाषा व संस्कृति यांना पारखा होऊन साहेबाळलेला असे. शिवाय फीचे दर बहुजन समाजास डोईजड वाटत. फीच्या सवलतीहि अत्यल्प व विद्यार्थ्यांची राहणीहि खर्चिक. याकरितां, सर्वांनाच बेताची फी, गरीब विद्यार्थ्यांना तीहि माफ, सर्वांचीच राहणी साधी व लठ्ठ पगाराची सरकारी नोकरी उपलब्ध असतांहि स्वार्थत्यागपूर्वक सेवाव्रत स्वीकारून आलेले ध्येयनिष्ठ शिक्षक, यांचे साहाय्यानें विष्णुशास्त्र्यांनीं नवी परंपरा निर्माण केली. हा 'चिपळूणकर प्लॅन ऑफ एज्युकेशन' कांहीं वर्षे फार यशस्वी झाला. या यशस्वितेचें रहस्य, सरकारी नोकरी व खाजगी वकिली, डॉक्टरी वगैरे धंद्यांत भरपूर वाव असल्यामुळें 'ज्याची परीक्षा पास, त्याला यश हमखास' या परिस्थितींत होतें. सरकारी मानमरातब, सामाजिक दर्जा, संपत्तीची ऊब या फलश्रुतीमुळें या शिक्षणसंस्थांची व तेथील शिक्षकांची फार चहा झाली. ज्याच्या हातीं ससा तोच तेवढा पारधी हा जगाचा साधासुधा न्यायच आहे. त्यामुळें हल्लीचा विद्यार्थी पूर्वीपेक्षां अंगापिंडानें सरस, बहुश्रुतपणांत तर आघाडीवर व आचरणांत निःसंशय जास्त बुद्धिप्रधान असा कांकणभर श्रेष्ठ असतांहि तो एक हेटाळणीचा विषय झाला आहे. शिक्षणक्रम संपल्यावर ज्या परिस्थितीशीं झुंजावें लागतें त्यांत विजयी होण्याची कार्यक्षमता हल्लींच्या विद्यार्थ्यांत नसतें हें खरें; पण त्यांची जी तरफदारी करावयाची ती एवढ्याच दृष्टीनें कीं, यांत विद्यार्थ्यांपेक्षां संस्थांच्या चालकांकडे जास्त जबाबदारी आहे; व अशा करतां कीं, संस्था-चालकांनीं वेळोवेळीं परिस्थितीनुरूप ध्येयाला उजळा

दिला नाहीं व आतां साठ वर्षांनंतर तरी व कांहीं संस्थांनां तरी असा उजळा देण्याची अत्यंत जरूरीची अशी आवश्यकता उत्पन्न झाली आहे.

अगदीं पुढारलेल्या देशांत सुद्धां, दुय्यम शिक्षण मिळणें ही एक सुसंधि समजली जाते. भाजी-भाकरी, साक्षरता, फार काय प्राथमिक शिक्षण, याप्रमाणें ती एक आवश्यक गोष्ट नाहीं. आणि हिंदुस्थानांत तर दुय्यम शिक्षण इतक्या थोडयांच्या वांटयास येतें कीं, तें एक भाग्याचें लक्षणच समजलें पाहिजे. दुय्यम शिक्षणाचें कार्य तरी कोणतें ? आपण सर्वजण एका ईश्वराचीं लेंकरें असूं, परंतु जन्मतःच अगदीं जुळ्या भावंडांत सुद्धां—अनेक तऱ्हेचें—शरीराचें, बुद्धीचें व भावनेचें—वैचित्र्य असतें व हें लेणें देवाघरचें असलें तरी तें संमिश्र स्वरूपाचें असतें. गोड गळा घेऊन येणारा विद्यार्थी तीव्र मत्सरबुद्धि घेऊन येतो. प्रतिभावान् लेखणी घेऊन येणारा विद्यार्थी भरपूर असा अहंपणाहि घेऊन येतो. दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून प्रथमतः विद्यार्थ्यांच्या विविध कृतींवरून हें वेळींच हेरलें पाहिजे व जरूरीप्रमाणें कोठें उत्तेजन, तर कोठें निर्मूलन, तर कोठें निराळें वळण, असें दिलें पाहिजे. मान वर न करणारा, तोंड न उघडणारा, अतिनम्र असा होयबा विद्यार्थी काय कामाचा ? सत्त्व, रज, तम या सर्वांचें योग्य संमिश्रण व त्यांतून प्रभावी असें व्यक्तिमत्व चमकलें पाहिजे.

हें साध्य होण्यास आपल्या हाडींमांसीं खिळलेल्या कांहीं भ्रामक कल्पना दूर झुगारल्या पाहिजेत. एखाद्या कोंडवाड्यासारखीं पूर्वीचीं शाळागृहें सुदैवानें कमी झालीं आहेत हें खरें, परंतु अद्यापहि तीं एखाद्या पडीक वाड्याप्रमाणें आहेत. धुळीचीं पुटें, असंख्य फुटकीं तावदानें, बिनताणाच्या खिडक्या, किर-किरीं दारें, मोडक्या तिकाटण्यावरचे मेंचट व पांढुरके फळे, खुर्च्या, इमारत बांधल्यापासून पुन्हा न दिलेले रंग व या सर्वांवर ताण म्हणजे विद्यार्थ्यांच्या शरीरप्रकृतीला अतीव अनिष्ट, अशीं बेढब, भेसूर व शाईनें बरबटलेलीं बांकें, ही हलाखी सर्वत्र आढळते. तसेंच शाळागृह कांहीं एखाद्या बौद्ध भिक्षूंचा मठ नव्हे. तें देवी सरस्वतीचें रम्य मंदिर आहे. तेथें पश्चिमेचें खेळतें वारें पाहिजे; भरपूर उजेड पाहिजे व सर्वांपेक्षां पाठीचा कणा ताठ ठेवून लवचीक हाडांना डौलदार आकार देतील अशीं शिक्षणशास्त्रसंमत अशीं बाकें पाहिजेत. नयनाला आल्हाद देतील असे मध्यवर्ती लांब-रुंद, गुळगुळीत, सुंदर फळे पाहिजेत. चित्तवृत्ति सुखावेल असें कमालीच्या स्वच्छतेचें, टापटिपीचें, रेखीव, प्रमाणबद्ध

असें सौंदर्ययुक्त प्रांगण पाहिजे. तसेंच अद्यावत् अशीं शिक्षणाचीं विविध साधनें व उपकरणें व त्यांचा भरपेट उपयोग आणि आपल्या विषयाचा सखोल अभ्यास केलेले, अध्ययनकलानिपुण व मुख्यतः शिक्षकाच्या पेशाची हौस असणारे शिक्षक व या सर्वांचा भरपूर फायदा घेतां येईल असें प्रसन्न वातावरण, निर्माण होणें जरूर आहे.

तसेंच, विद्यार्थ्यांकडून विद्येच्या विविध विषयांची भरगच्च अशी अहर्निश उपासना करवून घेऊन 'विद्यार्थी' हें नांव सार्थ करविलें पाहिजे. थोडासाच अभ्यास, बेताचाच गृहपाठ व पुष्कळशा सुट्या यांमुळें विद्यार्थी-जीवन वायां जात आहे. त्यांतच, 'अरे, परीक्षा काय पास होता, देशकार्य करा; अभ्यास काय करतां, शरीर कमवा; पुस्तकी ज्ञान पुरे, धंदेशिक्षण घ्या; अभ्यास-बिभ्यास सब झूट है, बस् एक चारित्र्य पाहिजे; या व अशा व्यासपीठी वक्तृत्वानें विद्यार्थ्यांचा बुद्धिभेद व चालकांचा बुद्धिभ्रंश होत आहे. शाळेनें विद्यार्थ्यांकरितां करावयाचें पहिलें काम म्हणजे अखिल जगाच्या विचारवंतांनीं विविध विषयांवर निर्माण केलेलें रत्नभांडार विद्यार्थ्यांना सुलभतेनें उपलब्ध केलें पाहिजे. शिक्षकांनीं दृष्टांत, प्रश्नोत्तरें, लेखन, रेखन, वाचन, पाठांतर, कृति वगैरे सर्व तऱ्हेच्या मार्गांचा अवलंब करून विद्यार्थ्यांच्या रक्तमांसांत हे भिनतील असें केलें पाहिजे. या दृष्टीनें जिवंत व जातिवंत विचार आत्मसात् करावयास शिकविणारा असा एकमेव विषय म्हणजे मातृभाषा. या विषयांत मॅट्रिकच्या परीक्षेस विश्वविद्यालयानें दिलेलें गौणस्थान व त्यामुळेंच कीं काय, खालचे वर्गांत शाळांनीं चालविलेली उपेक्षा व त्याहीपेक्षां या विषयाची विचाराची जननी म्हणून नव्हे, तर भाषेचा नमुना म्हणून चालविलेली शिकवण पाहून फार खेद वाटतो. शास्त्रीय ज्ञानावर आधारलेलीं, तेजस्वी, क्रांतिकारक व स्फूर्तिदायक अशा विचारांनीं ओथंबलेलीं अशीं पाठ्यपुस्तकें निवडून, पहिल्या प्रतीचे बुद्धिमान शिक्षक नेमून या विषयाची फार काळजीपूर्वक जोपासना केली पाहिजे. शालेय जीवनानंतर खास उपयोगी पडणारी अशी हीच शिदोरी. म्हणून धड्याच्या इवल्याशा मजकुराचें चर्वितचर्वण न करतां त्यासंबंधीं, पण बाहेरची परिश्रमपूर्वक अभ्यास करून संपादलेली अशी माहिती सांगणारे शिक्षक पाहिजेत. शिक्षकानें तर कायमचे विद्यार्थी राहिलें पाहिजे. केवळ गरीब व बेकार म्हणून भूतदयेचे दृष्टीनें अद्यापिहि हिणकस शिक्षक नेमण्याची घातुक परंपरा त्वरित

बंद झाली पाहिजे. शेंकडों विद्यार्थ्यांचें वर्षानुवर्षें यामुळें किती नुकसान होतें याकडे लक्ष पुरविलें पाहिजे. अनेक पदव्यांनीं विभूषित, ग्रंथसंपत्तींत भर घालणारे, लेखन, भाषण, कृति वगैरेनीं समाजांत वरचें स्थान मिळविलेले, शिक्षणशास्त्र समजणारे व श्रद्धेनें तें प्रत्यक्ष कृतींत उतरविणारे, निरनिराळ्या क्षेत्रांत हरहुन्नरीपणा असणारे व जबर आत्मविश्वास असणारे असे शिक्षक परिश्रमपूर्वक पैदा करून ते विद्यार्थ्यांपुढें उभे केले पाहिजेत. शालेय जीवनांत जिवंतपणा आणण्याचा हा एकच राजमार्ग आहे. अद्यापिहि शाळेकरतां दगडामातीच्या प्रासादतुल्य शाळागृहाकरितां अगणित खर्च केला जातो; परंतु जातिवंत माणसांच्या पैदाशीकडे लक्ष जात नाहीं. असेंच दुर्लक्ष शाळेच्या ग्रंथालयाकडे होतें. शाळेचें ग्रंथालय म्हणजे कोठें तरी आडबाजूस चार-दोन कपाटांत सदैव कडीकुलुपांत ठेवलेलीं दोन-चारशें जुनीं पुस्तकें व त्यांतहि शेंकडा नव्वद इंग्रजी; ही अनास्था ताबडतोब थांबविली पाहिजे. पुण्यांतील आर्ट्स कॉलेजांनीं या बाबतींत केलेल्या योजना शाळानिहाय आणविल्या पाहिजेत. स्वतंत्र व ऐसपैस असें ग्रंथालय; त्याकरतां हजारांनीं मोजतां येतील अशीं मराठी पुस्तकें; व विद्यार्थ्यांना वाचनांत मार्गदर्शक होऊं शकणारा व हौसेनें पुस्तकें देणारा असा तज्ज्ञ ग्रंथालयाधिकारी पाहिजे. शिक्षकांचें हें एक फार महत्त्वाचें असें अंग आहे. असे शिक्षक, अशीं पुस्तकें व निरनिराळ्या विषयांवर तरतऱ्हेची विपुल साधनसामुग्री जमविल्यावर "सर्व विषयांचा सखोल अभ्यास करून त्यांत पारंगतता मिळवून प्रत्येक परीक्षेंत उत्कृष्ट यश मिळविलें पाहिजे," ह्या ध्येयाची घोषणा करून हें ध्येय विद्यार्थ्यांच्या मनांत वरचेवर ठसविलें पाहिजे. शालेय जीवनाची सर्वांत महत्त्वाची अशी कसोटी हीच. नुसतें शरीरच कमवावयाचें असेल तर आखाडे आहेत. खेळच खेळावयाचे असतील तर क्रीडामंडळें आहेत; व धंदेशिक्षणच हवें असेल तर कारखाने आहेत आणि धंदेशिक्षणाच्या अशा स्वतंत्र शाळा आहेत. धर्म व राजकारणाकरितां आश्रम व शिबिरें आहेत. कुस्ती मारली, सेंचरी काढली, रबर स्टॅंप केला, कागदाचीं फुलें केलीं, ग्रामोद्धार-छावणीला गेला वगैरे निःसंशय कौतुकास्पद आहे; पण केव्हां? तर खराखुरा 'विद्यार्थी' हें करील तेव्हां. वार्षिक परीक्षेंत एकूणांत शेंकडा ६० गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यानें हें केलें तर कोण नाहीं कौतुक करणार? पण हल्लीं विद्येचें व या उपांगांचें क्षेत्र इतकें भिन्न होऊं पाहत आहे कीं, एखाद्या दात्यानें दोन्ही क्षेत्रांत प्रवीण अशा

विद्यार्थ्यांकरितां एखादें पारितोषिक देऊं केलें तर लायक विद्यार्थी सांपडणें मुष्किलीचें होतें. एखाद्या शाळेच्या क्रिकेट टीमच्या विद्यार्थ्यांच्या अभ्यासाची थोडी चौकशी केल्यास याचें सहज प्रत्यंतर येईल. तेव्हां परीक्षेंत सुयश पाहिजे व एकांगी जीवन होऊं नये म्हणून या मध्यवर्ती हिऱ्याभोंवतीं अनेकविध उपांगांचें सुवर्ण-वलय पाहिजे. निकोप शरीरप्रकृति ठेवण्याकरतां अनेकविध खेळांची सर्व तऱ्हेचें साहित्य पुरवून केलेली योजना, मन रमून जाईल असें तऱ्हतऱ्हेच्या कलाकृतींचे छंद, या सर्वांची शाळेनें आपुलकीनें सोय केली पाहिजे. शाळेनें विद्यार्थ्याला असें म्हटलें पाहिजे, "बोल, तुला कसली आवड आहे? ही का? वा, छान्! आणि तुला रे ? काय? तुला माहीत नाहीं, थांब तुझ्या शिक्षकांना विचारूं हं. बघ तर खरं दोन दिवस! हा वर्ग, ही वेळ, हे शिक्षक आणि हें साहित्य; नाहीं, निराळी फी नाहीं. होय, पारितोषिकें आहेत तर!" वगैरे. सुप्तशक्तींचें संशोधन, त्यांचा प्रमाणबद्ध परिपोष करून दांडगा आत्मविश्वास निर्माण केला पाहिजे. हें करतांना विद्यार्थ्यांच्या सभोंवतालच्या सामाजिक जीवनाकडे सारखी नजर ठेविली पाहिजे. सामाजिक जीवन व शालेय शिक्षण यांचा सुंदर मिलाफ झाला पाहिजे. सामाजिक जीवन सुमधुर करण्यास हरघडी उपयोगी पडणारी विनोदबुद्धि सदैव जागृत केली पाहिजे. समाजांत वावरणाऱ्या थोर व्यक्ति, समाजांत घडणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी, यासंबंधीं प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणें शिकवण दिली पाहिजे. हिंदुस्थानासारख्या परतंत्र देशांत जेथें स्वातंत्र्याच्या लढ्यावरच सर्व जीवन अवलंबून आहे त्याची तर रूपरेषा सदैव विद्यार्थ्यांच्या डोळ्यांपुढें ठेवली पाहिजे.

एखादें महायुद्ध सुरू झाले कीं, युद्धाच्या बातम्या विद्यार्थ्यांच्या नजरेस आणण्याची टूम सर्वत्र आहे; परंतु आपणांस त्यापेक्षां जास्त महत्त्वाच्या अशा आपल्या स्वातंत्र्ययुद्धाच्या घटना यांची माहिती दिली पाहिजे. सर्वांना अंगिकारतां येईल असें स्वदेशीचें व्रत तर बाळपणापासूनच दिलें पाहिजे. जीवनास विविध पैलू पाहिजेत. एखाद्या विषयाची मनापासून आवड, एखाद्या मौजेचा सच्छंद व सभोंवतालच्या सामाजिक जीवनाच्या घडामोडीचें सम्यक् ज्ञान, एवढी कमाई विद्यार्थ्यांच्या पदरांत टाकली पाहिजे. " जीवन जगण्याकरितां " हा दंडक इतरेजनाकरतां. दुय्यम शिक्षण मिळालेल्या भाग्यवंतांनीं सांस्कृतिक जीवन जगलें पाहिजे. त्यांच्या जीवनांत

चारुता व मधुरता आली पाहिजे. समाजांत सदैव वरच्या पातळीवर राहतां येईल, इतरांपेक्षां भिन्न व निश्चित वरच्या दर्जाची अशी भाषा, विचार, आचरण ठेवतां येईल, एवढी तयारी शाळेनें करून दिली पाहिजे. याकरतां विद्यार्थि-दशा ही हाल-अपेष्टाकरतां ही कल्पना बदलून विद्यार्थि-जीवन आनंदमय केलें पाहिजे.

आपला विद्यार्थी शालेय शिक्षणक्रम संपल्यावर कोणत्या परिस्थितींत जाणार हें चालकांनीं सभोंवतालच्या परिस्थितीचें सूक्ष्म व वरचेवर अवलोकन करून अजमाविलें पाहिजे व तदनुरूप शालेयजीवनांत इष्ट तो फरक केला पाहिजे. शिक्षण हें साधन आहे व सांस्कृतिक जीवनांतलें साध्य आहे. भावी जीवन-प्रवाहांत हसतमुखानें व आत्मविश्वासानें उडी घेऊन सहीसलामत पैलतीरां जाईल असा विद्यार्थी तयार केला पाहिजे. हल्लीं तर निरनिराळ्या शास्त्रीय शोधांनीं, विविध व जलद अशा वाहनांच्या निर्मितीनें, मानवी संबंधाचे दृष्टीनें जग अतिशय लहान होत चाललें आहे. मानवी जीवन जास्त जास्त परावलंबी व स्निग्ध असें होत चाललें आहे. अशा परिस्थितींत कूपमंडूकवृत्ति व एकांडी शिलेदारी यांना थारा नाहीं. जबर महत्त्वाकांक्षा व बेताची संपत्ति अशा महाराष्ट्रीयांना तर मुलुखगिरी चालू ठेवणें क्रमप्राप्तच आहे. तेव्हां त्यांनीं— विशेषतः ब्राह्मण वर्गानें— परीक्षा, खेळ, कला, वागणूक वगैरे सर्वच बाबतींत अग्रेसरत्व ठेवणें अत्यंत आवश्यक झालें आहे. विविध अंगांनीं लायकी वाढविली पाहिजे. याकरितां स्वस्त शिक्षण व दारिद्र्याचा साधेपणा हा जुना जमाना बदलून, कांहीं संस्थांनीं तरी, जरूर तर सरकारी शाळेपेक्षां जास्त फी आकारून, श्रेष्ठ दर्जाच्या शिक्षकांस आकर्षक वेतन देऊन, आधुनिक शास्त्रीय अशी विपुल साधनसामुग्री जमवून, विविध प्रकारची ज्ञानोपासना करवून, विद्यार्थी अष्टपैलु कसा होईल याची चिंता सदैव वाहिली पाहिजे !

---

# कवाईत

लेखकः— गंगाधर केशवराव देशपांडे

यस्तु विज्ञानवान्भवति । युक्तेन मनसा सदा ।
तस्येंद्रियाणि वश्यानि । सदश्वा इव सारथेः ॥ —कठोपनिषद्

" जो चित्त स्थिर करतो त्याचीं इंद्रियें, कुशल सारथ्याच्या अंकित जसे घोडे राहतात, त्याप्रमाणें अंकित राहतात. आपलें हित कशांत आहे, अहित कशांत आहे, याचा पूर्ण विचार करून मनुष्यानें हिताचा मार्ग निश्चयानें पत्करला पाहिजे.

कोणत्याहि राष्ट्रांतील लोकांत जर शिस्त व आज्ञाधारकपणा आत्मिक अथवा सांघिकपणें नसेल तर तें राष्ट्र अथवा लोक फार लवकर हीनावस्थेंत गेलेले दिसतील. यमनियमाची आत्मिक अथवा सांघिक बल वाढविण्यास फार जरूरी आहे. यमनियमामुळें आत्मविश्वास उत्पन्न होतो व आत्मविश्वासानें अनेक महत्त्वाचीं कामें रेखलेला करितां येतात; आणि म्हणूनच या विषयाकडे पूर्ण लक्ष द्यावयास पाहिजे. परकीय राष्ट्रांतील लोकांनीं हिंद देशांत प्रवेश केल्यानंतर त्यांस जी गोष्ट मुख्यतः दिसून आली ती ही कीं, सार्वत्रिक सांघिक शिस्तीचा अभाव. परमपूज्य कै. गोपाळराव आगरकर आम्हांस १८८८ सालीं मेकॉलेचें पुस्तक शिकवीत असतां वारंवार म्हणत कीं, "आपल्या फौजा भारी असतांना देखील इंग्रजांच्या कवाइती फौजांनीं त्यांचा धुव्वा उडविला." शिस्त वा नियमबद्धतेखेरीज यश मिळणें शक्य नाहीं. सन १८८८ मध्यें महाराणी व्हिक्टोरियाच्या ज्युबिली समारंभानिमित्त रे मार्केटमध्यें पुण्यांतील सर्व विद्यार्थ्यांस बोलावण्यांत आलें होतें. त्या वेळीं विद्यार्थ्यांकडून बेशिस्तपणाची वागणूक झाली व त्याबद्दल बराच गवगवा झाला. ही उणीव काढून टाकली पाहिजे असें आमच्या न्यू इंग्लिश स्कूलच्या चालकांच्या मनानें घेतलें.

गु. परशुराम नारायण पाटणकर हे शिस्तीचे मोठे भोक्ते होते. गु. वामन शिवराम आपटे यांजसारखे शिस्त ठेवणारे क्वचित्च आढळतील. पाटणकर हे प्रख्यात वासुदेव बळवंतांचे पट्टशिष्य. त्यांस दांडपट्टा, फरीगदगा व तदनुषंगिक सर्व शारीरिक व्यायामांचा फार नाद. त्यांनीं या कामांत फार लक्ष घालून दांडपट्टा व कवाइतीचें शिक्षण देण्याचें ठरविलें. वासुदेव बळवंतास ज्या उस्तादानें दांडपट्टा शिकविला. व ज्यापासून ते स्वतः दांडपट्टा शिकले त्याच उस्तादास त्यांनीं दांडपट्टा शिकविण्यास ठेवलें; त्याच पटाईत उस्तादापासून आम्ही दांडपट्टा शिकलें. वृद्ध असून देखील तरुणांनीं लाजावें अशी चपलता त्या पुरुषांत होती. वासुदेव बळवंतावर त्यांचें नितान्त प्रेम होतें व डोळ्यांत पाणी आणून तो म्हणे, "माझ्या सर्व आयुष्यांत असा दांडपट्टा करणारा मी पुरुष पाहिला नाहीं." पाटणकरांनीं कवाईत सुरू करण्याचें ठरविल्यानंतर न्यू इंग्लिश स्कूलमधील शिक्षक रा. गंगाधर गोविंद दीक्षित यांनीं आपण ड्रिल शिकवितों असें कबूल केलें. मला बाळपणापासून कवाइतीचा फार नाद असे. वडील फौजदार असल्यानें कवाईत व गोळीबार यांची मला उत्तम तालीम मिळाली होती. १२ व्या वर्षीच मी गोळीबारांत निष्णात झालों होतों. श्री. दीक्षित व मी "सायपर्स मायनर्स" पलटणींत गेलों. तेथील एका "नथू" नांवाच्या इसमाची ओळख करून घेऊन शिक्षणाची तजवीज केली व शाळेंत कवाइत शिकविण्यास सुरुवात झाली. श्री. दीक्षित यांनीं लहानपणापासून शरीराची फार काळजी घेतली होती. त्यांचें शरीर धिप्पाड असून एखाद्या सेना-नायकास शोभण्यासारखें होतें. आवाज मोठा व शिस्तहि फार कडक असे. मुलें त्यांस फार भीत. त्या वेळीं कवाइतीची गोडी लागावी म्हणून आम्ही फार खटपट केली. प्रथम १८ मुलें फार प्रयत्नानें स्पेशल ड्रिल शिकण्याकरितां तयार झालीं. ड्रमवर त्यांस मार्चिंग शिकविण्याचा प्रयत्न मीं केला. गोडी लागतांच जास्त मुलें येऊं लागलीं. एक वर्षांत कवाइतीस दृश्य स्वरूप आलें. प्रत्येक क्लासांत एक मिलिटरी सेक्रेटरी नेमण्यांत आला. उंचीवर स्कॉड्स पाडण्यांत आले. कबूतर-खान्यांतील नुकतीच नांगरलेली जमीन आमच्या 'बालगोपाल फौजी लोकांनीं' तुडवून साफ केली. सन १८८९ पर्यंत स्पेशल ड्रिलमध्यें ३०० मुलें आलीं. तीन कंपन्या ( १००।१०० च्या ) तयार झाल्या. परेड पलटणीसारखी होऊं लागली. सर्वांचे पांढरे शुभ्र पोशाख, वर काळ्या टोप्या व त्यांजवर N. E. S.

असा मोनोग्राम लावण्यांत आला. आम्हीं आमचें निशाण तयार केलें. त्याजवर शाळेचा मॉटो 'यूनिअन इज स्ट्रेंग्थ' हा सुवर्णाक्षरांनीं लिहिला गेला. कवाइतीचें मुलांस जवळ जवळ वेडच लागलें. मला श्रीशिवछत्रपतीच्या व सम्राट् नेपोलिअनच्या चरित्रवाचनाचें फार वेड. मुलांस मी त्यांवर अत्यंत स्फूर्तिदायक व्याख्यानें देऊन त्यांनीं कवाईत शिकलीच पाहिजे त्याशिवाय अंगीं शिस्त बाणणार नाहीं, असें वारंवार सांगत असे. मी सीनिअर कप्तान होतों. नंबर दोन कंपनीचे कप्तान करंदीकर व नंबर तीनचे कप्तान प्रभाकर वैद्य होते. ते गोरे असल्यामुळें त्यांस मींच व्हाइटसाहेब असें नांव ठेवलें होतें. रात्रीं तीन-तीन, चार-चार वाजतां सुद्धां-मुलें ब्यूगल ऐकून कबूतर-खान्यांत अथवा गद्रे वाड्यापुढें जमत. सन १८८९ मध्यें १७ ऑगस्ट रोजीं जो बक्षिससमारंभ झाला त्याचें अगोदर मुंबईचे अत्यंत लोकप्रिय गव्हर्नर लॉर्ड रे यांनीं आपले 'ए. डी. सी.' कर्नल लिटलटन् यांस अगोदर आमची कवाईत पाहून येण्यास पाठविलें. कबूतरखान्यांत आमच्या पांढऱ्या'पलटणी पोशाखांत आमच्या निशाणासहित कवाईत करितांना त्यांनीं पाहिलें. मार्च-पास्ट, रिव्ह्यू परेड व इतर मनूव्हर्स त्यांनीं अत्यंत चौकस बुद्धीनें पाहिल्यानंतर अत्यंत कौतुक व्यक्त केलें. त्यांचे मनावर फार चांगला परिणाम झाल्याचें दिसलें; इतकेंच नव्हे तर, आपण गव्हर्नरसाहेबांस आपणांस काय वाटलें हें पूर्णपणें सांगूं असें आश्वासन देऊन ते गेले. आम्हां तीनहि कप्तानांशीं हस्तांदोलन करून त्यांनीं मोठी शाबासकी दिली. आमचे सर सेनापति श्री. दीक्षित यांची सेनापतीच्या पोशाखांतील ती भव्य मूर्ति पाहून कर्नलसाहेबांस ते खरोखरीच पलटणींतील कोणी सुभेदार अगर सुभेदार मेजर पेन्शनर असावे असा भास होऊन तसें त्यांस त्यांनीं विचारलेंहि. आम्हांस प्रोत्साहन देण्यास प्रोफेसर भानू, गोपाळराव गोखले शाळेंतील शिक्षक—विशेषतः गणूकाका वझेमास्तर—हे नेहमीं परेडग्राउंडवर येत; इतकेंच नव्हे तर ते ड्रिलमध्येंहि स्वतः भाग घेत. प्रथम प्रथम त्यांस लाज वाटे; पण मग आमच्यांतच ते मिसळत व मग आम्हांस मोठें प्रोत्साहन मिळे.

लार्ड रे प्राइझ डिस्ट्रिब्यूशनला कबूतरखान्यांत आले. आमच्या 'गार्ड ऑफ ऑनर'नें त्यांस मिलिटरीबरहुकूम सलामी दिली. कवाईत फार बहारीची झाली. एक तास गव्हर्नरसाहेब, मोठमोठे युरोपिअन अधिकारी, बडेबडे लोक

तटस्थ वृत्तीनें महाराष्ट्रांतील मुलांची ही कवाईत पाहत होते. हा देखावा खरोखरच अदृष्टपूर्व होता. आम्हीं सर्व परेड काठ्यांवरच केली. ड्रिल संपली. गव्हर्नरसाहेब निहायत खूष झाले. मुक्तकंठानें त्यांनीं शिफारस केली. महाराष्ट्रांतील सर्व हायस्कूलमध्यें आमचें अनुकरण करावें असा हुकूम सुटला. गव्हर्नरसाहेबांनीं अत्यंत प्रेमानें सर सेनापति दीक्षित व आम्हां तिघां कप्तानांचें कौतुक करून हस्तांदोलन केलें व टाळ्यांचा गजर झाला. लार्ड रे साहेब स्वभावतःच थोर व आमच्या सोसायटीवर त्यांचें फार प्रेम असल्यानें त्यांचे कारकीर्दीतच हिंदु लोकांस 'व्हॉलंटिअर्स'चा अधिकार मिळून इतर व्हॉलंटिअर कोरमध्यें त्यांची गणना व्हावी म्हणून प्रो. आगरकरआदि सर्वांनीं खटपटीस सुरुवात केली व त्या हेतूनें त्यांनीं एक युरोपिअन ड्रिल इन्स्ट्रक्टरहि ठेविला. पुढें प्रिन्स आल्बर्ट व्हिक्टर हे युवराज पुण्यास आल्या-वेळीं आमच्या तीन कंपन्या, ज्यांस लॉर्ड रे साहेबांनीं कौतुकानें 'सिटी व्हॉलंटि-अर्स' असें संबोधिलें त्यांस, पोलिस अधिकारी कर्नल मॅकफर्सन यांची इच्छा नसतां लकडीपुलापासून ते सदाशिव पेठ हौदापर्यंत दोन्ही बाजूंस रस्त्यावर 'रोड लाईन' करण्याकरितां ड्यूटी दिली. आमचे मागें पोलिसांनीं उभें रहावें असा हुकूम दिला. तीन पांढऱ्या पोषाखांतील कंपन्या, मध्यें निशाण, पुढें मिलिटरी बँड अशा रीतीनें ही सार्वजनिक कामगिरी केवळ गव्हर्नरसाहेबांच्या खास प्रेरणेमुळें करण्यास निघालेली पाहून सर्वांस फार कौतुक वाटलें.

पार्लमेंटचे मेंबर केनसाहेब आले त्या वेळीं त्यांनींहि कबुतरखान्यांत परेड पाहून अत्यंत आश्चर्य प्रकट केलें व ते म्हणाले, " ही कॉंग्रेसची भावी फौज तर नव्हे ना ? "

प्रि. आपटे यांनीं ड्रिल हा विषय 'कंपलसरी' म्हणून केला. ड्रिल वर्षभर ज्यानें पूर्णत्वानें केली नाहीं, चुकविली, असें नजरेस आलें, अशा मुलास परीक्षेस जाण्यास फॉर्म दिला नाहीं. वार्षिक परीक्षेचे निकाल देणाऱ्या कार्डांत इतर विषयांबरोबर ड्रिल विषय नोंदला गेला. शारीरिक कसरती व इतर खेळ यांच्या इतकेंच नव्हे, जास्त प्रमाणांत कवायतीचें महत्त्व ओळखलें गेलें. बक्षिसें लावलीं गेलीं. आम्हीं किती तरी वेळां कॉलेजमागील टेकड्यांवर फौजी शिस्तीनें हल्ले चढविले असतील. ब्यूगल कॉलवर सर्व मनूव्हर्स आम्ही करीत असूं व याचप्रमाणें जर पुढें क्रम सुरू असता तर भावी फौजेंत सामील होण्याकरितां

आमची शाळा एक रिक्रूटिंग ग्राउंड झाली असती व हजारों तरुण योद्धे या शाळेनें राष्ट्ररक्षणाकरितां दिले असते. यानंतर प्लेगाचा कहर–वगैरे वगैरे अनेक कारणांनीं या क्रमांत विघ्न आलें; पण या थोड्याच काळांत झालेल्या व केलेल्या कामगिरीची स्मृति मात्र नष्ट झाली नाहीं. मजबरोबरचे सर्व अधिकारी जरी शरीरानें आज मजसमोर दृष्टीपुढें नाहींत तरी ते अंतश्चक्षूपुढें आठवण होतांच उभे राहतात. तो कबूतरखाना, ते माझे प्रिय सुहृद् ते माझे अत्यंत पूज्य गुरुजन हे माझ्या स्मृतींतून कसे जातील? आजहि माझ्या हाताखालीं कवाईत शिकलेले व वृद्धावस्थेस पोंहोचलेले माझे बालमित्र मला कौतुकानें 'आमचे न्यू इंग्लिश स्कूलचे कप्तान बाबासाहेब' असें प्रेमानें म्हणतात. मुलांनीं शिस्तीनें चालावें, शिस्तीनें राहावें, संघशक्तीनें कामें करावीं असें कोणास वाटणार नाहीं? धन्य तो दिवस, ज्या दिवशीं सर्व राष्ट्र शिस्तीनें प्रेरित होऊन शिस्तमय होईल व आपलें प्राचीन वैभव गाठील! ज्या शाळेंत आम्हांस असें शिक्षण मिळालें त्या शाळेस आम्हीं कसें विसरावें? ज्या परमपूज्य गुरूंनीं आम्हांस अत्यंत प्रेमानें वागविलें, ज्यांच्या कृपाप्रसादामुळें आम्ही आपलें आयुष्य समाधानपूर्वक व अभिमानपूर्वक चालवूं शकलों त्यांस अनन्यभक्तिपूर्वक प्रणाम करून हा लेख संपवितों!

Sow good seed, that those who follow
Future blessings may yet reap,
Joy resound over hill and hollow
When we all have gone to sleep;
Germs of truth and knowledge gather
All the varied ways we go,
Know the present is the father
Of the future weal or woe.

—*Peacock*

# संस्कृताचें माध्यम अथवा परिचय-भाषा



लेखकः—गोविंद कृष्ण मोडक

**१. प्रास्ताविक**—न्यू इंग्लिश स्कूल ( नवांग्ल पाठशाला ) स्थापण्यांत इतर हेतूंबरोबर विद्येचें अध्ययन विद्यार्थ्यांस सोपें करून देणें हाहि एक होता. शिक्षणांतील भाषांचें माध्यम एक दोन तपांपूर्वींपर्यंत केवळ इंग्रजी होतें. इंग्रजीचेंच ज्ञान इंग्रजीच्या द्वारें देण्यांत येत असे ऐवढेंच नव्हे तर संस्कृताचें व फार काय मातृभाषा—मराठीचेंहि संस्कृत भाषा मराठीची प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष जननी असल्यानें, ती आपली महाराष्ट्रियांची मातामही अथवा आजी होय. पण हिचा परिचय जननी मराठीचें द्वारें न होतां इंग्रजीचे द्वारा करून देण्यांत येत असे;—जणूं काय विद्यार्थ्यांस इंग्रजी पूर्णतः अगोदरच येत आहे व आतां संस्कृत नवीन अभ्यासावयाचें आहे. मराठींतील चारपंचमांशाहून अधिक शब्द संस्कृतागत असल्यानें संस्कृताचें ज्ञान मराठीच्या द्वारा आपणांस होणें सुलभ व सहज असें आहे तरी पण या गोष्टीकडे योग्य लक्ष न गेल्यानें ( १ ) इंग्रजी भाषेंत बनविलेले नियम आणि ( २ ) संस्कृताशीं वा मराठीशीं विभिन्न असलेल्या वाक्यरचना इंग्रजींतून संस्कृत शिकतांना विद्यार्थ्यांस फारच छळीत असत. ( १ ) विसर्ग Preceded by अ, विसर्ग Followed by अ इत्यादि वाक्यांशांनीं युक्त असलेले नियम गळीं उतरतां—उतरतां विद्यार्थ्यांचे प्राणच गळ्यांत म्हणजे कंठांत चढत असत. संस्कृत धातू रुच् याचा अर्थ व कार्य मराठींत रूच् या धातूनें साधतें; तेव्हां 'मुलांना ( मोदक अथवा ) खाऊ 'रुचतो' याचें शुद्ध संस्कृत 'बालेभ्यः मोदकः रोचते' असें सरळ व सोपें होतें.

पण इंग्रजी माध्यमामुळें रुच्-चा प्रतिशब्द( to be liked ) हा योजण्यांत आल्यानें ( Boys like sweet-meat ) या तुल्यार्थक वाक्याचें संस्कृत 'बालकाः मोदकं रोचन्ते' असे विद्यार्थ्यांकडून वारंवार करण्यांत येई. हें सदोष आहे हें सांगणें नकोच. या दोहोंच्या जोडीला त्या वेळच्या संस्कृत पुस्तकां-

तील इंग्रजी भाषाहि दुर्बोधता वाढविण्यास तिसरें कारण होत असे. शुभ्, कृत्, लुट् इत्यादि धातूंचे अर्थ विद्यार्थ्यांच्या आटोक्यांतील शब्दांत न देतां क्रमानें (To behave, To panegyrize, To wallow) अशा अपरिचित बोजड शब्दांनीं दिलेले असत. यामुळें आपणांस जी शिकण्यास वस्तुतः सोपी जावी ती संस्कृत भाषा विनाकारण जड जात असे. ही गोष्ट कोणाहि विचारी माणसास सहज पटण्यासारखी होती. तरी पण हा वेडेपणा अथवा विक्षिप्तपणा अनेक वर्षें अव्याहत चालू होता. हा अविचार इतका पराकोटीचा होता कीं याहून मोठा अविचार एकाच गोष्टींत आढळण्यासारखा होता. ही गोष्ट म्हणजे (स्कूल फायनल) अथवा शालान्त परीक्षेंत करावयाचा मराठीचा अभ्यास. हा अभ्यास इंग्रजीद्वारा करावा लागत असे. या विषयांतील उत्तरें परीक्षेमध्यें इंग्रजींत लिहावीं लागत हें सांगणें नकोच. स्वतःच्या मातृभाषेची ओळख अथवा (मातामही–भाषे–चा परिचय) सर्व प्रकारांनीं विजातीय असलेल्या सप्तसमुद्रांपलीकडून आलेल्या इंग्रजीच्या द्वारा करून घेणें म्हणजे एका प्रकारें मूर्खपणाची सीमाच नाहीं काय? पण असा मूर्खपणा अनेक तपें आपणांत चालू होता. या मूर्खपणाला आवर कसा पडला?

**२ मराठी माध्यम**—आपली जन्मभाषा मराठी. तिचा विश्वविद्यालयांत प्रवेश व्हावा एतदर्थ पुण्यश्लोक महादेव गोविंद रानडे यांनीं बरीच खटपट केली असें ऐकतों. आपल्या Deccan Education Societyचे आजीव सेवक प्रो. हरीभाऊ लिमये यांनींहि हा विषय हातीं घेतला होता. आणि या कार्यांत क्रमानें यशहि येत चाललें आहे. हल्लीं कॉलेजांत अथवा महाविद्यालयांत मराठी भाषा सर्व परीक्षांत ऐच्छिक म्हणून प्रविष्ट झालेली आपण पाहतोंच. याप्रमाणें अध्येय (अभ्यासावयाची) या नात्यानें मराठी भाषा आतां सुप्रतिष्ठित झाली आहे. त्याप्रमाणेंच अध्येय विषयांचें माध्यम म्हणून मराठीस मान्यता मिळविण्याचा प्रयत्न दिवंगत प्रो. विश्वनाथ बळवंत नाईक यांनीं बऱ्याच नेटानें केला. मॅट्रिक परीक्षेंत संस्कृताचीं उत्तरें मराठींत देण्याची सवड पुढें-मागें मिळावी या अपेक्षेनें त्यांनीं प्रथम यत्ता ४–५–६ मधून इतर विषयां-बरोबर संस्कृताचें अध्यापन मराठीच्या माध्यमानें करण्याची अनुमति शाळा-खात्याकडून सन १९०९ मध्यें मिळविली. हें माध्यम संस्कृताच्या अभ्यासास विशेषच उपकारक झालें, हें सांगणें नकोच. तसें तें होणारच. कारण संस्कृताचा

मराठीशीं संबंध अत्यंत निकट आहे. मराठी माध्यमापासून होणारा लाभ लक्षांत येऊन क्रमानें इतर शाळांनींहि हा मार्ग हळूहळू स्वीकारिला. यावरून इतर गोष्टींतल्याप्रमाणें येथेंहि साभिमान म्हणतां येतें कीं, The New English School leads and others follow. हें माध्यम साहजिक आणि अत्यंत उपकारक आहे;—या गोष्टीची साक्ष पुढील गोष्टीवरून पटते. ती गोष्ट म्हणजे सन १९२५ पासून मॅट्रिक-परीक्षेमध्यें (आणि अर्थात मॅट्रिकच्या वर्गांतून) संस्कृताचें माध्यम म्हणून मराठीचा उपयोग सर्वस्वीं मान्य झाला आहे. या मान्यतेमध्यें मराठीचें माध्यम सर्वोत्कृष्ट आहे याचें बलवत्तर प्रमाण आढळतें. Nothing Succeeds like Success. (सफलं सत्तमं मतम्) संस्कृताच्या अध्ययनास मराठी ही परिचय-भाषा म्हणून किती उपयुक्त आहे याविषयीं इतर प्रमाणें आहेतच; पण हें माध्यम विश्वविद्यालयानें अंगिकारिलें आहे ही एकच गोष्ट येथें भरपूर प्रमाण आहे.

**३ मराठी माध्यमाची निर्दोषता:**—वर सांगितल्याप्रमाणें संस्कृताच्या अध्ययनांतील इंग्रजीचा बांध दूर झाल्यानें संस्कृत भाषा विद्यार्थ्यांत सोपी झाली हें निश्चित. पण याच समयाला दुसरी एक घटना घडून आली ती म्हणजे संस्कृत भाषा—जी वस्तुतः मातामही असल्यानें आपणांस कठीण जाऊं नये ती, स्थूलदृष्ट्या शिकल्यानेंहि विद्यार्थ्यांस परीक्षेंत उत्तीर्ण होतां यावें, एतदर्थ विद्वानांचा प्रयत्न. या प्रयत्नाचें स्वरूप म्हणजे संस्कृताच्या व्याकरणांतील कठीण आणि विरलप्रयुक्त असे भाग गाळणें; एवढेंच नव्हे तर, संस्कृत व्याकरणास शंभरांपैकीं केवळ १५ गुण ठेवणें. यापासून होणारी हानि निःसंशय कालक्रमानें दिसून येईलच. तरी पण या हानीस मराठीचें माध्यम हें मुळींच कारण धरतां येणार नाहीं हें उघड आहे. या माध्यमामुळें संस्कृताच्या अध्ययनांत वांचणारा वेळ खरें पाहतां संस्कृताच्या अधिक खोल अध्ययनाकडे लावतां येऊन, विद्यार्थ्यांचें संस्कृताचें ज्ञान गाढतर व्हावें. पण असें संस्कृताचें अध्ययन विद्यार्थी प्रायः करतांना दिसत नाहींत. म्हणजे माध्यम बदलल्यामुळें थोड्या श्रमाची बचत यापलीकडे कोणताच लाभ विद्यार्थ्यांच्या पदरीं पडत नाहीं. अर्थात् हा दोष माध्यमाचा मुळींच नाहीं. मराठी हें माध्यम आणि व्याकरणाचा संक्षेप व त्यामुळें येणारी ज्ञानाची शिथिलता— या गोष्टी प्रायः समकालोत्पन्न झाल्या एवढेंच. परसांत

नळाचें पाणी आलें असतां लांबून पाणी आणावयास लागणारा वेळ आतां फुलझाडें लावणें इत्यादि कामांत न लावतां, धनी अधिकच आळशी झाल्यास तो दोष नळाचा नसून धन्याचाच आहे. ही गोष्ट लक्षांत आणून, संस्कृताच्या अध्ययनास मराठी हें निसर्गानुकूल, हितकर माध्यम लाभलें असतां पुष्कळशा विद्यार्थ्यांनीं केवळ परीक्षार्थी बनून आपलें संस्कृताचें ज्ञान अभ्यासानें गाढतर न करितां उथळच ठेविल्यास तो माध्यमाचा दोष नाहीं, हें कोणासहि पटेल. चांगली गोष्ट केव्हांहि चांगलीच. तिच्यापासून योग्य लाभ एखाद्यानें न साधल्यास त्यांत तोच दोषी. वरील विवेचनावरून, या संस्थेनें संस्कृताचें माध्यम नेटानें प्रयत्न करून इंग्रजीचे स्थानीं मराठी मान्य करून घेतलें या गोष्टीबद्दल केव्हांहि विद्यार्थिवर्गानें या संस्थेचे उपकार स्मरणें योग्य आहे. या माध्यम बदलण्याप्रमाणेंच इतरहि उपर्युक्त बदल शिक्षणाचे कामांत या संस्थेकडून उत्तरोत्तर घडून येवोत अशी आशा करून आपला निरोप घेतों.

# इंग्रजीच्या अध्यापनांतील अनुभव

लेखकः—केशव विष्णु साने

हा विषय संभाषणपद्धतीनें शिकविण्याचे यशस्वी प्रयत्न कै. प्रि. वासुदेवराव पटवर्धन सुपरिंटेंडेंट असतांना त्यांनीं केले व नंतर Direct Method ची सुरुवात प्रो. नाईक यांच्या कारकीर्दींत झाली. तत्पूर्वी मी दुसऱ्या यत्तेंत शिकत असतांना गु. शंकरराव लवाटे आम्हांस इंग्रजी शिकवीत. New Royal Reader No. 2 हें आमचें वाचनपुस्तक होतें. Direct Method अगर संभाषणपद्धति ही भाषा त्या वेळीं नव्हती. पण गु. लवाटे हे आम्हांस कसें शिकवीत तें मला अजून स्मरतें. या पुस्तकांत तोंडांत छत्री असलेल्या कुत्र्याचा एक धडा आहे. त्यांतील पहिलेंच वाक्य– There is a dog with an umbrella in its mouth– या वाक्याचे त्यांनीं दोन भाग केले. There is a dog. It has an umbrella in its mouth. नंतर त्यावर इंग्रजींत प्रश्न विचारले आणि त्या दोन वाक्यांचें आम्हांकडून मूळ स्वरूपांत एक वाक्य करून घेतलें. नंतर There is a boy. He has a book in his hand. There is a boy with a book in his hand, हीं व अशा तऱ्हेचीं बरींच वाक्यें आम्हांकडून करवून घेतलीं. प्रत्येक धड्यांतील सोप्या व उपयुक्त रचना आम्हांकडून ते बसवून घेत व त्यांवर इंग्रजींत पुष्कळ प्रश्न विचारीत. तर्खडकरांची पाठमाला तेव्हां होतीच पण इंग्रजी वाचन-पुस्तक हें मुख्य साधन समजलें जाई. श्री. लवाटे यांच्या पद्धतींत संभाषणावर व वाक्यरचनेवर भर असे. भाषा शिकविण्याच्या पद्धतीचा श्री. लवाटे यांनीं शास्त्रीय तऱ्हेनें विचार केला होता कीं नाहीं तें मला माहीत नाहीं, पण नियमांच्या आधारें भाषा शिकविण्यापेक्षां ती वापरून श्रवण व उच्चार यांनीं शिकविणें हें अधिक सुकर व विद्यार्थ्यांना आकर्षक असें त्यांस वाटत असावें.

कै. प्रो. भानू सुपरिंटेंडेंट असतांना प्रत्येक वर्गांत जाऊन प्रश्न विचारण्याची

त्यांची प्रथा असे. ते, जो धडा चालला असेल त्यावर इंग्रजींत बरेच प्रश्न विचारीत; पण शिक्षकांकडून ही गोष्ट फारशी होत नसे.

कै. प्रि. पटवर्धन सुपरिंटेंडेंट असतांना खालच्या वर्गातून भाषांतर-पद्धतीनें शिकविणें हें चुकीचें आहे असें ते म्हणत. पण आम्हां शिक्षकांना ही गोष्ट पटत नसे. पण त्यांच्या अल्प अशा कारकीर्दींत पहिल्या तीन इयत्तांतून Direct Method जरी नव्हती, तरी इंग्रजी संभाषणावर बराच भर देण्यांत आला.

पुढें मुंबईस Secondary Teachers' Training College सुरू झालें (१९०६). त्यावर प्रो. नेल्सन फ्रेझर यांची प्रिन्सिपल म्हणून नेमणूक झाली. तेव्हां या गृहस्थांनीं हा प्रश्न हातीं घेतला, आणि Elphinstone Schools मध्यें प्रयोग करून Direct Method पुढें आणिली. त्यांनीं शिक्षकांसाठीं लिहिलेलीं पुस्तकें फारच उपयुक्त आहेत. या ट्रेनिंग कॉलेजांतून तयार झालेले शिक्षक खाजगी शाळांच्या वांट्यास आरंभीं पुष्कळ वर्षें येत नसत. म्हणून खाजगी शाळांना नवीन पद्धतींचा फायदा मिळावा म्हणून सरकारनें १९१४ सालीं कै. आचार्य यांची व माझी या कामीं नेमणूक केली. आम्हीं दोघांनीं हें काम पुण्याच्या शाळांत चार वर्षें केलें. आमचें मुख्य काम खालच्या वर्गांना Direct Method नें शिकविणारे शिक्षक तयार करणें हें होतें. अर्थात् इतर विषय, विशेषतः भूगोल व गणित, शिकविण्याच्या पद्धतीकडेहि आम्हीं लक्ष देत होतों. शिवाय दर शनिवारीं नानावाड्यांत आमच्या हाताखालीं असलेले खाजगी शाळांतील शिक्षक व S. T. C. चा अभ्यास करणारे शिक्षक यांच्या-साठीं शिक्षणपद्धति, शिक्षणाचा इतिहास वगैरे S. T. C. ला उपयोगी पडणाऱ्या विषयांवर श्री. आचार्य व मी व्याख्यानें देत असूं. इतर शिक्षकहि या व्याख्यानांना हजर रहात.

Direct Method संबंधीं फार मोठा गैरसमज म्हणजे या पद्धतींत मातृ-भाषा, व्याकरण व स्पेलिंग यांना बिलकूल स्थान नाहीं! प्रचलित भाषा कशा शिकवाव्या यावर इंग्रजींत पुष्कळ ग्रंथ आहेत. ते जरी नाहींत, तरी बिचाऱ्या फ्रेझरसाहेबांनीं लिहिलेलीं, व ज्यांची किंमत कांहीं आण्यांहून जास्त नाहीं, अशीं पुस्तकें आक्षेपकांनीं वाचण्याची तसदी घेतली असती तर हे गैरसमज उत्पन्न झाले नसते.

जे इंग्रजी शब्द प्रत्यक्ष वस्तु, Model अगर चित्र यांच्या साहाय्यानें शिकविणें शक्य आहे ते तसे शिकविणें; पण जे शब्द–भाववाचक कल्पना–वस्तुदर्शनानें शिकविणें शक्य नाहीं ते शब्द मातृभाषेंतील प्रतिशब्द देऊनच शिकविले पाहिजेत. पण एकदां इंग्रजी ध्वनि (शब्द) व त्यानें व्यक्त होणारी कल्पना यांची मातृभाषेंतील शब्दाच्या द्वारें सांगड घालून झाली म्हणजे त्या नवीन इंग्रजी शब्दाचा पुष्कळदां उपयोग करण्याचे प्रसंग आणून, अर्थ समजण्यास मातृभाषेंतील शब्दाच्या मध्यस्थीची जरूरी नाहींशी करणें, हें Direct Method चें सार म्हणतां येईल; पण याचा अर्थ मातृभाषेवर बहिष्कार असा होत नाहीं.

इंग्रजी शिकविण्यास व्याकरणापासून सुरुवात न करतां सामान्यतः Direct Method नें शुद्ध रचनांची क्रमाक्रमानें कानाला थोडीबहुत सवय झाली म्हणजे त्या रचना पक्क्या व्हाव्या म्हणून Inductive पद्धतीनें व्याकरणाचे नियम बनवावयाचे, आणि हा व्याकरणाचा अभ्यास भाषाज्ञानाला पोषक होण्यासाठीं तो, भाषापाठ–Language lessons–यांजवर आधारला पाहिजे.

Spelling चा व Direct Method चा तत्त्वतः कांहीं संबंध नाहीं हें खरें, कारण Direct Method चा जो उद्देश भाषा बोलतां येणें व बोललेली समजणें–याला Spelling ची जरूरी नाहीं. पण भाषा लिहितां आली पाहिजे व लिहिलेली कळली पाहिजे; ही गोष्ट Spelling च्या ज्ञानाशिवाय शक्य नाहीं. हें भाषा शिकविण्यासाठीं तयार केलेला शिक्षक विसरत नाहीं आणि Spelling शिकविण्याचा उद्देश–भाषा लिहितां येणें व वाचतां येणें–हा मनांत बाळगून तो Spelling सर्वस्वीं मुलांवर न सोपवितां फळ्यावरून, शक्य असेल तेव्हां सारख्या Spelling च्या शब्दांचे गट करून, शिकवितो. पूर्वी पुस्तक वाचून व भाषांतरानें इंग्रजी शिकविण्याची पद्धत असल्यामुळें सामान्यतः भाषा-शिक्षणांत कानापेक्षां डोळ्यावर जास्त भिस्त असे. त्यामुळें Spelling कडे दुर्लक्ष होण्याचा संभव कमी होता. निवळ, Direct Method हा शब्द ऐकून तीसंबंधीं कल्पना बनवून जर कोणी शिकवूं लागेल तर Spelling कडें दुर्लक्ष होणें साहजिकच आहे. असले गैरसमज होऊं नयेत म्हणून कोणत्याहि नवीन पद्धतीनें शिक्षण देणें झाल्यास तिच्यासाठीं शिक्षक तयार करण्याची खबरदारी घेतली पाहिजे.

न्यू इंग्लिश स्कूलमध्यें पुढील शिक्षक Direct Method नें शिकविण्यास लायक झाले.

श्री. जी. व्ही. भिडे, एस्. टी. सी.
श्री. व्ही. व्ही. लिमये, एस्. टी. सी.
श्री. एस. एन्. फाटक, एस्. टी. सी.
श्री. बी. व्ही. देवधर, एस्. टी. सी.
श्री. एस्. के. कानेटकर, एस्. टी. सी.
श्री. व्ही. व्ही. कुळकर्णी.
श्री. एस. व्ही. ओक.

पुण्यांतील शाळांसाठीं शिक्षक तयार करण्याचें काम कै. आचार्य व मीं चार वर्षें केलें. या मुदतींत आम्हीं Direct Method नें इंग्रजी शिकविण्यासाठीं ४३ शिक्षक तयार केले. त्यांपैकीं १४ S. T. C. झाले आणि या १४ शिक्षकांपैकीं न्यू इंग्लिश स्कूलमधील असे पांच शिक्षक होते.

प्रो. नाईक यांचें या प्रयोगाकडे फार लक्ष होतें. या पद्धतीविषयीं बोलतांना त्यांनीं जळगांव येथें खानदेश दुय्यम शिक्षक संघाच्या अधिवेशन प्रसंगीं पुढील उद्‌गार काढले:—

"रा. **आचार्य** व **साने** यांनीं आम्हांस या कामीं बरीच मदत केली. पुढें आमच्या इतर शाळांतूनहि ही पद्धत आम्हीं सुरू केली; परंतु वरच्या शिक्षकांची अशी तक्रार येई कीं, खालच्या वर्गांत या नवीन पद्धतीमुळें व्याकरण व स्पेलिंगकडे पुरेसें लक्ष दिलें जात नाहीं....तथापि नव्या पद्धतीचा अवलंब करण्यास शिक्षकांस उत्तेजन देण्यांत आलें. कालांतरानें नवी पद्धत फलद्रूप झाली व तिनें शिक्षणक्षेत्रांत परिवर्तन करून सोडलें.

—**केसरी**, मंगळवार, ता. ८ मार्च १९३२"

# हस्तकौशल्य-शिक्षण

बौद्धिक शिक्षणाबरोबर हस्तकौशल्याचें शिक्षण देण्याची जरूरी आहे ही गोष्ट प्रो. हरीभाऊ लिमये यांच्या ध्यानांत आली व ते सुपरिंटेंडंट असतांना, १९०३ सालीं, हस्तकौशल्याचा एक ऐच्छिक वर्ग सुरू केला. १९०८ नंतर या वर्गाला व्यवस्थित स्वरूप येऊन रोज सायंकाळीं ५ ते ६ या वेळीं मेघडंबरीमध्यें हा वर्ग भरत असे. मुलांनीं केलेलीं लांकडी खेळणीं वगैरे वस्तूंचें प्रदर्शन दर साल भरविण्यांत येऊं लागलें. तथापि विद्यार्थी असावे तितके व नियतकालिक नसत. म्हणून शिक्षणसाहित्य अधिक वाढविण्याचा उपक्रम नियमित सुरू केला. विद्यार्थ्यांनीं केलेल्या वस्तु घरीं पालकांस दाखविण्यास पाठविण्यांत येऊं लागल्या; त्यामुळें पालकांचेंहि लक्ष या वर्गाकडे लागूं लागलें. १९१४-१५ सालीं रा. भास्कर विश्वनाथ घारपुरे, क्युरेटर लॉर्ड रे इंडस्ट्रियल म्यूझियम्, पुणें, यांची या वर्गावर नेमणूक झाली व तेव्हांपासून या वर्गाला चांगलीच भरभराट आली. रा. ब. चिनमुळगुंद हे वर्ग पाहावयास आले असतां संतुष्ट होऊन त्यांनीं रु. २५ ची देणगी दिली. रा. बी. एस्. कामत यांनीं आपला मुलगा या वर्गांत घातला. याचप्रमाणें पुढें हल्लींचे रा. आपटे इंजिनिअर, श्री. व्ही. एन्. सरदेसाई, आय. सी. एस्. व प्रो. गुपचुप हे विद्यार्थी या वर्गांत नियमितपणें येत असत. विद्यार्थ्यांना चांगल्या कामाबद्दल प्रोत्साहनार्थ बक्षिसांसाठीं हत्यारें देण्यास सुरुवात केली. श्री. लक्ष्मणराव किर्लोस्करांचे दोघे चिरंजीव शंतनुराव व राजा यांना या वर्गांत पहिल्या प्रतीचीं बक्षिसें मिळालीं होतीं. या वर्गाचे हे दोघे विद्यार्थी आज किर्लोस्कर बंधूंचा कारखाना चालवीत आहेत. विद्यार्थ्यांच्या श्रेष्ठपणांत अशा वर्गाचें शिक्षण अधिक भर घालतें असा अनुभव अनेक ठिकाणीं आलेला आहे. यापुढें विद्यार्थी निश्चित व नियमित व हुकमी लाभावयासाठीं हा ऐच्छिक वर्ग नादार व अर्धनादार विद्यार्थ्यांना अवश्य करावा असें प्रो. नाईक यांनीं ठरविलें. या विद्यार्थ्यांस चार आणे फी द. म. ची ठेविली व येथील कामावर नादारी मिळणें न मिळणें अवलंबून राहूं लागलें. यामुळें चांगल्या होतकरू व कष्टाळू विद्यार्थ्यांची संख्या ३-४ शें पर्यंत वाढली.

वार्षिक फीचें उत्पन्न ४—५ शें रुपयांपर्यंत होऊं लागलें व हा वर्ग चांगला कार्य-क्षम झाला व यामुळें सोसायटीनें औद्योगिक शिक्षणाची अधिक विस्तृत योजना हातीं घ्यावी असें ठरलें. पहिल्या तीन इयत्तांतील विद्यार्थ्यांना हा विषय आठवड्यांतून दोन वेळां देण्याची प्रथा या वेळेपासून पडली.

१९१९ सालीं विद्यार्थ्यांच्या कामांचें प्रदर्शन नेहमींप्रमाणें भरलें व तें फारच चांगलें झालें. प्रदर्शन पहावयास लो. टिळक व श्री. न. चिं. केळकर हे आले होते. विद्यार्थ्यांनीं केलेल्या कामाची विक्री सुमारें २-३ शें रुपये झाली. या प्रदर्शनामुळें या वर्गाचा नांवलौकिक चांगला वाढला व पालकांचेंहि लक्ष इकडे विशेष वेधूं लागलें. मुंबई इलाखा जंगल खात्यानेंहि या वर्गास मदत म्हणून दांडोली येथील सरकारी गुदामांतून सागवानाचे व शिसवीचे ४-५ मोठे ओंडे पाठवून दिले. या मदतीमुळें मुलांना कामें करावयास आतां मुबलक लांकूड मिळूं लागलें. कै. गणेश बळवंत लिमये यांचेकडून रुपये ६० बक्षिसाकरितां मिळत असत. ही बक्षिसें आतां हत्यारांच्या रूपानें द्यावयास सुरुवात केली. आवश्यक वर्गामध्यें ड्रॉइंग व हस्तकौशल्य यांचे तास एकापुढें एक-दोन असावेत अशी योजना केली; त्यामुळें निम्मा वर्ग ड्रॉइंग शिकावयास जाई व निम्मा हस्तकौशल्य शिकावयास जाई. या योजनेमुळें शिक्षकांना प्रत्येक विद्यार्थ्यांकडे अधिकाधिक लक्ष देतां येऊं लागलें व विद्यार्थ्यांचीं कामें अधिक चांगलीं होऊं लागलीं. रा. घारपुरे यांच्या शिकवणीमुळें या वर्गाला जें वळण लागलें तें पुष्कळ दिवस टिकून राहून जवळजवळ त्याचप्रमाणें आजहि काम चालू आहे.

# विदेशी खेळ

लेखकः—कृष्णाजी गोविंद किनरे

या खेळांत फक्त पुढील खेळांचा समावेश केला आहेः—१ क्रिकेट, २ फुट-बॉल, ३ हॉकी, ४ टग-ऑफ-वॉर व ५ किरकोळ ( हर्डल्स, लांब-उंच उड्या, इ० ).

आपल्या शाळेच्या संस्थापनेला आज बरोबर साठ वर्षें म्हणजे पांच तपें झालीं. त्यांतलें एकेक तप क्रमशः घेऊन त्याचें समालोचन केल्यानें जसें सोईचें, तसें चटकन् डोळ्यांत भरणारें होईल, असें वाटल्यावरून तो क्रम येथें स्वीकारिला आहे.

## तप १ लें

## ( सन १८८०–१८९१ )

या कालावधींत या विभागांत आपल्या शाळेला जवळ जवळ कांहींच करितां आलें नाहीं. याचें कारण, शाळेच्या संस्थापकांची व पुढील चालकांची शिक्षणाविषयींची कल्पना केवळ एकदेशी होती, असें नाहीं. विद्यार्थ्यांचें शरीर, मन, बुद्धि व आत्मा हीं यथाप्रमाण पुष्ट होण्याची सवड ज्या शिक्षणपद्धतींत असते, तीच शिक्षणपद्धति सर्वांगपरिपूर्ण होय; यांपैकीं कोणत्याहि अंगाची उपेक्षा झाल्यास, तें शिक्षण व्यक्तीला, तसेंच समाजाला व राष्ट्राला सुपरिणामी न होतां घातकच होतें, याची जिवंत जाणीव त्यांना होती; पण आरंभीच्या अकिंचन परिस्थितींत त्यांना कांहीं करितां आलें नाहीं. इतर निकडीच्या गोष्टींची जमवाजमव करून मुलांच्या वाढत्या संख्येची सोय लावतां लावतांच त्यांची त्रेधातिरपीट उडत होती. याचें कारण एकच : विद्या, बुद्धि, सद्विचार, हौस, उत्साह, निरपेक्षता यांत ते खूप श्रीमंत होते; पण व्यावहारिक द्रव्यांत त्यांची श्रीमंती शून्य होती. यामुळें बौद्धिक शिक्षणाचें उपक्रमाबरोबर मुलांच्या शारीरिक शिक्षणाची व्यवस्था या पहिल्या काळांत त्यांना करितां आली नाहीं. पण ही उणीव शक्य तितक्या लौकर भरून काढण्याकरितां ते प्रखर

तळमळीनें सारखे धडपड करीत होते. इतकेंच नव्हे तर याच ओघांत असें अभिमानानें म्हणतां येतें कीं, स्थापनेपासून या क्षणापर्यंतच्या काळांत आपल्या शाळेनें बौद्धिक शिक्षणांत जसा नांवलौकिक मिळवून तो सारखा निष्कलंक ठेविला आहे, तसाच शारीरिक शिक्षणांतहि चांगला नांवलौकिक कमावून तो आजपर्यंत चांगला उजळ ठेविला आहे. शाळेचे मूळ संस्थापक, होऊन गेलेले व आज असलेले चालक, यांपैकीं कोणीहि शारीरिक शिक्षणाची उपेक्षा केली नाहीं व करीत नाहीं हें निःसंशय आहे. शाळेचा तेजस्वी इतिहास हें सत्य बाहू उभारून स्पष्टपणें सांगत आहे.

शाळेच्या दरिद्री संस्थापकांच्या मनोरथांची कशी जागच्या जागीं कुचंबणा होत होती, याचें प्रत्यंतर एका लहानशा गोष्टीवरून सहज येतें. आपल्या शाळेंतील विद्यार्थ्यांच्या शारीरिक शिक्षणाची कांहीं तरी सोय लागावी, असा हेतु संस्थापकांच्या मनांत प्रारंभापासून होता. शाळा इतिहासप्रसिद्ध मोरोबा-दादांच्या वाड्यांत प्रथमतः सुरू झाली. तो वाडा शाळेला सोइस्कर नव्हता व लहानहि होता. शाळेच्या मुलांच्या वाढत्या संख्येला तो फार दिवस पुरा पडणारा नव्हता. शिवाय तेथें आखाड्याला जागा नव्हती; द्रव्याची तंगीहि जाणवत होतीच. यामुळें ती कल्पना पहिल्यानें मागें टाकावी लागली. दोन वर्षें होतात न होतात तोंच मुलांच्या वाढत्या संख्येला तो वाडा अपुरा होऊं लागला. त्यामुळें शाळेचें स्थलांतर दुसऱ्या एका इतिहासप्रसिद्ध प्रशस्त वाड्यांत—पेशव्यांचे सावकार गद्रे यांच्या वाड्यांत— झालें. त्या वाड्यांत, लहानसा का होईना, पण आखाडा करण्यास जागा करणें शक्य दिसल्यामुळें तो तयार करण्याच्या संकल्पानें उचल केली. आंखाड्याला सुमारें पांचशें रुपये लागणार होते व ते तर संस्थेजवळ नव्हते. लोकांपुढे झोळी पसरावी तर संस्थेच्या कर्तृत्वाची लोकांना अद्याप पुरी खात्री पटावयाची होती. उपहासबुद्धि, साशंकवृत्ति व उदासीनता यांचें आरंभीं सभोंवतीं पसरलेलें दाट धुकें जरी पुढें कांहींसें विरळ झालें होतें, तरी तें पूर्णपणें नष्ट झालें नव्हतें. यामुळें आखाडयाची कल्पना पुढें सुमारें तीन वर्षें अमूर्तच राहिली. पुढें एका सद्‌गृहस्थांकडून देणगी मिळाल्यानें गद्रेवाडयाच्या मागील चौकाच्या एका भागांत आखाडा तयार झाला.

जसजसें शाळेचें नांव होऊं लागलें, तसतशी शाळेंत मुलांची भरती वाढूं लागली. गद्रेवाडा पुरेनासा झाला. तेव्हां त्याच्याच शेजारचा होळकरांचा

इतिहासप्रसिद्ध वाडा नाममात्र भाड्यानें मिळविण्यांत संस्थेनें यश मिळवून त्या वाड्यांत पहिल्या तीन इयत्ता बसविण्याची व्यवस्था केली. पुढें हळूहळू संस्थेला बरे दिवस दिसूं लागले. संस्थेविषयीं लोकांत अभिमान, कौतुक, सहानुभूति या भावना जागृत झाल्या. डे. ए. सोसायटीची स्थापना होऊन शाळेला सार्वजनिक मालकीचें स्वरूप आल्यानें तिला स्थैर्य आलें. ती लोकांचीच संस्था झाल्याकारणानें लोकांकडून तिला बरीच मदत होऊं लागली. शाळेंतील मुलांना शारीरिक शिक्षणाच्या गैरसोयीचें व्यंग, जें चालकांच्या मनांत डांचत होतें, तें दूर करण्याला अशा रीतीनें अनुकूल काल आला. तो साधण्याकरितां प्रथमतः शाळेला जवळच कोठें तरी विस्तृत क्रीडांगणाकरितां जागा शोधण्याचा उद्योग सुरू झाला. त्या उद्योगाला फळ येऊन क्रीडांगणाकरितां इतिहासप्रसिद्ध कबूतरखाना सुमारें सातआठ हजार रुपयांना संस्थेला विकत मिळाला. ही गोष्ट सन १८८८ सालीं झाली. पहिल्या तपांत शाळेच्या हातून डोळयांत भरण्यासारखी विदेशी खेळांची किंवा एकंदरींत मुलांच्या शरीरसंवर्धनाची जवळ जवळ कांहीं जरी डोळयांत भरण्यासारखी कामगिरी झाली नसली, तरी कबूतरखान्यासारखी विस्तृत व सोइस्कर जागा शाळेकरितां संपादित करून जी शारीरिक शिक्षणाची कायमची सोय आरंभींच्या चालकांनीं करून ठेविली, तीमुळें पुढें शाळेला त्या शिक्षणाच्या बाबतींत कर्तृत्व दाखविण्याला केवढा तरी आधार मिळाला ! तेवढा आधार नसता, तर पुढील काळांत शाळेनें जो देशी-विदेशी खेळांत अभिमानास्पद लौकिक मिळविला, तो तिला मिळवितां आला असता कीं नाहीं याची शंकाच आहे. कबूतरखान्याचें संपादन हा पुढील कर्तबगारीचा पायाच होय. कबूतरखान्याच्या जमिनीची नीट साफसफाई केल्यानंतर शाळेच्या चालकांनीं विदेशी किरकोळ खेळांचीं उपकरणें कांहीं विलायतेंतून आणवून व कांहीं येथें करवून त्याच वर्षी व्यवस्थित उभीं केलीं. अशा रीतीनें विदेशी खेळांच्या सोईची सर्व सिद्धता या पहिल्या तपांत झाली.

या पहिल्या तपाचें समालोचन करितांना कांहींसा विसंगत असा त्या काळच्या इतिहासाचा प्रपंच करावा लागला, त्याला इलाज नाहीं. पुढील मनोहर चित्राला उठाव येण्याकरितां या प्रपंचाच्या पार्श्वभूमीची आवश्यकताच होती. असो, आतां दुसऱ्या तपाचा विचार.

## तप २ रें

### (१८९२–१९०३)

या तपाचीं पहिलीं तीन चार वर्षें पाहिलीं, तर कबूतरखान्यासारखी मोकळी, मौजेची, मोठी जागा मिळाल्यामुळें शाळेंतील शेंकडों विद्यार्थी देशीविदेशी लहानमोठ्या खेळांत दंग असतांना रोज सायंकाळीं तेथें दिसत असत. त्यांचा उत्साह दांडगा असे. त्या स्वाभाविक उत्साहाला आणखी चालना देण्याकरितां १८९५ सालीं शाळेच्या चालकांनीं आपल्या विद्यार्थ्यांकरितां निरनिराळ्या देशीविदेशी खेळांचें एक क्रीडासत्र करण्याची योजना केली. सात्त्विक स्पर्धेनें मुलांच्या कर्तबगारीला किती स्फूर्ति मिळते, याचें वर्णनहि करितां येणार नाहीं. अशी स्फूर्ति मिळावी, हाच वरील सत्राचा मुख्य हेतु होता. या सत्राची योजना शिमग्याच्या निमित्तानें म्हणून झाली होती. त्यांत क्रिकेट, फुटबॉल, बार, लांब व उंच उड्या, निरनिराळ्या अंतरांवर पळणें इत्यादि विदेशी, व कुस्ती, मलखांब, पट्टा इत्यादि देशी खेळांचा समावेश करण्यांत आला होता.

या सत्रांत सुमारें २०० विद्यार्थी स्वयंस्फूर्तीनें सामील झाले होते. मुलांना सत्राचा उपयोग पुढें चांगलाच झाला.

पण या सत्राचें लोकांकडून जितकें कौतुक होणें अगत्याचें होतें, तितकें झालें नाहीं. लोकांचा सगळा भर केवळ बौद्धिक शिक्षणावर! शारीरिक शिक्षणाविषयीं ते उदासीन होते. त्याचें महत्त्व त्यांना वाटत नव्हतें. शारीरिक शिक्षणाबद्दलच या काळच्या लोकांत व पालकांत जी अनास्था होती, ती अगदीं कींव करण्यासारखी होती. आजच्या काळांत मात्र लोकांच्या मनांत बराच पालट झालेला आहे व होत आहे, हें सुचिन्ह होय.

अशा रीतीनें शाळेच्या बौद्धिक व शारीरिक शिक्षणाची घडी व्यवस्थित बसत चालली असतांना प्लेगची अकल्पित दैविक आपत्ति सबंध महाराष्ट्रावर कोसळली. पुण्यावर तर तिचे दरवर्षी जास्त जास्त जोराचे आघात बसूं लागले. शाळेची सुंदर बसलेली घडी या वारंवार बसणाऱ्या आघातांनीं पुरी विसकटून गेली. मुलांच्या अभ्यासाचें मातेरें होऊं लागलें. शाळेला आपला जीव संभाळतां संभाळतां नाकीं नऊ आले. मग त्या काळांत कसलें शारीरिक शिक्षण नि कसलें काय!

झाली. त्यानें क्रिकेटच्या खेळाला चांगलीच उठावणी मिळाली. म्हणून या जयाचें महत्त्व विशेष. १९०५ सालचा योग अशुभ ठरला. त्या सालच्या शेवटच्या सामन्यांत आपल्या शाळेच्या संघांतील एका गड्याला नाजूक ठिकाणीं चेंडू लागल्यानें तो बेशुद्ध झाला. त्याच्या शुश्रूषेंत स्वतः कै. हरिभाऊ लिमये (त्या वेळचे सुपरिंटेंडेंट) शिक्षक व विद्यार्थी गर्क असतांना विरुद्ध पक्षानें कांहींसें अनुदार वृत्तीचें धोरण धरल्यामुळें कै. हरिभाऊंनीं कांहींसें वैतागानें पण स्वखुषीनें सामना बंद केल्याचें लिहून दिल्यानें जय आपोआप विरुद्ध पक्षाच्या पदरांत पडला. १९०६।७।८ या तिन्ही वर्षी आपल्या शाळेचा जय होऊन किक्रेटची ढाल शाळेकडे राहिली. मध्यें १९०७ सालीं पूना स्कूल्स ॲथ्लेटिक ॲसोसिएशननें पंधरा वर्षांखालील मुलांकरितां आंतरशालेय क्रिकेटचे सामने दर वर्षी घडवून आणण्याची योजना करून विजयचिन्ह म्हणून एक 'पेला' ठेविला. अशा रीतीनें प्रत्येक शाळेंत क्रिकेट संघाचे दोन वर्ग पडले; एक मोठा, एक धाकटा. या धाकट्या संघांचे सामने याच सालीं होऊन आपला संघ पराभूत झाला. पण त्याचा वचपा पुढल्या वर्षी निघाला. १९०८ सालांत आपल्या शाळेच्या धाकट्या संघानें पहिला विजय मिळवून मोठ्या संघाचा कित्ता गिरविला. याच सालीं टग-ऑफ-वॉर-मध्येंहि आपल्या शाळेनें पहिला जय मिळविला. अशा रीतीनें क्रिकेटची मोठी ढाल, 'पेला' व टग ऑफ वॉरची ढाल हीं तिन्हीं विदेशी खेळाचीं विजयचिन्हें आपल्या शाळेनें पहिल्यानें मिळविल्यानें तिचा या खेळांतील नांवलौकिक फारच वाढला. या वर्षी टग ऑफ वॉरच्या संघाला पद्धतशीर शिक्षण देण्याची योजना त्या वेळचे सुपरिंटेंडेंट प्रो. राजवाडे यांनीं लष्करी शिक्षक नेमून केल्यामुळें व स्वतः आस्थापूर्वक तिकडे रोज नजर ठेविल्यानें हें यश शाळेला मिळालें. याचें सर्व श्रेय प्रो. राजवाडे यांना आहे. आमच्या शाळेच्या क्रिकेटमधील १९०४ सालच्या पहिल्या जयाचें जितकें महत्त्व आहे, तितकेंच या टग ऑफ वॉरच्या पहिल्या जयाचें आहे. यापूर्वीच्या सर्व वर्षी टग ऑफ वॉरचें विजयचिन्ह लष्करांतील शाळांनींच मिळविलें होतें. ती ढाल गांवांत आणण्याचा पहिला मान आपल्या शाळेनें मिळविला, व सगळ्या शाळांना यशाचा मार्ग चोखाळून ठेविला. यानंतर अशा कांहीं घटना बनल्या कीं, शाळेला या संघांतून आपलें नांव काढून घेणें प्राप्त झालें. तो इतिहास अप्रिय आहे. म्हणून त्याचा उल्लेख येथें करीत नाहीं.

ॲसोसिएशनचा संबंध सोडल्यानंतर १९१५ सालीं आमच्या शाळेनें आपल्या शाळेपुरते सर्व देशीविदेशी खेळांचे सामने घडवून आणण्याची योजना करून तीप्रमाणें पहिले सामने त्याच सालीं झाले.

या तपांत ॲसोसिएशनमार्फत झालेल्या वार्षिक किरकोळ खेळांत आमची शाळा दरवर्षी भाग घेत असे; पण दरवर्षी चारदोन किरकोळ बक्षिसें मिळविण्यापलीकडे तिला कांहीं जास्त लाभ होत नसे. याचें कारण या तपांत प्लेगची स्वारी दरवर्षी बहुधा होत राहिल्यामुळें शाळेचीच सगळी घडी अव्यस्थित होत असे. त्यामुळें किरकोळ खेळांकडे विशेषसें लक्ष देणें शाळेला शक्यच झालें नाहीं. तथापि या खेळांत शाळेनें आपला पूर्वीचा लौकिक माल कायम ठेविला. प्लेगच्या आपत्तीचा विचार केला, म्हणजे हेंहि कांहीं कमी नाहीं.

अशा रीतीनें सुखदुःखमिश्रित अशी ही तिसऱ्या तपाची कहाणी संपली.

## तप ४ थें

## (१९१६-१९२७)

या तपाच्या पहिल्या पांच वर्षांत शाळेचे वार्षिक सामने फक्त दोन वर्षेंच झाले. केवळ प्लेगमुळें ते तीन वर्षे झाले नसावे. या वेळीं ॲसोसिएशनचा संबंध सुटल्याला सात वर्षें झालीं होतीं. हा संबंध सुटल्यानें शाळेचें जितकें नुकसान होत होतें, त्यापेक्षां प्रत्यक्ष ॲसोसिएशनचें शेंकडों पटींनीं जास्त होत होतें. तिचे आंतरशालेय स्पर्धेचे वार्षिक सामने जरी नियमानें वर्षास सुरू होते, तरी त्यांत आमची शाळा नसल्यामुळें खरा 'राम' नव्हता. त्यामुळें ॲसोसिएशनचें वार्षिक कार्य फिकट दिसूं लागलें. शेवटीं तोडलेला संबंध आपल्या शाळेनें पुन्हा जोडावा, असे प्रयत्न होऊं लागले. घडलेल्या अद्दलीपासून ॲसोसिएशन यापुढें वागतांना धडा घेतल्यावांचून राहणार नाहीं, असा मनाशीं विचार करून आमच्या शाळेच्या त्या वेळच्या चालकांनीं पुन्हा ॲसोसिएशनला मिळण्याचा बेत केला व तो त्याच वर्षी ( १९२१ सालीं ) तडीसहि नेला. ॲसोसिएशनमार्फत होणाऱ्या त्याच सालच्या आंतरशालेय सर्व खेळांत शाळेनें भाग घेऊन क्रिकेटचीं दोन्ही विजयचिन्हें ( ढाल व पेला ) मिळविलीं. गेल्या सात वर्षांत आमचे क्रिकेटच्या शिक्षणाचे प्रयत्न ॲसोसिएशन सुटल्यामुळें मुळींच ढिले झाले नव्हते याचें प्रत्यंतर पहिल्याच वर्षी

आमच्या दोन्ही संघांनीं जो हा विजय मिळविला, त्यावरून सहजच येतें. असो.

पी. वाय्. सी. हिंदु जिमखान्यामार्फत होणाऱ्या फुटबॉलच्या सामन्यांत भाग घेऊन आमची शाळा पहिल्यानें १९२० सालीं विजयी झाली व तिनें जिमखान्याचा 'कप' मिळविला. तो 'कप' १९२१ सालींहि शाळेला पुन्हा मिळाला. १९२२ सालीं शाळेचे दोन्ही क्रिकेट संघ पराभूत झाले. मात्र फुट-बॉल कप या वर्षीहि सारखा तिसऱ्यांदा मिळाला. १९२३ सालीं मागील साल-च्या क्रिकेट संघाच्या पराभवाची पुन्हा आवृत्ति झाली. तशीच आवृत्ति फुट-बॉलच्या विजयाचीहि झाली. तो कप आमच्या शाळेकडे सारखा चार वर्षे राहिला. याच सालीं ॲसोसिएशनच्या वार्षिक किरकोळ खेळांत शाळेनें पांच पदकें मिळविलीं. १९२४ सालीं क्रिकेटचा धाकटा संघ यशस्वी होऊन शाळेला 'कप' मिळाला. टग ऑफ वॉरची ढालहि मिळाली. १९२५ सालीं मोठा क्रिकेट संघ विजयी होऊन शाळेला क्रिकेट ढाल मिळाली. १९२६ सालीं दोन्ही क्रिकेटचे संघ विजयी झाले. १९२७ सालीं त्यांनीं मागील वर्षीचा आपला मान कायम राखला. क्रिकेटची ढाल सारखी तीन वर्षे आपल्या शाळेकडे राहिली. अशी राहिल्याचा हा दुसरा योग होय.

या तपांतील पहिलीं पांच वर्षे सोडलीं, तर बाकीचीं सात वर्षे मोठीं संस्मरणीय होत यांत शंका नाहीं. हा काल म्हणजे ॲसोसिएशनला पुन्हा मिळाल्यानंतरचा होय. या सात वर्षांत क्रिकेटची ढाल चार वेळां, क्रिकेटचा 'पेला' तसाच चार वेळां, टग ऑफ वॉर एक वेळ आणि फुटबॉलचा 'पेला' तीन वेळां, अशीं विजयचिन्हें शाळेनें मिळविलीं. ॲसोसिएशन सुटल्यानें आमच्या शारीरिक शिक्षणाचे उद्योगांत तिळमात्रहि कमीपणा तर आला नाहींच; पण उलट तो जास्त जोरानें सुरू झाला, याचें प्रमाण या विजयांवरून दिसतें.

तिसऱ्या तपांत शाळेला विदेशी खेळांत, विशेषतः क्रिकेटच्या खेळांत, जें वैशिष्ट्य प्राप्त झालें होतें, तें त्याच प्रमाणांत या चवथ्या तपांतहि कायम राहिलें, असें स्पष्ट निदर्शनास येतें. फुटबॉल नवीन सुरू करून त्यांत चांगली तयारी या काळांत शाळेनें केली, हा या तपाचा एक विशेष होय. किरकोळ खेळांत मात्र हें तप मागील तपाच्या पंक्तींतच बसतें.

## तप ५ वें
## (१९२८-१९३९)

आतां पांचव्या म्हणजे शेवटच्या तपाचें समालोचन. शाळेच्या गेल्या साठ वर्षांच्या जीवनांतील जसें हें कळसाचें तप होय, तसेंच हें गुणांत, विजयांत व नांव लौकिकांतहि कळसाचेंच आहे. या अवधींत विविध व मनोहर यशोमालिकेनें शाळेला विशेष सुशोभित केलें. कित्येक विजयचिन्हें सतत अनेक वर्षें शाळेनें जिंकलीं, कित्येक नवीन खेळ सुरू करून त्यांतहि लवकरच अनेक विजय मिळविले, पहिल्यापासून ज्या खेळांत शाळेला म्हणण्यासारखें यश लाभलें नव्हतें, त्या खेळांत उत्तम प्रतीचें यश मिळविलें. या सगळ्या प्रतापाचा परिणाम एकंदर शाळेच्या विद्यार्थ्यांवरहि स्वाभाविक झालाच. त्यांचा उत्साह वाढला, शरीरविकासाचें महत्त्व त्यांच्या मनांत बिंबलें, ईर्षा, हौस व महत्त्वाकांक्षा ह्यांचीं सुप्त बीजें वाढूं लागलीं व परिणामतः त्यांच्या शरिराचा चांगला विकास होऊन त्याचा परिणाम त्यांच्या बौद्धिक विकासावर झाला.

या साऱ्या स्थित्यंतरांचें कारण काय बरें? दक्षतेच्या, कळकळीच्या, पद्धतशीर व शास्त्रोक्त उद्योगाच्या पोटीं यशाचा जन्म हा होतोच, हा निसर्गनियम आहे. त्या नियमानें हें स्थित्यंतर झालें. पूर्वी शाळेकडून एकंदर लहानमोठ्या खेळांच्या बाबतींत असा उद्योग फारसा झालाच नव्हता. कांहीं सांघिक खेळांच्या शिक्षणाची योग्य व्यवस्था मात्र झाली होती व जें पूर्वी यश लाभलें तें याच खेळांत लाभलें; पण ही उणीव याच तपांत भरून निघाली. लहानमोठ्या सगळ्या खेळांचें शास्त्रोक्त, पद्धतशीर, नियमित व आस्थेनें शिक्षण व्हावें याकरितां अभिज्ञ, दक्ष व आस्थावान् अशा शिक्षकांची योजना या काळांतच झाली. अशा रीतीनें सांघिक व वैयक्तिक खेळांच्या शिक्षणाची जी या काळांत तजवीज झाली, तिचींच परिपक्व फळें या तपांत शाळेला लाभलीं. याच तपाच्या शेवटच्या चार वर्षांत शाळेच्या व्यायामांगांचा योगक्षेम पाहण्याकरितां शाळेनें एक स्वतंत्र कारभारी-मंडळ नेमलें. त्यामुळें तर या अंगांचा प्रपंच विशेष सुसूत्र चालूं लागला. किं दूरं व्यवसायिनाम्। असो. आतां या तपाचें समालोचन:

१९२८ सालीं क्रिकेटच्या मोठ्या व धाकट्या संघांनीं शेवटच्या सामन्यांत विजयी होऊन 'ढाल' व 'कप' हीं दोन्ही विजयचिन्हें मिळविलीं. मोठ्या

संघाच्या अखंड विजयाचें हें ४ थें वर्ष व धाकट्याचें तिसरें वर्ष होय. क्रिकेट-ची ढाल सतत चार वर्षें पूर्वी कधींच मिळाली नव्हती; 'कप'हि सारखा तीन वर्षें मिळाला नव्हता. याच वर्षी हॉकीचा नवीन खेळ सुरू होऊन बऱ्याच मुलांना त्या खेळाचा ओढा लागला. टग–ऑफ–वॉरमध्यें पराभव झाला. किरकोळ खेळांत कांहीं विशेष हातीं लागलें नाहीं. १९२९ सालीं धाकट्या क्रिकेट संघाचा या वर्षी चौथ्यांदा विजय झाला. मोठा संघ पराभूत झाला. टग-ऑफ-वॉर-मध्यें यश आलें. हॉकीचा खेळ केवळ गेल्या वर्षीच जरी नवीन सुरू झाला होता, तरी या वर्षी तिचा संघ आंतरशालेय सामन्यांत विजयी होऊन शाळेला हॉकीची ढाल पहिल्यानें मिळाली. आजपर्यंत ती केवळ लष्करांतील शाळांचीच मिरास झाली होती. क्रिकेट, टग-ऑफ-वॉर यांचीं विजयचिन्हें जशीं आमच्याच शाळेनें पहिल्यानें गांवांत आणिलीं, तसेंच हॉकीचेंहि विजयचिन्ह गांवांत पहिल्यानें आणण्याचें श्रेय आमच्या शाळेनेंच मिळविलें. १९३० सालीं धाकट्या क्रिकेट संघानें आपल्या यशानें 'कप' सारखा पांचदां मिळविला. हॉकीसंघाचा उपान्त्य सामन्यांत पराभव झाला. याच वर्षी डेक्कन जिमखान्यानें टिळक फुटबॉल शील्डकरितां जे सामने केले, त्यांत शाळेचा संघ विजयी होऊन शाळेला ती ढाल मिळाली. पूना स्कूल्स ॲथ्लेटिक असोसिएशनच्या किरकोळ खेळांच्या आंतरशालेय सामन्यांत या वर्षी आमच्या शाळेला एकंदर गुणांत दुसरा क्रमांक मिळाला. असा मान मिळविण्याचें हें पहिलेंच वर्ष होय. १९३१ सालीं धाकट्या क्रिकेट संघानें आपल्या विजयाची अखंड ६वी आवृत्ति केली. टग-ऑफ-वॉरचा संघहि यशस्वी झाला. आणि किरकोळ खेळांच्या आंतरशालेय स्पर्धेत आमची शाळा गुणांनीं श्रेष्ठस्थानीं बसली. या स्थानाचा मान शाळेला हा प्रथमच मिळाला. १९३२ सालीं धाकट्या क्रिकेट संघानें विजयी होऊन आपल्या यशोमालिकेंत ७ वें विजयपुष्प हारीनें ओविलें. किरकोळ खेळांतहि शाळा विशेष तेजानें चमकली. ठाणें रिक्रिएशन गोल्ड मेडलकरितां या वर्षी डेक्कन जिमखान्यानें मॅराथॉन रेस घडवून आणिली; तींत आमच्या शाळेचा एस्. बी. केदारी हा पहिला व बी. डी. भोसले हा तिसरा आला. त्याच दिवशीं एक मैलाची फ्लॅट रेस झाली. तींत वरील दोन्ही विद्यार्थी अनुक्रमें पहिल्या व तिसऱ्या क्रमांकांत आले. हॉकी संघाचा शेवटच्या सामन्यांत पराभव झाला. किरकोळ खेळांत

शाळेनें १० मेडल्स मिळविलीं. त्यामुळें एकंदर गुणांत ती दुसऱ्या स्थानीं बसली. शिवाजी-जयंती-समितीनें या वर्षी वनसंचार-स्पर्धा आंखली. तींत शाळेचा विद्यार्थी केदारी हा पहिला आला. क्रिकेटचा मोठा संघ व रस्सीखेंच-संघ पराभूत झाले. १९३३ सालीं प्लेगमुळें आंतरशालेय सांघिक सामने झालेच नाहींत. किरकोळ खेळ मात्र होऊन त्यांत शाळेला फक्त कांहीं पदकें मिळालीं. १९३४ सालीं क्रिकेटचे दोन्ही संघ अपयशी झाले. हॉकींतहि यश आलें नाहीं. टग-ऑफ-वॉरमध्यें मात्र जय मिळाला. विरुद्ध बाजूला शिवाजी मिलिटरी स्कूलचा संघ असून तो वजनदार, जोरकस, सकस व मोठा सराइत, लढाऊ होता; म्हणून या जयाचें महत्त्व विशेष. १९३५ सालीं दोन्ही क्रिकेटसंघ शेवटच्या सामन्यांत पराभूत झाले. मोठ्या संघाला ॲसोसिएशनचा 'रनर-अप कप' मिळाला. फुट बॉल-संघानें डेक्कन जिमखान्यामार्फत झालेल्या सामन्यांत टिळक शील्ड मिळविलें. १९३६ सालीं क्रिकेटच्या दोन्ही संघांची तयारी उत्तम प्रतीची असूनहि त्यांचा पराभव झाला. हॉकींतहि पराभव झाला. फुट बॉलचा संघहि तसाच पराभूत झाला. टग-ऑफ-वॉरच्या शेवटच्या सामन्यांत अपयश आलें. किरकोळ खेळांत ४-५ बक्षिसें मिळालीं. शाळेचे वार्षिक सामने झाले. त्यांत ४८० मुलें मोठ्या उत्साहानें सामील झालीं होतीं. विशेष म्हणजे हें कीं, मुलींचेहि सामने पहिल्यानेंच होऊन त्यांत १७५ मुली सामील झाल्या होत्या. मुलांमुलींनीं चांगलें नैपुण्य दाखविलें.

१९३७ सालीं क्रिकेटच्या मोठ्या व धाकट्या संघांनीं यश मिळविलें. हॉकीचा संघ पराभूत झाला. फुट बॉलचा संघ उपान्त्य सामन्यांत अयशस्वी झाला. टग-ऑफ-वारचा संघ पहिल्याच फेरींत पराभूत झाला. किरकोळ खेळांत ३-४ बक्षिसें मिळालीं. पोहण्याच्या शर्यतींत शाळेचीं तीन मुलें दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या क्रमांकांत आलीं. शाळेचे वार्षिक सामने झाले. त्यांत सामील झालेल्या मुलांमुलींची संख्या बरीच वाढली होती. दोघांचाहि उत्साह दांडगा होता. फुट बॉलच्या खेळाला उत्तेजन मिळावें म्हणून शाळेनें या वर्षी आपल्या शाळेपुरती एक ढाल ठेविली. मुलींकरितां या वर्षी आंतरशालेय सामने सुरू होऊन त्यांत शाळेच्या ३५ मुलींनीं भाग घेतला. या सामन्यांमुळें मुलींचें खेळांकडे विशेषच लक्ष लागलें. १९३८ सालीं क्रिकेटचे दोन्ही संघ पराभूत झाले. फुट बॉलचा संघ आंतरशालेय सामन्यांत, डेक्कन जिमखान्याच्या 'टिळक

ढाल'च्या सामन्यांत व लीगतर्फे झालेल्या सामन्यांत यशस्वी झाला. म्हणजे त्यानें या वर्षी तीन विजयचिन्हें जिंकलीं. हॉकी संघाचा उपान्त्य सामन्यांत पराभव झाला. तसाच पराभव टग-ऑफ-वॉरच्या संघाचा झाला. किरकोळ खेळांत कांहीं म्हणण्यासारखें हातीं लागलें नाहीं. या वर्षी व्हॉली बॉलच्या सामन्यांत शाळेनें भाग घेतला; पण शेवटीं यश आलें नाहीं. टेनिकॉइट हा खेळ नवीन सुरू केला. तसेंच बॅडमिंटनहि नवीन सुरू होऊन त्यांत शिक्षक व विद्यार्थि खेळूं लागले. १९३९ सालीं क्रिकेटचे दोन्ही संघ पराभूत झाले. हॉकीचे सामने अद्याप झाले नाहींत. फुट बॉलचे सामनेहि अद्याप झाले नसून त्यांची तयारी जोरांत सुरू आहे. शाळेचा संघ चांगला तयारींत आहे. टग-ऑफ-वॉरचे सामने व किरकोळ खेळांचे सामने या वर्षी अद्याप झाले नाहींत. अशा रीतीनें या तपाचें थोडक्यांत समालोचन संपलें.

**उपसंहारः**—शाळेला आज साठ वर्षें जरी पुरीं झालीं असलीं, तरी पहिलीं २१ वर्षें तिच्या शरीरसंवर्धक उद्योगाला तशी व्यवस्थित कसोटी लागण्याचें साधन नव्हतें. १९०१ सालीं पूना स्कूल्स ॲथ्लेटिक ॲसोसिएशनच्या स्थापनेनें तसें साधन मिळाल्यामुळें या उपसंहारांत फक्त ३९ वर्षांचाच आढावा घेतला पाहिजे.

**१ क्रिकेट—मोठा संघः**—३९ वर्षांत मध्यंतरीं सात वर्षें शाळेनें ॲसोसिएशन सोडली होती व एक वर्ष मुळीं सामने झालेच नाहींत. बाकी राहिलेल्या ३१ वर्षांत शाळेनें **दहा वर्षें विजय-चिन्ह मिळविलें.**

**२ क्रिकेट—धाकटा संघः**—हा संघ पहिलीं सहा वर्षें सुरूच झाला नव्हता. शाळा सात वर्षें अलिप्त होती. एक वर्ष सामने झाले नाहींत. म्हणजे या संघाच्या सामन्यांत शाळेनें फक्त २५ वर्षें भाग घेतला. या २५ वर्षांत शाळेच्या संघानें **अकरा वेळां विजयचिन्ह मिळविलें.**

**३ फुट बॉलचा संघः**—हा खेळ शाळेंत १९२० सालींच सुरू झाला. तेव्हांपासून आजपर्यंतच्या वीस वर्षांत शाळेच्या संघानें **७ वर्षें विजयचिन्ह मिळविलें.**

**४ टग-ऑफ-वॉरचा संघ**—३९ वर्षांत सात वर्षें शाळा अलिप्त होती.

३२ वर्षें या खेळाच्या सामन्यात शाळेचें अंग होतें. तेवढ्या अवधींत शाळेच्या संघानें **फक्त सहा वेळा विजयचिन्ह मिळविलें.**

**५ हॉकी संघ**—हा खेळ शाळेंत पहिल्यानें १९२८ सालींच सुरू झाला. पुढील बारा वर्षांत **तो फक्त एकदांच यशस्वी झाला.**

**६ किरकोळ खेळ**—३२ वर्षांच्या अवधींत या खेळांत शाळेला नांव घेण्यासारखें यश **फक्त दोन वर्षेंच मिळालें.** १९३० सालीं ती एकंदर गुणांत **दुसरी** व १९३१ सालीं **पहिली** होती. बाकीच्या सालांत शाळेनें कधीं १-२ तर कधीं पांच-चार अशीं बक्षिसें मिळविलीं. एका सालीं मात्र तिला जास्त म्हणजे दहा बक्षिसें मिळालीं.

पोहणें, वनसंचार, फ्लॅट रेस, मॅराथॉन रेस यांतहि शाळेनें बरेंच यश मिळविलें.

---

# देशी खेळ

लेखकः—**कृष्णाजी गणेश वझे**

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचें न्यू इंग्लिश स्कूल ही संस्था आज तारीख १-१-१९४० या रोजीं आपल्या वयाचीं ६० वर्षें पुरीं करून ६१ व्या वर्षांत पदार्पण करीत आहे. अर्थात् या ६० वर्षांच्या कार्याचें सिंहावलोकन पुढें करावयाच्या कार्यास मार्गदर्शक होणारच. त्यांपैकीं प्रस्तुत लेखांत देशी व्यायाम व खेळ आणि त्यांचा प्रचार व प्रसार यांचाच विचार करावयाचा आहे.

शारीरिक शिक्षणाच्या देशी पद्धतीचें बीज याच शाळेंत रोवलें गेलें व आज सुदैवानें वाढीस लागलें आहे. या बीजाचें संगोपनकार्य आपल्या शाळेंतील शिक्षकवर्गापैकीं कै. दुल्लेखां, कै. गु. बाळकोबा पाठक व कै. वस्ताद महादबा काळे (तांबट), कै. वझे मास्तर, कै. ग. ब. दीक्षित, माजी शिक्षक रा. बापूसाहेब नगरकर, रा. ना. के. जोग, नवाजखां व आज संस्थेंत काम करणारे सर्व शिक्षक करीत आहेत.

या संस्थेच्या देशी खेळांच्या शाखेची सुरुवात जरी शाळेच्या सुरुवातीबरोबरच झालेली असली तरी कै. वझे मास्तर यांची जोड शाळेस लाभल्यानंतरच त्याला चांगलें स्वरूप येऊं लागलें. कै. वझे मास्तर यांनीं प्रथम शिक्षकवर्गांत व्यायामाची अभिरुचि उत्पन्न केली व नंतर विद्यार्थ्यांमध्यें त्याचा प्रसार केला. या बीजाचें रोपण प्रथम गद्रे वाड्यांतील अंगणांत होऊन त्याची परिणति कबूतरखान्याच्या खरेदींत व तेथील आधुनिक साधनांनीं युक्त व हवाशीर अशा आखाड्यांत झाली. कै. वझे मास्तर व कै. दीक्षित मास्तर यांच्या नेतृत्वाखालीं भटांची तालीम व नेनेघाट तालीम अशा दोन संस्था शहराच्या दक्षिण व उत्तर टोकास सुरू झाल्या. कै. दीक्षित मास्तर यांचा मर्दानी व भैदानी या दोन्ही खेळांवर विशेष भर असे. यामुळें न्यू इंग्लिश स्कूलचा विद्यार्थी त्याच्या बेडर वृत्तीनें कोठेंहि चटकन् ओळखला जाई. प्रो. के. रा. कानिटकर, श्री. बापूराव नगरकर व श्री. जोग मास्तर यांनीं मुलांना सोदाहरण आटापाट्यांचें

शिक्षण देऊन " वाळवंट क्लब "सारख्या निष्णात खेळाडू-संघास जन्म दिला. हें वाळवंट म्हणजे ॐकारेश्वराजवळील स्मशानभूमि होय.

अभिमानाची गोष्ट अशी कीं आज विद्यमान् व नांवारूपास आलेल्या डेक्कन जिमखाना, यंग मेन्स क्रिकेट क्लब, पी. वाय्. सी. जिमखाना या मोठ्या संस्थांची जन्मभूमि आपला कबूतरखाना आहे. देशी खेळांना चालना देणारे आणखीहि पुष्कळ संघ याच ठिकाणीं वेळोवेळीं स्थापन झाले. यांत एस्. एम्. सी. पूना स्पोर्ट्स्मेन, कबूतरखाना यूनियन, सन्मित्र संघ वगैरे प्रमुख होत.

यापुढील या बाबतींतील उपक्रम म्हणजे आट्यापाट्या, खोखो व पळण्याच्या शर्यती यांचे शाळेंतल्या शाळेंत सामने भरवून मुलांना पुस्तकें वगैरे बक्षिसादाखल देणें हा होय. याच पद्धतीवर १९०१ सालीं " पूना स्कूल्स ॲथ्लेटिक ॲसोसिएशन " स्थापन होऊन पुण्यांतील सर्व शाळांकरितां अशा तऱ्हेचे सामने भरविण्यांत येऊं लागले. तसेंच १९१० सालीं डेक्कन जिमखान्याचे विद्यमानें आंतरशालेय कुस्त्यांचे ( इलाखा ) सामने सुरू झाले व या सर्व सामन्यांत आपल्या शाळेच्या विद्यार्थ्यांनीं भाग घेऊन उत्तम यश संपादन केलें.

कै. वझे मास्तर यांचे नजरेखालीं जोंपर्यंत सर्व खेळांची बाब असे तोंपर्यंत या सर्व संघांतील घटकांना तालमींत यावेंच लागे; व माजी विद्यार्थिसुद्धां तालमींत आल्याशिवाय राहत नसत. प्रत्येकाच्या व्यायामाची चौकशी कै. वझे मास्तर पितृवात्सल्यानें करीत असत.

देशी खेळांच्या प्रसारामुळें शिमग्यांतील बीभत्स प्रकारांस पुष्कळच आळा बसला. याचमुळें ' शिमगा स्पोर्ट्स ' या नांवाखालीं धुळवडीच्या दिवशीं सर्व मुलांना शाळेंत बोलावून त्यांची मातींत खेळण्याची हौस तालमींतील मातींत लोळवून पुरी केली जाऊं लागली.

यानंतर १९२५ चे सुमारास " हनुमज्जयंतीउत्सव " सुरू झाला व त्यामध्यें आज इतरत्र सर्व ठिकाणीं दृष्टीस पडणारे खेळ ' मल्लखांब, वजन उचलणें, गोळाफेकणें, सांघिक लाठी, लेझीम इत्यादि' खेळांचें प्रदर्शन होत असे व या वेळीं मागें बंद झालेले विद्यमान आजी व माजी विद्यार्थि, पालकवर्ग व नामांकित रहिवासी या सर्वांचें सहकार्य असे. पुढें १९३२ सालीं हे उत्सव बंद पडले.

शाळा म्हणजे शिक्षक व विद्यार्थिवर्ग यांच्या सहकार्यानें चालणारी संस्था असल्यामुळें अशा सहकारी विद्यार्थ्यांचा नामनिर्देश न करणें चुकीचें होईल. म्हणून तो करून हा लेख संपवितों.

श्री. दातार मास्तर तर या सर्व कार्याचा भार शिरावर घेऊन आजतागायत काम करीतच आहेत. परंतु प्रारंभीं आट्यापाट्या, खो-खो इत्यादिकांत पुढाकार घेणारे श्री. कुशाभाऊ, कै. गोविंदराव व कै. केशवराव हे छत्रेबंधू, बन्याबापू व तात्या साठे यांनीं हें काम शिक्षकांच्या अभावींहि उत्तम तऱ्हेनें केलें. त्यानंतर रामभाऊ नेने, राजाभाऊ लिमये इत्यादि मंडळींनीं उपर्युक्त रा. जोग व नगरकर यांच्या नेतृत्वाखालीं तेंच काम केलें. कुस्त्यांचे सामने सुरू झाल्यावर कै. वझे मास्तर यांचे नेतृत्वाखालीं, गोविंदराव आवटे, गोविंदराव बुटे, बोराडे, दुगल इत्यादींनीं शाळेच्या यशांत भर घातली. तसेंच मोरे, हरिभाऊ छत्रे, मेहेंदळे बंधू, नारवेलकर, इत्यादि विद्यार्थ्यांनीं स्थानिक 'अवर डे'सारख्या प्रसंगीं व बाहेर–हिंदविजय जिमखाना बडोदे, येथें जाऊन दातार मास्तरांचे नेतृत्वाखालीं, शाळेच्या यशोदुंदुभि दुमदुमविल्या. शिक्षणांत हौद्यांतील कुस्ती ही वैय्यक्तिक बाब सांघिक स्वरूपांत शिकविण्याचा मान श्री. दातार मास्तर यांनीं सहकाऱ्यांच्या अपेक्षेनें मिळविण्याचा विचार केलेला आहे. हेंहि कार्य आपलीच शाळा प्रथम करणार आहे. हें अभिमानास्पद होय.

एकंदरींत गेल्या साठ वर्षांत इतकी प्रगति आपल्या मातृसंस्थेनें करून यापुढें प्रगति करण्याकरितांच ६१ व्या वर्षांत ती पदार्पण करीत आहे. आपण माजी विद्यार्थि आपल्या संस्थेची अशीच प्रगति होवो, अशीच इच्छा करणार. दुसरें काय ?

# गरीब विद्यार्थी साहाय्यक-मंडळ



न्यू इंग्लिश स्कूलमध्यें चालू असलेल्या विविध प्रकारच्या उपयुक्त कामांपैकीं 'पूअर बॉइज फंड' या संस्थेचें काम हें फारच उपयुक्त असें आहे. या संस्थेस आतां चांगलें स्वरूप येत चाललें आहे ही समाधानाची गोष्ट आहे.

'पूअर बॉइज फंड' या संस्थेची स्थापना सन १९०५–६ मध्यें झाली. 'पुण अनाथ विद्यार्थिगृह' या नांवानें पुण्यास कार्य करीत असलेल्या एका मोठ्या संस्थेचे कुलगुरु श्री. विष्णु गंगाधर ऊर्फ दादासाहेब केतकर हेच या 'पूअर बॉइज फंडा'चे मूळ उत्पादक होत. त्यांचें बालपण अत्यंत गरीबींत गेलें. मातोश्रींनीं स्वयंपाकादि मोलमजुरीचीं कष्टाचीं कामें करावीं व बंधूंनीं वार-मधुकरीचें साह्य घेऊन मुंबईस सर्व कुटुंबाचा उदरनिर्वाह जेमतेम भागवावा. अशा प्रकारें स्वतः गरिबीचे दिवस अनुभवल्यामुळें श्री. दादासाहेब केतकर यांनीं गरीब विद्यार्थ्यांसाठींच नाना प्रकारचे प्रयत्न अव्याहत चालू ठेविले व अखेर आपलें सर्व आयुष्य त्याच कार्यांत घालविलें. त्यांचें इंग्रजी चौथीचें शिक्षण मुंबईस 'रॉबर्ट मनी स्कूल'मध्यें व इंग्रजी पांचवीचें शिक्षण मुंबईच्या 'विल्सन हायस्कूल'मध्यें झालें. त्या काळांत वर्गांत लागणारीं एक्झरसाइझ बुकें स्वतः विकावीं व त्यांतील नफा गरीब विद्यार्थ्यांसाठीं त्यांनीं खर्च करावा. त्याचप्रमाणें वर्षअखेर नवीं-जुनीं पुस्तकें विकावयाचीं व त्यांचाहि नफा गरीब मुलांसाठीं उपयोगांत आणावयाचा असा श्री. केतकर यांचा उपक्रम होता. सन १९०५–६ सालीं इंग्रजी ६ वीच्या शिक्षणासाठीं श्री. केतकर हे पुण्यास न्यू इंग्लिश स्कूलमध्यें आले. कै० हरीभाऊ लिमये हे त्या वेळीं शाळेचे सुपरिंटेंडेंट होते. गरीब विद्यार्थ्यांसाठीं कांहीं तरी पद्धतशीर स्वरूपाचा प्रयत्न करावा अशी तळमळीची आपली कल्पना श्री. केतकर यांनीं कै. हरीभाऊ लिमये यांस सांगितली. कै. हरीभाऊंनींहि मोठ्या आनंदानें श्री. केतकर यांच्या कल्पनेस मूर्त स्वरूप देण्याचें ठरविलें. हाच या फंडाचा प्रारंभकाल होय.

**कार्यारंभ**—कै. हरीभाऊंचें प्रोत्साहन मिळाल्यानें श्री. केतकर यांनीं आपल्या कल्पनेस अधिक व्यापक स्वरूप देण्याचें ठरविलें. त्या काळीं पुण्यांत 'काबली'चें महत्त्व विशेष होतें. 'काबली'साठीं मुलांना मिळणाऱ्या पैशांतून पालकांच्या संमतीनें प्रत्येक विद्यार्थ्यानें वर्गाचे फीबरोबर एक पैसा वर्गशिक्षकां-जवळ द्यावा अशी सूचना व विनंति विद्यालयातर्फे जाहीर रीतीनें बोर्डावर लागली. अर्थात् या बाबतींत कोणतीच सक्ती नव्हती. परंतु अशा प्रकारें वर्गावर्गांतून पैसे जमवावे व ते गरीब विद्यार्थ्यांकरितां खर्च करावे, ही कल्पना फारच लोकप्रिय झाली. शाळेंतील शिक्षकमंडळींपैकीं श्री. ए. के. मुदलियार, श्री. व्ही. एस्. करंदीकर इत्यादि मंडळीहि त्याकडे अधिक सहानुभूतीनें पाहूं लागली. कै. प्रो. ज. वि. ओक, कै. प्रो. सी. के. दामले यांची स्वतःची व इतर शिक्षकमंडळींचीहि मदत या फंडास मिळूं लागली. अशा रीतीनें दरमहा साधारणपणें १५।१६ रुपये जमा होऊं लागले. श्री. केतकर यांच्या तत्कालीन स्नेही मंडळींपैकीं श्री. मुरलीधर विश्वनाथ गोरे (सध्यां वकील, कल्याण), श्री. बलवंत महादेव बापट (सध्यां हेडमास्तर, वसई), श्री. शंकरराव बर्वे, श्री. नानासाहेब मराठे इत्यादि मंडळी श्री. केतकर यांच्या या प्रयत्नाकडे अत्यंत आपुलकीनें व कौतुकानें पहात राहून त्यांस यथाशक्ति साहाय्य करीत असत.

अशा रीतीनें जमविण्यांत आलेली रक्कम ही शाळेंतील गरीब विद्यार्थ्यांचे फीचे मदतीसाठींच बहुधा उपयोगांत आणण्यांत येई. त्यासाठीं शाळेचे सुपरिंटेंडेंट यांजकडे रीतसर अर्ज करून विद्यार्थ्यांस मदतीची मागणी करावी लागे. अर्थात् त्या वेळीं इंग्रजी शिक्षणाचा आजच्यासारखा फारसा मोठ्या प्रमाणांत प्रचारहि नव्हता व फीची रक्कमहि आजच्यासारखी मोठी नव्हती. त्यामुळें फीचे अभावीं कुचंबणा झालेल्या विद्यार्थ्यांचें प्रमाणहि बेताचेंच असे व असे जे अडलेले विद्यार्थी असतील त्यांस या अल्प मदतीचाहि चांगला आधार वाटत असे.

हें काम पुढें स्वयंसेवकांनीं हातीं घेतलें व त्यांचे वतीनें काढलेलें स्टेशनरीचें दुकान चालू असून त्यांतून दरसाल फायदा मिळतो त्याचा विनियोग मदती-करितां चालू आहे.

# स्वयंसेवक-संघ



लेखक--**नारायण विनायक पेंडसे**

न्यू इंग्लिश स्कूलमधील विद्यार्थ्यांच्या वतीनें झालेल्या विविध चळवळीत 'व्हॉलंटियर्स यूनियन' म्हणजे 'स्वयंसेवक संघ' या संस्थेचा प्रामुख्यानें उल्लेख करणें अत्यावश्यक आहे. सन १९१५ सालीं ही संस्था स्थापन झाली. त्यानंतरच्या तीन वर्षांच्या कार्याचा संकलित वृत्तांत त्या वेळीं प्रसिद्ध करण्यांत आला आहे.

**संघाची योजना**—या 'स्वयंसेवक-संघा'चा इतिहास मोठा गमतीचा व बोधप्रद आहे. सन १९१५ च्या जून महिन्यांत शाळेच्या वादविवादोत्तेजक सभेमध्यें श्री. नारायण विनायक पेंडसे ( सध्यां पुणें अनाथ विद्यार्थिगृहाचे आजीव सेवक ) यांचें प्रो. व्ही. बी. नाईक यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. शाळेंतील अभ्यासक्रमाखेरीज इतर विविध प्रकारचीं कामें विद्यार्थी करूं शकतात. या कामांची पद्धतशीर रीतीनें योजना करावी व त्या योगें विद्यार्थ्यांच्या अंगच्या गुणांची वाढ करण्याचें साधन निर्माण करावें आणि अशा प्रकारचें उपयुक्त कार्य करीत असतां विद्यार्थ्यास सार्वजनिक कामाचें खरें शिक्षण मिळत राहून तो एक समाजोपयोगी घटक बनावा, अशा प्रकारची योजना पद्धतशीर रीतीनें करणें आवश्यक असून त्यासाठीं विद्यार्थ्यांचीच एक संघटना प्रत्येक शिक्षण-संस्थेंत असणें जरूरीचें आहे असें श्री. ना. वि. पेंडसे यांनीं आपले भाषणांत सांगितलें. सभेचे अध्यक्ष प्रो. नाईक यांनीं या योजनेस आपली पूर्ण संमति दिली व ही कल्पना मूर्त स्वरूपांत आणण्यासाठीं विद्यार्थ्यांची एक पोटकमिटी नेमण्यांत आली. श्री. ना. वि. पेंडसे, श्री. का. न. केळकर ( श्री. तात्यासाहेब केळकरांचे ज्येष्ठ चिरंजीव ), श्री. गो. आ. देशपांडे ( सध्यां कॉंग्रेसचे पुणें शहरांतील कार्यकर्ते ) या तिघांची कमिटी नेमण्यांत आली. या तिघांनीं मोठ्या मेहनतीनें लवकरच आपली तपशीलवार योजना पुढें मांडली. या योजनेंतूनच 'न्यू इंग्लिश स्कूल व्हॉलं-

टिअर्स यूनियन' अथवा 'स्वयंसेवक संघ' या संस्थेची स्थापना झाली. "निर-पेक्ष बुद्धीनें, एकजुटीनें व व्यवस्थितपणानें सत्कार्य करण्याची इच्छा, शक्ति व धैर्य हीं अंगीं यावीं व शाळेसंबंधाचें प्रेम व अभिमान हीं राष्ट्रकार्यास पोषक व्हावीं, याकरितां आपलें वय, ज्ञान व आवड यांस साजतील अशीं कामें अंगावर घेऊन करणें" असा व्यापक उद्देश–ध्येय–डोळ्यांपुढें ठेवून या संस्थेनें आपली घटना तयार केली. या संघाच्या कार्यकारी मंडळांत चौथ्या इयत्तेपासून सातवे इयत्तेपर्यंत प्रत्येक इयत्तेचा एक एक सभासद, वादविवादोत्तेजक सभेचे दोन चिटणीस, क्रीडांगणावरील खेळांच्या क्लबांचे निवडलेले ४ सभासद व सर्व स्वयंसेवकांनीं निवडलेले २ सभासद-मुख्य चिटणीस असें बारा सभासदांचें कार्य-कारी मंडळ निवडण्यांत आलें. संघाचा सभासद होण्यास शें. ४० गुण अगर खेळांत बक्षिस मिळवणें यांपैकीं एक गुण आवश्यक होता. निदान चार स्वयं-सेवकांनीं नांव सुचवून त्यास संघाच्या कार्यकारी मंडळाची संमति मिळवणें एवढें तरी प्रत्येक सभासदास आवश्यक असे. स्वयंसेवकानें सत्य, कर्तव्यपालन व शील यांकडे विशेष लक्ष पुरवावें. अशा प्रकारें स्वतःला व्रतस्थ समजून आचरण ठेवणें आवश्यक होतें. अशा प्रकारची कार्यकर्ती मंडळी संघटित झाल्यावर त्यांच्यासाठीं कामाच्या विविध योजनाहि आखण्यांत आल्या. या सर्व कामांचा वृत्तान्त लक्षांत घेतल्यास एक नमुनेदार कार्य या कालांत विद्यार्थ्यांनीं करून दाखविलें हें निर्विवाद दिसून येईल.

**संघाची कामगिरी**—'स्वयंसेवक संघा'नें विविध प्रकारचीं कामें अंगावर घेऊन तीं यशस्वी करून दाखविलीं. शाळेंत पूर्वीपासून चालत असलेल्या पूअर बॉइज फंडास–गरीब विद्यार्थी साहाय्यक फंडास निरनिराळ्या बाजूनें कसें साहाय्य करतां येईल याचा विचार करण्यांत आला. महायुद्धामध्यें जे हिंदी सैनिक लढत होते त्यांच्या मदतीकरितां ता. १२।१२।१९१७ हा दिवस **'अवर डे'** म्हणून पाळण्यांत आला. 'अवर डे' फंडास मदत करण्यासाठीं गांवांत निशाणें विकणें, रोख मदत जमा करणें व शाळेंतील मुलांचे खेळ करून त्यांचे द्वारा मदत मिळवणें हीं कामें विद्यार्थ्यांनीं केलीं. या 'अवर डे' चे निमित्तानें युद्धकर्जास मदत मिळविण्याची योजना करतांना गरीब विद्यार्थी साहाय्यक फंडाकडेहि लक्ष पुरविण्यांत आलें. या प्रसंगाच्या निमित्तानें १२४ रुपये गरीब विद्यार्थी फंडास मिळाले. त्याचप्रमाणें शाळेंतील

मुलांनीं रद्दी जमविली व तिची विक्री करून ४७॥ रुपये मिळविले. इतर ३॥ रुपयांची भर पडून १७५ रुपयांचें भांडवल विद्यार्थ्यांचे हातीं आलें.

मुलांस नेहमीं लागणाऱ्या वस्तु विकणें, पेपर वगैरे जिनसा गरीब मुलांकडून तयार करविणें, पिशव्या-लंगोट इत्यादि जिनसा शिवून विकणें, वगैरे कामें करण्याची योजना करण्यांत आली. ता. १ जून १९१७ पासून शाळेमध्यें एक **स्टेशनरी सामानाचें दुकान** काढून त्याचा फायदा गरीब विद्यार्थ्यांना देण्याचा विचार झाला. या दुकानामार्फतच वरील विविध प्रकारचीं कामें करून घेण्यांत येत असत. 'अवर डे'च्या निमित्तानें व रद्दी-विक्री करून मिळविण्यांत आलेल्या रकमेचा या दुकानास भांडवला-साठीं चांगला आधार मिळाला. एक वर्षाचे अवधींत रु. १३२ नफा या दुकानास मिळाला व त्यांतून रु. १०० गरीब विद्यार्थ्यांस मदतीदाखल देण्यांत आले. श्री. त्र्यं. वा. तळवलकर व इतर स्वयंसेवकांनीं या बाबतींत फारच परिश्रम घेतले. याच सुमारास **बुक एक्सचेंजिंग असोसिएशन** या नांवाची एक संस्था श्री. अ. र. काळे यांनीं सुरू केली व त्या संस्थेमार्फत गरीब विद्यार्थ्यांस जुनीं पुस्तकें वापरण्यास देण्याची चांगली सोय झाली. या योजनेचा बऱ्याच विद्यार्थ्यांस चांगला फायदा झाला. स्वतःला जरूर नसलेलीं पुस्तकें संघाच्या ताब्यांत द्यावीं व संघानें तीं गरजू विद्यार्थ्यांस वापरण्यास द्यावीं. अशा प्रकारच्या साहाय्यभूत होण्याच्या योजनेचा चांगलाच उपयोग झाला. शाळेचे संमेलन-प्रसंगीं मुलांचीं हस्ताक्षरें, हस्तलिखित मासिकें, नक्षीकाम, सुतारकाम, कागदी-काम इत्यादि विविध प्रकारच्या वस्तु व नाग, घोरपड यांसारखे जिवंत प्राणी व कांहीं शास्त्रीय यंत्रें एकत्र मांडून **प्रदर्शन** भरविण्यांत आलें. या प्रदर्शनास फी ठेवून त्याचें उत्पन्न रु. ३५ गरीब विद्यार्थी साहाय्यक फंडास संघातर्फे मिळालें. याखेरीज शाळेंत **मराठी ग्रंथसंग्रहालय** सुरू करून त्याची व्यवस्था ठेवणें, वर्गोवर्गांतून **हस्तलिखित मासिकांचा** व **हस्तलिखित वृत्तपत्रकांचा** प्रचार करणें, शाळेच्या **वार्षिक संमेलनाची** सर्व व्यवस्था अंगावर घेणें, शाळेच्या **क्रीडासभांचे** कार्यक्रम ठरवून त्यांत साहाय्य करणें, **नियमित व्यायामाचा** विद्यार्थीवर्गांत प्रचार करणें, शाळेच्या नित्य व्यवस्थेंत **वर्गाचा नियमितपणा व शिस्त** पाळण्यासाठीं शाळाधिकाऱ्यांस साहाय्य करणें, श्री. माटे यांच्या-सारख्या पूज्य गुरुजींची युद्धविषयक माहितीचीं **व्याख्यानें** करवून विद्यार्थ्यांचे

व्यापक ज्ञानांत भर घालणें, राष्ट्रीय विभूतींचे उत्सव घडवून आणून त्यांच्या कार्याबाबत विद्यार्थीवर्गास ओळख करून देणें इत्यादि अनेक कामें या संघातर्फे चालू असत.

हीं सर्व करण्यांत विद्यार्थी मोठ्या उत्साहानें भाग घेत असत. श्री. गो. शि. लिमये व श्री. श्री. वा. हंडे या चिटणिसांचे मदतीस श्री. गो. आ. देशपांडे, श्री. ना. वा. घांग्रेकर, श्री. शा. स. वागळे, श्री. मा. वा. रानडे, श्री. शं. अ. जोशी, श्री. देशमुख, श्री. वि. गो. गोखले, श्री. गो. त्र्यं. आठवले, श्री. गोडबोले, श्री. केळकर व श्री. प्र. ग. खरे, या निरनिराळ्या सभासदांनीं व इतर अनेक स्वयंसेवकांनीं मनोभावें साहाय्य केलें व त्यामुळेंच हीं कामें होऊं शकलीं.

शिक्षक--चालक मंडळींपैकीं प्रो. नाईक हे स्वतःच या कामीं प्रारंभापासून लक्ष घालीत असत. विद्यार्थ्यांनीं स्वतः संघटना करावी, कामांच्या योजना कराव्या व जबाबदारीचीं कामें अंगावर घेऊन तीं पार पाडावीं अशी त्यांची मना-पासून तळमळ असे. त्यामुळें ते वेळोवेळीं हरएक बाबतींत साहाय्य देत व विद्यार्थ्यांचा उत्साहभंग सहसा होणार नाहीं अशी काळजी घेत. त्याच-प्रमाणें प्रो. कुंभारे, कै. म. कृ. जोशी, श्री. माटे, श्री. जोग इत्यादि शिक्षक-मंडळींचेंहि संघाचें कामीं बहुमोल साहाय्य होत असे.

# नामवंत शिक्षक

अनेक विद्वान्, कर्तबगार, स्वार्थत्यागी शिक्षकांच्या साहाय्यानें या शाळेची स्थापना व वाढ झालेली आहे. केवळ ग्रंथकर्तृत्वानें ज्यांनीं आपलें नांव केलें आहे अशांची यादी केल्यास तीसुद्धां बरीच मोठी होईल. म्हणून संक्षेपानें खालील माहिती दिली आहे. प्रोफेसर असून शाळेंत शिकविणारे शिक्षक पहिल्यापासून पुष्कळ असत; पण त्यांचा उल्लेख येथें केला नाहीं.

१ रा. गो. र. नंदरगीकर ( १८८०–१९०२ ) संस्कृत शिक्षक, अनेक संस्कृत पुस्तकांचे संपादक. स्थापनेपासून शाळेंत शिक्षक होते.

२ रा. हरी कृष्ण दामले ( १८८०–१८९१ ) इंग्रजीचे शिक्षक–भाषांतर या विषयावर अनेक पुस्तकें लिहिलीं. १८९१ मध्यें दामले–चिपळूणकर बक्षिस मॅट्रिकमधील मराठींत पहिला येणाऱ्या विद्यार्थ्याला ठेविलें.

३ रा. ना. जि. बापट, गणित शिक्षक. अंकगणित, बीजगणित या विषयावर पुस्तकें लिहिलीं.

४ रा. गं. गो. दीक्षित ( १८८०–१९०५ ) ड्रिलचे शिक्षक.

५ रा. रा. भि. जोशी ( १८८१–१९१६ ) मराठीचे शिक्षक. 'मराठी व्याकरण' वगैरे अनेक पुस्तकांचे कर्ते.

६ रा. ग. स. वझे ( १८८६-१९१६ ) ड्रिल, तालीम, होस्टेल या बाबतींत अनेक कामें जबाबदारीनें केलीं आहेत.

७ रा. कृ. गो. ओक ( १८८८-१९०३ ) संकृत शिक्षक.

८ रा. म. पां. ओक ( १९०४-१९२६ ) संकृत शिक्षक.

९ रा. म. वि. साने ( १९०३-१९२४ ) न. म. शाळेचे हेडमास्तर, पुढें न्यू. इं. स्कूलमध्यें मराठी, शास्त्रें वगैरे विषय शिकवीत.

१० रा. द. कृ. जोशी. कांहीं काल पुण्याच्या शाळेंत काम केल्यावर साताऱ्यास न्यू. इं. स्कूल काढून तें १९०० सालीं डी. ई. सोसायटीकडे दिलें

११ रा. पु. ना. जोगळेकर—कांहीं काल शिक्षक. गद्रेवाडा खेरदी करण्याचें कामीं बरीच मदत केली.

१२ रा. के. रा. जोगळेकर ( १८८१-१८९१ ) रा. आपटे व प्रो. केळकर यांनीं पहिल्या काळांत फार मदत केली. कांहीं काळ शिक्षकाचें कामहि करीत होते.

१३ रा. कृ. के. दामले—सुप्रसिद्ध कवि "केशवसुत" कांहीं काळ शिक्षक होते.

१४ रा. वि. का. राजवाडे—सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक कांहीं काळ शिक्षक होते.

१५ रा. रा. ग. गडकरी—सुप्रसिद्ध नाटककार; कांहीं काळ शिक्षक.

सेवानिवृत्त किंवा विद्यमान शिक्षक यांविषयीं येथें उल्लेख केलेला नाहीं.

# कोष्टकें व आंकडे



## वयोमानाप्रमाणें उंची व वजन या विषयींचा तक्ता

### ही माहिती १९२९ मधील विद्यार्थी व विद्यार्थिनी यांच्याविषयींची आहे

| | विद्यार्थी | | विद्यार्थिनी | | |
|---|---|---|---|---|---|
| वय | उंची | वजन | उंची | वजन | शेरा |
| | फू. इं. | पौंड | फू. इं. | पौंड | |
| २२ | ५–६·२ | १०८·८ | ५–१·० | ८८·३ | |
| २१ | ५–६·५ | १२७·९ | ५–३·० | ९०·५ | |
| २० | ५–६·१ | १२३·३ | ५–०·३ | ८४ | |
| १९ | ५–४·५ | १०६·६ | ५–२·० | १०८·५ | |
| १८ | ५–४·० | १०३·९ | ५–३·० | १०८·४ | |
| १७ | ५–४·१ | १०३·६ | ५–०·४ | ९३·३ | |
| १६ | ५–३·८ | ९३·६ | ४-११·० | ८४·७ | |
| १५ | ५–०·९ | ८३·९ | ४–९·५ | ७५·५ | |
| १४ | ४-११·१ | ७९·९ | ४-१०·० | ७५–१ | |
| १३ | ४–८·७ | ७१·२ | ४–६·९ | ६६·५ | |
| १२ | ४–६ ९ | ६४·५ | ४–६·९ | ६३·५ | |
| ११ | ४–५·३ | ६९·१ | ४–२·७ | ५५·६ | |
| १० | ४–२·५ | ५६·७ | ४–०·३ | ५० | |

**गरीब व होतकरू विद्यार्थ्यांना शाळेनें चालविलेल्या पूअर बॉइज़ स्टोअर्सकडून सालोसाल दिलेली मदत दर्शविणारा तक्ता.**

| वर्ष | | रक्कम |
|---|---|---|
| १९२७–२८ | रु. | १६५–११–० |
| १९२८–२९ | ,, | १७९—०–० |
| १९२९–३० | ,, | १८५—२–६ |
| १९३०–३१ | ,, | २१०—८–६ |
| १९३१–३२ | ,, | १५५–१२–६ |
| १९३२–३३ | ,, | १५२—४–९ |
| १९३३–३४ | ,, | ३२६–१५–३ |
| १९३४–३५ | ,, | ६०३–१५–६ |
| १९३५–३६ | ,, | ४६३—४–३ |
| १९३६–३७ | ,, | ४६४–१२–० |
| १९३७–३८ | ,, | ३२६—९–० |
| १९३८–३९ | ,, | ५१७—४–० |

**टीपः**— पूअर बॉईज असोसिएशन ही संस्था सन १९१६–१७ या वर्षी स्थापन झाली व १९२० सालापर्यंत व्हॉलंटिअर्स यूनिअनकडे तिची व्यवस्था सोंपविलेली होती.

## ( २ ) पगारांचें प्रमाण

### ( अ ) आजीव सेवक

१८८०—दरमहा रु. ४०.

१८८६—दरमहा रु. ७५.

१९०२— ७५–५/३–१००.

१९११— १००–५/३–१२५.

**१९१८** दरमहा २५ टक्के जादा पगार सुरू करण्यांत आला.

**१९२०** जादा पगार २५ टक्क्यांवरून ४० टक्के करण्यांत आला.

**१९०२** सालापासून आजीव सेवकांनां त्रैवार्षिक पांच रुपयांची वाढ खाजगी निधीकडे ( Private fund ) देण्यास सुरुवात केली.

## ( ब ) शिक्षक

कायम शिक्षकांच्या पगाराचें नियमित प्रमाण १९१२ सालीं प्रथम सुरू करण्यांत आलें. त्याच योग्यतेच्या इतर शिक्षकांच्या पगारांची सुरुवात सदरहू-प्रमाणेंच होत असे, पण त्यांना कायम शिक्षकांच्या ⅔ प्रमाणांत बढती मिळे.

| | |
|---|---|
| मॅट्रिक | रु. २० ते ३०. |
| पी. ई. | ,, २५ ते ४५. |
| आय. ई. | ,, ३० ते ५०. |
| बी. ए. अगर बी. एस्सी. | ,, ४० ते ६०. |
| एम्. ए. | ,, ५० ते ७५. |
| ड्रॉइंगची दुसरी परीक्षा | ,, १५ ते ३०. |
| ड्रॉइंगची तिसरी परीक्षा | ,, २० ते ४०. |
| टीचर्स सर्टिफिकेट | ,, २५ ते ४५. |
| कवायत शिक्षक | ,, १० ते १५. |
| क्वालिफाइड कवायत शिक्षक | ,, १५ ते ३०. |

शाळेंत होणारी शैक्षणिक परीक्षा पास होणाऱ्या शिक्षकांस विश्वविद्यालयीन तीच परीक्षा पास झालेल्या परंतु शैक्षणिक परीक्षा न झालेल्या शिक्षकांपेक्षां दरमहा रुपये पांच अधिक मिळत असत. एस्. टी. सी. झालेल्या शिक्षकांस त्या परीक्षेबद्दल दहा रुपये जादा पगार मिळे. मॅट्रिक असून एस्. टी. सी. झाल्यास १० च्या ऐवजीं १५ रुपये बढती मिळे. नंतर १९२० सालीं विशिष्ट शैक्षणिक परीक्षेच्या बढतींत कांहीं सुधारणा करण्यांत येऊन बी. टी. परीक्षेची पगारवाढ रु. १५ ठरविण्यांत आली.

| | | |
|---|---|---|
| व्हर्न्याक्युलर फायनल | — रु. २० ते २५ | मुदत २० वर्षें. |
| प्रथम वर्ष ट्रेनिंग | — रु. २५ ते ४० | ,, ,, |
| द्वितीय वर्ष ट्रेनिंग | — रु. ३० ते ५० | ,, ,, |
| तृतीय वर्ष ट्रेनिंग | — रु. ४० ते ६० | ,, ,, |

१९१८ सालीं लढाईमुळें २५ टक्के महागाई भत्ता सुरू करण्यांत येऊन त्याच वर्षी तो शेंकडा ४० करण्यांत येऊन कायम स्वरूपाचा करण्यांत आला.

१ जून १९३४ नंतर नेमलेल्या कायम शिक्षकांच्या पगारांचें नवीन खालील-प्रमाणें प्रमाण ठरविण्यांत आलें, व ते चालू आहे.

| | |
|---|---|
| मॅट्रिक, एस्. टी. सी. | २५–४/३–५० |
| पी. ई., एस्. टी. सी. | ३०–४/३–५५ |
| आय्. ई., एस्. टी. सी. | ३५–५/३–७० |
| बी. ए., एस्. टी. सी. | ५०–६/३–९५ |
| बी. ए., बी. टी. | ५५–७/३–१०० |
| एम्. ए., एस्. टी. सी. | ५५–७/३–१०० |
| एम्. ए., बी. टी. | ६०–७/३–१०५. |

शैक्षणिक परीक्षा झालेल्या इतर शिक्षकांच्या पगाराची सुरुवात त्याच पगारावर होऊन त्यांना सदर्हू प्रमाणाच्या २/३ बढती मिळते.

### ( क ) शैक्षणिक परीक्षा न झालेल्या शिक्षकांच्या पगाराचें प्रमाण

| | |
|---|---|
| मॅट्रिक | रु. २०. |
| पी. इ. | ,, २५. |
| आय्. ई, किंवा आय्. एस्सी. | ,, ३०. |
| बी. ए. किंवा बी. एस्सी. | ,, ४५. |
| एम् ए. किंवा एम्. एस्सी. | ,, ५०. |

## ( ३ ) पुण्याचे व पुण्याबाहेरून शाळेला येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या संख्येचा तक्ता

| वर्ष | पुणें येथील विद्यार्थि | पुण्याबाहेरील विद्यार्थि | एकूण विद्यार्थि |
|---|---|---|---|
| १८९० | ६०५ | ४४७ | १०५२ |
| १८९६ | ५६१ | ४२९ | ९९० |
| १९१० | ७०१ | ४३७ | ११३८ |
| १९२० | ९८५ | ५०५ | १४९० |
| १९३० | १४२७ | ४९७ | १९२४ |
| १९३९ | १५६२ | ३८२ | १९४४ |

## कांहीं माहितीचे आंकडे

( १ ) **शिक्षकांची संख्या** १८८० या पहिल्या वर्षांत सहा शिक्षक होते, १८९१ मध्यें ४९, १९०० मध्यें २५, १९१० मध्यें ५८, १९२० मध्यें ६०, १९३० मध्यें ६४, १९३९ मध्यें ७९ असें शिक्षकांचें संख्या-प्रमाण आहे.

( २ ) **शैक्षणिक दर्जा** —हल्लींच्या ७९ शिक्षकांपैकीं १ टी. डी., १९ बी. टी., ३१ एस्. टी. सी., ११ शास्त्री वगैरे विशेष तज्ज्ञ शिक्षक, ४ मराठी थर्ड इयर ट्रेन्ड शिक्षक, बाकीचे शिक्षक कांहीं जुने अनुभविक व कांहीं नवीन शिक्षणाच्या परीक्षेला बसणारे आहेत.

( ३ ) **सरकारी मदत**—१८८० मध्यें म्युनिसिपालिटीकडून रु. ९५० व सरकारकडून ७७६२ रु. मदत मिळाली. १९१४ मध्यें १३८६३ रु. ग्रँट मिळाली. १९२७ ते ३१ पर्यंत रु. २१७००२ ग्रँट मिळत असे. त्यानंतर सरकारी मदतीचें मान कमी होत जाऊन गेल्या वर्षी रु. १७००० मदत मिळाली.

## विद्यार्थ्यांविषयींच्या माहितीचे आंकडे

( १ ) **संख्या**—१८८४ मध्यें ४८६, १८९०मध्यें ९४१, १९०० मध्यें २४४, १९१० मध्यें ११०८, १९२० मध्यें १४४२, १९३० मध्यें १८८७, १९३९ मध्यें १९४० असें संख्येचें प्रमाण आहे. लग्न झालेल्या विद्यार्थ्यांची संख्या १८८४ मध्यें ४८६ सनमध्यें ४३१ होती. सन १८९६ पासून हें प्रमाण कमी होत गेलें. आज १९३९ मध्यें फक्त १३ च लग्न झालेले विद्यार्थी आहेत.

( २ ) **वयोमान**—१८८४ मध्यें पहिल्या इयत्तेचे सरासरी वयमान १४·४ होतें तें पुढें १८९० पासून केव्हां १२, केव्हां १३ असें आहे. आज पहिलीचें वयोमान ११·७ आहे. सातवींतील विद्यार्थ्यांचें वयोमान आरंभीं १८ किंवा १९ असे. आज १७·५ आहे.

( ३ ) **फी**—१८८० ते १८९४ इ. १ ली ची फी दरमहा आणे १२ असे व सातवीची फी रु. २ असे. १९१२ नंतर फीची वाढ होत गेली. आज पहिलीची फी रु. २॥ व सातवीची रु. ४॥ आहे. जिमखाना फी व ड्रॉइंग या विषयींची सहामाहीची फी वेगळी घेण्यांत येते.

(४) **गरीब विद्यार्थ्यांस मदत**:–शिक्षकांच्या प्रयत्नानें गरीब विद्यार्थ्यांना मदत देण्याकरितां कांहीं तात्पुरता निधि जमा करण्याचें काम बरींच वर्षे होत असे. या कामीं संघटित प्रयत्न १९२७-२८ मध्यें एक स्टेशनरीचें दुकान काढून सुरू केला. त्या द्वारे फायद्यांतून रु. १६५ ची मदत त्या सालीं दिली. आज ही रक्कम रु. ६०० पर्यंत दरसाल देण्यांत येतें. नादारी वगैरेची वेगळी सोय असते, गरीब विद्यार्थ्यांना मदत देण्याकरितां वेगळ्या कायम देणग्या आहेत. त्यांचे व्याजांतून दरसाल अजमासें रु. ५०० ची मदत देण्यांत येतें.

(५) **मॅट्रिकचे निकाल**:—सन १८८० मध्यें १२ विद्यार्थी बसले, पैकीं ८ उत्तीर्ण झाले; १९०० मध्यें ६२ पैकीं ३२, १९३१ मध्यें २३२ पैकीं २०४, १९३९ मध्यें ३१३ पैकीं १९९ पास झाले.